ॐ

॥ नमो नागनाथाय ॥

# मोक्षमार्गप्रदीप.

हा ग्रंथ

ईश्वरप्रेरणानुसार भीमावधूत यानें

तयार करून

पुणें पेठ शनिवार मेहूणपुरा येथें, रावजी श्रीधर गोंधळेकर यांचे

" जगद्धितेच्छु " छापखान्यांत छापून

मुमुक्षुजनहितार्थ प्रसिद्ध केला.

राजविद्याराजगुह्यं पवित्रमिदमुत्तमम् ॥
प्रत्यक्षावगमंधर्म्यं सुसुखंकर्तुमव्ययम् ॥

(अ. गीता.)

शकाब्दः १८२

किंमत २ रुपये.



॥ ॐ नमो नारायणाय ॥

# उपोद्घात.

कृत, त्रेता, द्वापार व कली ह्या चोहोंपैकीं जें द्वापार त्या युगाच्या समाप्तीस सुमारास पराशर ऋषींपासून सत्यवतीच्या उदरीं भगवान् श्रीवेदव्यास हे जन्मास आले! त्या प्रभूंनीं प्रथमतः अठरा पुराणें रचिलीं, तरी देखील चित्ताचें समाधान झालें नाहीं. हें पाहून त्यांनीं ब्रह्मदेवाचे मानस पुत्र जे नारद मुनी त्यांस त्याचें कारण विचारिलें. तेव्हां त्या मुनीश्वरांनीं सांगितलें कीं, "ज्यामध्यें श्रीभगवन्नामसंकीर्तनाचें संपूर्ण वर्णन आहे, असें शास्त्र रचण्याचें राहून गेल्यामुळें तुझ्या चित्ताची शांति झाली नाहीं; याकरितां ज्या योगें कृतकृत्यतेची प्राप्ति होईल असा एखादा ग्रंथ निर्माण कर." मग श्रीवेदव्यासांनीं मोक्षसाधनांनीं युक्त श्रीकृष्णलीलामृतपूरित श्रीमद्भागवत नामक पुराण रचिलें; तेव्हां त्यांच्या चित्तास उत्तम शांतिसुख मिळालें. पुढें त्या परमदयाळु श्रीवेदव्यासांनीं भेदबुद्धिनिवृत्तीसाठीं तें भागवत आपले पुत्र श्रीशुकाचार्य यांस पढविलें. त्या समर्थांनीं राजाधिराज जो परीक्षिति त्यास तें ऐकविलें. त्याच्या श्रवणमननादिकांनीं तो राजा सात दिवसांत उद्धरून गेला! तर मग त्या ग्रंथाचा महिमा किती अगाध असावा बरें! हा ग्रंथ ह्मणजे केवळ कैवल्याचा मार्ग दाखविणारा व कृतकृत्य करणारा होय. अशा त्या परमोत्तम ग्रंथांतील श्रेष्ठ व कल्याणकारक जी अध्यात्मविद्या ती

संपादून घेण्याकडे अवधान ठेवून त्याविषयीं परम पुरुषार्थ करणें हेंच मानव जन्मीं आल्याचें सार्थक होय. पण कलिप्रभावानें सर्व प्रजा निर्वीर्य व मंदबुद्धि निपजली असल्यामुळें गहन अशा वेदांत विषयाचें ज्ञान करून घेण्यास ती समर्थ नाहीं; म्हणून तीस दुःखरूप संसार भोगावा लागतो. असें जाणून परम कृपाळू अनुभवज्ञ सत्पुरुषांनीं "जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टविती परोपरी ॥" ह्या तुकाराम महाराजांच्या उक्त्यनुरूप लोककल्याणासाठीं आपले देह झिजवून, अनेक अध्यात्म ग्रंथ रचिलेले आहेत; व त्यांपासून आत्मज्ञानाची प्राप्ति करून घेतां येत असल्यामुळें प्रस्तुत ग्रंथाची अवश्यकता नव्हती ही गोष्ट खरी; तथापि एका कलशांतलें अमृत प्राशन करीत असतां जसें दुसऱ्या पात्रांतील अमृताची इच्छा असते; तद्वत् एका ग्रंथांतलें ज्ञानामृत सेवन करीत असून दुसऱ्या ग्रंथाच्या परिशीलनेची हाव असणें साहजीक होय. ह्यास्तव अवधूतानें त्या परमश्रेष्ठ श्रीमद्भागवत ग्रंथांतील स्कंध अध्याय व श्लोक ह्यांचा क्रमांक प्रत्येक अध्यायाच्या शिरोभागावर देऊन त्या त्या स्थलांचे विषय निराळे करून सोप्या भाषेमध्यें, गोष्टींच्या रूपानें यथामति हा प्रकरणप्रतिपादित ग्रंथ तयार केला आहे.

ह्या ग्रंथाचा उद्देश, परमानंदरूप मोक्ष सफल होण्याकरितां विचार करावीं लागणारीं नाना प्रकारचीं साधनें. व तीं ज्या मुख्य तत्त्वावर अवलंबून असतात तें ज्ञान स्पष्ट करणें हा होय. ह्मणून त्यांत भूमिकाक्रमानें वैराग्यादि चार प्रकरणांची योजना केली आहे; आणि त्या प्रकरणांतील विषयांचीं सुलभ रीतीनें समज होण्याकरितां त्यांचे अनेक अध्याय पाडून त्या प्रत्येक अध्यायाचेही बरेच विभाग केलेले आहेत. त्या सर्व विभागांत सांगितलेल्या गोष्टींचा अल्प आयासानें समज व्हावा, ह्मणून प्रत्येक विभागाच्या शिरोभागावर प्रथम त्याचा सारांश,

नंतर जागजागीं त्यावर दृष्टांत व द्राष्टांत देऊन त्यांच्या खालीं भरपूर व सार्थ टीपांचीही योजना केली आहे. ह्यांतील कठिण शब्दांची माहिती व्हावी, ह्मणून त्याच्या शेवटीं वेदांतपदार्थमंज्ञा अथवा लघुवेदांत कोश दिला आहे. एतावता उक्त चतुर्विध प्रकरणरूपी मोक्षमंदिराच्या सोपानाची रचना अशी आहे कीं. "वैराग्या" पासून इहपर लोकसंबंधीं विषयवासना नाश पावल्यावर "भक्ती"च्या योगें अंतःकरणशुद्धिरूपी पायरीवर आरोहण होतें; आणि "योगा"नें चित्तवृत्तींची निवृत्ति व चित्तैकाग्रतेची प्राप्ति झाल्यावर "ज्ञान"द्वारें असंभावना विपरीतभावनारूप आवरण दूर होऊन मोक्षमंदिरांत सहज प्रवेश करतां येतो.

हा अवधूत छांदोग्यादि श्रुतींचा अर्थवेत्ता नसून साधारण मुमुक्षूसारखा मंदमतिमान् आहे. यामुळें गहन अशा वेदांत विषयाचें स्पष्टपणें प्रतिपादन करण्यास जरी तो असमर्थ आहे, तरी ज्यानें हृदयगुहेंत स्थित होऊन हा ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा केली, आणि त्याची निर्विघ्नपणें परिसमाप्ति करविली, त्या अनिवार मायामोहाचें निरसन करणाऱ्या व अप्राप्य वस्तु प्राप्त करून देऊन त्याचें संरक्षण करणाऱ्या परमेश्वराला; तसेंच सूत्रकार श्रीवेदव्यास व भाष्यकार श्रीमच्छंकराचार्य आणि महावाक्योपदेशक श्रीमद्गुरु नागनार्य ह्या सर्वांच्या चरणकमलीं अत्यंत नम्रतापूर्वक मस्तक ठेवून दंडवत् प्रणाम करतों; आणि हा ग्रंथही त्यांच्याच पादपद्मीं समर्पितों. ह्यांत भाषानभिज्ञतेमुळें बरेच दोष राहिले असतील, तर "हंसोयथाक्षीरमिवाम्बुमिश्रं" ह्या वचनाप्रमाणें त्यांतील साररूप अर्थ ग्रहण करून सदय अंतःकरणानें क्षमा करावी, अशी सर्व सुज्ञ जनांप्रत या अवधूताची सविनय प्रार्थना आहे इति ।

| | |
|---|---|
| विश्वावसुनामसंवत्सरे. | साधुसंतांच्या चरणीं नम्र झालेला |
| सन् १९०५. | भीमावधूत. |

# साभारस्वीकार.

लोकमान्य महाराज रा. रा. **बाळ गंगाधर टिळक** हे श्रद्धापूर्वक साधुसंतांचा परामर्ष करणारे होत. असें स्वानुभवावरून प्रत्ययास आल्यामुळें मनास विशेष आनंद झाला. ह्या जगद्विख्यात परोपकारी पुरुषांनीं हा ग्रंथ छापण्याच्या कामीं उद्भवलेलें विघ्न दूर करून प्रेमपूर्वक बहुतेक गोष्टींची मदत केली; आणि अवधूताच्या प्रार्थनेवरून आपले फोटो व जन्मपत्रिका वांटण्याची परवानगीही दिली; ह्यास्तव तो त्यांचा सर्वतोपरी आभारी आहे.

रा० रा० **पांडुरंग जावजी** निर्णयसागर प्रेस मुंबई, यांनीं हा ग्रंथ छापण्याच्या कामीं कांहीं उपयुक्त सूचना करून त्यांत दिलेल्या चित्रांचे कटस फुकट पाठवून दिले; याकरितां त्यांचे आभार मानणें प्रशस्त होय.

ह्या ग्रंथाचें लेखन चालू असतांना कारंजा येथील भगवन्निष्ठ वृद्ध राधाबाई पाटलीण इणें उत्तम प्रकारची व्यवस्था ठेवून सेवाही केली; आणि त्यास रा. रा. शेट नारायणदास व रा. रा. रामकृष्णपंत मालगुजार या उभयतांनीं साहाय्य केलें; म्हणून त्या सर्वांचे आभार मानल्याशिवाय राहवत नाहीं. तसेंच नीलकंठराव देशमुख यांनीं बहुतेक ग्रंथाची मदत केली; यामुळें येथें त्यांचेही आभार मानणें अप्रासंगिक होणार नाहीं.

**भीमावधूत.**



॥ ॐ नमो नागनार्याय ॥

# ईश्वरप्रेरणोद्देश.

सुजनहो ! श्वेताश्वतर ऋषि, कौशिक ऋषि, वशिष्ठ महामुनी, पतंजली, याज्ञवल्क्य, ज्ञानदेव, तुकाराम, एकनाथ, रामदासस्वामी इत्यादि अपरोक्षानुभवी महत्म्यांनीं प्रतिपादन केलेल्या वैराग्य, उपासना योग वगैरे साधनांसह संपूर्ण ब्रह्मविद्येचें सामान्य मुमुक्षुजनांस सुद्धां सुलभपणें ज्ञान होण्याकरितां विस्तारपूर्वक सोप्या भाषेमध्यें गोष्टींच्या रूपानें अनेक ग्रंथ यथावकाश प्रसिद्ध करावयाचे आहेत. आणि ते स्वल्प किंमतींत मिळावे, ह्मणून शंभर पृष्ठांस सहा आण्यांचा दर ठरविला आहे. व यांत जें कांहीं अवशेष राहील, त्याचाही विनियोग "**योगज्ञानोन्नति**" शाळा स्थापण्याच्या महत्पुण्य कर्माकडे करावयाचा आहे. पुढें त्याच्या व्यवस्थेसाठीं एक संस्थाही निर्माण होईल. ह्या महत्फलदायक हेतूस उदार आश्रय देऊन तो सिद्धीस नेणें सुज्ञांवर अवलंबून आहे.

प्रस्तुत ( १ ) "**उपनिषच्चिंतामणि**" नामक ब्रह्मविद्येचें मासिक पुस्तक, (२) "**योगमार्गप्रदीप**" नामक योगरहस्याचें मासिक पुस्तक, (३) "**विज्ञानतरंगिणी**" नामक अपरोक्षानुभवी ग्रंथ व (४) "**पंचीकरण**" नामक तत्त्वबोध ग्रंथ हीं चार तयार आहेतः—

( १ ) "**उपनिषच्चिंतामणि**—गर्भोपनिषद, हंसोपनिषद जाबाला अमृतनाद, क्षुरिका, आरुणेय, आत्मप्रबोध इत्यादि उपनिषदांचा निवळ अर्थ या मासिकांत नानाप्रकारच्या विचित्र कथांसह विस्तारपूर्वक देणार आहों. व ऐतरेय ऋषि, कठ, तित्तिर इत्यादि ऋषींनीं आपापल्या शिष्यवर्गास जी ब्रह्मविद्या शिकविली, आणि

वैराग्य, योग, उपासनादि जीं जीं साधनें सांगितलीं, त्या सर्व साधनांसह संपूर्ण ब्रह्मविद्येचें नानातऱ्हेंच्या विचित्र आख्यानांसह वर्णन येईल. उक्त गर्भोपनिषदांत शरीरांतील कोणकोणत्या नाड्या कोठून उत्पन्न होऊन कसकशा गेल्या आहेत, त्यांची व षट्चक्र कंद इत्यादि मर्मस्थानांची संपूर्ण माहिती दिली आहे, प्रथमतः तेंच देणार आहों. या मासिकाचीं पृष्ठें २० वार्षिक वर्गणी पोष्टेजासह एक रुपया.

( २ ) **योगमार्गप्रदीप**—यांत यम, नियम, आसन ( अनेक रोग नाशक ), सूर्यभेदन, उज्जायी, सीत्कारी, शीतली, भस्त्रिका, भ्रामरी, मूर्च्छा व प्लावनी हे अष्टविध प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा व समाधि हा अष्टांगयोग; सांख्य, तारक, अमनस्क, लय, लंबिका ( याच्या साधनानें अमृतपान होऊन त्या योगें काया अमर होते ), कुंडली, हठ व राज हे अष्टयोग; मंत्र, हठ, लय व राज चतुर्विधयोग ( त्यांपैकीं, मंत्रयोग ह्मणजे अजपागायत्री. ही मोक्षदात्री असून हिचें साधनही फार सोपें असल्यामुळें ससार करून परमार्थ साध्य करण्यास अत्यंत उपयोगी आहे. याविषयीं मुकुंदराज ह्मणतातः—" नरदेहीं सुगम उपाय । अजपा धरी सोय । तोचि नरनारायण होय । उलटोनि पाहतां ॥ " ही गुप्तविद्याही प्रकट केली आहे ); खेचरी, भूचरी, शांभवी, षण्मुखी, चाचरी, अगोचरी, अलक्ष व अचल ह्या आठ मुद्रा; पंचाग्निसाधन, जलशय्या, शीतोष्णदुःखसहिष्णुता, अनलशय्या, धूम्रपान, टाडेश्वरी, ऊर्ध्वबाहु, दुग्धाधारी, मौनी, जीवंत समाधि व जलसमाधि हे तपोयोगाचे बारा भेद; धौति, बस्ति, नेति, त्राटक, नौलि व कपालभाति ह्या सहा शरीरशोधनक्रिया; बस्ति, गज, धौति, कुंजर, लंबिका व नेति ह्या सहा षट्चक्रशोधन क्रिया; मूलाधारादि षट्चक्रभेदन ( अर्वाचीन यंत्रद्वारें शरीराच्या आंतील मर्मस्थानांचा फोटो काढितात. त्यावरून षट्चक्र, कंद वगैरे सप्रमाण व सचित्र देऊं ); वर्ष, सहा महिने, तीन महिने, महिना, पक्ष इत्यादि प्रकारांनीं कालानुसार होणारें मरण समजण्याचीं अनेक प्रकारांचीं चिन्हें व तें चुकविण्याचा उपाय. ज्या योगें प्रत्यक्ष कालपुरुषाचें दर्शन होऊन त्याजकडून प्रश्नाचें उत्तर मिळत असल्यामुळें आपला इष्ट हेतु सिद्ध करून घेतां येतो, तें साधन; औषधी कल्प ( त्याच्या सेवनानें प्रणवनाद उद्भवतो, षट्चक्रांचा भेद होतो, आणि सविकल्प समाधीचाही अनुभव येतो ); अगस्ति ऋषींनीं समुद्रप्राशन केलें, भीष्मपितामह यांस इच्छामरण प्राप्त झालें, श्रीमच्छं-

काराचार्यांनीं परकायाप्रवेश केला, गोरक्षनाथांनीं मूत्राच्या योगें दगडाचें सुवर्ण केलें, ज्ञानदेव महाराजांनीं भिंत चालविली इत्यादि महिमासिद्धी त्यांस प्राप्त झाल्याचें कारण, वगैरे अनेक विषय उपनिषद्, सूत्र, संहिता इत्यादि प्रमाणांसह येतील. या मासिकाचीं पृष्ठें २०, वार्षिक वर्गणी पोष्टेजासह एक रुपया.

( ३ ) **विज्ञानतरंगिणी**–यांत केवळ अपरोक्षज्ञान गुरुशिष्यसंवादरूपानें प्रतिपादन केलें असून मुंड, मांडुक्य, केन, कठवल्ली, छांदोग्य, बृहदारण्य इत्यादि उपनिषद् प्रमाणांनीं तें सिद्ध केलें आहे. या ग्रंथाचीं पृष्ठें सु. ७५.

( ४ ) **पंचीकरण**—यांत स्थूलसूक्ष्म देह हे कोणकोणत्या तत्वांनीं बनलेले आहेत, त्यांचीं कोष्टकें व त्यांचे धर्म; स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण ह्या चारी देहांचा आणि देहादि संघाताहून आत्मा निराळा असल्याचा अनेक लौकिक दृष्टांतांसह गुरुशिष्यसंवादरूपानें निवाडा. शिवाय शुकरंभ, आत्मबोध, तत्त्वबोध इत्यादि ग्रंथांतील विषयही येतील. या ग्रंथाचीं पृष्ठें सु. २००.

शनिवार पेठ नं. ११५ पुणें–सिटी. | सत्पुरुषांच्या चरणीं नम्र झालेला **भीमावधूत.**

---





# अनुक्रमणिका.

## वैराग्यप्रकरण.

भक्तिप्रकरण.

## ज्ञानप्रकरण.

ॐ तत्सत्.

॥ ॐ नमो वेदव्यासाय ॥

# मोक्षमार्गप्रदीप.

## मंगलाचरण.

जन्माद्यस्य यतोऽन्वयादितरतश्चार्थेष्वभिज्ञः स्वराट् ।
तेने ब्रह्म हृदा य आदिकवये मुह्यंति यः सूरयः ॥
तेजोवारिमृदां यथा विनिमयो यत्र त्रिसर्गोऽमृषा ।
धाम्ना स्वेन सदा निरस्त-कुहकं सत्यं परं धीमहि ॥ १ ॥

ह्या सर्व जगाची उत्पत्ति, स्थिति आणि प्रलय ज्या परमेश्वरापासून अन्वयव्यतिरेकानें होतात, ह्मणजे जो स्थावरजंगमादि सर्व वस्तूंमध्यें अन्वयरूपानें अंतर्बाह्य व्यापून राहिला असून, व्यतिरेकरूपानें त्याहून निराळा व अलिप्त आहे. तेज, जल व मृतिका ह्यांचा एकमेकांच्या ठिकाणीं होत असणारा भास वस्तुतः मिथ्या असतांही आश्रयभूत पदार्थांच्या सत्यतेमुळें खरा वाटतो. त्याप्रमाणें मायेच्या सत्व, रज, आणि तम ह्या त्रिगुणांपासून उत्पन्न झालेल्या देवता, इंद्रियें आणि भूतें ही सृष्टि वस्तुतः असत्य असतांही अधिष्ठानाच्या ( परमेश्वराच्या ) सत्यत्वामुळें सत्य अशी भासते. तो परमेश्वर स्वतःसिद्ध ज्ञानस्वरूपी असून सर्वांचा परमगुरु आहे. कारण, ज्या वेदांविषयीं मोठमोठ्या विद्वानांस देखील मोह पडतो, ते वेद ब्रह्मदेवाला मनानेंच

शिकविले; ह्मणजे परमेश्वरानें अंतःकरणांत प्रेरणा केल्यामुळें ब्रह्मदेवाला वेद समजले. अशा ' सत्य. ज्ञान. अनंत व ब्रह्मरूपी ' परमेश्वराचें मीं शिष्यांसहवर्तमान ध्यान करतों.

**प्रश्नः**—ग्रंथाच्या प्रारंभीं मंगलाचरण कां करावें ?

**उत्तरः—"निर्विघ्नसमाप्तिकामो मंगलमाचरेत्."** अर्थ–ग्रंथाची निर्विघ्नपणें परिसमाप्ति व्हावी, ह्या हेतूनें आरंभीं परमात्म्याचें स्मरणरूप मंगलाचरण करावें लागतें. कारण, तो परमात्मा मंगलरूप आहे. इति।

॥ ॐ **नमो दत्तावधूताय** ॥



॥ ॐ नमो नागनार्याय ॥



# वैराग्यप्रकरण.

## अध्याय १ ला

### प्राण्याचें जन्मवर्णन

श्रीभगवान उवाच—

कर्मणा दैव नेत्रेण जंतुर्देहोपपत्तये
स्त्रियाः प्रविष्ट उदरं पुंसो रेतःकणाश्रयः ॥ १ ॥

**कपिल महामुनि ह्मणाले:**—माते देवहूति! प्राणी जन्मास कसा येतो, तें मी आतां तुला स्पष्टपणें सांगतों:—प्राण्याला शरीर प्राप्त होण्याला कारण त्यानें पूर्वजन्मीं केलेलें कर्मच होय. त्याचा प्रवर्तक ईश्वर आहे. त्या पूर्वकर्मांच्या फलप्राप्तीची वेळ आली ह्मणजे जीव पुरुषाच्या शरीरामध्यें धान्यकणांच्या आश्रयेंकरून प्रवेश करितो; आणि नंतर त्या

पुरुषाच्या रेतःकणाच्या आधारानें तो स्त्रीच्या गर्भाशयांत प्रविष्ट होतो. पहिल्या रात्रीं तें पुरुषाचें रेत आणि स्त्रीचें रुधिर या दोहोंचें एके ठिकाणीं मिश्रण होतें, त्यास 'कलल' असें ह्मणतात. पुढें पांच रात्रींनीं तें बुद्बुदासारखें वाटोळें होतें. दहा दिवसांनीं त्याचा बोरासारखा कांहींसा कठीण गोळा बनतो. पुढें एका महिन्यांत त्याचा मांसाच्या पिंडासारखा आकार बनतो. जर तें रेत पक्ष्यांच्या योनीमधील असेल तर अंड्यासारखें होतें. नंतर त्याला मस्तक उत्पन्न होतें. दोन महिन्यांनीं त्याला हात पाय वगैरे अवयवांची वेगवेगळीं रचना होते. तीन महिन्यांनीं नखें, रोम, अस्थि व त्वचा हीं तयार होतात; व तो गर्भ स्त्रीचा असला तर योनिछिद्र व पुरुषाचा असला तर लिंग उत्पन्न होतें. चौथ्या महिन्यांत मांसादिक सप्त धातु उत्पन्न होतात. पांचव्या महिन्यांत क्षुधा व तृषा ह्यांचा उद्भव होतो. सहाव्या महिन्यांत तो गर्भ चर्मानें वेष्टित होऊन उजव्या कुशींत फिरूं लागतो. नंतर माता ज्या अन्नोदकांचें भक्षण व प्राशन करीत असेल, त्यांच्या योगानें त्या गर्भाच्या धातूंची उत्तरोत्तर वृद्धि होत जाते. उदर ह्मणजे विष्ठा आणि मूत्र ह्यांनीं भरलेला एक खाडा होय. त्यांत इतर जंतूंची उत्पत्ति होत असतेच. अशा ठिकाणीं त्या प्राण्याला राहणें आवडत नसतें. पण करितो काय? पूर्वकर्माधीनतेमुळें तसल्या वाईट स्थळीं त्याला राहणें भाग पडतें, आणि तेथें फार यातना सोसाव्या लागतात. कारण, गर्भस्थितींत हा कोमल असल्यामुळें मातेच्या उदरांतील भुकेलेले इतर कृमी त्याच्या सर्वांगाला वारंवार टोंचीत असतात, त्यामुळें त्याला फार क्लेश होतात व क्षणोक्षणीं मूर्च्छा येते! कडू, तिखट, उष्ण, खारट, रुक्ष व आंबट इत्यादि मातेनें भक्षिलेल्या पदार्थांचा त्याला स्पर्श होऊं लागला ह्मणजे त्याच्या सर्वांगाला वेदना होऊं लागतात. त्याच्यावर पहिलें गर्भाशयाचें आवरण असतें, व त्याच्या बाहेरून आंतड्यांचें वेष्टण असतें. ह्याची पाठ व

डोकें हीं द्रोणासारखीं वांकलेलीं असतात, व तेथें हा कुशींत डोकें ठेवून असतो, ह्मणून याला स्वतःचे अवयव हलविण्याचें देखील सामर्थ्य नसतें. अशा वेळीं दैवयोगानें स्मरणशक्ति प्राप्त होऊन शंभर जन्मांत केलेलीं कर्में आठवूं लागतात! तो पुष्कळ वेळपर्यंत उच्छ्वास न सोडतां तेथेंच स्तब्ध राहतो! अशा अवस्थेंत त्याला सुख तें काय मिळणार बरें? नंतर सातव्या महिन्यापासून त्याला ज्ञान उत्पन्न होतें. पण प्रसूतिवायु त्याला एकसारखे धक्के मारीत असतो. ह्मणून तो एका ठिकाणीं स्थिर रहात नाहीं. उदरांतच तो विष्ठेंतील एखाद्या किड्याप्रमाणें फिरत असतो. त्याला त्या वेळीं अनात्मा व आत्मा ह्या दोहोंचें स्वरूपज्ञान असतें ह्मणून त्याला आपणास प्राप्त झालेल्या संकटांबद्दल दुःख वाटतें, व ज्या कर्मांमुळें ही स्थिति भोगावी लागली, त्याबद्दल पश्चात्ताप होतो. पण त्या वेळेस तो सप्तधातुरूप बंधनानें बद्ध झाल्यामुळें त्याचा कांहीं उपाय चालत नाहीं. यास्तव तो गर्भस्थ जीव आपल्या स्थितीस कंटाळून मोठ्या सद्गदित वाणीनें परमेश्वराची प्रार्थना करितो.—

**गर्भस्थ जीवाची प्रार्थनाः**—हे भगवन्! मी विषयासक्त असल्यामुळें मला जी गति तूं दिली आहेस, ती माझ्या कर्माला योग्यच आहे. पण मला आतां त्याबद्दल पूर्ण पश्चात्ताप झाला आहे; आणि मी तुला अनन्यभावानें शरण आलों आहे. परमेश्वरा! मी भूतें, इंद्रियें व अंतःकरण ह्या रूपानें ह्मणजे देहरूपानें परिणाम पावलेल्या मायेचा आश्रय करून स्वतःच्या कर्मांच्या योगानें बांधला गेलों आहे, तरी माझ्या त्रस्त झालेल्या हृदयांत मला तुझ्या आनंदमय स्वरूपाचा अनुभव येत आहे. हें तुझें स्वरूप निर्विकार व निर्मल आहे. मी त्याला वंदन करितों. तुझ्याप्रमाणेंच माझें स्वरूप देखील वास्तविक पाहतां

(१) "बहू हिंपुटी होइजे मायपोटीं। नकोरे मना यातना तेचि मोठी। निरोधें पचें कोंडिलें गर्भवासीं। अधोमूख रे दुःख त्या बाळकासी—" **रामदास.**

निर्मलच आहे. परंतु तुझ्या (परमेश्वराच्या) आणि माझ्या स्वरूपांत अंतर कायतें विद्या आणि अविद्या ह्यांनींच झालेलें आहें. ह्मणजे तुझ्याकडे विद्या ( ज्ञान ) आणि मजकडे अविद्या ( अज्ञान ) आलेलें आहे. ह्यामुळें मीं पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेल्या शरीराच्या ठिकाणीं अभिमान धरणारा झालों आहें; वस्तुतः मी तसा कांहीं आच्छादित नाहीं. प्राणी सत्त्व, रज, आणि तम या त्रिगुणांच्या स्वाधीन होऊन जीं अनेक कर्में करितो, तींच त्याला संसारबंधनास कारण होतात, व त्याला आपल्या स्वरूपाची विस्मृति पडते, आणि तो ह्या संसारांत अनेक क्लेश भोगीत फिरत असतो. हे परमेश्वरा ! तुझ्या अनुग्रहावांचून ह्या प्राण्याला पुनः स्वस्वरूपाची प्राप्ति होण्याला दुसरें कोणतें साधन आहे बरें ? कोणतेंहीं नाहीं. हें प्रभो ! ह्याकरितां तुझा **अनुग्रहच** संपादिला पाहिजे. हल्लीं मला जें त्रिकालज्ञान झालें आहे, तें तरी तुझ्याच कृपेमुळें होय. सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टीच्या अंतर्यामीं तूंच अंशरूपानें वास करितोस; तुजशिवाय इतर सर्व प्राणी जीवरूपानें कर्ममार्गांत येऊन पडले आहेत. त्यांचें हें दुःख हरण करण्याचें सामर्थ्य तुजवांचून इतरांमध्यें नाहीं. ह्मणून आह्मी सर्व जीव अध्यात्मिकादिक त्रिविध तापानें निरमन होण्याकरितां तुझें 'भजन' करीत आहों. हे षड्गुणैश्वर्यसंपन्न देवा ! मातेच्या उदरगुहेंत असलेल्या रक्त, विष्ठा आणि मूत्र यांच्या कूपामध्यें पडून राहिलेला हा देह ह्या जठराग्नीच्या योगानें अति 'पोळून' गेलेला आहे. येथून बाहेर केव्हां पडेन या आशेनें मी

(१) "ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः। मनः षष्ठानींद्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति" **अर्थ**-सर्व प्राण्यांमध्यें चेतनस्वरूप असणारा जीव हा माझा अंश आहे, तरी तो मनादि सहा इंद्रियांना मोहामुळें आपणाकडे ओढीत असतो, ह्मणून त्यास जीव ( चिदाभास ) ही संज्ञा प्राप्त झाली आहे.--गीता.

आपले दिवस मोजीत राहिलों आहें. हे दीनदयाळा देवा! येथून तूं केव्हां बरें माझी मुक्तता करणार? माझें अंतःकरण अतिशय दीन होऊन मला कांहीं सुचेनासें झालें आहे! हे दीनानाथा! तूं पराकाष्ठेचा दयाळू व अनाथांना आशीर्वाद देणारा आहेस, कारण तूं मजसारिख्या दहा महिन्यांच्या अज्ञ जीवाला येवढें ज्ञान प्राप्त करून दिलेंस, ह्या तुझ्या उपकृतीबद्दल मला कधींही उतरायी होतां येणार नाहीं. मीं तुला नुसत्या वंदनानेंच पूजितों. तूं दीनांचा नाथ असल्यामुळें स्वतः-च्या उपकृतीमध्येंच 'संतुष्ट' असतोस. कारण, तिची फेड कोणा-च्याही हातून होणें शक्य नाहीं. हे प्रभो, मजसारिखेच सप्त धातूंच्या बंधनांनीं बांधले गेलेले पश्वादिक जीव केवळ आपल्या शरीरास होणारीं सुखदुःखें मात्र जाणतात, परंतु या तूं दिलेल्या ज्ञानाच्या योगानें माझ्या ठिकाणीं शांति व इंद्रियनिग्रह इत्यादि गुण प्राप्त झाले आहेत; आणि तुझें सत्य स्वरूप मला अंतर्बाह्य दिसत आहे. ह्मणून हे सर्वव्यापका ईश्वरा! या संसाराचा मला फार तिटकारा आला आहे. ह्या गर्भवासामध्यें जरी मी अतिशय दुःखांत आहें, तरी मला गर्भातून बाहेर पडण्याची इच्छा होत नाहीं. कारण, मी बाहेर पडलों असतां ज्या बुद्धीच्या योगानें तुझें हें स्वरूप पाहण्यास समर्थ झालों आहे, ती माझी बुद्धि अविद्येच्या योगानें आच्छादित होऊन मला मोह पाडील आणि अहंकाराच्या योगानें दुःखमय संसारचक्रांत फेरे खावयास लावील! म्हणून हे देवा! मीं येथेंच राहीन, व तुझ्या चरणकमलांचें हृदयांत ध्यान करून मी आपल्या दुःखाचें परिमार्जन करीन. तूं दिलेल्या बुद्धी-च्या योगानें तुझ्या स्वरूपाचें ज्ञान प्राप्त करून घेऊन या संसाररूपी अंधकारांतून आत्म्याचा असा उद्धार करितों कीं, फिरून या दुःखाचें नांव देखील घ्यावयास नको. कारण, वारंवार या संसारांत येणें म्हणजे नेहमीं गर्भवासाचें दुःख आहेच! नकोरे बाबा, पुन्हां हीं दुःखें व यातना!

**कपिल महामुनि ह्मणाले:**--माते देवहूति! याप्रमाणें तो दहा महिन्यांचा जीव अशा प्रकारें भगवंताची स्तुति करून मुक्त होण्याविषयीं आपल्या बुद्धीचा निश्चय करीत आहे, इतक्यांत प्रसूतिवायु त्याला खालीं ढकलतो. ह्या वेळीं त्याचें तोंड खालीं असतें. त्या वायूनें त्याला त्याच्या स्थानापासून एकाएकीं लोटून दिल्याबरोबर तो फार व्याकुळ होतो, त्याचा उच्छ्वास बंद होतो, स्मृति नाहींशी होते, आणि डोकें खालीं करून मोठ्या कष्टानें तो एकदम बाहेर पडतो. भूमीवर पडल्याबरोबर मातेच्या रक्तामध्यें व मूत्रामध्यें लोळत असलेला तो जीव विष्ठेंत उत्पन्न झालेल्या किड्याप्रमाणें वळवळूं लागतो, आणि पूर्वींचें (गर्भवासांतील) श्रेष्ठ ज्ञान नाहींसें होऊन त्यास एकदम विपरीत गति प्राप्त होते; त्यामुळें तो अतिशय रडूं लागतो. त्याच्या (मुलाच्या) रडण्याचें वास्तविक कारण कोणासही समजत नसल्यामुळें, तो रडूं लागला असतां त्याला भलतेच उपचार करितात, तो भुकेनें रडत असला तरी त्याचें पोट दुखत असेल अशी कल्पना करून त्यास औषधें पाजितात आणि खरोखर ज्या वेळीं पोट दुखत असेल, त्या वेळीं त्यास भूक लागली असेल अशी कल्पना करून बळेंच स्तनपान करवितात. एकंदरींत त्यास जें हवें असेल तें त्याला मिळत नाहीं; आणि भलभलतेच उपचार होऊं लागले, तर त्याचा त्यास प्रतिकारही करतां येत नाहीं. या वयांत बहुतकरून त्याला गलिच्छ वस्त्रांत रहावें लागतें, व त्यामुळें त्याला ढेंकूण किंवा पिसा खावूं लागल्या तर त्यांचें निवारण करण्याचेंही सामर्थ्य त्याला नसतें. अशा स्थितींत त्याची बाल्यावस्था जाते. पुढें पौगंड ह्मणजे तारुण्याच्या पूर्वींच्या अवस्थेंत अध्ययन वगैरे करण्याचा त्रास त्याला भोगावा लागतो; याही वेळीं तो सर्वस्वीं दुसऱ्या मनुष्यांवर अवलंबून असल्यामुळें त्याला पाहिजे असेल ते वेळचे वेळीं मिळतेंच असें नाहीं, व शिवाय तो अज्ञान असल्यामुळें त्याला त्याबद्दल

त्वरित राग येतो. ही अवस्था कशीबशी जाते, तों त्याला तारुण्यावस्था प्राप्त होते. त्यांत त्याला 'कामपीडा' होऊं लागते. त्यायोगें त्याच्या शरीराबरोबर क्रोध, लोभ आणि अहंकार हे विकारही वृद्धिंगत होतात. तो इतर कामीजनांचा वैरभाव करूं लागतो, त्यामुळें त्याचा स्वतःचा नाश होतो. वास्तविक देह हा पंचमहाभूतांपासून उत्पन्न झालेला असतो; परंतु ह्या प्राण्याची बुद्धि अज्ञानानें नष्ट झाली असल्यामुळें," हा देह माझा आहे. हीं बायकामुलें माझीं आहेत, " अशी तो खोटीच कल्पना करितो. कारण हा स्थूल देह त्याला त्याच्या पूर्वार्जित कर्मांपासून प्राप्त झालेला असतो. अशा त्या देहामध्यें असतां त्याला जन्म, जरा, व्याधि व मरण इत्यादि अनेक दुःखें वारंवार प्राप्त होतात; तथापि तो त्या देहाच्या संगोपनाकरितां अनेक नवीन नवीन कर्मे करीत असतो; ह्मणून त्याला पुनः पुनः या दुःखमय संसारांत पडावें लागतें. ह्या सृष्टीमध्यें शिश्नोदरपरायण लोकच फार आढळतात. एखादा सन्मार्गवर्ती प्राणी जर यांच्या संगतीला लागून यांच्या मार्गांत रमूं लागला, तर त्याला सुद्धां नरकयातना भोगाव्या लागतात. कारण, दुर्जनांच्या संगतीमुळें सत्य, शौच, दया, मौन, सुबुद्धि, संपत्ति, ऐश्वर्य, लज्जा, कीर्ति, सहनशीलता, इंद्रियदमन व मनोनिग्रह इत्यादि सद्गुणांचा लोप होतो. ह्मणून विषयासक्त, मूढ, स्त्रीलंपट अशा नीच पुरुषांच्या संगतीला सज्जनांनीं लागूं नये. कारण हे लोक ह्मणजे स्त्रियांचे पाळीव पशूच बनलेले असतात. स्त्रियांच्या अथवा स्त्रीलंपट पुरुषांच्या संगतीनें मनुष्याला जितका मोह पडेल आणि बंधन प्राप्त होईल, तितकें इतर कशानेंही होणार नाहीं. ह्मणून पुरुषानें स्त्रियांपासून व विषयी

(१) " पुनरपि जननं पुनरपि मरणं पुनरपि जननीजठरेशयनम्। " **अर्थ—**पुनः पुनः जन्मास येणें, मरणें आणि गर्भवास भोगणें ही क्रिया सारखी चालूच आहे.

**—शंकराचार्य.**

जनांपासून अगदीं अलिप्त असावें. कारण, स्त्रिया ह्मणजे मुमुक्षु पुरुषाला नरकास नेण्याचें द्वारच होत. ही देवानें निर्माण केलेली प्रत्यक्ष माया होय. ही मोठ्या लडिवाळपणानें प्रेम दाखवीत जवळ जवळ येते, पण तें खरें नव्हे. एखाद्या खोल विहिरीच्या तोंडावर गवताचें आच्छादन असतांना तेथें भय असेल ही जशी कल्पना होत नाहीं, पण त्याजवर पाय ठेविला असतां मात्र प्राणांशीं गांठ पडते, त्याचप्रमाणें ह्या स्त्रिया **मोहक** दिसतात, परंतु त्यांचा सहवास केवळ प्राणघातकच होय, असें मुमुक्षूनें समजावें. माते ! मुमुक्षु स्त्रीनेंही याचप्रमाणं विचार करून समजावें कीं, पूर्वजन्मीं मी पुरुष असतां विषयासक्ततेमुळें अंतकाळीं स्त्रीचा ध्यास लागून मला या जन्मीं **स्त्रीरूप** प्राप्त झालें, व या जन्मीं जर पुरुषाविषयीं आसक्ति ठेविली, तर अंतकाळीं त्याच्याच ध्यासानें पुढील जन्मीं **पुरुषरूप** प्राप्त होईल. याप्रमाणें हें रहाटगाडगें असेंच चालू राहिलें, तर संसाराची निवृत्ति कधींही होणार नाहीं. मला द्रव्य, सुख व पुत्र देणारा जो पति प्रिय वाटत आहे, तो पति नसून केवळ माझा मृत्यूच होय. पति, गृह इत्यादि वस्तु मला भुरळ पाडणाऱ्या असून व्याधाचें गायन जसें मृगाच्या नाशास कारण होतें, त्याप्रमाणें ह्या माझ्या नाशास कारण होत. आई ! आतां तुला जर अशी शंका येईल कीं, “ जीव व्यापक व नित्य आहे. तर त्याचें परलोकीं जाणें म्हणजे काय आणि त्याला जन्ममरण तरी

(१) “ आवर्तः संशयानामविनयभवनं पत्तनं साहसानाम् । दोषाणां सन्निधानं कपटशतमयं क्षेत्रमप्रत्ययानाम् । स्वर्गद्वारस्य विघ्नं नरकपुरमुखं सर्वमायाकरण्डम् । स्त्रीरत्नं केन सृष्टं विषममृतमयं प्राणिनां मोहपाशः ॥ ” **अर्थ**—संशयाचा भोंवरा, अविनयाचें घर, साहसांचें नगर दोषांचा समुदाय, कपटांचें व वेभरंशाचें शेत, स्वर्गाला आड येणारें विघ्न, नरकाचें तोंड, सर्व मायावीपणाचा गड्डा, विषानें भरलेली पण अमृतासारखी भासणारी अशी ही स्त्री आपल्या मोहपाशानें प्राण्यांचा नाश करणारी आहे; हिला कोणी बरें उत्पन्न केली असावी ?

कसचें ?" यावर असें उत्तर आहे कीं, जीवाचा उपाधिभूत जो लिंगदेह त्याच्या योगानें त्याला एका लोकांतून परलोकीं जातां येतें, व तेथें तो आपल्या कर्मांचीं फलें भोगीत राहतो आणि तीं भोगीत असतां तो आणखी एकामागून एक नवीं नवीं कर्मे करीत असतो. आत्म्याच्या अनुरोधानें चालणाऱ्या ह्या जीवाचा उपाधि लिंगदेह व पंचभूतात्मक स्थूल देह हे दोन्हींही आपआपलें कार्य करण्यास असमर्थ झाले, म्हणजे तेंच ह्या जीवाचें **मरण** होय. आणि ते देह पुनः प्रकट झाले म्हणजे तोच ह्या जीवाचा **जन्म** होय. जन्म आणि मरण हीं देहाला आहेत, जीवाला नाहींत, हें नीट समजण्यासाठीं मी तुला एक दृष्टांत सांगतों. कांवीळ वगैरे रोगांनीं मनुष्याचे नेत्रगोलक बिघडले म्हणजे त्यांची पाहण्याची शक्ति नाहींशी होऊन, नेत्रेंद्रियाची शक्तिही नाहींशी होते, व असें झालें असतां ज्याप्रमाणें जिवाला पाहण्याची शक्ति मुळींच उरत नाहीं. असा जीवाच्या ठिकाणीं भास होतो. वस्तुतः या स्थूल देहालाच व्याधि व जरा (वार्धक्य) इत्यादि प्राप्त झालीं असतां शब्दादि विषय ग्रहण करण्याचें सामर्थ्य त्यास नाहींसें होतें. तेव्हां त्यांतील सूक्ष्म देह (लिंगदेह) सुद्धां आपलें काम करण्यास असमर्थ होतो. असें झालें ह्मणजे स्थूल शरीर नाश पावतें; हेंच त्याचें मरण असें मानतात. तें स्थूल शरीर सूक्ष्म शरीरासह पुनः उत्पन्न होतें; आणि हा देहच मी आहें अशा अभिमानानें विषयांचें ग्रहण करण्यास जें समर्थ होतें, तेंच त्याचें जन्म होय. वास्तविक, जीवाला जन्ममरण मुळींच नाहीं हेंच खरें. ज्या अर्थीं जीवास जन्म किंवा मरण कांहींच नाहीं, त्या अर्थीं 'मुमुक्षु पुरुषानें मरणाची भीति अगदीं बाळगूं नये; आपला उदरनिर्वाह कसा चालेल म्हणून काळजी करून दुसऱ्यास दैन्य दाखवूं नये; तसेंच उपजीविकेविषयीं प्रयत्नही करूं नये. तर धैर्यानें, वागून या जीवाच्या अज्ञात गतीचें ज्ञान प्राप्त करून घेऊन सर्वसंगपरित्याग करावा; आणि पृथ्वीचे पाठी-

वर आनंदानें संचार करावा. सर्वसंगपरित्यागापासून इतकाच अर्थ घ्यावयाचा कीं देहावर आसक्ति न ठेवतां योगाभ्यास आणि वैराग्य धारण करावें. त्यायोगें त्याच्या बुद्धीला उत्तम विचारशुद्धि प्राप्त होते. मग त्या विचारशील बुद्धीच्या योगानें शरीरावरील आसक्ति टाकून ह्या पृथ्वीवर संचार करावा.

---

# अध्याय २ रा.

## जीवाची संसारांतील स्थिति ( १–३० ).

श्रीभगवान् उवाच—

**तस्यैतस्य जनो नूनं नायं वेदोरुविक्रमम् ।**
**काल्यमानोऽपि बलिनो वायोरिव घनावलिः ॥ १ ॥**

**भगवान् कपिल महामुनि म्हणाले:**—माते देवहूति ! कालाचा प्रभाव फार मोठा आहे. त्याच्या योगानें जीवास निरनिराळ्या अनेक अवस्था प्राप्त होतात. पण मेघ जसे वायूच्या योगानें इकडे तिकडे भ्रमण करीत असतात, तथापि वायूच्या पराक्रमाचें ज्ञान त्यांना नसतें, त्याप्रमाणें हे लोक कालाच्या महान् पराक्रमास खरोखर जाणत नाहींत. मनुष्य आपल्याला सुख मिळावें म्हणून मोठ्या प्रयासानें जी जी गोष्ट हातीं घेतो, त्या त्या गोष्टींचा हा सर्वसमर्थ काल नाश करितो; व असें झालें म्हणजे मनुष्य त्या गोष्टीकरितां शोक करूं लागतो, हें त्याला योग्यच आहे. कारण कीं पुत्र व आप्तेष्ट यांसहवर्तमान देह नश्वर असतांना तो मंदबुद्धि मनुष्य अज्ञानामुळें आपल्या शरीराच्यासंबंधानें प्राप्त झालेलें घर, शेत, द्रव्य इत्यादिकांस शाश्वत मानितो. यास्तव त्यांचा नाश झाल्यावर त्याला दुःख होणें साहजिकच आहे. ह्या संसारामध्यें प्राणी

ज्या ज्या योनींत जन्मास जाईल त्या त्या योनीमध्यें त्याला सुख वाटत असतेंच! प्राणी प्रत्यक्ष नरकांत जरी रहात असला, तरीदेखील विष्ठाभक्षण हेंच त्याला सुखप्रद वाटतें; व तें सुख जोंपर्यंत मिळत आहे तोंपर्यंत हा देह सोडून जावें ( मरावें ) अशी इच्छा त्याला मुळींच होत नाहीं. कारण, ईश्वराच्या विलक्षण मायेनें तो पूर्ण मोहित झालेला असतो. स्वतःचें शरीर, स्त्री, पुत्र, धन, गृह, पशु, बांधव यांच्याविषयीं त्याच्या अंतःकरणांत अनेक प्रकारचे विचार चालत असून त्यांतच तो आपल्याला धन्य मानीत असतो! व कुटुंबपोषणाच्या चिंतेनें सतत व्याकूल असतो; ह्मणून तो मूढ प्राणी एकामागून एक अशीं पापें करीत राहतो! मायावी स्त्रियांपासून प्राप्त होणारें एकांतसुख, लहान मुलांचीं मधुर भाषणें, इत्यादिकांच्या योगानें प्राण्याचें अंतःकरण व इंद्रियें आकर्षिलीं जातात. संसार[१] ह्मणजे दुःखाची खाण आहे; कारण, त्यांतले सर्व व्यवहार किंवा धर्म फसवाफसवीचे आहेत. त्यांत सत्याचें नांवसुद्धां नाहीं! अशा ठिकाणीं सुख असणार कोठून? तरी तो गृहस्थाश्रमी पुरुष दुःखमय संसारामध्यें राहून दुःखाचें निराकरण करीत असतो; व हेंच सुख आहे असें मानून राहतो! तो पुरुष सुख होण्याकरितां ज्या धर्मांचें आचरण करतो, ते धर्मही त्यास फिरून संसारांत पाडणारे असेच असतात; तरी त्यांचें ह्या प्राण्यास ज्ञान न होऊन तो त्या संसारांतच अविश्रांत श्रम करीत असतो. स्त्रीपुत्रांच्या पोषणाकरितां तो अनेक घोरकर्में करून द्रव्य संपादन करितो, व त्या द्रव्यावरती मंडळी यथास्थित चैन करिते. त्यांची पूर्तता होऊन कांहीं उरलें तर त्याला खावयाला मिळावयाचें! पण ह्या कर्मामुळें त्याला जी अधोगति मिळते, तिला मात्र ती मंडळी वांटेकरी होत नाहीं. स्त्रीपुत्रांच्या पोषणाकरितां व त्यां-

१ " संसारं सागरं दुःखं नित्य दुःखं पुनः पुनः ॥ " **अर्थ**—संसार हा दुःखाचा सागर असून त्यामध्यें दुःखांच्याच लाटा पुनः पुनः उसळत असतात.

स सुख मिळावें ह्याकरितां द्रव्यप्राप्तीच्या इच्छेनें हा अनेक प्रकारचे व्यापार करीत असतो. त्याच्या प्रारब्धकर्मानें बूड वगैरे आली, तर त्याचा लोभ अधिकाधिक वाढत जाऊन तो आणखी तसलेच कांहीं सटरफटर व्यापार करीत राहतो. व त्यांतही यश आलें नाहीं, म्हणजे शेवटीं लोभाच्या पूर्ण आधीन होऊन परद्रव्याचा अपहार करण्यांची त्यास इच्छा उत्पन्न होते! पण तो मंदभाग्य असला म्हणजे त्यानें किती जरी उद्योग केले तरी ते व्यर्थ होतात! मग ह्या दुर्दैवी पुरुषाचे हातून कुटुंबाचें पोषण होत नाहीं. शेवटीं माझा उत्कर्ष कसा होईल, अशी चिंता करीत तो तळमळत बसतो. अशा स्थितींत याच्यानें कुटुंबपोषण होईनासें झालें, म्हणजे शेतकरी जसा म्हाताऱ्या बैलाच्या खाण्यापिण्याची हयगय करितो, त्याप्रमाणें त्याचीं बायकामुलें वगैरे मंडळी पूर्वींप्रमाणें त्याचा आदर न करतां उलट तिरस्कारच करितात. इतकें झालें तरी त्याला वैराग्य उत्पन्न होत नाहींच! पुढें वार्धक्य प्राप्त

---

( १ ) " जन हे सुखाचे दिल्या घेतल्याचे ॥ बा अंतकाळींचें नाहीं कोणी ॥ झाल्या हीन शक्ति नाक डोळे गळती ॥ सांडोनिया पळती रांडा पोरें ॥ बाईल ह्मणे खर मरता तरी बरें ॥ नाशिलें हें घर थुंकोनियां ॥ तुका ह्मणे दीन काकुळती येतों ॥ तुह्मा आळवितो पांडुरंगा ॥ " " यावद्वित्तोपार्जनसक्तस्तावन्निजपरिवारो रक्तः । पश्चाज्जर्जरभूते देहे वार्ता कोऽपि न पृच्छति गेहे ॥ " **अर्थ**—जोंपर्यंत द्रव्य मिळविण्याची शक्ति असते व पैसा मिळतो तोंपर्यंत बाप, भाऊ, बहीण, बायको लेंकरें इतर परिवार त्यावर प्रेम करितात. त्यानंतर ह्मातारपणीं यांपैकीं घरचीं कोणीही त्याची विचारपूसही करीत नाहींत. **—आचार्य**. " तसेंच तुकाराम ह्मणतात.—सोयरे धायरे दिल्या घेतल्याचे । बा अंतकाळींचें नाहीं कोणी ॥ सख्या गोत्र बहिणी सुखाचे सांगाती । मोकलोनी देती अंतकाळीं ॥ आपुलें शरीर आपणा पारखें । परावे होतील नवल काय ॥ तुका ह्मणे आतां सोडी यांची आस । धरी एक आस पांडुरंगीं ॥"

झालें असतां शरीर जर्जरीभूत होऊन त्याचें स्वरूप विद्रूप होतें, खाल्लेलें अन्न त्यास पचत नाहीं, शरीरांत अनेक रोग उत्पन्न होतात, व त्याचे सर्व व्यवहार हळूं हळूं कमी कमी होत जातात. अशा स्थितींत त्यानें पूर्वीं मोठा प्रयत्न करून पोषिलेलीं माणसेंही त्याचा फारच तिरस्कार करीत असतात. एखाद्या कुत्र्यापुढें जसा भाकरीचा तुकडा टाकितात. त्याप्रमाणें ते त्याला अन्न देतात. तरी तो मरणोन्मुख मनुष्य अपमानपूर्वक घातलेलें तें अन्न स्वीकारितो. इतकें झालें तरीही त्याला त्या घरा-दाराविषयीं वैराग्य उत्पन्न होत नाहीं. शेवटीं प्राणवायु निघून जात असतांना वायूच्या मार्गभूत नाड्यांमध्यें कफ दाटला जातो, खोकला व श्वास यांपासून त्याला फार श्रम होतात, व कंठ घरघर वाजूं लागतो. अशा रीतीनें मृत्यूच्या पाशांत अगदीं आधीन होऊन तो पडलेला असतो! त्याच्या सभोंवतीं त्याचे आप्त रडत बसलेले असतात. व ते त्याला ' **बापा! भाऊ!** ' वगैरे अनेक प्रकारांनीं हांका मारीत असतात. तरी त्यांच्याशीं एक शब्ददेखील बोलण्याचें त्यास सामर्थ्य नसतें. तो बिचारा निचेष्ट पडलेला असतो! माते, आजपर्यंत ज्यानें कुटुंब पोसण्याचे कामीं आपलें शरीर झिजविलें व इंद्रियें स्वाधीन करून घेतलीं नाहींत त्या मनुष्याची अंतकाळीं अशी अनुकंपनीय स्थिति होते.

---

# अध्याय ३ रा.

## यमयातनावर्णन. ( १-३० )

श्रीभगवानुवाच—

**एवं कुटुंबभरणे व्यापृतात्माऽजितेंद्रियः ।**
**म्रियते रुदतां स्वानां गुरुवेदनयाऽस्तधीः ॥ १८ ॥**
**यमदूतौ तदा प्राप्तौ भीमौ सरभसेक्षणौ ।**
**स दृष्ट्वा त्रस्तहृदयःशकृन्मूत्रं विमुंचति ॥ १९ ॥**

**भगवान् कपिल महामुनि ह्मणाले:**--माते देवहूति, ज्यानें इंद्रियांचा जय न करितां केवळ कुटुंबाच्या पोषणासाठीं आपल्या आयुष्यांतील सर्व काळ व्यर्थ घालविलेला असतो, अशा त्या निर्बुद्ध पुरुषाची बुद्धि नष्ट होते व इष्टमित्र शोक करीत असतां तो मरण पावतो. इतक्यांत डोळे वटारून आलेले भयंकर यमदूत त्याच्या दृष्टीस पडतात. त्यांना पाहिल्याबरोबर मनांत फारच घाबरून जाऊन तो मलमूत्रोत्सर्ग करितो ! अपराधी मनुष्याला शिक्षा देण्याकरितां जसे राजाचे दूत बांधून नेतात, त्याप्रमाणें ते यमदूत त्या प्राण्याला यातना भोगण्यासाठीं तयार केलेल्या शरीरांत घालून व त्याच्या गळ्याला घट्ट पाशांनीं आंवळून बलात्कारानें व लांबच लांब रस्त्यानें ओढीत नेतात ! वाटेनें ते यमदूत त्यास मोठमोठ्या शिक्षांचें भय घालीत असतात. त्यापुळें त्या प्राण्याचें हृदय फाटून जातें व तो थरथर कांपूं लागतो. वाटेंत त्यास कुत्रे फाडफाडून खात असतात. अशा यातना होऊं लागल्या ह्मणजे त्याला आपल्या पापकर्मांचें स्मरण होतें. वाटेंत जातांना तापलेल्या वाळूवरून त्याला चालावें लागतें. त्यास अतिशय भूक व तहान लागलेली असते, तरी त्यास अन्नपाणी मिळत नाहीं. अशा स्थितींत त्याच्यानें एक पाऊलसुद्धां उचलवत नाहीं; तरी यमदूत पाठीवर सारखे कोरडे लगावीत असतातच. ह्मणून तो मेठ्या कष्टानें एक एक पाऊल

(१) " अंतकाळ येतां देतां । तेथें नये चुकवितां ॥
अकस्मात् लागे जावें । कांहीं पुण्य आचरावें ॥
पुण्याविण जातां प्राणी । पडे यमाची जाचणी ॥
रामदास ह्मणे जना । कठीण यमाच्या यातना ॥ "

(२) " विषयाचें सुख वाटे येथें गोड ॥ पुढें अवघड यमदंड ॥
मारिती तोडिती झोडिती निष्ठूर ॥ यमाचे किंकर बहुसाल ॥

—तुकाराम.

उचलीत असतो. वाटेंत चालतांना कित्येक वेळां पडतो, तरी त्याला ते यमदूत कठीण व अंधेऱ्या रस्त्यानें ओढीत यमनगरीस नेतात. पृथ्वीपासून यमपुरी नऊ हजार नव्वद योजनें लांब आहे. जीव साधारण पापी असला तर इतका लांबचा मार्ग त्याला तीन मुहूर्तांत आक्रमण करावा लागतो. एखादा फारच पापी असला तर यमदूत त्याला दोन मुहूर्तांतच तेथें ओढीत नेतात. अशा प्रकारचा दुःखमय प्रवास संपल्यावर त्या प्राण्यास यमपुरींतील यातनांचा अनुभव मिळण्यास प्रारंभ होतो.

**यमयातना**—प्रथम त्या पापी मनुष्याच्या अंगाभोंवतीं जळतीं लांकडें वगैरे बांधून त्याला भाजतात. मग त्याच्या शरीराचें मांस त्याच्या स्वतःकडून तोडवून तें त्यांस खावयास लावितात. किंवा इतरांकडूनही तोडवून खाववितात. यमपुरींत असलेले कुत्रे, गिधाडें त्याचीं आंतडीं बाहेर ओढून काढितात. सर्प, विंचू, इत्यादि विषारी प्राणी चावून त्याला पीडा देतात. कित्येक यमदूत शस्त्रांनीं त्याचे अवयव तोडितात. मत्त गजांकडून त्यास तुडवून त्याचे तुकडे तुकडे करितात. कित्येक वेळां पर्वताच्या शिखरावरून त्यास खालीं लोटून देतात, व कित्येक वेळां चिखलाच्या खाड्यांत बुडवून ठेवितात. अशा प्रकारें त्याचे हाल करून मग त्या जिवास त्याच्या कर्मानुसार तामिस्र, अंधतामिस्र, रौरव इत्यादि नरकांत ढकलून देतात. हे देवहूति, कित्येक विचारशील पुरुष तर स्वर्ग आणि नरक याच लोकीं आहेत असें म्हणतात. कारण, या लोकामध्येंही नरकसंबंधी यातना भोगणारे कीटकादिक प्राणी प्रत्यक्ष दिसून येतात. असो. याप्रमाणें आपल्या देहाचें किंवा आपल्या कुटुंबाचें पोषण करणारा पुरुष त्या सर्वांस येथेंच सोडून परलोकीं जातो, व तेथें त्यास स्वकर्मानुसार फल भोगावें लागतें. प्राण्यांची हिंसा किंवा द्रोह करून जीव ज्या शरीराचें पोषण करितो, तीं सर्व येथेंच राहतात, आणि केवळ आपल्या पापांचीं गांठोडीं बरोबर घेऊन त्याला एकट्याला अंधनरकांत प-

डावें लागतें. माते, आतां तूं म्हणशील कीं, ' जसा प्राणी स्त्री, पुत्र, घर फार तर काय आपलें शरीर देखील येथें पृथ्वीवर सोडून जातो, त्याप्रमाणें त्यानें आपलें पापही येथेंच सोडून जावें. म्हणजे त्याचा नरकवासाचा त्रास चुकेल. ' तर माते, त्याला तसें करतां येत नाहीं. कारण, पुरुषानें कुटुंबाच्या पोषणासाठीं जें जें पाप केलें असेल, तें तें पाप दैव त्याच्या जवळ आणून पोहोंचवितें. हें दैवाचें कर्तव्यकर्मच होय, व ह्यामुळें त्या जीवास नरकयातना भोगाव्या लागतात. जो पुरुष केवळ अधर्मानेंच आपल्या कुटुंबाचें पोषण करण्यांत निमग्न असतो, त्याला सर्व नरकांतील शेवटल्या नरक जो अंधतामिस्र त्यांत पडावें लागतें; हा नरकवास संपल्यानंतरही श्वानसूकरादि योनींतील सुख त्यास भोगावें लागतें ! आणि अनुक्रमानें तें भोगीत असतां[1] पश्चात्तापानें पापक्षय झाला म्हणजे तो फिरून मनुष्यजन्मास येतो.

---

# अध्याय ४ था.

## नरकांचें वर्णन ( ५-२६ ).

राजोवाच । **महर्ष एतद्वैचित्र्यं लोकस्य कथमिति ॥ १ ॥**

**राजा परीक्षिति म्हणाला:**—हे शुकाचार्य, मनुष्यें सारखीं कर्मे करीत असतां त्यांस भिन्न भिन्न फलें कां मिळावीं ?

**श्रीशुकाचार्य** म्हणाले--राजा ! कर्मे सारखींच खरीं, पण सत्व, रज, तम ह्या तीन[2] गुणांमुळें श्रद्धा विविध झाली आहे. तिला अनुरूप

( १ ) "पश्चात्तापेन शुद्ध्यति ।" **अर्थ**-पश्चात्तापानें पापक्षालन होतें. -**स्मृति.**

( २ ) " यजंते सात्त्विका देवान्यक्षरक्षांसि राजसाः । प्रेतान्भूतगणांश्चान्ये यजंते तामसा जनाः " अर्थ--सात्विक श्रद्धावान पुरुष देवाची पूजा करितात. राजसश्रद्धेचे लोक यक्ष राक्षस यांची पूजा करितात व तामसवृत्तीची मनुष्यें भूतप्रेत इत्यादिकांची पूजा करितात. **—गीता**

कर्मांचीं फळेंही भिन्न भिन्न प्रकारचीं उद्भवतात. पुरुष ज्या श्रद्धेनें अ-
नुष्ठान करितो, तदनुरूप त्यास फळ मिळतें. सात्विक श्रद्धेनें कर्मे कर-
णाराला केवळ सुख मिळतें. राजस श्रद्धेनें करील तर सुखदुःख दोन्ही
मिळतात; आणि तामस श्रद्धेनें करील तर केवळ दुःख मात्र प्राप्त होतें.
श्रुतिस्मृतींनीं ज्या कर्माविषयीं निषेध सांगितले आहेत, तीं कर्मे कर-
णारांस अनेक पातकें घडतात; अशा पातकांमुळें मनुष्यांस हजारों नरक
भोगावे लागतात. राजा! त्रैलोक्यामध्येंच दक्षिण दिशेकडे भूमीच्या
खालीं व उदकाच्या वरतीं नरकस्थानें आहेत. दक्षिण दिशेलाच अग्नि-
ष्वात्तादिक पितृगण आपल्या गोत्रांतील प्राण्यांना अखंड भोग मिळावे
ह्मणून चिंतन करीत उत्तम समाधियोगामध्यें निमग्न असतात. त्या दि-
शेला सूर्याचा पुत्र पितृराज ह्मणजे 'यमधर्म' आपल्या सेवकांसह रा-
हतो. प्राण्यांच्या हातून जे कर्मदोष घडले असतील, त्यांना तो तद-
नुसार शिक्षा देतो. आतां त्या नरकांपैकीं मुख्य मुख्य नरकांचीं नांवें,
रूपें व लक्षणें मी तुला सांगतों:--

**नरकांचीं नांवें:--** १ तामिस्र, २ अंधतामिस्र, ३ रौरव, ४ म-
हारौरव, ५ कुंभीपाक, ६ कालसूत्र, ७ असिपत्रवन, ८ सूकरमुख, ९
अंधकूप, १० कृमिभोजन, ११ संदंश, १२ तप्तसूर्मि, १३ वज्रकंटक-
शाल्मली, १४ वैतरणी, १५ पूयोद, १६ प्राणरोध, १७ विशसन, १८
लालाभक्ष, १९ सारमेयादन, २० अवीचि, व २१ अयःपान. हे एकवीस
मुख्य असून, शिवाय १ क्षारकर्दम, २ रक्षोगणभोजन, ३ शूलप्रोत,
४ दंदशूक, ५ अवटनिरोधन, ६ पर्यावर्तन व ७ सूचीमुख हे सात

(१) "असीपत्र तरु खैराचे इंगळ ॥ तेलपाकीं जाळ निघतातीं ॥ तप्त भूमीवरी चालविती पायीं ॥ अग्निस्तंभा बाहीं कवटाळविती ॥ ह्मणोनिया तुका येतो काकुळती ॥ पुरे यातायाती गर्भवास ॥

असे एकंदर अठ्ठावीस नरक आहेत. आतां त्यांतील दुःखें तुला अनुक्रमें सांगतोंः—

( १ ) **तामिस्र**—जो प्राणी परधन, अपत्यें किंवा परस्त्री हरण करितो. त्याला यमदूत तामिस्र नरकांत ढकलून देतात. तेथें त्याला खायाला प्यायाला कांहीं एकसुद्धां मिळत नसून, पाठीवर एकसारखे बडगे बसतात. आणि अशा अनेक यातनांच्या योगानें तो मूर्च्छित होऊन. अचेतनासारखा तेथें पडून राहतो.

( २ ) **अंधतामिस्र**—जो प्राणी दुसऱ्याला फसवून त्याच्या धनाचा किंवा स्त्रीचा अपहार करितो, त्याला ह्या नरकांत ढकलून देतात. तेथें त्याची बुद्धि नष्ट होते. आणि दृष्टि लयास जाते. शेवटीं त्याला अनंत यातना भोगाव्या लागतात.

( ३ ) **रौरव**— जो प्राणी देहाच्या व पुत्रकलत्रांच्या अभिमानानें इतरांस पीडा देतो. व न्यायान्याय न पाहतां प्रपंच चालवितो. त्यास ह्या नरकांत लोळावें लागतें; तेव्हां इतर प्राणी त्याला ह्या ठिकाणीं रुरु नांवाचे भयंकर कृमि होऊन गांजून सोडतात.

( ४ ) **महारौरव**—जो मनुष्य दुसऱ्याचा द्रोह करून आपला चरितार्थ चालवितो. त्याला हा नरक प्राप्त होतो. येथें क्रव्याद नामक प्राणी त्याच्या मांसाचे लचके तोडतात व त्यामुळें त्यास अत्यंत वेदना होत असतात.

(५) **कुंभीपाक**—हा नरक फारच भयंकर आहे. जे क्रूर लोक पशुपक्ष्यांनी जिवंत शिजवितात. त्यांना येथें तेलांत घालून तळण्यांत येतें.

( ६ ) **कालसूत्र**—जे लोक. पित्याचा. ब्राह्मणांचा व वेदांचा द्वेष करितात. ते ह्या नरकांत पडतात. ह्या नरकाचें दहा सहस्र योजनें व्यास वाटोळें तापवून लाल केलेलें विस्तीर्ण ताम्रमय मैदान आहे. खा-

लून अग्नि व वरून सूर्य हे त्यास अतिशय तापवीत असतात; अशा ह्या नरकांत पडलेल्या प्राण्याला क्षुधा, तृषा आणि अग्नीचा भडका ह्यांच्या महाभयंकर यातना भोगाव्या लागतात. पशूंच्या अंगावर जितके केंस असतात, तितकीं सहस्र वर्षें प्राण्याला ह्या नरकांत काढावीं लागतात.

( ७ ) **असिपत्रवन**--जो मनुष्य ह्या लोकांत कोणत्याही प्रकारची अडचण नसतां, आपला वेदमार्ग सोडून पाखंडधर्म अंगीकारितो, त्याला यमदूत ह्या नरकांत ढकलून चाबकांनीं फोडून काढितात; त्यामुळें तो धांवत सुटतो. त्या स्थळीं ताडांचें निबिड अरण्य आहे. त्या ताडांचीं पानें तरवारीच्या धारेसारखीं तीक्ष्ण असतात. तीं लागून त्याचें सर्वांग कांपतें. मग हा " **मेलोंरे मेलों** ! " असा एकसारखा ओरडतो व अत्यंत वेदनांमुळें मूर्च्छा येऊन पडतो. स्वधर्मत्याग करून पाखंडधर्माचा अंगीकार करणाराला असें फळ भोगावें लागतें.

( ८ ) **सूकरमुख**--जो राजा किंवा राजाचा आश्रित पुरुष अन्यायानें कोणास दंड करील, तर त्यास ह्या सूकरमुख नरकांतील दुःसह यातना भोगाव्या लागतात. तेथें यमदूत त्याचे अवयव उंसाच्या कांड्याप्रमाणें पिळून काढितात; त्यावेळीं तो मोठा आक्रोश करून अगदीं दीन होऊन जातो. त्यानें निरपराधी प्राण्यांना जसें कोंडून ठेविलें होतें, तसेंच त्याला कोंडून रहावें लागतें.

( ९ ) **अंधकूप**--पशु, मृग, सर्प, माशी, पिसा, ढेंकूण इत्यादि अज्ञान प्राण्यांना जे मारतात, त्या लोकांना ह्या नरकांत पडावें लागतें. ते पशु, मृग, सर्पादि ह्या नरकांत चोहोंकडून त्याचा छल करितात; व ह्या अंध नरकांत पडलेल्या लोकांची स्थिति दुखणेकऱ्याप्रमाणें शोचनीय होऊन जाते.

( १० ) **कृमिभोजन**--पंचमहायज्ञ केल्याशिवाय जे लोक आप-

ल्या द्रव्याचा एकटेच उपभोग घेतात; तें कावळ्यासारखेंच होत. त्यांस ह्या नरकांत कृमि व्हावें लागून कृमींवर निर्वाह करावा लागतो.

( ११ ) **संदंश**—दुष्ट बुद्धीनें जो मनुष्य ब्राह्मणाचें किंवा दुसऱ्याचें धन वगैरे चोरितो, किंवा बलात्कारानें हरण करितो, त्यास ह्या नरकांतील तीव्र यातना भोगाव्या लागतात. येथें यमदूत प्राण्यास तापवून लाल केलेल्या सांडसांनीं भाजतात व त्याच्या अंगाचे लचके तोडतात.

( १२ ) **तप्तसूर्मि**—व्यभिचार करणाऱ्या स्त्रीपुरुषांना हा नरक प्राप्त होतो. येथें यमदूत कामांध पुरुषाला तापविलेल्या लोखंडी स्त्रीच्या पुतळ्याशीं व जारिणी स्त्रीला पुरुषाच्या, पुतळ्याशीं आलिंगन देवावितात आणि तापवून लाल केलेल्या पुतळ्याशीं बांधून त्यांना चाबकानें फोडून काढितात.

( १३ ) **वज्रकंटकशाल्मलि**—पश्वादिकांशीं गमन करणाऱ्या पुरुषास ह्या नरकांत पडावें लागतें, येथें अत्यंत तीक्ष्ण अशा कांट्यांच्या सांवरीवर चढवून फरफरां ओढितात.

( १४ ) **वैतरणी**—जे राजे किंवा राजाश्रित पुरुष धर्ममार्गाचा उच्छेद करितात, त्यांस ह्या नदींत पडावें लागतें. येथें त्यांस जलजंतु जागोजाग तोडतोडून खातात. मग त्यांस स्वतःच्या कर्मांचें स्मरण होऊन पश्चात्ताप होतो. वैतरणी नदी ह्मणजे विष्ठा, मूत्र, पू, रक्त, केंस, नखें, हाडें, चरबी, मांस, असा ह्यांचा प्रवाह होय.

( १५ ) **पूयोद**—जे लोक भ्रष्टपणानें वागून शूद्र स्त्रियांशीं गमन करितात, त्यांस मेल्यावर पू, विष्ठा, मूत्र, कफ, मल ह्यांनीं भरलेल्या ह्या नरकांत पडावें लागतें व तेच अति घाणेरडे पदार्थ खावे लागतात.

( १६ ) **प्राणरोध**—जे ब्राह्मणादि लोक कुत्रीं, गाढवें इत्यादि जना-

वेरें पाळितात, मृगया खेळतात व विहित कर्मांवांचून पशूंची हिंसा करितात. त्यांना हा नरक प्राप्त होतो. येथें यमदूत त्यांची भयंकर हिंसा करितात.

( १७ ) विशसन—जे ढोंगी लोक यज्ञाचें मिष करून मांस भक्षण करण्याकरितां यज्ञयागादिक करितात, त्यांस हा नरक प्राप्त होतो. येथें यमदूत त्या प्राण्यांना महान् यातना देऊन चरचरा कापितात.

( १८ ) लालाभक्ष—जो ब्राह्मण कामांध होऊन समान वर्णाच्या अन्य स्त्रीला बलात्कारानें भोगितो, त्या पातकी पुरुषाला रेताच्या प्रवाहांत पाडून रेत पाजितात.

( १९ ) सारमेयादन—जे राजे किंवा राजाधिकारी चोरी करितात, आग लावितात, विष घालितात आणि लोकांस लुटितात, अशा चोर, लुटारू लोकांना यमदूत कुत्र्यांकडून चाववितात व त्यांच्याकडून लचके तोडवितात. ह्या नरकांत यमधर्मानें सातशें वीस कुत्रे ह्या कामासाठीं पाळिले आहेत.

( २० ) अवीचि—व्यवहारांत किंवा व्यापारांत खोटें बोलणाऱ्याला हा नरक प्राप्त होतो. येथें यमदूत शंभर योजनें उंच अशा पर्वताच्या शिखरावरून खालीं डोकें वर पाय करून त्यांना लोटून देतात. निवळ पाषाणाची भूमि आहे. तेथें प्राणी पडला कीं त्याचे तिळाएवढे तुकडे होतात; पण तो मरत नाहीं! मग त्याला पुनः पर्वतावर चढवून ढकलून देतात. अशा प्रकारें त्याचे फार हाल करितात.

( २१ ) अयःपान—ब्राह्मणानें किंवा ब्राह्मणाच्या स्त्रीनें मद्यपान केलें असतां, तसेंच क्षत्रियानें, वैश्यानें किंवा इतर कोणीं व्रत स्वीकारून सोमपान केलें असतां ह्या नरकांत नेऊन छातीवर पाय देऊन त्याच्या तोंडांत वितळविलेल्या पोलादाचा सळमळीत रस ओतितात.

( २२ ) **क्षारकर्दम**—जो मनुष्य स्वतः नीच असतांना मोठेपणाचा गर्व वाहतो, व विद्वान्, तपस्वी, सच्छील व श्रेष्ठ अशा पुरुषांना बहुमान देत नाहीं तो जिवंत असून मेल्यासारखाच होय. मेल्यावर ह्या नरकांत त्याला खालीं डोकें करून पुरतात. तेथें त्यास अति दुर्धर यातना भोगाव्या लागतात.

( २३ ) **रक्षोगणभोजन**—जे पुरुष नरमेध करितात व ज्या स्त्रिया नरमांस खातात त्या पुरुषांना व स्त्रियांना त्यांनीं मारिलेलीं मनुष्य हीं ह्या नरकांत राक्षसांचीं रूपें घेऊन खाटकाप्रमाणें कुऱ्हाडीनें तोडितात व त्यांचें रक्त पितात.

( २४ ) **शूलप्रोत**—जे लोक वनांत किंवा अन्य ठिकाणीं असलेल्या प्राण्यांना विश्वास दाखवून फसवितात आणि दुःख देतात; अशा निरपराधी प्राण्यांना यातना देणाऱ्यांस हा नरक प्राप्त होतो. यमदूत ह्यांस परलोकीं सुळावर चढवून नानाप्रकारच्या शिक्षा देतात. ह्या वेळीं त्यांना आपली पूर्वकृति आठवूं लागते.

( २५ ) **दंदशूक**—ह्या लोकामध्यें जे पुरुष प्राण्यांना विनाकारण छळितात. त्यांना हा नरक प्राप्त होतो. ह्या नरकांत अनेक प्रकारचे सर्प आहेत. ते त्या पातकी पुरुषांना पकडून उंदराप्रमाणें खाऊन टाकितात.

( २६ ) **अवटनिरोधन**—जे लोक प्राण्यांना अंधाऱ्या विहिरींत. खाड्यांत अथवा गुहांत इत्यादि ठिकाणीं कोंडून ठेवितात, यमदूत त्यांना ह्या नरकांत लोटून देऊन, अग्नीनें व धुरानें गुदमरून सोडितात.

( २७ ) **पर्यावर्तन**—जे गृहस्थाश्रमी पुरुष आपल्या घरीं आलेल्या अतिथींवर कातावून क्रूरपणानें त्यांच्याकडे पाहतात, त्यांना ह्या नरकाची शिक्षा मिळते. ह्या नरकांत गिधाडें, कंक, कावळे. वट इत्यादि पक्षी त्या पुरुषांचे डोळे फोडून बाहेर काढितात.

( २८ ) **सूचिमुख**—कित्येक लोकांस 'आह्मीं श्रीमंत आहों' असा अभिमान होऊन आईबाप, गुरु, इत्यादिकांविषयीं सुद्धां त्यांची पूज्यबुद्धि नसते. " हीं आपलें द्रव्य हरण करतील कीं काय ? " अशी त्यांना शंका असते; आणि द्रव्यव्यय होईल. ही विवंचना त्यांना नेहमीं असते; ते पिशाच्याप्रमाणें द्रव्याचें रक्षण करितात; व द्रव्यप्राप्ति होण्याकरितां अनन्वित पातकें करितात; अशा प्रकारचे सर्व लोक ह्याच नरकांत पडतात. येथें त्यांस नानाप्रकारच्या भयंकर यातना भोगाव्या लागतात.

राजा, अशा प्रकारचे नरक यमपुरींत शेंकडों हजारों आहेत. अधर्माचरणाचे सगळे प्रकार येथें सांगतां येत नाहींत. त्यांतले कांहीं मुख्य मुख्य मीं तुला निवेदन केले. एतावता वर सांगितलेले किंवा न सांगितल्या प्रकारचे जे कोणी अधर्मी पुरुष असतात, ते ह्या सर्व नरकांत पर्यायानें आपापल्या पापकर्मानुसार प्रवेश करितात. तसेंच धर्मप्रमाणें वागणारे पुरुष इतर स्वर्गादि लोकास जातात. पाप आणि पुण्य समान घडलें असल्यास प्राणी ह्या लोकांत जन्मास येतात. पुराणग्रंथामध्यें चवदा भुवनें म्हणून जीं वर्णिलीं आहेत तो ब्रह्मांडकोश एवढाच होय. जो पुरुष श्रद्धाभक्तिपूर्वक परम आदरानें हें ब्रह्मांडस्वरूपाचें वर्णन पठन करितो, श्रवण करितो व लोकांना श्रवण करवितो, त्याची बुद्धि शुद्ध होते. त्याला तत्त्वस्वरूपाचें ज्ञान होतें. इति ४ ॥

---

# अध्याय ५ वा

### नरकयातना चुकविण्याचा उपाय. (६-१)

राजोवाच—

**अधुनेह महाभाग यथैव नरकान्नरः**
**नानोग्रयातनान्नेयस्तन्मे व्याख्यातुमर्हसि ॥ ६ ॥**

**राजा ह्मणाला:**—मुनिवर्य, मनुष्यें ह्या संसारांत असतांना त्यांच्या हातून वारंवार अनेक अधर्म घडतात; त्यामुळें त्यांना भयंकर नरकयातना भोगाव्या लागतात; हें खरें, पण कोणत्या रीतीनें वागलें असतां त्या यातना भोगाव्या लागणार नाहींत. तो मार्ग मला सांगण्याची कृपा करावी.

**श्री शुकाचार्य ह्मणाले:**—राजा नरकयातना चुकविण्यास मुख्य उपाय ईशभक्ति होय. कृच्छ्रचांद्रायणें इत्यादि प्रायश्चित्तें घेतल्यानें पापांचा समूळ नाश होतो असा अर्थ नव्हे; कारण, प्रायश्चित्त देणारे पुरुष कर्ममार्गांत आसक्त असल्यामुळें त्यांचें अज्ञान नष्ट झालेलें नसतें. तेव्हां खरें प्रायश्चित्त म्हटलें म्हणजे ज्ञान होणें हेंच होय: ह्मणून मनुष्यानें आपापल्याला धर्माप्रमाणें वागावें. म्हणजे त्याला हळू हळू ज्ञानाधिकार प्राप्त होतो. नियमानें अन्न सेवन केल्यानें जसा मनुष्याला रोग होत नाहीं. तसा धर्मनियमानें वागणाऱ्या मनुष्याच्या हातून अधर्म घडत नाहीं. ह्याकरितां मनुष्यानें मन आणि इंद्रियें ताब्यांत ठेवून ब्रह्मचर्य व्रताचें आचरण करावें; चित्त शुद्ध ठेवावें! असत्य कदापि बोलूं नये आणि यमनियमादि नियम पाळावे. भक्तिपुरःसर अशा रीतीनें वागणारे धर्मज्ञ, धैर्यवान्, पुरुष, ज्याप्रमाणें अग्नि प्रचंड वेळूच्या बेटाचा नाश करितो, त्याप्रमाणें कायावाचामनेंकरून घडलेल्या पापांचा नाश करितात. जसें सूर्य उगवून धुकें अगदीं नाहींसें करितो, तसें परमेश्वराची अंतःकरणपूर्वक भक्ति करून सर्व कर्में त्यालाच अर्पण करणारा भगवद्भक्त ईशसेवेनेंच आपल्या सर्व कर्मांचा नाश करितो. हें आचरण, हा कर्मनाश, तपश्चर्येच्या योगानेंही होऊं शकत नाहीं. हा भक्तिमार्ग सर्वांत श्रेष्ठ आहे. यांत कोणत्याही प्रकारचें भय नाहीं. नारायणाचे भक्त कल्याणकारक मार्गाचाच अंगीकार करितात. राजा, ज्याप्रमाणें मद्या-

( १ ) योगप्रकरणांतील ९ वा अध्याय पहा.

च्या भांड्याला पवित्र करणें सहस्रावधि नद्यांकडूनही होत नाहीं. त्याप्रमाणें ईश्वराकडे ज्यानें आपलें चित्त लाविलें नाहीं, त्यानें कितीही प्रायश्चित्तें घेतलीं तरी तीं त्याला पूर्णपणें पवित्र करूं शकत नाहींत. ज्या पुरुषांनीं आपल्या मनाला परमेश्वराच्या गुणांची गोडी लावून एकवेळ ते त्या कृष्णचरणारविंदीं जोडिलें कीं, त्यांनीं सर्व प्रायश्चित्तें केल्यासारखींच होत. त्यांना स्वप्नामध्यें देखील काळाचें भय नाहीं. याबद्दल एक जुना इतिहास आहे. तो मी तुला सांगतों; एकाग्र चित्तानें श्रवण कर. त्यांत विष्णुदूतांचा व यमदूतांचा संवाद आहे.

## अजामिळाची कथा.

राजा. कान्यकुब्ज देशांत परस्त्रीरत व अत्यंत दुराचरणी असा एक अजामिळ नांवाचा ब्राह्मण राहत होता. तो चोरी, लबाडी, जुलूम, इत्यादि निंद्य कृत्यांनीं आपला व आपल्या कुटुंबाचा निर्वाह करीत असे. अशा प्रकारच्या आचरणांत त्याच्या वयाचीं ऐशीं वर्षे लोटलीं. त्याला एका दासीपासून दहा मुलगे झाले होते. त्यांतील धाकट्या मुलाचें नांव नारायण असें होतें. त्याचें ह्या धाकट्या मुलावर अत्यंत प्रेम असे. मुलाच्या स्नेहपाशांनीं अजामिळ अगदीं बांधून गेला होता. नारायणावांचून त्याला एक क्षणही चैन पडत नसे. जागृतीं स्वप्नांतही एकसारखा तो दिसे. असा सदोदित त्याला नारायणाचा ध्यास लागलेला होता. ह्या त्याच्या प्रेमातिशयांत आपला मृत्यु जवळ आला आहे, ह्याचेंही त्याला भान राहिलें नाहीं. एके समयीं त्याला कांहीं आजार होऊन तो मरावयास टेंकला. तरी त्याचें मन त्या पुत्रावर होतेंच. त्याचें देहभान नाहींसें झालें, तरी तो " नारायणा, अरे नारायणा " असा एकसारखा टाहो फोडीत होताच. शेवटीं त्याला असें दिसूं लागलें कीं, आपल्याला नेण्याकरितां कोणी भयंकर काळपुरुष हातांत पाश घेऊन आलेले

आहेत! त्यांना पाहून त्याचे प्राण भयानें व्याकुळ होऊं लागले; तरी तो " नारायणा! नारायणा! " अशा हांका मारीतच होता. राजा! तो मरणोन्मुख मनुष्य ईशभजन करीत आहे असें पाहून विष्णूचे पार्षद एकदम तेथें प्राप्त झाले. आणि त्या अजामिळाचे प्राण अंतर्हृदयांतून ओढून काढतांना विष्णुदूतांनीं आपल्या प्रभावेंकरून यमदूतांस प्रतिबंध केला असतां यमदूतांचा व विष्णुदूतांचा संवाद झाला तो असा.—

## यमदूतांचा व विष्णुदूतांचा संवाद.

**यमदूत ह्मणतात**:—"अहो, यमधर्माच्या आज्ञेला प्रतिबंध करणारे असे तुह्मी कोण? तुमचीं रूपें सुंदर असून तुम्ही चतुर्भुज आहां; व विष्णुप्रमाणें शंख, चक्र, गदा, पद्म हीं आयुधें तुम्हीं धारण केलीं आहेत. तुमच्या कांतीनें दिशा उज्ज्वल झाल्या आहेत; तव्हां तुम्ही देव आहां, किंवा उपदेव आहां, अथवा सिद्धांतील श्रेष्ठ आहां? तसेंच धर्ममर्यादांचें पालन करणारा जो यम, त्याचे आम्ही सेवक. आम्ही आपलें योग्य काम बजावीत असतां तुम्ही आम्हांस प्रतिबंध कां करितां?"

**श्रीशुकाचार्य ह्मणाले**:—राजा, यमदूतांचें तें भाषण ऐकून विष्णुदूत मोठ्यानें हांसले आणि गंभीर वाणीनें त्यांना म्हणाले: " अहो, तुम्ही आपल्याला धर्मराजाचे दूत म्हणवितां, तर आम्हांला अगोदर धर्माचें तत्त्व आणि त्याचें लक्षण सांगा पाहूं. शिक्षेस पात्र कोण? कोणतीं कर्में करणारांस दंड करावयाचा? प्रत्येक प्राण्याला शिक्षा केलीच पाहिजे कीं काय? अथवा कांहींजणांना मात्र शिक्षा करावयाची असते? काय तुमचे नियम असतील ते सांगा."

**यमदूत म्हणाले**:—" वेदांनीं जो धर्म सांगितला आहे तो धर्म, व तद्विरुद्ध आचरण करणें तो अधर्म होय. वेद हे साक्षात् नारायणस्वरूप होत. ज्यानें आपल्या स्वरूपीं सत्व, रज आणि तम या गुणांनीं

युक्त गुणकर्मविभागशः प्राण्यांची रचना केली, तो नारायण होय. सूर्य चंद्र, अग्नि, आकाश, भूमि, हृदय, यम, दिवस रात्र, संध्याकाळ आणि धर्म, हे सर्व जीवांच्या पापपुण्याचे साक्षी आहेत. ह्यांच्यामुळें अधर्माचें ज्ञान होतें; असें अधर्म करणारे जे प्राणी असतील, त्यांना त्यांच्या कर्माप्रमाणें शिक्षा होणें योग्य आहे. आतां कर्म करणें सोडलें तर पाप घडणार नाहीं, ही गोष्ट खरी. पण त्रिगुणांपासून प्राण्यांची उत्पत्ति आहे. म्हणून त्या गुणानुसार त्यांच्या हातून कर्महा व्हावयाचींच. ह्या लोकीं जसा धर्म किंवा अधर्म आचरिला असेल, तदनुरूप फल परलोकीं भोगावें लागतें. पुण्यपुरुषानों, ह्या भूलोकीं गुणवैचित्र्यामुळें जसे तीन प्रकारच्या स्वभावाचे प्राणी आढळतात, तसे जन्मांतरींही ते असले पाहिजेत. हें अनुमानानें कळून येतें. ज्याप्रमाणें एक ऋतु पाहिला म्हणजे पुढें येणाऱ्या व मागें गेलेल्या त्या त्या ऋतूंच्या गुणधर्माचें अनुमान होतें, त्याप्रमाणें एका जन्मावरून पुढील व मागील जन्माचें ज्ञान होतें. ( चांगल्या स्थितीत असल्यास पूर्वजन्मीं धर्मिष्ठ होता हें कळतें; वाईट स्थिति प्राप्त झाल्यास पूर्वीं पापाचरण केलें असावें असें समजतें. अशाच प्रकारानें चालू जन्मांतील कृतींवरून पुढील जन्म कोणत्या प्रकारचा मिळणार हेंही धोरण बांधितां येतें.) जन्मरहित परमेश्वर प्राण्याच्या हृदयमंदिरांत राहून व त्याचें कर्म लक्ष्यांत आणून, त्याला कोणता जन्म द्यावयाचा ह्याचा विचार करून ठेवितो. हें अज्ञानी प्राण्याला कळत नाहीं. त्याला " हा स्थूल देह मीच " असें वाटतें व त्या देहाभिमानाच्या योगानें त्याला पूर्वीच्या किंवा पुढील ज-

(१) " दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ॥ बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ १ ॥ " **अर्थः**--अर्जुना आसक्त बुद्धीनें केलेलें कर्म फारच वाईट. ह्मणून कर्मप्रवर्तक त्या समबुद्धीला शरण जा. फलाचा हेतु धरून कर्म करणारे क्षुद्र आहेत. —**गीता.**

न्माचें ज्ञान मुळींच होत नाहीं. प्राणी हस्तपादादि पंच कर्मेंद्रियांच्या योगानें देणें, घेणें, चालणें इत्यादि व्यवहार करितो; श्रोत्रत्वचादि पंचज्ञानेंद्रियांच्या योगानें शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध, जाणतो. आणि आपण स्वतः सतरावा ( एक ) असतांना सोळा उपाधीं-च्या आंत राहून पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें आणि मन यां-च्याद्वारें विषयांचा उपभोग घेतो. तें हें षोडशकलांनीं युक्त असें त्रिगु-णांचें कार्य अनादि लिंग शरीर, पुरुषाला शोक, भय व पीडा देणाऱ्या संसारप्रवाहाची प्राप्ति करून देतें. अज्ञानी प्राणी मन आणि पांच ज्ञानें-द्रियें ह्या महांच्या समुदायाला जिंकीत नाहींत, ह्मणून त्यांची इच्छा न-सली तरी त्यांजकडून कर्में घडतात. व तीं कर्में घडलीं ह्मणजे कोळी ( किडा ) जसा आपण केलेल्या जाळ्यांतच *आपण गुरफाटला जातो, तसा प्राणी आपल्या कर्मानेंच बद्ध होतो; आणि त्यांत वासना राहि-ल्यामुळें त्याला पुनर्जन्म घ्यावा लागतो. असें हें जन्ममृत्यूंचें रहाटग-डगें सतत चालत राहतें; आणि प्राण्यास संसार प्राप्त होऊन त्याच्या पूर्वकर्माप्रमाणें मिळणाऱ्या सुखदुःखांचा तो उपभोग घेत राहतो. हा सं-सार सुटण्यास ईश्वराचें भजन हाच एक उत्तम उपाय आहे. अहो देव-श्रेष्ठ! हा अजामिल मूळचा शास्त्रसंपन्न असून सदाचरणी होता. ह्याच्या अंगीं दया, क्षमा, शांति. सत्य भाषण हे गुण असून हा इंद्रियनिग्रही होता. हा अतीत, अभ्यागत, वृद्धजन, अग्नि आणि गुरु ह्यांच्या सेवेंत निरंतर तत्पर असे आणि कोणाचेही दोष न काढितां हा सर्वांशीं मि-त्रत्वानें वागे. एकंदरींत साधूचे सर्व गुण त्याच्या ठायीं होते. एके दि-वशीं हा पित्याच्या आज्ञेवरून समिधा, दर्भ, फुलें वगैरे आणण्याकरि-तां वनांत गेला होता. तेथें कामवासनेनें अंध झालेला एक शूद्र मद्य प्राशन केलेल्या एक स्त्रीबरोबर विहार करीत असतांना त्याच्या दृष्टी-स पडला. त्या स्त्रीकडे पाहून हा ब्राह्मणही काममोहित झाला. ह्यानें

आपल्या चंचल झालेल्या मनाचें आकलन करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला, परंतु तो सर्व व्यर्थ झाला. पुढें हा धर्ममार्ग सोडून वागूं लागला. नंतर हा अजामिल आपल्या सुशील व अल्पवयस्क पत्नीचा त्याग करून त्या दासीशीं रममाण झाला. आणि तिच्या संतोषाकरितां त्यानें पित्याचें सर्व द्रव्य नाहींसें केलें. तिचें कुटुंब मोठें असल्यामुळें ह्याचें तें द्रव्य पुरेसें झालें नाहीं. शेवटीं नानातऱ्हेचीं निंद्य कर्मे करून द्रव्य संपादन करावें आणि तिच्या कुटुंबाचें पोषण चालवावें, असा ह्याचा क्रम सुरू झाला. असा हा पापी असल्यामुळें ह्याला योग्य शिक्षा व्हावी ह्मणून आह्मी यास यमधर्माकडे घेऊन चाललों आहों ह्यानें आपल्या पापकर्माबद्दल कोणतेंही प्रायश्चित्त घेतलें नाहीं. ह्मणून तेथें ह्यानें शिक्षा भोगिली पाहिजे."

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**--राजा! त्या न्यायनिपुण विष्णुदूतांनीं तें यमदूतांचें भाषण ऐकून घेतलें. आणि ह्मणाले-" अहो, ही मोठी आश्चर्याची गोष्ट आहे कीं, ज्या मनुष्याकडे यत्किंचित्‌ही पाप नाहीं, अशा पुण्य पुरुषाला धर्मराजाच्या दरबारांत दंड होतो ह्याला काय ह्मणावें? जे आपणास प्रजाजनांचे पिते किंवा गुरु असें ह्मणवितात, आणि ज्यांच्या हातून अन्याय किंवा पक्षपात कधींही घडत नाहीं. तेच जर असा अन्याय करूं लागले तर प्राण्यांनीं शरण तरी कोणाला जावें? स्वतः यमधर्म जर असा अन्याय करूं लागेल, तर त्याचे दूतही करतील यांत कांहींच नवल नाहीं. धर्मराज न्याय करतील तो प्रमाण, असें मानून हे अज्ञानी लोक त्याजवर विश्वास ठेवितात; आणि अशा त्या विश्वासाच्या ठिकाणीं असा अंधेर! तेव्हां याला काय ह्मणावें? अहो या अजामिलानें मरणोन्मुख स्थितींत ईश्वराचें पुण्यप्रद नांव उच्चारिलें ह्मणून अनंत जन्मींच्या पापाचें प्रक्षालन झालें आहे. जो ईश्वराच्या नांवाचा उच्चार करितो, त्याचीं कोणतींही पापें असलीं तरी भस्म होतात,

आणि भगवान् विष्णु त्याचें सर्वस्वीं रक्षण करितो. वेदवादी पुरुषांनीं पापांच्या नाशाकरितां व्रतादिक अनेक प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत; परंतु तीं केल्यानें मनुष्यास ईश्वराच्या गुणांचें ज्ञान होत नाहीं, ह्मणून त्याची बुद्धि फिरून पाप करण्याकडे प्रवृत्त होतें. भगवंताच्या नामस्मरणाचा महिमा फार मोठा आहे. त्यापासून ईश्वराच्या गुणांचें ज्ञान प्राप्त होतें व त्या ज्ञानामुळें पुन्हां पापाकडे प्रवृत्ति होत नाहीं. ह्मणून दूतहो, ज्या अर्थी ह्या अजामिळानें मरणसमयीं[1] भगवन्ताचें नाम उच्चारिलें व तेणेंकरून ह्याच्या सर्व पापांचें क्षालन झालें आहे; त्या अर्थी ह्याला तुह्मी नेऊं नका. वैकुंठवासी परमेश्वराचें नांव कोणत्याही मिषानें मनुष्याच्या मुखांतून निघालें, तरी ज्याप्रमाणें चुकून अमृत घशांत गेलें असतां सर्व रोगांचा परिहार होतो, आणि काया अमर होते, त्याप्रमाणें त्या मनुष्याचें सर्व पाप नाहींसें झालें आणि हा पुण्यपुरुषांमध्यें अग्रगण्य झाला आहे.

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**—राजा, अशा प्रकारें भगवन्नामोच्चारणाचा महिमा किती मोठा आहे, हें विष्णुदूतांनीं यमदूतांना सांगून, त्या अजामिळ ब्राह्मणाला यमपाशापासून सोडवून मृत्युपासूनही मुक्त केलें. तेव्हां यमदूत हें सर्व वर्तमान यमधर्माला सांगण्याकरितां यमलोकीं गेले; व त्यांनीं यमराजाला तेथें घडलेला सर्व प्रकार निवेदन केला. इकडे ब्राह्मण यमपाशांतून सुटल्यावर शुद्धीवर आला. आणि विष्णुदूतांना पाहून त्याला पराकाष्ठेचा[2] आनंद झाला. व त्यानें त्यांस शिरसा वंदन

(१) " अंतकाले च मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरं ॥ यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ,, **अर्थ**—मरणकाळीं माझी आठवण ठेवून जो देह सांडतो, तो माझ्या सारूप्याला जाऊन मिळतो, यांत संशय नाहीं ॥ ,, —**गीता.**

(२) " यारे यारे धरूं हरिनाम तारूं ॥ भवाचा सागरू भय नाहीं ॥ साधुसंत गेले आनंदीं राहिले ॥ हरिनामीं झाले कृतकृत्य ॥ ,, —**नाथ.**

केलें. हे पुण्यपुरुषा राजा. अजामिळाचे मनांत कांहीं तरी बोलावयाचें आहे, असें लक्षांत येतांच ते विष्णुदूत त्या ठिकाणींच गुप्त झाले. त्या उभयतांचा संवाद अजामिळाच्या कानीं पडला होता; त्यावरून त्याला 'वेदप्रणीत धर्म सगुण होय व भगवद्भक्तांचा धर्म निर्गुण होय,' असें स्पष्ट समजून आलें, आणि तत्काळ त्याची भगवंतावर भक्ति जडून गेली. भगवन्नाम माहात्म्य श्रवण केल्यामुळें त्या अजामिळाला आपल्या पापकर्माबद्दल पश्चात्ताप होऊन तो आपलीच निर्भर्त्सना करून घेऊं लागला. आतां तें तुला सांगतों:—

अजामिळाची निर्भर्त्सना.

**अजामिळ ह्मणाला**:—" अहो. मीं मनोनिग्रह न करितां फार निंद्य कृत्यें केलीं, ह्मणजे शूद्र स्त्रीशीं रत होऊन ब्राह्मण्य नष्ट केलें. माझ्या-सारख्या कुलांगाराला धिक्कार असो. मीं आपल्या तरुण आणि पति-व्रता स्त्रीचा त्याग करून व नीच दासीशीं रममाण होऊन राहिलों. किती तरी नीच कर्म हें! म्यां कृतघ्नानें आपल्या वृद्ध मातापितरांचा त्याग केला. असा जो मीं अत्यंत पापी, त्या मला घोर नरकांतील यातना प्राप्त होणारच, मला आतां तुकतेंच जें कांहीं दिसलें तें स्वप्न तर नव्हेना! किंवा तो चमत्कार मीं येथें प्रत्यक्षच पाहिला! कारण मला ओढून नेणारे ते पाशधारी पुरुष गेले कोठें! व ज्यांनीं त्यांपासून मला मुक्त केलें. ते सुंदर चतुर्भुज सिद्ध तरी गेले कोणीकडे! या जन्मीं मीं पापाचरण केलें आहे. तथापि मला श्रेष्ठ ईशा त्या देवांचें दर्शन झालें एवढ्यावरून पूर्वजन्मीं मी कांहीं तरी पुण्य संपादिलें असावें हें उघड दिसतें. वेश्येशीं रममाण होऊन राहणाऱ्या माझ्यासारख्या हत-भाग्याला अंतीं नारायणाचें स्मरण पूर्वसंचिताशिवाय कोठून होणार? आतां यापुढें मी आपलें मन व इंद्रियें स्वाधीन ठेवून नरकयातना चुकवीन. " अविद्या आणि कर्ममार्ग " यांपासून प्राणी बद्ध होतो. आतां

त्या सर्वांचा त्याग करून सर्व प्राण्यांचा हितकर्ता, शांत, दयाळू व इंद्रियनिग्रही होईन; आणि जिनें मज अधमाला 'आपल्या क्रीडेसाठीं पाळलेला मृग मानून' पाहिजे तसा नाचायाला लाविलें त्या स्त्रीरूप मायेनें ग्रासलेल्या आत्म्याला मुक्त करीन. तसेंच मी अतःपर सत्य आत्म्यावर मन ठेवून शरीरादिकांवरील "मी व माझीं" ही बुद्धि सोडीन व भगवंताच्या गुणांचें कीर्तन, स्मरण इत्यादि करून शुद्ध झालेलें मन त्या ईश्वराकडे लावीन, व देहादिकांचा सर्व अहंकार सोडून भगवच्चरणीं लीन होईन."

**श्री शुकाचार्य म्हणाले:**—राजा, किंचित् कालपावेतों सत्समागम झाला. तेवढ्याचमुळें त्या अजामिलाला वैराग्य उत्पन्न झालें, व तो तत्काळ सर्वसंगपरित्याग करून हरिद्वारीं गेला. ह्या स्थलीं तो ईश्वराच्या मंदिरांत बसून योगाभ्यास करीत राहिला. त्यानें इंद्रियसमूह विषयापासून हटवून, मन आत्मस्वरूपीं लाविलें. नंतर देहादिकांपासून आत्मा पृथक् आहे असें विचारद्वारें ओळखून त्यानें समाधि-योगानें आत्म्याचें परब्रह्मस्वरूपीं ऐक्य केलें. परब्रह्मस्वरूपीं बुद्धीचें ऐक्य झालें असतां, तेच विष्णुदूत त्याला पुन्हा दिसले. ह्या ब्राह्मणानें लागलींच त्यांना शिरसावंदन केलें व तत्काळ त्या गंगातीर्थांत शरीर टाकून भगवंताच्या पार्षदांचें स्वरूप धरिलें. तो ब्राह्मण परमेश्वराच्या दूतांसह विमानांत बसून आकाशमार्गें वैकुंठास गेला. राजा, अशा प्रकारें त्या निंद्यकर्म करणाऱ्या अधर्मरत अजामिलाला यमदूत नरकांत टाकण्याकरितां नेत होते, पण त्याच्या थोड्याशा नामस्मरणाच्या पुण्याईमुळें त्याच्या सर्व यातना चुकून त्याला वैकुंठलो-

(१) "स्वहिताकारणें संगती साधूंची ॥ भावें भक्ति हरीची भेटे तेणें ॥ हरि तेथें संत संत तेथें हरि ॥ ऐसे वेद चारी बोलताती. ॥"—**नाथ.** (२) ज्ञानप्रकरण १३ वा अध्याय पहा.

काम जातां आलें. म्हणून ज्याला मोक्षमार्गाची इच्छा आहे, त्यानें भक्तिपूर्वक अंतःकरणानें ईश्वराचें नामस्मरण करावें; म्हणजे तो कितीही पापी असला, तरी त्याला त्या नरकाची भीति राहणार नाहीं. अजामिलाला पुत्राच्या निमित्तानें मरणसमयीं हरिनामस्मरण झालें, इतक्यानें तो विष्णुपदीं गेला; मग श्रद्धापूर्वक नारायण नामोच्चार करणारा पुरुष उत्तम लोकीं जाईल, यांत नवल तें कोणतें ?

**राजा परीक्षिति म्हणाला:**—मुनिवर्य, अजामिलाला नेण्यास विष्णुदूतांनीं यमदूतांस प्रतिबंध केल्यावर ते दूत ती सर्व हकीकत सांगण्याकरितां यमधर्माकडे गेले. तेव्हां यमधर्मानें त्यांस काय सांगितलें तें कृपा करून मला सांगावें.

**श्री शुकाचार्य म्हणाले:**–राजा, ते यमदूत संयमिनी नगरीचा अधिपति जो यम, त्याजकडे जाऊन त्यांनीं त्यास विज्ञापना केली: " हे प्रभो. या प्राणिसमूहाला त्याच्या कर्मानुसार फल देणारे नियामक देव आहेत तरी किती ? जर प्राण्यांना दंड करणारे पुरुष अनेक असतील. तर कोणतें कर्म करणाऱ्या प्राण्यास कोणी शासन करावयाचें, तें तरी आम्हांस सांगा. ह्या लोकांत कर्मकर्ते प्राणी अनेक आहेत, तसे शिक्षा करणार जर अनेक असतील, तर सर्वांत श्रेष्ठ तरी कोण ? सर्व प्राण्यांच्या पापपुण्याचें पृथक्करण आपणच करितां ह्मणून आपण सर्वांत श्रेष्ठ असावेत असें आह्मांला वाटतें. हें जर खरें असेल, तर आज आपली आज्ञा चौघा अद्भुत पुरुषांनीं मोडिली; तेव्हां असे ते आपणांहून श्रेष्ठ पुरुष होते तरी कोण ? तें आह्मांस कळल्यास जर

(१) " अपि चेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितो हि सः ॥ " **अर्थ**–जो एकनिष्ठेनें मला ( भगवंताला ) भजतो, तो अत्यंत दुराचारी असला तरी साधु ( भूतिपाप ) समजला पाहिजे. कारण त्याची बुद्धि सम्यक् झालेली असते.—**गीता.**

कांहीं लाभ होईल असें आपणास वाटेल. तर ह्याविषयींचा खुलासा आपण करावा. आह्मी ज्या पुरुषास आणावयास गेलों होतों त्यानें "**नारायणा !**" असा नामोच्चार केल्याबरोबर ते पुरुष "**भिऊं नको ! भिऊं नको** !" असें ह्मणत तत्काळ तेथें प्राप्त झाले."

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**—राजा. प्रजांना शिक्षण लावण्याचें काम यमदेवाचें होय, असें दूतांचें तें भाषण ऐकून घेऊन नंतर यमधर्मानें नारायणनामाचा उच्चार करीत करीतच आपल्या दूतांना ह्मटलें:—"दूतहो ! स्थावरजंगमात्मक जगाचा अधिकारी मजहून निराळा दुसराच आहे. मी फक्त जंगम प्राण्यांचा त्यांतही पातकी पुरुषांचा शास्ता असून त्या ईश्वराचा सेवक आहें. वस्त्र जसें केवळ तंतूंनीं भरलेलें असतें, तसें हें सर्व विश्व परमेश्वराच्या स्वरूपीं ओतप्रोत भरलेलें आहे. उत्पत्ति, स्थिति, लय व हे सर्व त्याच्याच अंशापासून होतात. मी यम, देवेंद्र, निर्ऋति, वरुण, सोम, अग्नि, शंकर, वायु, सूर्य, ब्रह्मदेव आदि करून सर्व देव त्याच्याच सत्वांशापासून उत्पन्न झाले आहेत. तरी त्याच्या चरित्राचा आह्मांलाही अंत लागत नाहीं. कारण तो अनंत आहे. मग जे जीव मायावश झाले आहेत त्यांना त्याचा अंत कसा लागणार? जसें नेत्रांना सर्व पदार्थ पाहण्याची शक्ति आहे, पण पदार्थांना नेत्र दिसत नाहींत. तसें ईश्वर सर्वांना जाणतो, पण प्राणी ईश्वराला इंद्रियांच्यायोगें, मनानें किंवा प्राणांच्यायोगें जाणूं शकत नाहींत. कारण तो जगदात्मा अवाङ्मनसागोचर असून स्वतंत्र आहे. त्याचे दूत बहुधा सर्वत्र फिरत असतात. त्यांचीं स्वरूपें व गुण ईश्वरासारखेच असल्यामुळें, त्यांच्या दर्शनानें लोकांचीं मनें हरण होतात; कारण, तो मनोहर आहे. त्याचें दर्शन झालें असतां देव देखील पूजन करितात. ते विष्णूची भक्ति करणाऱ्या पुरुषांचें मजपासून व इतर सर्वांपासून रक्षण करितात. साक्षात् भगवंतानें जो धर्म सांगितला आहे, त्याचें तत्त्व ब्र-

ह्मदेव, नारद, शंकर, सनत्कुमार, कपिल, मनु, प्रल्हाद, जनक, भीष्म, बलि, व्यासपुत्र शुक, आणि मी ( यम ) असे बाराजण मात्र जाणतों. इतरांना या भागवतधर्मांतील गुह्य कळत नाहीं. ह्या लोकामध्यें भक्तियोग प्राण्याला मुक्ति देणारा आहे. आतां हरिनामोच्चाराचें माहात्म्य कसें आहे तें सांगतों:—

हरिनामोच्चारमाहात्म्य.

हे दूतांनों ! अजामिळासारख्या महा पातक्याला, त्या नामोच्चारणाच्या योगानें मृत्यूपासून आपली सुटका करून घेतां आली. भगवंताच्या गुणांचें, चरित्रांचें व नामांचें कीर्तन करणारांचीं सर्व पापें भस्म होतात. अमृतसंजीवनी ज्यांना माहीत नाहीं, ते वैद्य जशीं सटरफटर औषधें देत बसतात, त्याप्रमाणें पापनाशनाचा योग्य उपाय माहीत नसलेले लोक नानाप्रकारचीं प्रायश्चित्तें देत बसतात; पण बुद्धिमान् पुरुष असला कांहीं एक खटाटोप न करितां षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराची अंतःकरणपूर्वक भक्ति करितात. अशा प्रकारच्या पुरुषांना दंड करण्याचें माझें सामर्थ्य नाहीं, ह्मणून तुह्मी तशा पुरुषांकडे वांकड्या नजरेनेंसुद्धां बिलकुल पहात जाऊं नका. जे पुरुष भगवंताचें भजन, पूजन इत्यादि करीत नाहींत, किंवा भगवद्भक्तांची अवहेलना करितात, त्यांनाच माझ्या दरबारांत घेऊन येत जा. हे कुरुराजा परीक्षिते, यमधर्मानें आपल्या दूतांना असें सांगून त्यांजकडून झालेल्या अपराधाबद्दल परमेश्वराची क्षमा मागितली. याप्रमाणें हें भगवन्नामाचें महात्म्य

( १ ) " कांकरितोशिणवाचेंसिनारायण । जपतांसमाधानहोईलतुज ॥ कृष्णगोविंद हरेगोविंद । वाचेसिहाछंदनामपाठ ॥ वंदितांलयसकळिकाळसर्वदां । नपावसिआपदा असतांदेहा ॥ नामाह्मणेंओंगळशिणझालासांगें । प्रपंचवाऊगेमांडिपरतो ॥ " ( २ ) " ह्मणतांवाचेंनामवंदितयायम । काळादिकसमवंदानया ॥ ऐसेंनामश्रेष्ठसकळावरिष्ठ । उच्चारितांनांदवैकुंठराजे ॥ नोहानामामहिमावाखाणितब्रह्मा । नकळेतयाउपमाआदिअंतीं ॥ नामाह्मणेंपाठेंनामाचेंनिवाडें । नरिप्रत्यक्षभेटे विठ्ठलहरि ॥ "

अगाध आहे. जे लोक ईश्वराचीं चरित्रें वारंवार गातात अथवा श्रवण करितात त्यांच्या ठिकाणीं भक्ति उत्पन्न होते. त्या भक्तीच्या योगानें चित्त शुद्ध होऊन या दुःखकारक संसारांत त्यांचें मन आसक्त होत नाहीं. तें भक्तिमाहात्म्य श्रवण करून यमदूत फिरून भगवद्भक्तांच्या वाटेस कधींही गेले नाहीत. परीक्षिते. भगवान् अगस्ति ऋषि मलय पर्वतावर परमेश्वराची पूजा करीत बसले असतां त्यांनीं हा गुप्त इतिहास मला सांगितला. इति ५. ।

---

# अध्याय ६ वा.

## नरदेहप्रशंसा ( ५-१९ )

**अहो अमीषां किमकारि शोभनं प्रसन्न एषां स्विदुत स्वयं हरिः ॥**
**यैर्जन्म लब्धं नृषु भारताजिरे. मुकुंदसेवौपयिकं स्पृहा हि नः ॥२१॥**

**श्रीशुकाचार्य म्हणतात:**—राजा, ह्या भरतभूमीमध्यें प्राण्याला जो अनुपम लाभ घडतो, त्याबद्दल देवही त्याचा हेवा करितात. ते ह्मणतात कीं, ह्या भरतभूमींत आह्मांस मनुष्याचा जन्म मिळेल, तर आह्मांलाही सायुज्य प्राप्त करून घेतां येईल; परंतु हें घडावें कसें? राजा देवादिकांना स्वर्गादि सुख प्राप्त आलें असतांही तळमळ लागते कीं, "अरेरे! अनेक कठिण कठिण असे पुष्कळ यज्ञ यागादिक केले, तपें केलीं, व्रतें आचरलीं. दानधर्म केले व तुच्छ 'स्वर्ग संपादिला. पण त्याचा उपभोग कांहीं कामाचा नाहीं. येथें आह्मांला नारायणाच्या चरणकमलाचें नित्य स्मरण घडत नाहीं; कारण, ह्या लोकांत दिव्य उपभोग्य पदार्थ विपुल असून प्राप्य आहेत. अशा दिव्य भोगांत इंद्रियें निमग्न झाल्यामुळें आह्मी देवता परमार्थसा-

धनास अंतरलों. तेव्हां आतां काय करावें ? राजा, स्वर्गांत राहणाऱ्या पुरुषांना युगेंच्यायुगें आयुष्य असतें. व भारतभूमध्यें कायतें शंभर वर्षें आयुष्य असतें. असा आयुर्मानांत भेद आढळतो व त्यामुळें स्वर्ग आपणांस श्रेष्ठ वाटतो; पण स्वर्गलोकीं जाऊन उपयोग काय ? पहा— कल्पपर्यंत ज्यांचीं आयुष्यें आहेत त्या देवादिकांना देखील पुनर्जन्म घ्यावा लागतोच ! ह्मणून त्यांचीं स्थानें ( स्वर्गसुख ) संपादन करण्यापेक्षां भरतभूमीवरील मनुष्यजन्मांत आयुष्य थोडें असतें, तरी देखील तो जन्म संपादणेंच योग्य होय. कारण, विद्वान् पुरुष त्या मनुष्यदेहामध्यें एका क्षणांतच कर्मांचा त्याग करून ईश्वराच्या निर्भय पदास प्राप्त होतात. ह्मणजे आपल्या अल्प आयुष्यांतच पुनर्जन्म चुकवितात. हे पुण्यपुरुषा, ज्या ठिकाणीं भगवद्गुणांचें गायन, कीर्तन चालू नाहीं, जेथें भगवद्भक्त व साधुजन राहत नाहींत, आणि ज्या स्थलीं यज्ञपति ईश्वराच्या पूजेचे समारंभ चालत नाहींत, तेथें तो प्रत्यक्ष ब्रह्मदेवाचा लोक असला तरी देखील राहूं नये. राजा, भारतवर्षामध्यें परमार्थप्राप्तीचीं अनेक साधनें असून भगवद्भक्तांचें वास्तव्य असल्यामुळें, ह्याची योग्यता विशेष आहे. जे लोक अशा स्थलीं जन्मास येऊन आपल्या जन्माचें सार्थक करीत नाहींत, व संसारादिकांत मग्न होतात, ते किती तरी मूढ होत बरें. पहा—पक्षी एकवार जाळ्यांतून सुटून पुनः जाळ्यांत पडावा तद्वत् हें त्यांचें आचरण होतें ह्मणजे ते संसारांत मोहपाशानें बांधले जातात ह्यांत संशय नाहीं. राजा परिक्षिते, भरतभूमींतील लोक यज्ञयागादि क्रिया करून इंद्रादिक देवतांना संतुष्ट करितात; परंतु इंद्र अग्नि इत्यादि भिन्न भिन्न नांवांनीं

( १ ) "बहुता सुकृतें नरदेह लाधला ॥ भक्तीविण गेला अधोगति ॥ पाप भाग्य कैसें न सरेचि कर्म ॥ न कळेची वर्म अरे मूढा ॥ अनंत जन्मांचें सुकृत पदरीं ॥ त्याचे मुखीं हरि ठाव होय ॥ रावरंक होका उंचनीच याति ॥ भक्तीविण माती मुखीं त्याच्या ॥ एका जनार्दनीं हरि हरि म्हणतां ॥ मुक्ति सायुज्यता पाठीं लागे ॥ "

आवाहन केलें तरी त्या देवांच्या रूपानें तो एक परिपूर्ण परमात्मा आनंदानें तेथें येऊन यज्ञांतील हविर्भाग ग्रहण करितो. सर्व उपभोग व ऐश्वर्यें त्या ईश्वराच्याच आधीन आहेत. ईश्वराजवळ जें मागावें तें तो देतो हें खरें. पण मागणी अशी असावी कीं. ती मागणी प्राप्त झाली ह्मणजे दात्याचा व आपला ऋणानुबंध संपला असें होऊं नये; व ह्या दृष्टीनें विचार केला असतां सकाम भक्तीपेक्षां निष्काम भक्तीच अत्यंत आवश्यक ठरते. कारण, सकाम भक्तीनें एकदां आपली कामना पूर्ण झाली कीं आपलें भगवंताकडे कांहीं येणें निघत नाहीं; परंतु असा परिणाम निष्काम भक्तीचा नाहीं. निष्कामनेनें सेवा करणाऱ्या पुरुषांविषयीं भगवंतास नित्य काळजी वाहावी लागते. व त्यामुळें भक्तांस कोणतेंही संकट प्राप्त होणार नाहीं; अशी व्यवस्था नेहमीं ठेवूनही त्यास अंतीं सायुज्य देतो. आतां सकाम भक्तांची व्यवस्था तशी नव्हे. पहा--तो जी कामना करितो ती सिद्धीस गेल्यानंतर पुन्हां ईश्वराकडे येणें कांहीं निघत नसतें; ह्मणून त्याची अगदीं पहिल्याप्रमाणें दीन स्थिति होऊन जाते; अर्थात् सकाम भक्तीपेक्षां निष्काम भक्ति अत्यंत श्रेष्ठ आहे असें सिद्ध झालें. " आह्मीं पूर्वीं जे उत्तम यज्ञ केले, जें अध्ययन किंवा शुभकर्म केलें, त्याचें फल सध्यां स्वर्ग भोगीत आहों. आतां त्यांतील कांहीं सुकृत उरलें असेल तर त्याचें फळ आह्मांला भरतखंडांत जन्म मिळो. व त्या स्थळीं गेल्यावर 'ईशसेवा करावयाची' अशी स्मृति राहो " व " अक्षय्य. निर्मल. शुभ असें अत्यंत महापुण्य सांठविण्यासाठीं भारत भूप्रदेशीं जन्म मिळावा " अशी देव देखील इच्छा करितात. ह्याचें कारण हेंही एक आहे. त्यांना वाटत असतें कीं, आह्मांला भरतभूमीवर

---

( १ ) अनन्याश्चिंतयन्तो माम् ये जनाः पर्युपासते ॥ तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ **अर्थ**—जो मला अनन्य भावानें शरण येईल, व माझीच उपासना चालवील, त्या पुरुषाच्या योगक्षेमाचा भार सर्वस्वीं मी वहातों. —**गीता.**

जन्म मिळेल कधीं ? तसेंच महान् पुण्य प्रभावानें आह्मांला उत्तम पदाची प्राप्ति कधीं वरें करून घेतां येईल ? आह्मांला दान, नानाप्रकारचे यज्ञ, तपश्चर्या ह्यांच्या योगें विष्णूची पूजा करून महत् पदाचें दर्शन कधीं मिळेल ? ज्याच्या स्वभावाला ईश्वराचे गुण वर्णन करणें रुचतें; ईश्वराच्या भक्तांना जो आवडतो, व महापुरुषांची सेवा करणें ज्याच्या मनाला प्रिय वाटतें. तो उत्तम पुरुष आह्मांला वंद्य आहे. वेदार्थ जाणणें. पुराण श्रवण करणें व साधुजनांचा सहवास धरणें हें ज्याला रुचतें त्या उत्तम पुरुषाला आह्मी वंदन करितों. भरतखंडांत जन्म मिळाला असून जो मनुष्य सदाचरणाविषयीं पराङ्मुख असेल तो अमृताचा कलश टाकून विषकलश घेऊं इच्छितो असें ह्मणावें लागतें. वासुदेवाची पूजा करणें सोडून जो दुष्कर्म करितो, तो कामधेनु टाकून रुईचा चीक संपादूं इच्छितो असें ह्मटलें पाहिजे. एतावता. देवसुद्धां भारतभूप्रदेशाची अशी प्रशंसा करितात. जे लोक अशा ठिकाणीं प्राप्त होऊन विषयांवर आसक्त राहतात, त्यांना ईश्वराच्या मायेनें लुटलें असेंच समजावें. इति ६ ।

---

# अध्याय ७ वा.

## बालोपदेश ( ११-२० )

स्वर्गिणोऽप्येतमिच्छंति लोकं निरयिणस्तथा ॥
साधकं ज्ञानभक्तिभ्यामुभयं, तदसाधकम् ॥ १२ ॥
न नरः स्वर्गतिं, कांक्षेन्नारकीं वा विचक्षणः ॥
नेमं लोकं च कांक्षेत देहावेशात्प्रमाद्यति ॥ १३ ॥

**भगवान् म्हणाले:**--उद्धवा, मनुष्यदेह हा निष्काम कर्माच्या योगें परमेश्वराची अनन्य भक्ति अथवा विचारद्वारें परब्रह्माचें ज्ञान उत्पन्न करून देणारा असल्यामुळें, ह्या नरतनूची मोठी थोरवी आहे. नरकांतील प्राण्यांप्रमाणें स्वर्गांतील देवही अशा नरदेहाची इच्छा करितात, कारण, स्वर्ग आणि नरक ह्या दोन्ही ठिकाणचीं शरीरें ज्ञान व भक्ति साधण्याच्या कामाचीं नाहींत. एवढ्यासाठीं विवेकसंपन्न पुरुषास जशी नरकीं जाण्याची इच्छा नसते, तशीच स्वर्गीं जाण्याची इच्छा धरूं नये, आणि नरदेह अत्युत्तम आहे असें जाणून आपण पुन्हां मनुष्यजन्मास यावें अशीही कामना ठेवूं नये. कारण, देहावर आसक्ति जडली कीं, मनुष्याचें परमार्थलाभाकडे अवधान राहत नाहींसें होतें. यास्तव नरदेहांत आल्यावर प्रथम देहबंधांतून सुटण्याची व्यवस्था केली पाहिजे. पुन्हां नरदेह मिळण्याची हांव धरणें ही मोठी चुकी होय. उद्धवा, जन्ममरणाचा फेरा चुकविण्यास हा मनुष्यदेह समर्थ आहे खरा; परंतु केवळ मनुष्ययोनींत जन्म झाला म्हणजे, सर्व पुरुषार्थ साधले असें नव्हे. ही नरतनु प्राप्त झाल्यावर कर्मयोग, भक्तियोग, ज्ञानयोग ह्यांची सिद्धि करून न घेतल्यास, उत्तम नरजन्म फुकट गेला असेंच होईल. ह्यासाठीं मृत्यू प्राप्त होण्याच्या पूर्वीं मोक्षसाधनांच्या यत्नाचा अवलंब करून ह्या देहाचें साफल्य करणें इष्ट होय. बाबा, हा नरदेह उत्तम आहे खरा; पण तो तसाच क्षणभंगुरही आहे. ह्याकरितां सावधान चित्तानें ह्या देहाचें सार्थक्य करण्याविषयीं अविश्रांत झटणें हें मुमुक्षूंचें प्रधानकर्तव्य होय. उद्धवा, मनुष्यजन्म प्राप्त झाल्यावर परमार्थसिद्धीकरितां अवश्य असलेलें कर्तव्य बजाविण्यास हा नरदेहच विघ्नें करीत असतो, म्हणजे ह्या देहाच्या संगोपनाविषयीं व इंद्रियादिकांच्या तृप्तीविषयीं जीव त-

त्पर होऊं लागतो व मग तो श्रेयस्कर मार्गास विसरतो. ह्यासाठीं देहादिकांविषयीं अनासक्ति धारण करून मुमुक्षु पुरुषानें वासनांचा त्याग करावा व शांत रहावें. बाबा, एखादा वृक्ष तोडण्याचे कामास प्रारंभ झाल्यावर त्या वृक्षावर घरटें करून राहिलेला पक्षी जसा एकदम तो वृक्ष सोडून जातो, तसें ह्या देहाचें आयुष्य नाहींसें करण्यास दिवस व रात्र हीं प्रवृत्त झालीं आहेत, अर्थात् आपलें आयुष्य व्यर्थ चाललें आहे हें लक्षांत आणून विवेकी पुरुष देहादिकांची सर्व आसक्ति सोडून त्या परमात्म्याचें ज्ञान संपादून शांति म्हणजे परमसुख पावतात. उद्धवा, हा नरदेह अत्यंत श्रेष्ठ असून मिळण्यास मोठा अवघड आहे. ह्या जन्मामध्यें जीवाला परमात्म्याची प्राप्ति करून घेतां येते, तशी ती कोणत्याही अन्य जन्मांत करून घेतां येत नाहीं. यास्तव हा नरदेह सकल फलांचें मूळ होय. म्हणजे ह्यामध्यें कर्मे करून पाहिजेत तीं फळें मिळवितां येतात. हा कोट्यावधि प्रयत्नांनींही प्राप्त करून घेणें अशक्य असतें; पण सहज दैवयोगानें मिळाला म्हणून सुलभ वाटतो. हें शरीर संसारसमुद्रांतून तरून जाण्याचें साधनभूत एक नौकाच होय. ही नौका चांगली दृढ आहेच, या अवधींत गुरूला शरण जावें. गुरूला शरण गेलें पुरे कीं तो हिचा चालविणारा नावाडी बनतो. ईश्वरस्मरण केलें पुरे कीं तो अनुकूल असा वारा होऊन हिला इष्ट स्थानीं नेण्यास सहाय्य करितो. अशीं उत्तम साधनें अनुकूल असतां जो मनुष्य संसारसमुद्रांतून तरून जाणार नाहीं, तो आत्मघाती समजावा. इति ७ ।

---

# अध्याय ८ वा.

## प्रल्हादोपदेश ( १–६ )

प्रल्हाद उवाच—

कौमार आचरेत्प्राज्ञो धर्मान्भागवतानिह ॥
दुर्लभं मानुषं जन्म तदप्यध्रुवमर्थदम् ॥ १ ॥
यथा हि पुरुषस्येह विष्णोः पादोपसर्पणम् ॥
यदेष सर्वभूतानां प्रिय आत्मेश्वरः सुहृत् ॥ २ ॥

**प्रल्हाद म्हणाला:**—समंजस पुरुषांनो ! हा मोक्षप्रद मनुष्यजन्म दुर्लभ आणि अशाश्वत आहे. असें पूर्ण ओळखून बाळपणांतच भागवतधर्म आचरण करूं लागावें; कारण, इहलोकीं भगवंताला शरण जाणें हेंच मनुष्याचें मुख्य कर्तव्य होय. तो भगवान् सर्व भूतांचा प्रिय आत्मा असून सर्वांचें कल्याण करणारा ईश्वर आहे. मुलांनो, पूर्व कर्माच्या योगानें जसें यत्न केल्यावांचून मनुष्यास दुःख प्राप्त होतें, तसेंच

( १ ) सोन्यासारखा मनुष्य देह प्राप्त झाला असतां जे लोक आपल्या आयुष्याचा व्यय विषयसुख भोगण्याकडे करितात, अर्थात हातीं आलेलें अमृत टाकून मृगजळाकडे धांव घेतात, किंवा कल्पवृक्षाची राई तोडून सोट्या साक्षपानें त्या जागीं भांग पेरितात, अथवा हातचें चिंतामणिरत्न देऊन गंधर्वनगरीचा ठाणा म्हणजे आकाशांत तुरळक तुरळक ढगें असलों म्हणजे त्यांवर भासणारे काल्पनिक हत्ती, घोडे, नगरें, वाडे इत्यादि ऐश्वर्य विकत घेतात असें समजावें. नाना प्रकारचे विनोद किंवा टवाळ्या करणें, सोंगट्या खेळणें, रिकामी ओरडाओरड इत्यादि कामाला नेहमीं तयारी, पण रामनाम जपायाचें म्हटलें कीं जणो वत्तिशीच पडते. घरीं आयती कामधेनु चालून आली असतां हे लोक तिला पोसवत नाहीं, म्हणून घालवून देतात ! श्रीरामनाम उच्चारिलें तर जसें कांहीं त्यांचें गांठोडेंच बुडतें. ( नाथांचे अभिप्राय )

इंद्रियजन्य सुखही दैवयोगानें आपोआप प्राप्त होतें; म्हणून प्राण्यानें सुख प्राप्त होण्यासाठीं प्रयत्न करूं नये; त्यायोगें आयुष्याचा मात्र व्यर्थ क्षय होतो. आणि त्या मार्गानें अत्यंत सुखदायक ईशपदाची प्राप्ति होत नाहीं. ह्यास्तव. विचारवंत संसारी पुरुषानें, जोंपर्यंत आंगांत जोम आहे, तोंपर्यंतच कल्याणप्राप्तीचा यत्न करूं लागावें. कारण, मनुष्यानें आयुष्य अवघें शंभर वर्षें त्यांपैकीं अर्धे ( पन्नास वर्षें ) तर निद्रेंतच जातें; बाल्य व कौमार ह्या दोन अवस्थांत मुग्धपणें खेळतां खेळतां वीस वर्षें जातात; वृद्धपणीं ( ऐशीं वर्षांनंतर ) शरीर अशक्त झालें, म्हणजे तीं वीस वर्षें चिंतेंत जातात. त्याचें बाकी राहिलेलें अत्यल्प आयुष्य काय तें दहा वर्षें तरुणपणांत नानाप्रकारचीं संकटें सोसून विषयोपभोग भोगण्यांत आणि सुखप्राप्तीचे यत्न करण्यांत तेव्हांच निघून जातें. ज्याच्या हातून इंद्रियदमन मुळींच झालें नाहीं. असा कोणता तरी पुरुष गृहावर आसक्त झालेल्या व दृढ स्नेहपाशांनीं जखडून गेलेल्या अशा मनाला संसारापासून सोडविण्यास समर्थ होईल काय? चोर, सेवक, वाणी वगैरे लोक प्राणाचीही पर्वा न करितां द्रव्यसंचय करितात. असें प्राणापेक्षांही प्रिय जें द्रव्य त्याची इच्छा सोडील कोण? मधुरभाषिणी जी प्रिय पत्नी तिच्या समागमसुखाचें स्मरण होतांच अंतःकरण तल्लीन होतें, अशा त्या पत्नीचा त्याग करवेल कसा? स्नेहपाशानें बद्ध झालेल्या मित्रांचा, पुत्रप्रेमामुळें बद्ध झालेल्या आपल्या कोमल बालकांचा, व आप्तप्रेमामुळें बद्ध झालेले भाऊ, बहिणी, आईबाप इत्यादिकांचा मोह त्याच्यानें दूर कसा करवेल बरें? सुंदर आणि उपभोग्य वस्तूंनीं भरलेलीं घरें, तसेंच शेतें, पशु, सेवकजन इत्यादिकांवर आसक्त झालेलें मन त्यास आवरतां कसें येणार? उदाहरण--कोळी नामक किडा जसा स्वतः तयार केलेल्या तंतूच्या घरांतच गुदमरून मरतो, तसा हा प्राणी आपण कल्पिलेल्या संसाररूपी

जाळ्यांत गुरफटून जातो. शिश्न आणि उदर ह्या इंद्रियांपासून होणारी सुखेंच काय तीं उत्तम, असें त्याला वाटतें. अशा पुरुषाचा मोह दूर होऊन त्यास वैराग्य कसें प्राप्त होणार ? त्या विषयांध पुरुषाला कुटुंब-पोषणासाठीं या संसारांतील कर्मांचें आचरण करितां करितां आपलें आयुष्य क्षीण होत असून आपला पुरुषार्थ नाश पावत आहे, याचें त्यास भान देखील नसतें. तो आपल्या कुटुंबांत इतका रममाण झाले-ला असतो कीं, तापत्रयांनीं सर्वत्र अगदीं गांजिलें, तरी त्याला विरक्त-बुद्धि उत्पन्न होत नाहीं. परक्याचें द्रव्य हरण केलें तर इहपरलोकीं शासन भोगावें लागतें, हें माहित असूनही तो पुरुष जितेंद्रिय नसल्या-मुळें कुटुंबपोषणाकरितां परद्रव्याचें हरण करण्यास मागेंपुढें पहात नाहीं. एतावता, दैत्य हो ! ज्ञानवान् पुरुष देखील संसारांत गढला कीं आत्मविचार करण्यास असमर्थ होतो. कारण तेथें त्याच्या मनांत हें स्वकीय व तें परकीय, अशी भेदभावना उद्भवते; मग शेवटीं अज्ञानी प्राण्याप्रमाणें तो अंध नरकांत पडतो ! दैत्यपुत्रहो ! बाळपणापासूनच भगवद्भक्ति करूं लागावें, असें मी म्हणतों. याचें मुख्य कारण हेंच कीं, स्त्रियांच्या नेत्रकटाक्षांत मदन म्हणजे काम वास करीत असतो. एकदां पुरुष स्त्रीलंपट होऊन पुत्ररूप शृंखलेनें बद्ध झाला कीं, मग त्याला कधींही आपल्या आत्म्याची मुक्तता करून घेण्याचें सामर्थ्य रहात नाहीं; असें नेहमीं आपल्यास आढळतें. ह्मणून, मुलांनो, तुह्मी ह्या स्त्रीलंपट दैत्यांचा सहवास सोडून द्या, आणि सर्वसंगपरित्याग करणारे साधुलोक ज्याला परमपद असें म्हणतात त्या आदिनारायणाला शरण जा. अर्थात् सर्वसंगं सोडणारे साधु त्या ईश्वरालाच मोक्ष मानितात. मुलांनो, त्या परमेश्वराला संतुष्ट करण्यास तुह्मांला मुळींच आयास पडणार नाहींत. कारण, तो सर्वांतर्यामीं असल्यामुळें येथेंही आहेच. स्थावरजंगमादि पदार्थांमध्यें, यच्चयावत् जीवांमध्यें, निर्जीव घटपटादिकांमध्यें, आकाशा-

दि पंचमहाभूतांत, त्रिगुणांत, गुणस्वरूपांत आणि महत्तत्वांत निर्विकार परब्रह्मरूप ईश्वर ओतप्रोत भरलेला आहे. मित्रहो! भोक्ता जीव हें परमेश्वराचें व्यापक व अनिर्देश्य ( दाखवितां न येणारें ) रूप होय. आणि शरीर हें व्याप्य व निर्देश्यरूप होय. तो स्वतः भेदरहित असून ही शुक्तिरौप्यवत् ( शिंपीवर भासणाऱ्या चांदीप्रमाणें ) भेद असा भास होतो. ह्मणून व्याप्य, व्यापक, निर्देश्य. अनिर्देश्य इत्यादि संज्ञक विशेषणें शास्त्रांत सांगितलीं आहेत; आणि त्रिगुणरूपात्मक सृष्टि उत्पन्न करणारी जी माया, तिच्या उपाधीच्या योगानें त्याचें स्वरूप आच्छादित दिसत असल्यामुळें, तो अशा भिन्न भिन्न प्रकारें भासतो. पण परमेश्वराचें खरें स्वरूप ह्मटलें ह्मणजे, शुद्ध निजानंदबोधात्मक होय. म्हणून मुलांनो, तुह्मी ह्या आसुरी संपद् दैत्यांचा सहवास सोडून देऊन सर्व जीवमात्रांचे ठायीं प्रेम ठेवा. भूतदयेनें त्या परमेश्वरास मोठा संतोष होतो. भगवत्प्रसन्नतेनें आपणांस काय मिळणार नाहीं बरें? अर्थात् सर्व कांहीं मिळतें. कालपरत्वें परिणाम पावणारे जे धर्म, अर्थ व काम हे आपणांस काय उपयोगीं? आणि हरिगुणगायन करण्यांत जर सत्य सुखाचा ( ब्रह्मानंदाचा ) उपभोग घ्यावयास सांपडतो, तर मोक्षाची तरी इच्छा कशाला? वेदांनीं सांगितलेल्या धर्म, अर्थ, काम, आत्मविद्या, तर्कशास्त्र, वगैरे गोष्टी जर आपल्या आत्म्याचे उद्धार करण्यास साहाय्यभूत असतील तरच त्या चांगल्या व सत्य आहेत असें मी समजेन. हें शुद्ध व दुर्लभ ज्ञान नराचा सखा जो नारायण, त्यानें नारदास उपदेशिलें. भगवंताची अचल भक्ति प्राप्त करून घेऊन त्याच्या चरणरजानें ज्यांचे देह पुनित झाले आहेत, अशांनाच हें प्राप्त होतें. इति ८।

---

# अध्याय ९ वा.

## ऋषभदेवाचा उपदेश ( ५–९ )

ऋषभ उवाच--

**नायं देहो देहभाजां नृलोके कष्टान्कामानर्हते विड्भुजां ये ॥**
**तपो दिव्यं पुत्रका येन सत्वं शुद्ध्येद्यस्माद्ब्रह्मसौख्यं त्वनंतम् ॥१॥**

**ऋषभदेव म्हणाले**:--मुलांनो ! मानवदेहाचें इतिकर्तव्य विषयांना उपभोग घेणें हें नव्हे. विषयोपभोगापासून परिणामीं कष्ट भोगावे लागतात. विष्ठा भक्षण करून उदरपूर्ति करणारे कृमिकीटक देखील विषयसुख भोगतात. तें भोगावयास मिळालें ह्मणजे मनुष्यानें मोठा पुरुषार्थ साधला, असा मुळींच अर्थ नाहीं. ह्याकरितां मनुष्यानें कांहीं असाधारण कृत्य करण्याची हांव बाळगिली पाहिजे. मुलांनो ! मनुष्यदेह प्राप्त झाल्यावर तपश्चर्या करावी हेंच श्रेयस्कर आहे. तुम्ही दिव्य तपश्चर्या करा. तपोबळानें तुमची चित्तशुद्धि होईल, चित्त शुद्ध झालें म्हणजे तुम्हांस ब्रह्मस्वरूप अवगत होईल. बाबांनों, नरजन्म मिळाल्यावर मनुष्यानें ज्ञानाची प्राप्ति करून घेण्यास झटलें पाहिजे. त्याकरितां त्यानें सत्पुरुषांची सेवा करावी. सत्पुरुषांची सेवा म्हणजे मुक्तिमार्गाचें द्वारच होय. स्त्रीपुत्रादिकांच्या पाशांत गुंतून गेलेल्या ऐहिक सुखावलंबी पुरुषांचा आश्रय म्हणजे नरकाचें द्वारच होय. ह्याकरितां त्यांपासून दूर रहा. सत्पुरुष ओळखावे कसे ह्मणून म्हणाल, तर त्यांच्या खुणा लक्षांत ठेवा. सत्पुरुषांचे अंतःकरणांत सर्व भूतांविषयीं समभाव असतो. त्यांच्या अंतःकरणांत कामक्रोधादिक मनोविकार कधींच उचंबळत नाहींत. सर्वांचेंच कल्याण व्हावें हा विचार त्यांच्या अंतर्यामीं सदासर्वकाळ वसत असतो. त्यांचें आचरण नित्य उत्तम प्रकारचें असतें. त्यांना

परमेश्वराच्या ठिकाणीं लय लावणें हाच परम पुरुषार्थ वाटतो. आपली व आपल्या आप्तेष्टांची शरीरप्रकृति नीट राखून नानाप्रकारचीं सुखें संपादन करावीं, अशी वासना धारण करणाऱ्या लोकांवर सत्पुरुष कधींही प्रेम करीत नाहींत. जे लोकांशीं अगदीं कामापुरता म्हणजे शरीररक्षणापुरता मात्र संबंध ठेवितात तेच सत्पुरुष होत. बाबांनो! इंद्रियांची तृप्ति करणें म्हणजे आपली ज्ञानकला नष्ट करणें हें होय. मनुष्य एकदां इंद्रियांच्या संतोषासाठीं उद्योग करूं लागला कीं, त्याची विवेकबुद्धि शिथिल झाली म्हणून समजावें; याप्रमाणें त्यांचा विवेक शिथिल झाला. कीं तो भलभलतीं कर्मे करण्यास प्रवृत्त होतोच! मुलांनो, इंद्रियें तृप्त करून ज्या देहाच्या हितासाठीं झटावयाचें, तो देह कसा आहे ह्याचा नीट विचार करा. पहा.—एक तर ह्याचें तुम्ही कितीही प्रकारें रक्षण केलें तरी हा नष्ट होणारा आहे; व दुसरें असें कीं, जरी हा देह नष्ट झाला तरी ह्याच्या सुखाकरितां जीं पापें तुम्हीं केलीं असतील, त्यांचीं फळें तुम्हांस भोगल्याशिवाय गत्यंतर नाहीं. याकरितां ह्या देहांतून कायमची सुटका होईल असाच प्रयत्न करणें इष्ट आहे. तुम्ही पुनः दुसऱ्या देहाच्या तयारीच्या उद्योगास अतःपर लागूं नका. जोंपर्यंत मनुष्याची बुद्धि परमेश्वराच्या सत्स्वरूपीं जागृत् असते, तोंपर्यंत देहादिकांची प्राप्ति होत नाहीं. परंतु त्या सत्स्वरूपाचा विसर पडला कीं, कर्म करण्याकडे मनाची प्रवृत्ति होते; व त्या योगें तत्काल शरीरबंधन भोगावें लागतें. ह्याप्रमाणें मनावर अज्ञानाचें आवरण पडलें म्हणजे मनुष्य कर्माधीन होतो; आणि फिरून जोंपर्यंत परमेश्वराच्या ठायीं त्याची निष्ठा दृढ होत नाहीं तोंपर्यंत तो जन्ममरणाच्या फेऱ्यांत गुंतून राहतो.' मुलांनो! एकदां शरीरबंधन प्राप्त झालें म्हणजे ज्यामुळें मनुष्यास जें दुःख प्राप्त झालेलें असतें, तें अज्ञान अधिकाधिक वाढत जातें; मग त्याला देहाभिमान उत्पन्न होतो व इंद्रियांचे व्यापार यथार्थ भासूं ला-

गतात, आणि इंद्रियांची तृप्ति करण्याच्या भरीस पडून तो त्रिविध-ताप भोगतो. आतां ते विषय कोणते व त्यांची निवृत्ति कशी होते तें सांगतोः—

### विषयांची प्रवृत्ति व निवृत्ति.

गुलानों. वासनांमध्यें विषयसुखाची वासना ही फारच बलवत्तर आहे. ह्या वासनेच्या योगानें 'ही माझी स्त्री व हा माझा पति' अशी मनुष्याच्या मनाची दृढ भावना होते; व ह्यामुळेंच पुढें गृह, क्षेत्र, पुत्र, आप्त, द्रव्य इत्यादिकांच्या ठिकाणीं "हीं माझीं आहेत" असा प्रचंड मोह उत्पन्न होतो! त्यामुळें विषयांबद्दल देखील अहंता व ममता उद्भवणें साहजिकच आहे. पूर्व कर्मामुळें बांधला गेलेला हा हृदयाचा अहंरूप दृढ ग्रंथि[1] जेव्हां आत्मज्ञानानें शिथिल होतो, तेव्हां तो स्त्रीपुत्रादिकांच्या मोहापासून दूर होतो; आणि त्यानंतर बंधनाचें कारण अहंकार सुटून पुरुष मुक्त होत्साता परमपदास पावतो. इति ९.

## अध्याय १० वा.

### भवाटवीचें वर्णन ( १–१४ )

श्रीशुक उवाच—

**य एष देहात्ममानिनां सत्त्वादिगुणविशेषविकल्पित कुशलाकुशलसमवहारविनिर्मित विविधदेहावलिभिर्वियोगसंयोगाद्यना-**

( १ ) भिद्यते हृदयग्रंथिश्छिद्यंते सर्वसंशयाः ॥ क्षीयंते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ १ ॥ **अर्थ—**हृदयग्रंथीचा ( अहंकाराचा ) नाश झाला म्हणजे सर्व संशय ( असंभावना व विपरीत भावना ) नाहींसे होतात. नंतर त्याचीं कर्में क्षीण होऊन त्यायोगें त्याला दिव्यदृष्टि ( आत्मसाक्षात्कार ) प्राप्त होते. ( २ ) ज्ञानप्रकरण १५ वा आणि १६ वा अध्याय पहा.

दिसंसारानुभवस्य द्वारभूतेन षडिन्द्रियवर्गेण तस्मिन्दुर्गाध्ववदसुगमेऽध्वन्यापतित ईश्वरस्य भगवतो विष्णोर्वशवर्तिन्या मायया जीवलोकोऽयं यथा वणिक्सार्थोऽर्थपरः स्वदेहनिष्पादितकर्मानुभवः श्मशानवदशिवतमायां संसाराटव्यां गतो नाद्यापि विफलबहुप्रतियोगेहस्तत्तापोपशमनीं हरिगुरुचरणारविन्दमधुकरानुपदवीमवरुन्धे । यस्यामु ह वा एते षडिन्द्रियनामानः कर्मणा दस्यव एव ते ॥ २ ॥

श्रीशुकाचार्य म्हणाले:—राजा परीक्षिते! अखिल चराचरावर सत्ता चालविणाऱ्या श्री भगवान् महाविष्णूच्या स्वाधीन असणाऱ्या मायेनें ह्या जीवसमुदायाच्या ठायीं देहादिक आपले आहेत अशी एकदां भावना जडली म्हणजे तिचा परिणाम असा होतो कीं, जीव हे सत्त्व, रज, तम ह्या त्रिगुणांपैकीं एक अथवा सर्व गुणांच्या योगानें बरीं किंवा वाईट कर्मे करण्यास प्रवृत्त होतात; श्रोत्र, त्वचा, नेत्र, घ्राण, जिव्हा व मन हीं इंद्रियें तृप्त कशीं होतील, हाच मात्र त्यांस निदिध्यास असतो; व त्यामुळें ते आज अनादिकालापासून नानाप्रकारच्या देहांचा स्वीकार व त्याग करीत, ह्या अपार संसाराचा अनुभव घेत आहेत. राजा, घोर अरण्यांतील बिकट मार्गाप्रमाणें ह्या संसारांतील मार्ग अतिभयंकर आहेत. जसा व्यापाऱ्यांचा तांडा द्रव्यलोलुप होऊन चुकून अरण्यांत शिरतो; तद्वत् हा जीव केवळ आपल्या कर्मानें ह्या स्मशानाप्रमाणें अमंगल व भयंकर अशा भवारण्यांत शिरला आहे. अद्यापि त्याला आपण जीं कर्मे करीत आहों तीं व्यर्थ आहेत, यास्तव तीं सोडून द्यावीं अशी इच्छा उत्पन्न होत नाहीं. श्रोत्रादिक षडींद्रियें शत्रूप्रमाणें आपणांस विपत्तींत घालीत आहेत, हें अजून त्यास कळत नाहीं; आणि परमात्मा व सद्गुरु ह्यांच्या पदकमलीं मधुकर होऊन राहिल्यानें संसारांतील त्रिविधताप नष्ट होतील, असा त्यास विश्वास

उत्पन्न होत नाहीं. राजा. मन, नेत्र व त्वचा इत्यादि इंद्रियें ह्यांस त्यांच्या कर्मांवरून संसाररूप अरण्यांतील चोरच म्हणण्यास हरकत नाहीं; एकदां हा जीव सहा चोरांच्या तावडींत सांपडला, म्हणजे त्यांनें ईश्वरप्राप्तीकरितां मोठे कष्ट करून जें धर्मरूप धन थोडेंबहुत संचय केलेलें असेल, तें ते लबाडून घेतात. एखाद्या श्रीमंत मनुष्याला दुर्व्यसनाच्या नादीं लावून तो बेताल झाला म्हणजे दुष्ट लोक जसें त्याचें सर्वस्व लुटतात, तशीं नेत्र, त्वचा, घ्राण इत्यादि इंद्रियें, सुंदर रूप पाहणें, स्त्रियांस स्पर्श करणें. गाणें ऐकणें. पक्कान्नें सेवन करणें. सुगंध ग्रहण करणें. ऐहिक सुखाविषयीं विचार करणें इत्यादि क्षुद्र कर्माच्या नादीं जीवाला लावून त्या जीवाचें परमार्थसाधनरूपी धन लुटतात. राजा. स्त्रीपुत्रादिक हीं नांवानें मात्र स्वकीय होत; परंतु त्यांची कृति लांडग्याप्रमाणें व कोल्ह्याप्रमाणेंच असते. पहा,—धनगरानें राखलेल्या मेंढ्यांना जसे लांडगे त्याच्या देखत बळजबरीनें उचलून नेतात. त्याप्रमाणें स्त्रीपुत्रादिक हीं जीवानें केलेला धर्मसंग्रह त्याच्या देखत बळजबरीनें नाश करितात. राजा. गृहस्थाश्रम म्हणजे कर्मक्षेत्रच होय. ज्याप्रमाणें शेतांत सालोसाल नांगरणी व निंदणी होत असूनही त्यांतील बीजें नष्ट झालीं नसल्यास तीं प्रतिवर्षी पर्जन्य पडतांच उगवून जिकडे तिकडे गवत, वेली वगैरेंची दाटी होऊन जाते; त्याप्रमाणेंच ह्या गृहस्थाश्रमांतील कर्माचीं बीजें नष्ट न होतां वासनारूपानें राहून प्रसंगोपात् फिरून उद्भवतात जसा कापुराच्या करंड्यांतील कापूर संपला तरीही त्यांतील कापुराचा वास नाहींसा होत नाहीं; तसें गृहस्थाश्रमांत विषय भोगण्यास मिळत नाहींतसे झाले तरी त्यांच्या वासना अवशिष्ट राहतात; व ह्या वासनाच पुढील जन्मांतील कर्माचीं बीजें होत. राजा, जीव अशा गृहस्थाश्रमांत येऊन पडला. म्हणजे डांसासारखे व माशासारखे नीच असे दुष्ट लोक धाड घालून त्याच्या बाह्य प्राणांना त्रासवून

सोडितात (पुरुषाचे बाह्यप्राण म्हणजे द्रव्य होय). व इतका त्रास झाला तरी तो पुरुष त्याच मार्गांत फिरत राहतो. त्याच्या ठिकाणीं जो मायामोह उत्पन्न होतो, त्यामुळें त्यास नानाप्रकारच्या विषयसुखांच्या इच्छा उत्पन्न होऊन तो अनेक कर्मे करण्यास प्रवृत्त होतो. व त्या कर्मांत त्यास गोडी वाटून गंधर्वनगराप्रमाणें मिथ्याभूत असलेल्या ह्या मृत्युलोकाला सत्य मानितो. कधीं कधीं तो भोजन, मैथुन इत्यादिकांमध्यें लुब्ध होऊन मृगजळासारख्या मिथ्याभूत ( प्रथमदर्शनीं रम्य, परंतु परिणामीं दुःखदायक ) अशा विषयांकडे धांव घेतो. क्वचित् प्रसंगीं सुवर्ण त्याच्या हातीस पडतें. सोनें म्हणजे एक प्रकारची अग्नीची विष्ठाच आहे. जगांतील सर्व दोष ह्या सोन्याच्या आश्रयानें राहतात. जसा रानामध्यें थंडीनें कुडकुडत असलेला मनुष्य अग्नि मिळविण्याविषयीं आतुर होऊन कोलतीसारख्या आकाराच्या पिशाचाला धरण्याला जातो व फसतो, तसा हा पुरुष सुवर्ण संग्रहीं ठेवण्याचा प्रयत्न करून शेवटीं फसतो. सारांश पिशाच धरणाऱ्या माणसांची जी दशा होते ( तें पिशाच हातीं लागत नाहींच; कदाचित् सांपडलेंच तर त्याला मारून खातें ) तीच अवस्था ह्या सोनें ठेवणाऱ्या पुरुषाची होते; म्हणजे क्वचित् प्रसंगीं चोर किंवा दरोडेखोर त्याला मारून टाकितात. केव्हां केव्हां राहावयास जागा, प्यावयास पाणी व निर्वाहास द्रव्य इत्यादि उपजीविकेच्या साधनांच्या भरीस पडून ह्या संसाररूपी रानांत प्राणी एकसारखा इकडे तिकडे भटकत असतो. तरुण स्त्री म्हणजे केवळ वावटळच होय. एकादे वेळीं ती ह्याला अंकावर घेते; त्या वेळीं तिच्याविषयींची प्रेमरूपी धूळ चोहोंकडे उडून ह्यास सर्वत्र अंधार भासूं लागतो, व तो अनाचार करण्यास प्रवृत्त होतो. त्या अंधारांत आपलें दुष्कर्म दिग्देवता पाहत आहेत, हें त्याच्या लक्षांत मुळींच येत नाहीं. एकादे वेळीं संसारसुखांतील निरर्थकता त्याच्या लक्षांत येते, परंतु देहाभिमानांत गुंग होऊन त्या निरर्थकतेची त्यास

पुढें स्मृति होत नाहीं. व अशा विस्मरणामुळेंच तो फिरून मृगजलासारख्या मिथ्या संसारसुखाच्या पाठीस लागतो. कित्येक वेळीं अतिशय त्रासदायक व भयंकर असे शत्रु किंवा अधिकारी पुरुष एव्हां किंवा पर्यायानें त्यास धमकी वगैरे देतात; त्यामुळें त्याचें अंतःकरण अगदीं घाबरून जातें. राजा, ज्याचें पूर्व सुकृत जेथवर असतें, तेथवर त्याची मर्दी ठीक चालते; तें सुकृत नष्ट होतांच तो सुखप्राप्तीसाठीं धनीक लोकांच्या मागें लागतो. ते लोक काजर, श्वेतकावळी इत्यादि विषवृक्षासारखेच निरुपयोगी असतात. ते धनीक आपल्या द्रव्याचा व्यय ऐहिक किंवा पारमार्थिक अशा कोणत्याही कृत्यांकडे करीत नसल्यामुळें ते जीवंत असून मेल्यासारखेच होत; व हा त्या धनिकांच्या मागें लागून आपणही जीवंत असून मेल्यासारखाच बनतो. एखादे प्रसंगीं नीच लोकांच्या संगतीला लागून त्याची बुद्धि चकते; तेव्हां तो अचानक पाखंडांत जाऊन पडतो. हा मार्ग इहलोकीं व परलोकीं अशा दोन्ही ठिकाणीं दुःख देणारा आहे. पाखंडपणानें दुसऱ्याला त्रास दिल्यामुळें केव्हां केव्हां त्याला अन्न देखील मिळत नाहींसें होतें मग तो आपल्या बापाची किंवा मुलाची एखादी दर्भाची काडी देखील ज्याच्याजवळ असेल, त्यास एकदम खावयास धावतो. फार तर कशाला? आपल्या पित्याला किंवा पुत्राला देखील खाऊन टाकण्यास तयार होतो! केव्हां केव्हां संसारांत त्याला खडतर प्रसंग येऊन संसार हा वणव्याप्रमाणें दुःखमय आहे, अशी त्याची खातरी होते व त्यामुळें फार विरक्तता उत्पन्न होते. कधीं कधीं त्याला असा विपरीत काल प्राप्त होतो कीं, राजपुरुष हे राक्षसाप्रमाणें त्याचें सर्वस्व बुचाडून नेतात; व मग त्यायोगें अतिशय दुःख होऊन तो मूर्छित पडतो! केव्हां केव्हां हा कामसुखाचा लेश तरी मिळावा म्हणून शोध करीत फिरत असतो. व जेव्हां परस्त्री किंवा परद्रव्य घ्यायाला जातो, तेव्हां त्या स्त्रीचा पति अथवा धनाचा मालक

किंवा राजा त्याला यथेच्छ बडवितात; मग तत्काळ हा अपार नरकांत पचत पडतो! ह्यावरून विद्वान लोक ह्मणत असतात कीं, कर्म हें इहलोक व परलोक अशा दोन्ही ठिकाणीं जीवाला संसाररूप धान्य पिकवून देणारें क्षेत्र ( शेत ) होय. स्त्री ह्मणजे परमेश्वराची मायाच होय. तिची व ह्याची गांठ पडली, कीं ती आपल्या भुजलतांनीं त्याला दृढ आलिंगन दिल्याशिवाय रहात नाहीं. ह्याची अक्कलहुशारी तात्काळ लटपटून जाते. मग हा प्राणी तिला क्रीडेसाठीं घर बांधून देण्याच्या खटपटींत गुंततो. प्राण्याला स्त्रीसंगापासून पुत्र व कन्या होतात. मग तो पत्नी व अपत्यें ह्यांचें भाषण, अवलोकन, विलास ह्यांच्या योगानें पूर्ण नादावून जाऊन अखेरीस आपण होऊन स्वतःला अपार अंधतम नरकांत लोटितो. राजा, काळ हें षड्गुणैश्वर्यसंपन्न श्रीमहाविष्णूचें सुदर्शनचक्र होय. ह्या काळचक्राच्या गतीमुळें वय भराभर निघून जात असतें. आयुष्य संपलें कीं, हें चक्र क्षणमात्रांत ब्रह्मदेवापासून गवताच्या काडीपर्यंत सर्व प्राणीमात्रांचा देखत देखत संहार करितें. तथापि असें काळचक्र धारण करणाऱ्या सनातन प्रभूचा अनादर करून तो अनार्य व कृत्रिम अशा नास्तिक धर्माचा स्वीकार करितो. नास्तिक धर्म हा केवळ गिधाडें व बदकांबुळें ह्यांसारखा नीच व तुच्छ होय. राजा, ज्याची सनातन धर्मावर सुद्धां श्रद्धा नाहीं, त्याची पाखंडावर तरी श्रद्धा कशी बसेल बरें? ह्याचें मन अस्थिर जाणून पाखंडी लोक ह्यास सोडून देतात; मग हा त्या समुदायांतून निघून फिरून ब्राह्मणसमूहांत राहूं लागतो. परंतु मग ह्या मूर्खाला ब्राह्मणांचें उपनयनादि श्रौतस्मार्त कर्मानुष्ठान कोठून आवडणार? शेवटीं तो ब्राह्मणांचा आचार सोडून देऊन शूद्राप्रमाणें वागूं लागतो. शूद्रांना वेदोक्त कर्मांचा अधिकार नसल्यामुळें ते वानराप्रमाणें केवळ कुटुंबभरण व स्त्रीसमागम ह्यांतच रम-

( १ ) योगप्रकरण ४ था अध्याय पहा.

माण असतात; ह्यास्तव त्यांचें व ह्याचें ठीक जमतें. राजा, त्यास शूद्राचार करूं लागल्यावर मुळींच प्रतिबंध नाहींसा होतो; मग मनसोक्त वर्तन करण्याची संवय होऊन तो अगदींच बहकतो; व मैथुनादि विषयसुखांत इतका तल्लीन होतो कीं, आपण मरणाधीन आहों, ही गोष्ट त्याच्या स्मरणांतून पार निघून जाते. जसे वानर झाडांवर स्त्रीपुत्रादिकांत खेळत बागडत असतात, तसा हा प्राणी घरांत ऐहिक सुखभोगार्थ आपल्या स्त्रीपुत्रांमध्यें खेळत बागडत असतो. ह्याप्रमाणें ह्या संसारमार्गांत सुखदुःखांचा अनुभव घेणारा जीवसमुदाय, एखाद्या पर्वताच्या गुहेसारख्या भयंकर दुःखमय खड्यांत पडतो, व तेथें ह्याला मृत्यूरूप हत्तीची एकसारखी भीति वाटत असते. त्या विपन्न स्थितींत थंडी, वारा इत्यादि त्रिविध तापांपासून बचाव करण्याची शक्ति त्याच्या अंगीं मुळींच रहात नाहीं, व घोर चिंतेंत निमग्न होऊन तो सर्वस्वीं हताश होतो. एखादे वेळीं एकमेकांशीं व्यवहार करितांना दुसऱ्यांपासून तो लबाडीनें पैसा उपटतो. जवळचा पैसा संपला ह्मणजे शय्या, आसन, भोजन इत्यादि उपभोग मिळत नाहींतसे होतात, पुढें तो दुसऱ्याकडे याचना करूं लागतो; पण याचना करून मनोरथ पूर्ण होत नाहींत; तेव्हां चोरी वगैरे गुन्हे करण्यास मागेंपुढें पहात नाहीं. व मग लोक त्याची निंदा, अपमान, मारझोड वगैरे करण्यास कमी करीत नाहींत. राजा, ह्याप्रमाणें लोकांशीं त्याचें वैर वाढत असतांही प्राक्तनानुसार तो विवाहादिक नवीन संबंध जोडतो, व ते दुःसह झाल्यास तोडूनही टाकतो. एकंदरींत ह्या संसारमार्गामध्यें नानाविध दुःखांनीं व उपसर्गांनीं जेर झालेला प्राणी अनेक संकटें भोगून मृत्यू पावतो. व त्याचा सोबती त्यास तेथेंच टाकून जातो. पुढें तो नवीन जन्माचा स्वीकार करून रडत, पडत, भीत, बडबडत, ओरडत, खिदळत, गात व मार खात असतो. पण ज्या परमात्मस्वरूपापासून भ्रष्ट झाल्यामुळें ह्या

भवाटवींत हिंडावें लागलें, व ज्या परमात्म्याचें स्वरूप ह्मणजे भवाटवीचा शेवट, अशा त्या परमपदरूप मूलस्थानाला तो अद्यापिही परत येत नाहीं. राजा, भगवद्भक्त मात्र ह्या गोष्टीला अपवाद होत. ते प्रारब्धकर्मामुळें ह्या संसारांत आले असल्यास, परमात्मस्वरूपाचा विचार करून प्रारब्धकर्म संपतांच फिरून पूर्वस्थलीं निवृत्त होतात. जीव ह्या संसारचक्रांत सांपडतो. ह्याचें कारण तो भवाटवींतून पार पाडणारा जो योगमार्ग त्यास अनुसरून वागत नाहीं हें होय. जे पुरुष प्राणिमात्रांचा द्रोह करीत नाहींत, ज्यांचीं षडींद्रियें स्वाधीन व अंतर्मुख असतात, आणि जे योगशास्त्र जाणतात, ते ह्या संसारचक्रांत सांपडत नाहींत. राजा, दिग्गजांना जिंकून टाकणारे व यज्ञयागादिक अनुष्ठानें करणारे महान् महान् राजे सुद्धां " ही भूमि माझी आहे " असा जोंपर्यंत अहंकार बाळगून परस्परांमध्यें वैर करीत आहेत, व योगमार्गाचें ज्ञान मिळवून वासनारहित झाले नाहींत, तोंपर्यंत युद्धांमध्यें अन्योन्यांकडून प्रहार होऊन केवळ मरण पावतील; परंतु त्यांची वासना क्षीण न झाल्यामुळें त्यांस सायुज्य मिळणार नाहीं. सत्कर्माच्या आधारानें जीव कसा तरी नरकांतून सुटेल; पण पुन्हां संसारांत फिरत राहील. कारण, पुण्यसंचयानें तो स्वर्गांत जाईल व पुण्य संपल्यावर फिरून मृत्युलोकप्रत येईल[1]. बाबारे, आजपर्यंत पुष्कळांची अशा प्रकारें वाट लागली आहे.

ह्याप्रमाणें भरतानें सांगितलेल्या भवाटवीचें सविस्तर निरूपण केल्यावर, श्री शुकाचार्य राजा परीक्षितीस म्हणाले:—राजा, ऋषभपुत्र भरत हा ज्या मार्गानें गेला, त्या मार्गाचें अवलंबन इतर राजांकडून

---

१ " क्षीणे पुण्ये जायते मृत्युलोके " अर्थ--स्वर्गांतील भोग भोगून पुण्य संपल्यावर, तो मृत्युलोकीं जन्म घेतो. -( स्मृति ).

होणें अशक्य आहे. पहा,—मी गरुडाइतकी उंच उडून असें माशी ह्मणाली, तर शोभेल काय? भरताचें वैराग्य किती विलक्षण होतें ह्याचा विचार कर! भगवंताविषयीं एकाग्र चित्त करून त्या माहात्म्यानें तरुणपणांतच सुंदर स्त्रिया, सद्गुणी पुत्र, प्रेमळ मित्र व अखिल राज्य, ह्यांचा विष्ठेप्रमाणें त्याग केला; व ज्या गोष्टी करणें अगदीं अशक्य त्या गोष्टी स्वतः करून दाखविल्या. तेव्हां त्याचें केवढें सामर्थ्य सांगावें! राजा, विचार केला असतां ह्यांत कांहीं एक आश्चर्य करण्यासारखें नाहीं· कारण, भगवत्-सेवेंत ज्यांचीं मनें आसक्त असतात, त्यांस केवळ मोक्ष सुद्धां तुच्छ वाटतो. मग ऐहिक सुखसंपत्ति तुच्छ वाटली, तर त्यांत नवल तें कोणतें बरें? भरताचे गुण व चरित्रें इतकीं पवित्र आहेत कीं, भगवद्भक्त नित्य त्यांची प्रशंसा करितात. 'त्या राजर्षीचें आख्यान कल्याणकारक, आयुष्यवर्धक, कृतकृत्यतादायक, कीर्तिप्रद व स्वर्गमोक्ष दोन्ही मिळवून देणारें आहे. जो मनुष्य ह्याचें श्रवण, व्याख्यान किंवा अभिनंदन करील, त्याला आपोआप सर्व इच्छित फळें प्राप्त होतील! इति १०.

---

# अध्याय ११ वा.

## विषयासक्तीचे दुष्परिणाम ( ११-२६ )

श्रीभगवानुवाच—

मल्लक्षणमिमं कायं लब्ध्वा मद्धर्म आस्थितः ॥
आनंदं परमात्मानमात्मस्थं समुपैति माम् ॥ १ ॥

**भगवान् श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा, नरदेह ह्मणजे केवळ मोक्षाचें द्वार होय. जो मनुष्य नरजन्मास येऊन एकनिष्ठपणानें माझ्या

भक्तीत सदैव निमग्न असतो. त्यास अंतर्यामीं नित्यवास करणारा सच्चिदानंदरूप जो परमात्मा मीं—त्या मला प्राप्त होतो; अर्थात् तो संसारबंधनांतून सहज मुक्त होतो. बाबा, ज्या पुरुषास माझ्या चिन्मय स्वरूपाचें ज्ञान झालें असतें, त्यास हा त्रिगुणात्मक जीवोपाधि मिथ्या असा प्रत्यय येतो व ह्यामुळें जरी तो प्राक्तनानुसार संसारांतील व्यवहार करीत असतो, तरी ह्या त्रिगुणात्मक चराचर सृष्टीच्या नश्वर गुणास मोहित न होतां त्यापासून सर्वथा निस्संग राहतो ! उद्धवा, असें जरी आहे तरी मन हें मोठें चंचल आहे; ह्यास्तव प्रत्येक विचारशील पुरुषानें तें केव्हांही प्रत्यक्षपणें अथवा अप्रत्यक्षपणें बहिर्मुख ह्मणजे विषयासक्त न होऊं देण्याविषयीं सावध राहिलें पाहिजे. ही गोष्ट साध्य होण्यास विवेकसंपन्न पुरुषानें स्त्रैण व विषयासक्त लोकांच्या वाऱ्यासही उभें राहूं नये. नीचांच्या सहवासानें—आंधळ्याच्या मागून जाणाऱ्याला आंधळ्याप्रमाणें भयंकर गड्यांत ह्मणजे अंधतम नरकांत पडावें लागतें ! उद्धवा, विषयासक्त पुरुषांच्या संगतीनें मन कसें भ्रष्ट होतें व त्यामुळें विषयासक्ति प्रबळ होऊन परमार्थसिद्धि कशी दुरावत जाते, ही गोष्ट उत्तम रीतीनें कळावी म्हणून ऐल राजाचा थोडासा इतिहास सांगतों, तो तूं लक्षपूर्वक श्रवण कर:—

### ऐल राजाचा इतिहास.

**श्रीकृष्ण ह्मणालेः**—उद्धवा, पूर्वी भरतखंडांत ऐल ह्मणजे पुरूरवा नामक महान् विख्यात चक्रवर्ती राजा होऊन गेला. उर्वशी नामक श्रेष्ठ अप्सरा ही त्याची पत्नी होती. ऐल राजानें उर्वशीसमागमें बहुत कालपर्यंत नानाविध सुखोपभोग भोगले, व नंतर उर्वशी एका प्रसंगीं राजास शय्येवर सोडून आपल्या लोकांस निघून गेली. ती स्वर्गलोकीं

१ " त्यासी विषयांचें दर्शन । समूळचें मिथ्या जाण । करितां मृगजळाचें पान । कदा ओलेपण बाधेना ॥ " ॥ **नाथ** ॥

जाऊं लागली तेव्हां तिच्या वियोगानें राजा अगदीं व्याकुल झाला, आणि " हे प्रिये ! असा निष्ठुरपणा करून तूं मला टाकून जाऊं नको. तुझा विरह मला सहन होणार नाहीं, ह्यास्तव थांब थांब ! " असें ह्मणत व विलाप करीत उन्मत्ताप्रमाणें तिच्या मागून नग्नच धांवूं लागला ! उद्धवा, ऐल राजा क्षुद्र विषयसुखांत इतका निमग्न झाला होता कीं, कित्येक वर्षेपर्यंत सूर्योदय व सूर्यास्त केव्हां झाले, हें त्यास विदितही नव्हतें. असा कामांध पुरुषसुखसर्वस्वाचा नाश होणार असें पाहून विव्हळ झाल्यास नवल तें कोणतें ? असो. पुढें ऐल राजा उर्वशीच्या वियोगानें अगदीं वेडा झाला. व त्यास तिचा एकसारखा निदिध्यास लागला. नंतर एका वेळीं कुरुक्षेत्रांत त्याची व उर्वशीची गांठ पडली असतां त्यास उर्वशीनें सांगितलें कीं, तूं गंधर्वांची उपासना कर, ह्मणजे त्यांच्या प्रसादानें तुझा व माझा पुनः समागम घडेल. मग राजानें त्याप्रमाणें केलें, व अखेरीस स्वर्गलोकास गमन करून पुनः उर्वशीची प्राप्ति करून घेतली ! उद्धवा, उर्वशीचा व ऐल राजाचा फिरून समागम घडल्यावर पुष्कळ वर्षें त्यांनीं विविधविलासभोग भोगिले आणि शेवटीं विषयसुखाची क्षुद्रता लक्षांत येऊन राजास विरक्तता उत्पन्न झाल्यावर त्यानें जे उद्गार काढले ते प्रत्येक मुमुक्षु पुरुषानें अहर्निश लक्षांत वागविले पाहिजेत.

### ऐल राजाचे उद्गार.

**पुरूरवा ह्मणालाः**— " अहो मी किती मूर्ख बरें. माझ्या मोहाची पराकाष्ठा झाली ! कामानें माझें मन दूषित झाल्यामुळें या उर्वशीशीं सुखोपभोगाचे नादीं लागल्यानें माझ्या आयुष्याचा केवढा भाग गेला, ह्याचें मला लवमात्र सुद्धां स्मरण राहिलें नाहीं ! काय हें आश्चर्य ! काय हा माझा महामोह कीं ज्यामुळें मी सार्वभौम भूपति असून स्वतः मीं आपला देह क्रीडामृगाप्रमाणें ( खेळणाऱ्या हरिणाप्रमाणें )

ह्या अबलेच्या स्वाधीन केला! हर!! हर!! तेव्हां मला काय ह्मणावें बरें? माझ्यासारख्या सार्वभौम राजाला तृणाप्रमाणें तुच्छ मानून त्याग करून जाणाऱ्या अशाही स्त्रीच्या मागें मी उन्मत्ताप्रमाणें रडत व धांवत गेलों! लत्ताप्रहारांनीं ताडन केलें तरी गर्दभ जसा निर्लज्जपणानें गर्दभीच्या मागें लागतो तसा जो मी. उर्वशी मला टाकून जात असतां तिच्या मागें लागलों. त्या माझे ठिकाणीं पराक्रम, बल आणि प्रभुत्व तरी कसलें? ज्याचें मन स्त्रियांनीं वश केलें त्याच्या विद्येचा काय उपयोग? त्याची तपश्चर्याही निरर्थक; त्याच्या संन्यासाचें किंवा शास्त्राध्ययनाचें काय फळ? स्त्रीलंपट पुरुषानें कितीही एकांतवास केला किंवा मौन स्वीकारिलें तरी तें सर्व व्यर्थ समजावें. तस्मात् मी एवढ्या ऐश्वर्यास प्राप्त होऊनही स्त्रियांनीं ज्या मला पशूप्रमाणें किंवा गर्दभाप्रमाणें जिंकिलें, त्या स्वार्थाविषयीं मूढ असून आपणांस पंडित समजणाऱ्या मज मूर्खास धिक्कार असो! अहो, आज कित्येक वर्षें मी उर्वशीचें अधरामृत सेवन करीत आलों. तरी माझी सुखतृष्णा कमी न होतां घृताभिषिक्त अग्नीप्रमाणें अधिकाधिक वाढतच आहे; ह्याकरितां, स्त्रीसुख भोगून कामवासना तृप्त होईल अशी कल्पना व्यर्थ होय. कामवासना तृप्त होण्यास स्त्रीसुखाविषयीं पराङ्मुखताच साध्य केली पाहिजे हें निर्विवाद आहे, पण हें घडावें कसें? माझ्या ठिकाणीं उपरतीचा अंकुर उद्भवला आहे खरा. परंतु ह्याची वाढ कशी व्हावी? मला तर असें वाटतें कीं, ह्या प्रसंगीं ह्या उर्वशीच्या मोहजालांतून माझें चित्त निघण्यास त्या परमेश्वराचीच कृपा झाली पाहिजे; ह्यास भगवत्कृपेवांचून अन्य उपाय दिसत नाहीं. पण हो, ह्याचा उर्वशीकडे तरी काय दोष? मीच इतका अंध झालों होतों कीं, माझी अत्यंत विषयासक्ति पाहून हिला सुद्धां माझी कींव आली, व हिनें मला निवृत्तीचा उपदेश केला! परंतु मी इंद्रियांचा दास झाल्यामुळें त्या उपदेशाचा माझ्या मनावर

मुळींच परिणाम झाला नाहीं, व मीं पूर्वक्रम आजपर्यंत अविच्छिन्न चालू ठेविला! यास्तव माझ्या अनाचाराचा दोष उर्वशीकडे मुळींच नाहीं. अरेरे, मी किती वेडा तो पहा! रज्जूचें ( दोरीचें ) सत्यरूप न ओळखितां एकाद्यानें आपण होऊनच जर त्या रज्जूस सर्प मानिलें, तर त्यांत दोष कोणाकडे बरें? पहा-हा उर्वशीचा मलीन देह वस्तुतः दुर्गंधीनें ओतप्रोत भरलेला अपवित्र असा असतां मीं आपण होऊनच हा निर्मल, सुगंधित व श्रेयस्कर मानिला. तेव्हां मी वेडा नव्हे काय? आतां कोणी ह्मणेल कीं, सौगंध्य, सौंदर्य व प्रेम इत्यादि गुणांनीं तीच या मोहाला कारण झाली, तस्मात् हा तिचाच अपराध आहे. तर असें नाहीं. तिचे ठिकाणीं ते गुण तरी मीं आपल्या बुद्धीनेंच कल्पिलेले आहेत. पहा-हा मलीन व दुर्गंधीनें भरलेला अपवित्र देह कोणीकडे? आणि सौमनस्य, शुचित्व, सौगंध्यादि गुण कोणीकडे? परंतु तिचे ( देहाचे ) ठिकाणीं ह्या सर्व गुणांची मीं अज्ञानानें कल्पना केली! देहावर ममत्वाभिमान हा सुद्धां कल्पितच आहे. पहा-कीं हा देह कां मातापितरांचा म्हणावा ( त्यांनीं उत्पन्न केला म्हणून )? कीं भार्येचा ( ती सर्व भोग देते म्हणून ), कीं धन्याचा (तो वेतन देतो ह्मणून) आणि शेवटीं अग्नीस त्याची आहुति पडते, ह्यासाठीं तो अग्नीचा; अथवा कोल्हीं कुत्रीं किंवा गिधाडें यांचें तो भक्ष्य होतो, म्हणून तो त्यांचा असेंही म्हणावयास हरकत नाहीं; आणि ह्याशिवाय देहधारी जीव किंवा त्याचे इतर आप्त, स्नेही, हे आपापल्या परी त्या देहावर स्वत्व स्थापित असतातच. तेव्हां वास्तविकपणें हा देह असक्याचाच आहे असें ह्मणणें भ्रामक होय यांत संशय नाहीं. वस्तुतः देहाची स्थिति अशी असतां, त्या स्त्रीचे देहावर सौंदर्यादिक अनेक गुणांचा आरोप करून रममाण होणारे माझ्यासारखे पुरुष कृमितुल्यच समजावे. कारण, शरीर म्हटलें ह्मणजे त्वचा, मांस, रक्त, स्नायु, मेद, मज्जा व अस्थि ह्यांची मोळीच होय; आणि विष्ठा, मूत्र,

घृ इत्यादिकांचें हें कोठारच आहे. अशा ह्या नरकाच्या खाणींत विषयी पुरुष नेहमीं अनुरक्त असतात; तेव्हां कृमींमध्यें व विषयी पुरुषांमध्यें काय अंतर आहे? स्त्रियांच्या देहाची वास्तविक स्थिति अशी सर्वतोपरी गर्हणीय असूनही विषयी पुरुष इंद्रियतृप्तीकरितां लुब्ध झाल्यामुळें त्यांस सत्यस्वरूपाचें ज्ञान तर होत नाहीं, पण किळस येण्यायोग्य विषयापासून सुद्धां सुख आहे असें त्यांस वाटतें. व ते त्या भासमान विषय सुखास प्रवृत्त होऊन परिणामीं नाना यातना भोगण्यास सिद्ध होतात! असा महान् अनर्थ टळण्यास सुलभ उपाय हाच आहे कीं, स्त्रियांपासून किंवा स्त्रैण पुरुषांपासून साधक पुरुषांनीं अगदीं अलिप्त रहावें. जी वस्तु दृष्टीपुढें नसते, किंवा ज्या वस्तुबद्दल कांहीं ऐकूं येत नाहीं, त्या वस्तूच्या योगानें चित्ताचा क्षोभ कव्हांही होत नाहीं. आणि अशा रीतीनें चित्ताची सुस्थिरता टाम असली, ह्मणजे विषयासक्तीचें भय बाळगावें लागत नाहीं. हीं इंद्रियें व मन उच्छृंखल होण्यास विषयांचें दर्शन किंवा श्रवणमात्र पुरे आहे. मनासह हा इंद्रियसमूह मोठमोठ्या विद्वानांस सुद्धां अविश्वसनीय आहे, मग मजसारख्या अविचारी मनुष्याची काय कथा! ह्यासाठीं अतिशय अवधान ठेवून ह्यांच्या निग्रहाचा अविश्रांत प्रयत्न करावा. आणि स्त्रिया व स्त्रैण पुरुष ह्यांच्या संगतीपासून अगदीं दूर रहावें हेंच उचित होय!

**श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा, त्या पुरूरवा राजानें ह्याप्रमाणें मनांत आणून त्या उर्वशीचा त्याग केला; नंतर सर्व मायाभ्रम सोडून देऊन त्यानें हृदयांत वास करणाऱ्या परमात्ममूर्तीचें ज्ञान संपादून पूर्ण

(१) भगादिकुचपर्यंतम् संविद्धि नरकार्णवं। ये रमंतिपुनस्तत्र तरंति नरकं कथम्॥ विष्ठादिनरकं घोरं भगंच परिनिर्मितं। किमुपश्यसिरेचित्त कथंतत्रैवधावसि॥

(२) "नारदें विनोददृष्टीं। कृष्णपत्नी मागितल्यासाठीं। तो नारदी केला गंगातटीं। तेथें जन्मले पोटीं साठ पुत्र॥"—**नाथ.**

वैराग्य जोडिलें, आणि देहत्यागापर्यंत चित्त अंतर्मुख करून पृथ्वीपर्यटन करीत मोक्ष संपादिला! विवेकसंपन्न पुरुषानें दुःसंगाचा त्याग करून सत्संगति निरंतर करावी. कारण, सज्जन हे वारंवार हितोपदेश करून विषयासक्ति नाहींशी करितात. आतां सज्जनांचें लक्षण तुला सांगतों:—

**सज्जनांचें लक्षण व त्यांचें माहात्म्य**—उद्धवा, सत्पुरुष हे निरिच्छ असतात; त्यांची माझ्या ठिकाणीं निश्चल भक्ति असते; ते नित्य तृप्त असतात; त्यांची सर्वत्र समबुद्धि असते; त्यांना देहादिकांविषयीं अहंभाव किंवा ममता नसते; त्यांना ही स्थावरजंगमात्मक सृष्टि मिथ्या वाटते; आणि ते विषयादिकांपासून अलिप्त असतात. उद्धवा, सत्समागमाचें सामर्थ्य मोठें विलक्षण आहे. अशा सत्पुरुषांचा केवळ समागम घडला असतां उपदेशाचीही आवश्यकता नसते. केवळ त्यांचें सांनिध्यच तारक आहे. त्या महाभाग्यशाली संतांचे ठिकाणीं निरंतर माझ्या चरित्राचा अनुवाद चाललेला असतो; त्यामुळें तेथें जे पुरुष माझ्या कथांचें सेवन करितात, त्यांच्या अंतःकरणांतील पापवासना सहज निर्मूल होतात. ह्याप्रमाणें चित्ताची शुद्धि घडली ह्मणजे साधकाच्या हृदयांत माझी भक्ति उदय पावते. ते मग माझी आराधना श्रद्धापूर्वक चालवितात; आणि अशा प्रकारें माझा भक्तियोग सिद्ध झाल्यावर त्या मुमुक्षु जनांस माझ्या प्राप्तिव्यतिरिक्त दुसरें कोणतेंही कृत्य करावयाचें अवशिष्ट रहात नाहीं, व ते अहर्निश माझ्या सच्चिदानंद स्वरूपांत रममाण होऊन भवभयापासून पूर्ण निवृत्त होतात. उद्धवा, अग्नीचा आश्रय केल्यानें जसा अंधकार, भय व शीत हीं तात्काल नाहींशीं होतात, त्याप्रमाणें सज्जनांचा आश्रय केल्यानें कर्मजाड्य, संसारभय व मूलाज्ञान हीं नाहींशीं होतात. सत्पुरुष ह्मणजे भवसमुद्रांतून पार पडण्याची केवळ नौकाच

(३) सत्संगत्वे निःसंगत्वं निःसंगत्वे निर्मोहत्वम्। निर्मोहत्वे निश्चलतत्त्वं निश्चलतत्त्वे जीवन्मुक्तिः॥"

होय. प्राणिमात्रांचें जीवित जसें अन्नाधीन असतें, संत्रस्त झालेल्या पुरुषांची भिस्त जशी माझ्यावर असते. अथवा मद्गतीचें मुख्य साधन जसा धर्म असतो; तद्वत् संसाराच्या भयानें दीन झालेल्या पुरुषांस सर्व कांहीं आधार सत्पुरुषांचाच समजावा! उद्धवा, सज्जन हे मुमुक्षु पुरुषाचे नेत्रच होत. सूर्य हा आपल्या उज्ज्वल प्रकाशानें तमाचा ह्मणजे अंधकाराचा नाश करितो खरा; परंतु त्याचा प्रकाश काय तो बाह्यभागींच, अंतरात्मज्ञानाविषयीं त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं, तर अंतर्भागांतील हृदयग्रंथि नष्ट करणारे एक सज्जनच आहेत. उद्धवा, सत्पुरुष हेच देव, साधूच बंधु. साधूच आत्मा किंबहुना साधूच मी (परमेश्वर) होय. ह्मणजे ते व मी ह्यांत मुळींच भेद नाहीं, असें म्हटलें तरी चालेल.

**नैर्गुण्य सिद्धीचा उपाय!** नैर्गुण्य संपादन करण्यास मुमुक्षु पुरुषानें प्रथम विषयासक्ति दूर करावी. इंद्रियें जिंकावीं, ध्यानमननाचा अभ्यास करावा, चित्त सुस्थिर ठेवावें. सात्विक गुणकर्मांचें सेवन करून सत्वगुण वाढवावा. आणि त्या वाढलेल्या सत्वगुणानें रज व तम ह्या गुणांचा लय करून टाकावा; असें केल्यानंतर, केवळ सात्विक गुणकर्मांचें अस्तित्व मात्र मुमुक्षूच्या ठिकाणीं विद्यमान राहील. पुढें त्यानें त्या गुणकर्मांविषयीं अनासक्त व्हावें व केवलरूप सत्वगुणानें त्या सत्वगुणकर्मांचाही लय करून नैर्गुण्य जोडावें. आणि लिंगशरीराचा भंग करून माझ्या चिन्मात्ररूपाप्रत पावावें, म्हणजे त्यास जन्ममरणरूप संसार प्राप्त होणार नाहीं. इति ११.

(१) "द्रूपे वासुदेवस्य चलमाचलमेव च। चलं संन्यासिनोरूपो अचलं प्रतिमादिकं" — **स्मृति.** (२) न करितां भगवद्भक्ति। कदा नुपजे विरक्ति। विरक्तीविण भगवत्प्राप्ति। नव्हे कल्पांतीं साधकां॥"—**नाथ.**

(३) भक्तिप्रकरण २६ वा अध्याय पहा.

# अध्याय १२ वा

## ययातीचें पश्चात्ताप-वर्णन ( १--१९ )

श्रीशुक उवाच --

स इत्थमाचरन्कामांस्त्रैणोऽपह्नवमात्मनः ॥
बुद्ध्वा प्रियायै निर्विण्णो गाथामेतामगायत ॥ १ ॥

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**—राजा, पुष्कळ वर्षेंपर्यंत ययाति राजानें देवयानीबरोबर विषयसुखाचा उपभोग घेत राहिला. असें असतां त्यानें पूर्वी जी भगवंताची आराधना केली होती, तिच्या पुण्यबळानें तो विरक्त होऊन त्याला आपल्या विषयासक्तेबद्दल उपरति झाली. तेव्हां त्यानें आपली प्रिया जी देवयानी तिला पुढील इतिहास सांगितला.

**ययाति ह्मणाला:**—हे भृगुकन्ये, गृहस्थाश्रमी लोकांपैकीं अत्यंत कामातुर असणाऱ्या मनुष्याची स्थिति कशी असते, याविषयीं मी तुला एक गोष्ट सांगतों. "अत्यंत कामातुर असणाऱ्या पुरुषाची स्थिति पाहून, वनांत राहणाऱ्या जितेंद्रिय साधु लोकांना अतिशय वाईट वाटतें; ते मनांत ह्मणतात: ' अरेरे, हा मनुष्य किती तरी विषयलंपट आहे, काय याची स्थिति! याचें शेवटीं कल्याण कसें व्हावें ! ' प्रिये, अशा प्रकारच्या पुरुषांपैकीं मीही एक आहें ! तें मी तुला सांगतों, तूं लक्षपूर्वक ऐक: -हे सुंदरी, तुझें प्रेम, तुझें सुंदर स्वरूप, तुझे हावभाव इत्यादिकांनीं मी अगदीं मोहित होऊन गेलों आहे. विषयोपभोगांत मी इतका तल्लीन झालों आहे कीं, परमार्थाचा विचारही माझ्या मनावर उमटत नाहीं. आतां तूं ह्मणशील कीं, ' आणखी मनसोक्त विषय सेवन करा, ह्मणजे कामशांति होऊन मन तृप्त होईल..मग परमार्थाविषयीं विचार मनांत येतील;' तर असें संभवत नाहीं. कारण, या भूतलावर कांताकांचनादिक

ज्या उपभोग्य वस्तु आहेत, त्यांच्या उपभोगानें विषयवासनेनें गुंग झालेल्या मनुष्याचें मन कधींही तृप्त होत नाहीं. तर उलट असें होतें कीं. जसा अग्नि तुपाच्या संयोगानें न विझतां अधिकच पेट घेतो, तशी विषयवासना ही विषयांच्या उपभोगानें कमी न होतां अधिकाधिक वाढतच जाते. तेव्हां "आणखी जरी पुष्कळ काळ विषय सेवन केलें, तरी माझें मन तृप्त होणार नाहीं. हें तूं पक्कें समज." आतां मन तृप्त होण्याचा एक उपाय आहे तो तुला सांगतों. ऐकः—

## समदृष्टीचा उपाय.

हे देवयानी, जेव्हां पुरुष सर्व पदार्थांचे ठिकाणीं नेहमीं समदृष्टि ठेवितो–हा पदार्थ चांगला व हा पदार्थ वाईट असें मुळींच मनांत आणीत नाहीं. तेव्हां त्याला मात्र निरंतर सुख प्राप्त होतें. कारण, मनाला दुःख होणार तें त्याला न आवडती एखादी गोष्ट घडून येईल तेव्हांच; परंतु मनाची समदृष्टि असली तर मग त्याला प्रतिकूल असें कांहींच दिसत नाहीं. अर्थात् त्याला दुःख कोठून होणार बरें ? याकरितां सुखाची इच्छा करणाऱ्या मनुष्यानें विषयवासनेचा अगदीं त्याग केला पाहिजे. कारण, या वासनेची तृप्ति करितां करितां मनुष्य जरी म्हातारा झाला, तरी हिची तृप्ति मुळींच होत नाहीं. आयुष्य मात्र सरून जातें. शेवटीं इच्छा तृप्त न झाल्यामुळें मनुष्याचें मन तसेंच दुःखित रहातें. याकरितां विचारी मनुष्यानें या वासनेचा त्यागच करावा. जे अविचारी

(१) "ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥" **अर्थ**—विषयांचा चिंतना करीत राहिल्यानें मनुष्याची त्यावर आसक्ति जडते; आसक्तीपासून इच्छा उत्पन्न होते; इच्छा पूर्ण न झाल्यास तत्काल क्रोध येतो; क्रोधापासून भुरळ पडून तिच्या योगानें स्मृति नष्ट होते; स्मृतिभ्रंशापासून बुद्धि भ्रंश पावते; बुद्धिहीनतेनें मनुष्य नाश पावतो.–**गीता.**

लोक आहेत, त्यांजकडून या वासनेचा त्याग होणें अगदीं अशक्य आहे. या सर्व विषयांमध्यें स्त्री हा विषय फारच घातक आहे. याकरितां धर्मशास्त्रांत सांगितलें आहे कीं, ' पुरुषानें आई, बहीण किंवा कन्या यांच्या बरोबर सुद्धां एका आसनावर बसूं नये. कारण, इंद्रियांच्या समुदायाचा पराक्रम इतका विलक्षण आहे कीं, तो समुदाय विचारी मनुष्याचें सुद्धां मन आपणाकडे ओढून घेतो. ह्मणजे, विचारी पुरुष जरी आई, बहीण, किंवा कन्या यांबरोबर एका आसनावर बसला असला, तरी त्यांच्या रूपाकडे किंवा त्यांच्या कित्येक मोहक शरीरभागाकडे प्रसंगविशेषीं पहाणें, त्यांच्या अंगास स्पर्श करणें इत्यादि गोष्टी करण्याविषयीं त्या विचारी पुरुषास सुद्धां मोह उत्पन्न होतो. ' हे देवयानी, यावरून इतर स्त्रियांचे ठिकाणीं पुरुषाचें वर्तन प्रसंगविशेषीं कसें असेल, याचा तूं विचार कर. या गोष्टीवरून स्त्री हा विषय किती मोहक आहे, तसेंच त्याचे ठिकाणीं पुरुषांचें मन किती अनुरक्त असतें, त्यामुळें तो पुरुष परमार्थाला कसा विसरून जातो, हें तुझ्या सहज लक्षांत येईल.

**ययाति राजाचा विचारः** ययाति ह्मणाला:-हे देवयानी ! मी या पृथ्वीवरील अनेक विषयांचें यथायोग्यकालीं आज हजारों वर्षेंपर्यंत यथेच्छ सेवन करीत आलों, तरी अद्यापि माझी तृप्ति झाली नाहीं; याकरितां आतां ही तृप्ति होणें अशक्यच, असें समजून मी या विषयभोगवासनेचा आतांपासून त्याग करितों, व आपलें मन ब्रह्मरूप आत्म्याचे ठिकाणीं लावून आणि सुखदुःखांचा द्वंद्वत्याग करून हरिणाप्रमाणें

( १ ) " यस्य स्त्री तस्य भोगेच्छा निर्स्त्रीकस्य क भोगभूः ॥ स्त्रियं त्यक्त्वा जगत्यक्तं जगत्त्यक्त्वा सुखी भवेत् ॥ " **अर्थः**-ज्याला स्त्री आहे त्या पुरुषाला भोगेच्छा आहे, ज्याला स्त्री नाहीं त्याला भोग कोठले ! स्त्री सोडली की जगत् सुटतें, जगत् सुटलें ह्मणजे मनुष्य अर्थात् सुखी होतो.—( **श्रुति** ).

अरण्यांत सत्वर निघून जातों. आतां तूं ह्मणशील कीं, 'विषयवासना मोडणें हें मोठें दुष्कर आहे, तेव्हां आपलें मन आत्म्याचे ठिकाणीं स्थिर कसें होईल ?' तर त्याचा विचार सांगतों ऐक:—या जगामध्यें जे विषय आहेत, त्यांच्या भोगाची इच्छा असल्यामुळें प्राण्याला जन्म प्राप्त होतो. पुढें ती विषयेच्छा भोगतां भोगतां ह्मातारपण आलें तरी पूर्ण होत नाहीं; परंतु देह क्षीण झाल्यामुळें मरण मात्र येतें; आणि विषयेच्छा पूर्ण न झाल्यामुळें पुन्हां दुसरा जन्म प्राप्त होतो. अशा रीतीनें या विषयांच्या चिंतनानेंच हा जन्ममरणरूप संसार प्राप्त होतो. याकरितां जो कोणी या लोकींचे पाहिलेले किंवा परलोकींचे ऐकिलेले सर्वही विषय तुच्छ आहेत, असें मानून त्यांजकडे मुळींच लक्ष पुरवीत नाहीं व त्यांचा उपभोगही घेत नाहीं; तोच विषयवासनेचा त्याग करून आत्मद्रष्टा होतो. मीं आजपर्यंत ही विषयवासना पूर्ण करितां करितां थकून गेलों, परंतु ती पूर्ण तर झाली नाहींच; तर माझी मात्र पूर्ण खात्री झाली कीं, या विषयवासनेपासून कांहीं एक लाभ नाहीं, ही प्राण्याला संसारामध्यें गुंग करून ठेविते, परमार्थापासून त्याचें मन अगदीं परावृत्त करिते. याकरितां आतां मीं ह्या विषयवासनेचा पूर्णपणें त्याग केला आहे. इति १२।

---

# अध्याय १३ वा.

## पृथ्वीचे उद्गार ( १२–३ )

श्रीशुक उवाच—

**दृष्ट्वाऽऽत्मनि जये व्यग्रान्नृपान्हसति भूरियम् ॥**
**अहो मां विजिगीषंति मृत्योः क्रीडनका नृपाः ॥ १ ॥**

**श्रीशुकाचार्य ह्मणाले**:—राजा परीक्षिते, जे रणधुरंधर वीर पुरुष ह्या भूतलावर विजयश्री मिळविण्यांत तत्पर असतात; अशा त्या राजांना पाहून पृथ्वी हांसत असते. ती ह्मणते:–" अहो ! हे राजे मला अंकित करून घेण्यास उद्युक्त झाले आहेत; पण आपण स्वतः मृत्यूच्या हातांतील बाहुलीं बनले असून परमार्थलाभाचा मुळींच विचार करीत नाहींत ! अरेरे, हे कितीही शहाणे असले, तरी मला जिंकण्याविषयीं जी हांव बाळगितात, ती व्यर्थ होय. कारण, पाण्यावरील बुडबुड्याप्रमाणें क्षणभंगुर अशा आपल्या नरदेहावर ह्या राजांचा केवढा तरी विश्वास जडला आहे! आणि त्यामुळें अनेक अनर्थ घडत असून त्यांच्या वासना एकामागून एक उद्भवतच असतात. अहो ! ते मनांत असें आणितात कीं, 'आपण प्रथम सहाही इंद्रियांचा समुदाय जिंकून मग मंत्रिमंडळास वश करून घेऊं! नंतर राजसेवक, नागरिक जन, राजगुरु, गजपति इत्यादिकांस आपण वळवूं, आणि प्रतिपक्षाचा मोड करून समुद्रानें वेष्टिलेली पृथ्वी सहज हस्तगत करूं!' अशा प्रकारच्या आशातृष्णादिकांनीं त्यांचीं हृदयें बद्ध झालेलीं असतात, म्हणून आपल्या स्वतःच्या जवळपासच टपत बसलेल्या मृत्यूकडे त्यांची दृष्टिही जात नाहीं ! यदाकदाचित् समुद्रवलयांकित अशी मी ( पृथ्वी ) ह्यांच्या हस्तगत झालें, तरी ह्यांची हांव लांबतच जाते; आणि मग हे मोठ्या वेगानें समुद्रावर स्वारी करण्यास प्रवृत्त होतात. अरेरे ! ह्या जयापासून तरी त्यांचें समाधान होतें काय? छे नाहीं. उलट अशा घडामोडीमुळें ते आत्मसुखास अंतरतात ! श्रेष्ठ असें निजसुख राज्यतृष्णेंत किंवा तिच्या पूर्ततेंत नाहीं. ह्या दृष्टीनें विचार केला म्हणजे आत्मजयासारखा एकही पुरुषार्थ नाहीं, हें उघड आहे. कारण, आत्मजय करणाऱ्याला परमानंद मिळतो ! तर मग आत्मजयापुढें सार्वभौम राज्यसंपादनाचा पाड काय? अहो, मोठमोठे मनु व कुलोद्धारक त्यांचे पुत्र जिला ( पृ-

थ्वीला ) येथल्या येथें सोडूनच जसे आले तसे चालते झाले, त्या मला ( पृथ्वीला ) हे अज्ञानी लोक जिंकण्याचा प्रयत्न करीत असतात; तेव्हां ह्यांच्या मूर्खपणाला म्हणावें तरी काय ! माझ्यासाठीं भावाभावांत, आप्तस्वकीयांत, फार तर काय पितापुत्रांत सुद्धां हाडवैर उद्भवतें ! राज्यावरील ममतेनें ज्यांचीं मनें जखडून गेलीं, ते लोक म्हणजे दुष्टच होत ! ' मूर्खा ही सर्व पृथ्वी माझीच आहे, तुझी नव्हे. ' असें म्हणून ते राजे मजसाठीं घोर युद्ध करून अनेक योध्यांना बळी देतात व शेवटीं आपणही मृत्युमुखीं पडतात ! मांधाता, सगर, राम, खट्वांग, धुंधुमार, रघु, तृणबिंदु, ययाति, शर्याति, शंतनु, गय, भगीरथ, पृथु, पुरूरवा, गाधि, नहुष, भरत, अर्जुन, कुवलयाश्व, ककुत्स, नैषध, नृग, हिरण्यकशिपु, वृत्र, रावण, नमुचि, शंबरासुर, भौम, हिरण्याक्ष, तारकासुर इत्यादि शूर व महाबलाढ्य दैत्य व सार्वभौम राजे माझ्या ठिकाणीं प्रेम ठेवून शेवटीं अतृप्त स्थितींतच काळाच्या हस्तगत आले ! "

राजा, आजपर्यंत जे महान् पुरुष ह्या भूतलावर पराक्रम गाजवून व कीर्तिध्वज उभारून परलोकीं गेले, त्यांच्या कथा मीं तुला सांगितल्या. हीं आख्यानें सांगणें म्हणजे नुसते वाणीचे विलास होत, ह्यांपासून परमार्थलाभ होत नाहीं; पण सांगण्याचा माझा हेतु विषयादिकांचीं तुच्छता मनांत ठसावी व तद्द्वारा वैराग्य उत्पन्न व्हावें, हाच होय. राजा ! पुण्यकीर्ति प्रभूचा जो पापनाशक गुणानुवाद गाइला जातो, त्याचेंच प्रतिदिनीं वारंवार श्रवण करावें व अंतरीं " श्रीकृष्णावर निष्काम प्रेम जडो " अशी इच्छा धरावी हाच परमपुरुषार्थ होय ! इति १३ ।

---

# अध्याय १४ वा.

## सुयज्ञ राजाचें कथानक ( ७-२ )

नारद उवाच--

उशीनरेष्वभूद्राजा सुयज्ञ इति विश्रुतः ॥
सपत्नैर्निहतो युद्धे ज्ञातयस्तमुपासत ॥ २८ ॥

**नारद ह्मणाले:**—धर्मराजा ! उशीनर देशांत सुयज्ञ या नांवाचा एक प्रसिद्ध राजा होऊन गेला. युद्धामध्यें त्याच्या शत्रूंनीं एके काळीं त्याचा वध केला, तेव्हां त्याचे आप्तगणगोत त्याच्या सभोंवतीं गोळा होऊन बसले. त्या राजाचें रत्नमय कवच बाणांचे तडाके लागून फुटून छिन्नभिन्न झालेलें होतें. आंगावरील अलंकार व माळा गळून पडल्या होत्या. बाणांनीं हृदय विदीर्ण झाल्यामुळें रक्तानें शरीर लाल होऊन गेलें होतें. मनांत शत्रूविषयीं द्वेष धुमसत असल्यामुळें त्यानें आपले ओंठ दातांत आंवळून धरलेले होते. केंस अस्ताव्यस्त, मुखकमल धुळीनें भरून गेलेलें, आणि युद्धांत दोन्ही हात तुटून गेलेले असून डोळे बाणांनीं फुटलेले होते. अशी ही आपल्या पतीच्या शवाची दुर्दशा पाहून राण्यांना परम दुःख झालें. तेव्हां " नाथा ! आमचा सर्वस्वीं घात झाला ! " असा आक्रोश करून त्या रडूं लागल्या. त्यांनीं केंस मोकळे सोडून आपल्या अंगावरील अलंकार फेंकून दिले व त्या ऊर बडवून घेऊं लागल्या, आणि त्याचें एकेक कृत्य आठवून ह्मणूं लागल्या:--" हे नाथ ! आजपर्यंत तूंच आमचें सर्वतोपरी रक्षण केलेंस, आह्मांवर माया केलीस, आमचे लाड पुरविलेस, आतां तुझ्यामागें राहून आह्मांला ह्या जगांत कर्तव्य काय आहे ! वीरा आतां आमची इतकीच इच्छा आहे कीं, आपण असाल तेथें आह्मीं यावें आणि आ-

पली सेवा करावी, एवढीच देणगी आम्हांला द्या. " याप्रमाणें विलाप करीत त्या स्त्रियांनीं तें प्रेत घट्ट धरिलें होतें व कांहीं केल्या सोडीनात, यामुळें सायंकाळ होऊन गेला तरी अग्निसंस्कार तसाच राहिला. हा प्रकार पाहून स्वतः यमराजानें लहान मुलाचें रूप घेतलें, व तेथें येऊन त्यांना बोध केला. तो असाः—

## शिशुरूपधारी यमाचा बोध.

**यम ह्मणालाः**—" अहो ! येथें असलेले सर्व लोक मजपेक्षां मोठे दिसतात. आणि असले प्रकार ( जन्ममृत्यु ) नित्य घडत आहेत, हें पुष्कळ वेळां पाहिलें असून ह्यांना अद्याप मोह पडतो अँ ! अहो मनुष्य जेथून आला तेथें गेला. त्यांत शोक करण्याचें कारण काय ? हा गेला तसें ह्यांनाही जावयाचेंच आहे. मग ह्यापेक्षां आह्मी पुष्कळ बरे ! अहो, ज्यानें गर्भांत राखिलें, तोच सर्वत्र रक्षण करणारा आहे. स्त्रियांनो ! जो निर्विकार प्रभु आपल्या इच्छामात्रें हें विश्व निर्मितो, रक्षितो आणि लयासही नेतो, त्या ईश्वराचें स्थावरजंगमात्मक जग हें एक क्रीडा करण्याचें साधन होय; अर्थात् उत्पत्ति, स्थिति व लय ह्या सर्व गोष्टी त्याच्याच स्वाधीन आहेत. मूढानो ! तुह्मी ज्याच्यासाठीं शोक करितां, तो सुयज्ञ तर येथेंच पडला आहे. मग तुह्मी कां रडतां ? आतां तो तु-

( १ ) " ज्याचें होतें त्यानें नेलें । तेथें तुझें काय गेलें ॥ वेगें होई सावधान । करीं देवाचें भजन ॥ गती नकळे होणाराची । हे तों इच्छा भगवंताची ॥ पूर्व संचिताचें फळ । होती दुःखाचे कल्लोळ ॥ पूर्वी केलें जें संचित । तें तें भोगावें निश्चित॥ दास ह्मणे पूर्व रेखा । प्राप्त न टळे ब्रह्मादिकां ॥ "

( २ ) " कोणेंकोणाशीं रडावें । एकामागें एकीं जावें ॥ एक वेळ गेली माता । एक वेळ गेला पिता ॥ द्रव्य दारा जाती पुत्र । जिवलग आणि मित्र ॥ प्राणी संसारासी आला । तितुका मृत्युपंथें गेला ॥ पूर्वज गेले देवापाशीं । तेचि वाट आपणासी ॥ रामदास ह्मणे लोक । करिती गेलयाचा शोक ॥ "

मच्याशीं बोलत नाहीं किंवा तुमच्याकडे पहात नाहीं, म्हणून तो मेला असें समजून रडत असाल, तर मला एवढें सांगा कीं, आजपर्यंत जो तुमच्याशीं बोलत होता व जो तुमच्याकडे पहात होता, तो तुमच्या दृष्टीस कधीं तरी पडला होता काय? नाहींच. कारण, तो अवाङ्मनसागोचर असल्यामुळें दिसणारा नव्हे. बरें, सर्व इंद्रियव्यापाराचा मुख्य हेतु जो प्राण, तो देखील बोलणारा व पाहणारा नव्हे. यावरून असें सिद्ध झालें कीं देह व इंद्रियें ह्यांच्या योगानें त्यांचे त्यांचे विषय अवलोकन करणारा आत्मा प्राणाहून व देहाहून वेगळा आहे. स्वप्नांतील व मनोराज्यांतील गोष्टी जशा खोट्या, तसेंच इंद्रियांचे हे सर्व विषय मिथ्या होत; ह्मणून सुखदुःखादि कार्यें खरीं आहेत असें मानणें ह्मणजे शुद्ध वेडेपणा होय. हे सर्व प्रकार मायेनें केलेले आहेत. आज तो गेला ह्मणून तुह्मी रडतां; पण तुह्मी केव्हां जाणार तें तुह्मांला कळलें आहे काय? तेंच जर तुह्मांला कळलें नाहीं तर या रडण्यापासून उपयोग काय? कारण, ह्या गोष्टी ईश्वराच्या स्वाधीनच्या आहेत. यावरून मला एका 'कुलिंग पक्ष्याची गोष्ट' आठवली ती तुह्मांला सांगतों:—

### कुलिंगपक्ष्याची गोष्ट.

अरण्यामध्यें पक्ष्यांना मारणाऱ्या एका पारध्याला ईश्वरानें निर्माण केला होता. जेथें जेथें पांखरें आढळत, तेथें तेथें जाळें मांडून व धान्याचें आमिष दर्शवून, तो त्यांना फसवून धरीत असे. एके दिवशीं कुलिंग पक्ष्यांचा जोडा त्या पारध्याच्या दृष्टीस पडला. त्यांपैकीं मादीला त्यानें अचानक फसविलें. तेव्हां ती अत्यंत दीन झाली. मग आपल्या पत्नीची ती विपन्न व दीन स्थिति पाहून प्रेमातिशयामुळें कुलिंगाला फार दुःख झालें, पण करतो काय? तिला सोडविण्याचें अंगांत सामर्थ्य नाहीं. शेवटीं बिचारा एका झाडाच्या फांदीवर बसून रडूं लाग-

ला! आणि ह्मणूं लागला: "कितो तरी हो हा देव निर्दय! आधींच स्त्रियांची जात फार गरीब; त्यांतून ही माझी स्त्री पहा, कशी दीन होऊन एकसारखी शोक करीत आहे. परमेश्वर तर सर्वव्यापक असें ह्मणतात. मग त्याला ह्या दीन स्त्रीपासून काय लभ्यांश? देवानें मला देखील नेलें असतें तर चाललें असतें. ह्या विधुर स्थितींत दुःखानें राहण्यापेक्षां मेलेलें काय वाईट? विचाऱ्या पिलांना अजून पंख देखील फुटले नाहींत. तोंच त्यांची आई नाहींशी झाली; आतां त्यांचें पोषण मी करूं तरी कसें? तीं अभागी पिलें तिची (आपल्या आईची) वाट पहात असतील!" याप्रमाणें तो कुलिंग पक्षी दीन स्वरानें विलाप करीत आहे, इतक्यांत लपून बसलेल्यां त्याच पारध्यानें त्याला बाण मारून खालीं पाडिला! मृत्यूनेंच त्या पारध्याला पाठविलें होतें, यापरतें दुसरें काय? बायांनों, कुलिंगाप्रमाणेंच तुम्हांला बुद्धि नसल्यामुळें तुह्मांस आपला मृत्यु दिसत नाहीं. शंभर वर्षे जरी रडत बसलां, तरी देखील हा तुमचा पति तुह्मांला फिरून मिळण्याचा संभव आहे काय? ह्मणून माते, मुली, मुलांनों. माझें तुह्मांला इतकेंच सांगणें आहे कीं, तुम्ही स्वतःबद्दल अथवा दुसऱ्याबद्दल अगदीं खंत करूं नका. कारण, येथें आपलें काय आहे? प्राण्यांना 'मी आणि तूं' हा अभिमान असतो. हें त्यांचें अज्ञान होय. तें अज्ञान नष्ट झालें म्हणजे शोकाला जागाच उरत नाहीं.

(१) "मरे एक त्याचा दुजा शोक वाहे। अकस्मात् तोही पुढें जात आहे॥ पुरेना जन्मीं लोभरे क्षोभ होतो। ह्मणोनी जनीं मागुता जन्म घेतो॥-**रामदास.**

# अध्याय १५ वा.

## कर्मठांचें विवेचन ( ११-५ ).

राजोवाच—

भगवंतं हरिं प्रायो न भजन्त्यात्मवित्तमाः ॥
तेषामशांतकामानां का निष्ठाऽविजितात्मनाम् ॥ १ ॥

**राजा म्हणालाः**—मुनिवर हो, आपण आत्मज्ञानी पुरुषांमध्यें परम श्रेष्ठ आहांत. महाराज, ह्या संसारामध्यें बहुतक लोक मंगलरूप हरीला भजत नाहींत. व इंद्रियें आकळलेलीं नसल्यामुळें त्यांच्या विषयेच्छा शमलेल्या नसतात. अशा लोकांना अंतीं कोणती गति मिळते? तें कृपा करून सांगा.

**योगीश्वर चमस ह्मणालाः**—निमिराजा, आतां उत्तम विषय काढिलास. पण हा विषय तुला यथास्थित समजण्याकरितां ह्याचें उत्तम प्रकारें विवेचन करणें अवश्य आहे. राजा, प्रथम नारायणाच्या मुखापासून सत्वगुणाच्यायोगें ब्राह्मणाची उत्पत्ति झाली, बाहूंपासून सत्व व रज ह्या उभय गुणांच्यायोगें क्षत्रिय उत्पन्न झाले, मांड्यांपासून रज व तम ह्या दोन गुणांच्या मिश्रणानें वैश्य जन्मास आले. आणि पायांपासून एका तमोगुणाच्यायोगें शूद्र उत्पन्न झाले. तसेंच नारायणाच्या हृदयापासून ब्रह्मचर्याश्रम, जघनापासून गृहस्थाश्रम, ऊरुस्थलापासून वानप्रस्थाश्रम व मस्तकापासून संन्यासाश्रम हे निघाले. ह्याप्रमाणें वर्णाश्रमव्यवस्था खुद्द परमेश्वरापासून उत्पन्न झाली असल्यामुळें, जे लोक ती निर्माण करणाऱ्या परमात्म्याचें ज्ञान करून घेत नाहींत, त्याची

भक्ति करीत नाहींत पण उलट त्याची हेलना करितात; त्यांस कृतघ्नतेचें पातक लागून ते आपापल्या वर्णांपासून भ्रष्ट होऊन शेवटीं अधोगतीस जातात ! राजा, ब्राह्मणादिक वर्ण जर आपल्या ज्ञानाचा योग्य उपयोग करून घेऊन वेदांतील वचनांचें हृद्गत काय आहे तें जाणतील तर त्यांस हा मायामोह तरून जाण्यास मुळींच विलंब लागणार नाहीं; परंतु चमत्कार असा आहे कीं, यांची ही विषयोपभोगांची लालसा एकसारखी कायम राहिल्यामुळें. ते वेदवचनांच्या वरपंगी अर्थालाच खरा अर्थ मानून केवळ सकाम बुद्धीनें यज्ञयागादिक कर्मे करितात. जर आपल्याला कर्माचें वर्म कळलें नाहीं. तर तें दुसऱ्या कोणा ज्ञात्याला 'विचारावें हें वाजवी; परंतु ते ब्राह्मणादिक त्रिवर्ण असे हट्टी असतात कीं, 'ह्या मूर्खांना आह्मीच मोठे पंडित आहों असें वाटतें. आणि आतां आह्मी यज्ञ करून सोम पिऊं व अमर होऊन अप्सरांबरोबर क्रीडा करूं.'

(१) "शेळी टंगाचीं चवी गाढी। नेणोनि पाचोळा करडी। तेवीं नेणोनि हरिभक्तीची गोडी। अज्ञानें बापुडीं विषयलुब्ध" —**नाथ.**

(२) "यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः। वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः॥ कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदां। क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति॥" **अर्थ** वेदवचनांच्या अगदीं वरवर दिसणाऱ्या शब्दार्थांमध्येंच गढून जाऊन त्यावांचून कांहीं नाहीं असें ह्मणणारे सकाम बुद्धीनें स्वर्गाच्या पाठीस लागतात व भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं पुन्हां जन्म, पुन्हां कर्म असें फळ देणाऱ्या अनेक निरनिराळ्या पुष्कळ क्रिया ज्यांमध्यें सांगितल्या आहेत, अशा त्या वाक्यांची विशेष स्तुति करितात. परंतु अशा प्रकारच्या वेदवाक्यांचा वरपंगी अर्थ करून भोग व ऐश्वर्य यांमध्यें गढून त्यानें वेडे बनलेल्या ह्या मूर्खांची समाधीच्या वेळीं बुद्धि निश्चल राहूं शकत नाहीं.—**गीता.**

इत्यादि मोहक मनोराज्यांतच ते लोक गर्क असतात! राजा, विषयसुखाची आसक्ति उत्पन्न होणें हा रजोगुणाचा परिणाम होय. व "जों जों विषयसुखाची वृद्धि होते तों तों रजोगुणाचीही वृद्धिच होत जाते असा नियम आहे." उत्तरोत्तर ह्या विषयलुब्ध लोकांचा रजोगुण वाढत जाऊन, हे दुसऱ्यांचा प्राणघात करण्यासही तयार होतात, प्रसंगविशेषीं सर्पासारखे खवळतात[1], नानाप्रकारचीं ढोंगें[2] करितात, आह्मी मोठे असा अभिमान बाळगितात, बहुविध पातकें करितात व भगवद्भक्तांचा उपहास करण्यासही चुकत नाहींत. राजा, हे विषयी लोक नित्य स्त्रियांची मनधरणी करण्यांत नेहमीं तत्पर असतात. वृद्ध व ज्ञानी लोकांच्या वाऱ्यासही हे कधीं उभे रहात नाहींत. आपलीं इंद्रियें तृप्त ठेवण्याविषयीं ह्यांचा एकसारखा अट्टाहास चालू असतो. हे गृहस्थाश्रम करितात, पण तो तरी विषयाभिलाष पूर्ण करण्याकरितांच. अतिथीचा आदर करणें, पंचमहायज्ञ करणें, इत्यादि गोष्टी ह्यांच्या स्वप्नांतही कधीं येत नाहींत. "आज मी इतकें धन मिळविलें, उद्यां अमुक मिळवीन" इत्यादि मनोराज्याच्या

(१) "जंव जंव पिकिजे कोरिफळें। तंव तंव कडूपण गाढें। तसा कामनाशापुढें। वाढे क्रोध अत्युग्र॥ क्रोध काळिया नाग खरा। देत द्वेषाचा फुंकारा। घाली पूज्यतेच्या आकारा। धुधुकारा गाधुनिदेच्या॥" **-नाथ.** (२) "कर्मेंद्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन्। इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते॥" **अर्थ**--कर्मेंद्रियांचा निग्रह करून जो मूर्ख मनानें इंद्रियविषयांचें चिंतन करीत असतो, त्याला ढोंगी ह्मणतात. --**गीता**. (३) "यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः। भुंजते ते त्वघं पापा ये पचंत्यात्मकारणात्॥" **अर्थ**--पंचमहायज्ञ करून राहिलेलें अन्न जे सेवन करितात, ते सर्व पापांपासून मुक्त होतात. जे लोक केवळ आपल्या पोटासाठीं अन्न शिजवितात ते पापी लोक तें अन्न न खातां प्रत्यक्ष पापच खात असतात.--**गीता**.

गोष्टींतच हे सर्व गर्क असतात; आणि ह्यांचे इतरांशीं संवाद चालवयाचे ते तरी असल्याच ऐहिक विषयोपभोगाविषयीं असतात. ह्यांनीं यज्ञयागादिक विधि किंवा जपतपादिक अनुष्ठानें केलीं, तरी त्यांचा हेतु आपली लोकांत प्रौढी व्हावी हाच प्रायः आढळतो. यज्ञादिकांत यथायोग्य दक्षिणा किंवा अन्नसंतर्पण होण्याची बहुधा मारामारच. पशुहिंसेचा दोष नाहींसें होण्याकरितांच आपल्या हातून कोणकोणते प्रयोग घडले पाहिजेत, ह्याचा विचार हे कधींच करीत नाहींत. यज्ञांच्या नांवावर पशूंची हिंसा करून आपल्या जिव्हेची तृप्ति करावी हेंच ह्यांना माहित असतें. पशुहिंसेपासून दोष किती आहे तें समजून घेतो कोण? शिवाय धनादि संपत्ति, ऐश्वर्य, उत्तम कुलांत जन्म, विद्या, दान, रूप, बल, कर्म इत्यादिक एक किंवा सर्व गोष्टींच्या अनुकूलतेमुळें गर्व उद्भवून त्यांची बुद्धि अंध ( विचारशून्य ) होते, आणि मग त्या दुष्ट लोकांस इतका उन्मत्तपणा प्राप्त होतो कीं, ते भगवंताचा व भगवत्प्रिय भग-

( १ ) " इदमद्य मया लब्धमिमं प्राप्स्ये मनोरथम् । इदमस्तीदमपि मे भविष्यति पुनर्धनम् । असौ मया हतः शत्रुर्हनिष्ये चापरानपि । ईश्वरोऽहमहं भोगी सिद्धोऽहं बलवान्सुखी ।आढ्योऽभिजनवानस्मि कोऽन्योऽस्ति सदृशो मया । यक्ष्ये दास्यामि मोदिष्य इत्यज्ञानविमोहिताः । अनेकचित्तविभ्रान्ता मोहजालसमावृताः । प्रसक्ताः कामभोगेषु पतन्ति नरकेऽशुचौ " ॥ **अर्थ**—आज मी हें मिळविलें, आतां हा माझा मनोरथ शेवटास जाईल, हें तर मजजवळ आहे, हेंहि द्रव्य माझें होईलच, हा शत्रु मी मारला, असेच दुसरेही मारीन, मीच सर्वांचा स्वामी आहें, सर्व भोग मला सिद्ध आहेत, मी कृतकृत्य आहें, थोर कुळांत माझाच जन्म आहे, माझ्यासारखा दुसरा कोण आहे, मी यज्ञ करीन, मी दान करीन, याप्रमाणें अज्ञानानें वेडे होऊन नाना विचारांनीं डोकें फिरून जाऊन मोहजालामध्यें हे गुरफटले जातात, व वासनांची तृप्ति करून घेण्यामध्यें गर्क होऊन अमंगल नरकामध्यें पडतात. —**गीता**. ( २ ) " जसें विंचवा विष थोडें । परी प्रबळ वेदनेसी चढे । तेवीं विद्या थोडी परी गाढें । गर्वाचें पुढें अति भरितें ॥ " —**नाथ**.

वद्भक्तांचा अवमान करूं लागतात. राजा, जसें आकाश वस्तुमात्राला आंतून बाहेरून व्यापून राहिलें आहे, तसाच परमात्मा सकल प्राण्यांमध्यें आत्मरूपानें व ईश्वररूपानें नित्य वसत असतो; तोच सर्वांनीं मिळविण्याजोगा प्रिय पुरुषार्थ होय. वेद आत्म्याचें असें उघडपणें वर्णनें करीत आहेत, पण ते विषयलंपट मूढ लोक तिकडे कानच देत नाहींत, व श्रुतींचाही खराखरा भावार्थ ओळखण्याचा प्रयत्न करीत नाहींत. कारण, एकंदर वाद व विचार विषयसुख संपादण्यासाठीं व्यवहार कसकसे करावे ह्याविषयीं चाललेले असतात. वेद जरी वस्तुतः निवृत्तिपर आहेत, तरी त्यांचा अर्थ ते लोक विषयसुख मिळविण्याचें साधन जें कर्मकांड त्याकडे लावितात. ह्यावर कोणी शंका घेईल कीं, ' ऋतुकालीं स्त्रीसंभोग, हवन करून उरलेल्या मांसाचें भक्षण व सौत्रामणियागामध्यें मद्यपान करण्याचे शास्त्रांत विधि आहेत इतकेंच नव्हे, तर स्त्रीसंभोग न केला असतां दोष सांगितले आहेत. असें असतांना तुम्ही त्यांची निंदा कशी करितां ? ' तर त्यास उत्तर असें कीं, लोकांमध्यें स्त्रीसंभोग, मांसभक्षण व मद्यपान करण्याकडे प्राण्याची प्रवृत्ति नेहमीं स्वाभाविकच असते; ह्या गोष्टी करा ह्मणून कोणाला कधींच सांगावें लागत नाहीं; जें कांहीं ह्या विषयांबद्दल सांगावें लागतें, तें ह्या विषयांपासून निवृत्त होण्याकरितांच. ह्यास्तव विवाह, यज्ञयाग इत्यादि मर्यादा करून स्त्रीसं-

( १ ) " अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं च संश्रिताः । मामात्मपरदेहेषु प्रद्विषंतोऽभ्यसूयकाः ॥ तानहं द्विषतः क्रूरान्संसारेषु नराधमान । क्षिपाम्यजस्रमशुभानासुरीष्वेव योनिषु " ॥ **अर्थ.**—अहंकार, बल, गर्व, वासना व क्रोध यांच्या आधीन होऊन, त्याच्या स्वतःच्या व इतरांच्या देहामध्यें राहणारा जो मी त्या माझा द्वेष करितात, आणि सज्जनांचा अपमान करितात, त्या माझ्या हे द्वेष करणाऱ्या क्रूर अशा पापी नराधमांना मी ह्या संसारांत आसुर योनीमध्येंच नेहमीं जन्माला घालतों. —**गीता.**

भोग, मांसभक्षण, मद्यपान इत्यादि विषयांचें वेदांनीं नियमन केलें आहे, हें चांगलें लक्षांत आणा. ऋतुकालीं स्त्रीसंभोग करावा, हवन करून उर्वरित राहिलेलें मांस भक्षण करावें इत्यादि आज्ञांचा हेतु मनुष्याच्या स्वैर प्रवृत्तीस आळा घालण्याचाच आहे. पहा—स्त्रीसंभोग करावयाचा तो केवळ पुत्रप्राप्तीसाठींच करावा; ह्या वेदोक्त वचनाचा भावार्थ पाहिला असतां, इंद्रियांची तृप्ति हाच केवळ हेतु दिसत नाहीं. वेदप्रणित असलेल्या वचनांचा आशय प्रथम अंशतः व अंतीं सर्वस्वीं विषयनिवृत्ति व्हावी हाच होय, हें उघड होतें. राजा, धनाच्या संबंधानेंही प्रकार असाच आहे. मैथुन, मांसभक्षण, व मद्यपान हीं सुलभ व्हावीं हा धनाचा हेतु मुळींच नाहीं. धनाचा मुख्य उपयोग ह्मटला ह्मणजे धर्म संपादन करावा हाच होय. कारण, त्या धर्मापासूनच पुढें शास्त्रादिकांचें ज्ञान ह्मणजे परमात्म्याचें परोक्ष ज्ञान प्राप्त होतें. आणि शेवटीं अत्युत्तम शांतिसुख ( मोक्ष ) मिळतें. परंतु जे लोक द्रव्याचा उपयोग केवळ आपल्या देहसुखाकरितांच करितात, ते दूरवर दृष्टि न देतां धन व्यर्थ खर्चितात, असें ह्मणणें भाग आहे. कारण देहादिकही शेवटीं निश्चयानें मृत्यूच्या स्वाधीन होणारीं असल्यामुळें त्यांच्या तृप्तीसाठीं खर्च केलेलें धन व्यर्थ गेलें ह्यांत संशय नाहीं. ही गोष्ट त्यांच्या ध्यानांत येत नाहीं! [1]शिवाय वेदांनीं नियमन घालून संभोगादि करण्याला अनुमोदन दिलें आहे. तें देखील यथेच्छ उपभोगण्यासाठीं नाहीं, तर उलट आहे. पहा, मद्याचें सुद्धां अवघ्राण ( हुंगणें ) ह्या रूपानें भक्षण करावयाचें आहे, प्राशन करावयाचें नाहीं;—तसेंच पशूंचें आलंभन (अंगस्पर्श) करावयास सांगितलें आहे, हनन करावयाची नाहीं;

( १ ) " वेदिच्या अर्थवादागरिसा । मनीं बांधोनि भोगाशा । यज्ञामिषें पशुहिंसा । भोगलिप्सा करूं धांवती ॥ वेदीं बोलिलें आलंभन । त्या नांव ह्मणती पशुहनन । हें सकाम मानिती विधान । निष्काम हनन कदा न घडे ॥ निष्काम कामा-

ह्याचप्रमाणें मैथुन तरी संततीच्या निमित्तानें करावयाचें. रतिसुखासाठीं नव्हे. मनोरथानुरूप वेदाचा अर्थ करणाऱ्या लोकांना हा अत्यंत शुद्ध धर्म कळत नसतो. एकंदरींत, भगवत्सेवेला जे लोक विन्मुख झाले, त्यांच्या अंगीं अनेक दोष येतात, हाच निश्चय होय. आतां, त्यांना शेवटीं कोणती गति मिळते तेंही सांगतों:—

**कर्मठांची गति**—राजा, अशा प्रकारें धर्माचें रहस्य ज्यांना कळत नाहीं ते ताठखोर व स्वतःलाच पंडित मानणारे दुष्ट लोक निःशंकपणें पशूंचा वध करितात, व पुढें जेव्हां यमलोकीं जातात, तेव्हां त्यांनीं पूर्वी मारलेले पशू तेथें त्यांस फाडफाडून खातात! जे लोक आपल्या शरीरांतील आत्मा व दुसऱ्याच्या शरीरांतील आत्मा हे निराळे मानून दुसऱ्याच्या आत्म्याचा द्रोह करितात, व आपल्या स्वतः प्रेततुल्य शरीरावर आणि स्त्रीपुत्रादि परिवारावर प्रेम बांधून राहतात त्यांचा परिणाम, शेवटीं त्यांना अधोगतीस जावें लागतें, हा होतो. राजा, जे लोक परब्रह्मज्ञानांत प्रवीण असतात, ते तर हा संसारसागर तरून जातातच, पण अज्ञानी लोक सुद्धां ब्रह्मनिष्ठ लोकांच्या अनुग्रहानें ह्या मायामोहाचें उल्लंघन करून सायुज्यपद मिळवितात. परंतु जे कोणी वास्तविक ज्ञानी नाहींत व अगदीं मूर्खही नाहींत असे मिश्रज्ञानलवानें

( टीप मागील पृष्ठावरून. )
सि जाण। स्वधर्मार्थ करावे यज्ञ। तेथें पशूंचें आलभन। सर्वथा हनन करूं नये॥ पशूंलें करूं नये हनन। देवोद्देशें अंगस्पर्शन। या नांव बोलिजे आलभन। हें यज्ञाचरण निष्काम "॥ —**नाथ.**

( १ ) " असूर्या नाम ते लोका अंधेन तमसाऽऽवृताः। तांस्ते प्रेत्याभिगच्छंति येकेचात्महतो जनाः" ॥ **अर्थ**—निबिड अंधकारानें व्यापलेले असुरांचे प्रसिद्ध लोक आहेत. जे कोणी आत्मघाती जन असतात, ते मरणोत्तर त्या लोकांस जातात."

( २ ) सज्ञानी स्वता तरती। अज्ञानी सज्ञानां शरण येती। तेणें त्यांसि कैवल्यप्राप्ति। त्यांच्या वचनोक्ति विश्वासें-**नाथ.**

उन्मत्त झालेले पुरुष असतात. त्यांची मात्र फार दुःखद स्थिति होते. धर्म, अर्थ व काम हे सर्व इंद्रियांच्या संतोषाकरितांच संपादायाचे, अशी त्यांच्या मनाची प्रवृत्ति असल्यामुळें. ते मोक्षाला आंचवून भवभ्रमणामध्यें गोते खाऊं लागतात. राजा, असले हे मूर्ख लोक अकर्मालाच कर्म मानून ईश्वराच्या अनुग्रहास अंतरतात. व भलतींच कर्मे करून नित्य अतृप्त असे असतात; आणि अखेरीस कालाच्या तडाक्यांत सांपडून त्यांचे मनोरथ जागच्या जागींच राहतात. व ते स्वतःला दोहींपरी सफाई बुडवितात! एतावता, जे लोक नारायणाची भक्ति करीत नाहींत व नानाप्रकारचे आयास करून घरदार, स्त्रीपुत्र, आप्तस्नेही, व संपत्ति ह्यांमध्येंच निमग्न असतात, त्या भ्रांतिष्टांना हा सर्व पसारा मोठ्या दुःखानें येथच्या येथेंच टाकून धावा लागून शेवटीं नरकाचा मार्ग धरावा लागतो. इति १९।

---

# अध्याय १६ वा.

## प्रवृत्तिमार्गवर्णन. (११-२१)

श्रीभगवानुवाच—

विषयेषु गुणाध्यासात्पुंसः संगस्ततो भवेत् ॥
संगात्तत्र भवेत्कामः कामादेव कलिर्नृणाम् ॥१९॥
कलेर्दुर्विषहः क्रोधस्तमस्तमनुवर्तते ॥
तमसा ग्रस्यते पुंसश्चेतना व्यापिनी द्रुतम् ॥२०॥

(१) " जे अज्ञान ना सज्ञान । ज्यांसि केवळ अभिमान । ज्यांचें विषयीं लोलुप मन । ते पुरुष जाण आत्मघाती " —**नाथ.**

(२) " भ्रांता एवाखिलास्तेषां क मुक्तिः केह वा सुखम् ॥ " **अर्थ**—विषयांमध्यें अगदीं गढून गेलेल्या पुरुषाला कसली मुक्ति व कोठलें सुख ? —**श्रुति.**

**श्रीभगवान् म्हणाले:**—उद्धवा वेदाचा वरपांगी अर्थ प्रवृत्तिपर दिसतो खरा, पण वास्तविक तो तसा नव्हे. कारण, प्रवृत्तिमार्ग किती अनर्थावह आहे पहा. प्रथम विषयांची अभिरुचि उत्पन्न झाली कीं, त्यांच्या ठिकाणीं आसक्ति जडते; आसक्ति जडली कीं त्या विषयांची इच्छा उत्पन्न होते; नंतर मनुष्य ते विषय मिळविण्यास उद्युक्त होतो; तितक्यांत जर ते सुलभपणें प्राप्त झाले तर ठीक; नाहीं तर विघ्नें करणारांशीं कलह उत्पन्न होतो; कलह उद्भवला कीं तीव्र क्रोध येतो; त्यायोगें लौकरच विचार नष्ट होतो. अविचारामुळें पुढें तमोगुणानें प्राबल्य होतें व मनुष्य तत्काळ भलतींच कृत्यें करितो ! असा विवेकरहित पुरुष मृततुल्यच समजावा. कारण, त्याच्या (मृताप्रमाणेंच) चतुर्विध पुरुषार्थांची हानी होते[1]! प्रवृत्तिपर मनुष्य हा विषयांमध्यें पूर्ण तल्लीन होऊन जात असल्यामुळें आपण स्वतः कोण आहों, आपला अधिकार किती श्रेष्ठ आहे, व दुसऱ्या जीवांचे अधिकार किती क्षुद्र आहेत ह्या गोष्टींचा तो मुळींच विचार करीत नाहीं ! तो केवळ वृक्षादिकांप्रमाणें उपजीविका चालवितो व लोहाराच्या भात्याप्रमाणें श्वासोच्छ्वास करीत राहतो एवढेंच होय[2]! अर्थात् तो वृक्षासारखा मूर्च्छित व भात्याप्रमाणें मृततुल्य होय !

(१) " घोडा विकोनी पलाण (जीन) घेणें । जोंणी देऊनी नाक मागणें । भात सांडूनि तेलण पिणें । तैसें फळ भोगणें सकामीं ॥ " **नाथ.** (२) " ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः । स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ " **अर्थ**—विषयांच्या संबंधानेंच विचार करीत राहिल्यानें मनुष्याची त्यावर आसक्ति जडते, आसक्तीपासून वासना उद्भवते, व वासना पूर्ण न झाल्यानें क्रोध येतो, क्रोधापासून गुरळ पडून भ्रांतिष्ट होतो. त्या भ्रांतीच्या योगानें बुद्धि नाश पावते, बुद्धिनष्टतेनें मनुष्य नाश पावतो.—**गीता.**

उद्धवा, 'प्रवृत्तिमार्ग जर असा अनर्थकारक आहे, तर मग वेदानें त्याची प्रशंसा कां केली ?' अशी शंका तूं घेशील खरा; परंतु त्याचें समाधान असें कीं, वेदाचा खरा खरा आशय तुला समजला नाहीं, म्हणून असा संशय वाटतो. पहा:-यज्ञयागादिक क्रिया केल्या असतां स्वर्गादिकांची प्राप्ति होते, असें वेदानें सांगितलें आहे खरें; परंतु तसें सांगण्याचा हेतु, विषयासक्त पुरुषांचीं चित्तें प्रथम शुद्ध होऊन शेवटीं त्यांनीं निवृत्तिपर व्हावें व परमात्मपदाची प्राप्ति करून घ्यावी हाच आहे. उद्धवा, माझी प्राप्ति होण्यास आधीं प्राण्यांची वासना निवृत्त झाली पाहिजे. जोंपर्यंत चित्त बहिर्मुख असतें, तोंपर्यंत त्यांच्या ठिकाणीं वासनेचें अत्यंत प्राबल्य असतें ! व तेंच चित्त अंतर्मुख झालें असतां त्याच्या वासनेस आळा पडतो. ह्यासाठीं बहिर्मुख चित्त अंतर्मुख करणें हें अगत्याचें आहे. परंतु मनुष्यास हें साध्य करण्याचें इष्ट कसें वाटावें ही मोठी अडचण असल्यामुळें, वेदानें मनुष्याचें चित्त वळविण्याकरितां स्वर्गादिक सुखांचें आमिष उत्पन्न करून त्याला कर्माची गोडी लावून दिली आहे. पहा-मुलाला औषध पाजावयाचें असलें ह्मणजे आपण कांहीं तरी खाऊ देऊं करतों, पण औषधाचा खरा हेतु गोड खावयास मिळावें हा असतो, किंवा रोग जावा हा असतो ? अर्थात् रोगाची निवृत्ति हाच औषधाचा मुख्य हेतु होय; खाऊ हें अवांतर फल होय.

(१) "पिब निंबं प्रदास्यामि खलु ते खंडलड्डुकान ।पित्रैवमुक्तः पिबति न फलं तावदेव तु" **अर्थ**--बाळा, एवढा कडुनिंबाचा रस पी. मग मी तुला खडीसाखर आणि लाडू देईन, असें बापानें सांगितलें कीं, मुलगा तें औषध आनंदानें पितो; पण त्याचें फळ खडीसाखर किंवा लाडू मिळणें एवढेंच नव्हे. तसेंच आई सांगते--" शिखा ते वर्धते वत्स गुडूचीं श्रद्धया पिब " **अर्थ**—बाळा, हा गुळवेलीचा काढा पी, ह्मणजे किनई तुझी शेंडी लांब होइल. ह्याचें तात्पर्य तरी तसेंच. —**स्मृति.**

परंतु अजाण मुलांस तो हेतु प्रधान वाटत नाहीं; त्यांस शर्करादि पदार्थांचेंच महत्व वाटतें व त्यांच्याच लालसेनें तीं मुलें औषधांचें सेवन करितात. उद्धवा, वेदामध्यें ज्योतिष्टोम करणाराला स्वर्ग मिळतो इत्यादि फलश्रुति सांगितली आहे, त्याचा उद्देश तरी मनुष्यांनीं कर्में करावीं; चित्तें शुद्ध करून घ्यावीं व त्या द्वारा मोक्ष मिळवावा हाच मुख्य उद्देश होय. स्वर्गादि फळें केवळ खाऊसारखी गोडी लावण्यासाठीं देऊं केलेलीं अवांतर फळें समजावीं.

उद्धवा, विषय म्हणजे स्त्री—पुत्र, घर—दार, देह—प्राण हीं स्वतःला अनर्थावह आहेत खरीं; पण मनुष्यांचीं मनें स्वभावतः त्यांच्यावर आसक्त असतात, ह्मणून त्यांना परम सुख कोणतें तें अगदीं कळत नसतें. कारण, ते सर्वदा काममार्गांतच भ्रमण करीत असतात. तथापि ते देवाला नमून असतात. ह्मणजे वेद सांगेल तें प्रमाण, असा त्यांचा विश्वास असतो. अशा विश्वासु लोकांना स्वतः ज्ञाता वेद पुन्हां त्याच अनर्थकारक काममार्गांत प्रवर्तण्यास सांगतो कसा ? जर असें असेल तर तो योग्य उपदेश न करणारा, अर्थात् त्याला हितशत्रु ह्मणणें भाग पडेल ! ही गोष्ट कोणासही इष्ट नाहीं, व कोणीही वेदाविषयीं असली कुबुद्धि धारण करूं नये. वेदाचा खरा उद्देश जीवांचें कल्याण व्हावें ह्मणजे स्वर्गसुखाचें आमिष दाखवून मोक्षमार्गास लावावें हाच होय. उद्धवा, वेदाचा गर्भितार्थ न जाणतां दुर्बुद्धि ( कर्ममीमांसक ) लोक केवळ फुललेल्या वेलीसारख्या मनोहर अशा फलश्रुति सांगून त्या विश्वासुक लोकांस कर्मफलांचीच आसक्ति उत्पन्न करितात व शेवटीं फ-

( १ ) " पारधी लावूनी बडिशपिंडीं । मीनासी जळाबाहेर काढी । तेवीं दावूनि स्वर्गसुख गोडी । वेद जीवास वोढी परमार्थीं ॥ " —**नाथ.**

सविनात: परंतु ज्यांना वेदाचें खरें तात्पर्य कळतें ते व्यासादिक तसें कधींही सांगत नाहींत. त्या कर्मठांस अंतरीं भोगेच्छा प्रबळ असल्यामुळें त्यांची विवेकबुद्धि शिथिल झालेली असते ह्मणून स्वर्गादि अवांतर फळें तींच कायतीं मुख्य फळें असें ते समजतात! मग ते यज्ञ करावयास लागतात. व घुगानें डोळे मुजवून घेऊन पुनर्जन्माच्या सिद्धतेनें आत्मतत्त्वास अंतरतात! कर्मजड पुरुष त्या कर्माच्या अभिमानामुळें इतके अंधळे बनतात कीं, जगन्नियामक प्रभु जो परमात्मा तो अंतर्यामीं वास करीत असतांही त्याकडे त्यांचें लक्ष्य जात नाहीं. कारण, त्यांच्या मनांतून मांस खाण्याची इच्छा असते. ती पुरविण्याला आयताच अनुकूल असा यज्ञ. त्याच्या आधारानें पशू मारून खावे व इंद्रियांची तृप्ति करावी हाच त्यांचा मुख्य उद्देश असतो. वेद निर्माण करणाऱ्या ईश्वराचें मत तर असें आहे कीं, "मांस खाण्याची आवड असेल तर यज्ञशेषावांचून इतर मांस भक्षूं नये." मांस खायाला नको असलें किंवा स्वर्गादि फलाची इच्छा नसली तरी यज्ञ अवश्य केलाच पाहिजे असा विधि नाहीं. हा माझा गूढ अभिप्राय त्या विषयलोलुप पुरुषांना समजत नसल्यामुळें अनाचार माजवितात!

**कर्मठांचा आचारविचार:**—उद्धवा, कर्मठांस पशुहिंसा ह्मणजे एक मौजेचा खेळच वाटतो! मोठ्या उत्सुकतेनें ते यज्ञांत पशूचा वध करितात. व तसेंच इंद्रियांची तृप्ति करून घेतात; आणि पारलौकिक

(१) "न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम्। जोषयेत्सर्वकर्माणि विद्वान्युक्त: समाचरन्॥" **अर्थ**—कर्मामध्यें गढलेल्या अज्ञान्यांच्या बुद्धीला भेद पाडूं नये. शहाण्यानें निष्काम बुद्धीनें कर्मामध्यें गढलें राहून त्यांजकडून निष्काम कर्मेंच करवावीं. —**गीता.**

सुखाकरितां इंद्रादिक देव, पितर व भूत इत्यादि देवतांची आराधना करितात. स्वर्गलोक ह्मणजे नुसता कानाला मात्र गोड! पण खरें पाहूं जातां स्वप्नासारखा भासमान व असत् होय. कर्मठ पुरुष आपल्या जवळील पुष्कळ धनादिकांचा व्यय करून, त्या स्वप्नतुल्य स्वर्गादिकांच्या प्राप्तीसाठीं यत्न करितात, आणि समुद्र तरून परद्वीपांत जाणाऱ्या व्यापाऱ्याप्रमाणें हातचें दवडून पळत्याच्या पाठीस लागतात. त्यांचे स्वभाव सत्व, रज व तमोगुणांनीं युक्त असतात, ह्मणून ते आपापल्या गुणानुरूप अशा सात्विक, राजस व तामस इंद्रप्रभृति देवतांची उपासना करितात; पण गुणातीत जो मी ( परमात्मा ) त्या माझें आराधन करीत नाहींत. आतां इंद्रादिक देव तरी माझेच अंश होत. ह्मणून "आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरं" ह्मणजे आकाशापासून पडलेलें पाणी जसें समुद्रास मिळतें, तशी कोणत्याही देवतेची पूजा केली तरी ती माझीच केल्यासारखी होते. ही गोष्ट खरी; परंतु तें त्यांनीं केलेलें माझें पूजन जसें व्हावें तसें होत नाहीं. कारण, त्यांची दृष्टि भेदयुक्त असते ह्मणून त्यांना त्या त्या देवता भिन्न भिन्न वाटत असतात. आतां त्यांचीं मनोराज्यें कसकशीं चालतात तें सांगतों ऐकः—

**कर्मठांचीं मनोराज्येंः**—" आपण ह्या लोकीं यज्ञांच्या योगें देवतांचें आराधन केल्यावर मग स्वर्गीं जाऊन नानाप्रकारचीं सुखें भोगूं. नंतर ते भोग संपल्यावर पुन्हां ह्या भूलोकीं एकाद्या उच्च कुलामध्यें जन्मून मोठ्या वैभवांत [१]निमग्न होऊं." अशा मोहक व झोंकदार वचनांनीं मनुष्यांचीं मनें चंचल होऊन जातात; व मग त्यांना त्यांबद्दल अभि-

( १ ) " यांति देवव्रता देवान् पितॄन्यांति पितृव्रताः । भूतानि यांति भूतेज्या यांति मद्याजिनो ऽपि मां ॥" **अर्थ**—देवतांची विधिपूर्वक आराधना करणारे देवलोकास जातात. पितराची आराधना करणारे पितृलोकास जातात, भूतांची आराधना करणारे भूतत्त्वाला जातात, आणि माझी भक्ति करणारे भक्त मजकडे येतात.—**गीता.**

मान वाटूं लागतो; शेवटीं ते गर्वानें अतिशय फुगून जातात; व मग त्यांना माझी वार्ता सुद्धां आवडत नाहीं. ह्मणून ते माझ्या सेवेकडे लक्ष देत नाहींत. अर्थात् ह्या संसारामध्यें " पुनरपि जननं पुनरपि मरणं " ह्या आचार्यांच्या वाक्याप्रमाणें पुनःपुनः जन्ममरणरूप घिरट्या घालीत असतात.

**वेदांचा गूढ अर्थः**—हें उद्धवा, परमार्थसिद्धीकरितां, कर्मकांड, उपासनाकांड व ज्ञानकांड हे कांडत्रययुक्त चार वेद निर्माण झाले असून त्यात जीव ब्रह्मात्मक हा विषय आहे. ह्या सगळ्या वेदांचें पर्यवसान "आत्मा ( जीव ) ब्रह्मरूप होय, संसारी नव्हे" हेंच सांगण्याकडे आहे. वेदज्ञ ऋषींनीं हा अर्थ मुद्दाम गूढ ( वर दिसणारा अर्थ वेगळा व आंतील आशय भिन्न ) राखिला आहे, व त्यांचा तो विचार मान्य आहे. कारण, ज्यांचीं अंतःकरणें शुद्ध झालीं नाहींत अशा अनधिकारी पुरुषांस हा गूढ अर्थ समजल्यास उलट ते विनाकारण कर्म सोडून देऊं लागतील आणि " इतोभ्रष्टस्ततोभ्रष्टः " ह्मणजे येथें भ्रष्ट व तेथेंही भ्रष्ट होऊन स्वार्थास व परमार्थास अंतरतील. इति १६ ।

---

# अध्याय १७ वा.

## काम्यकर्म-वर्णन ( १-३२. )

कपिल उवाच—

अथ यो गृहमेधीयान्धर्मानेवावसन्गृहे ॥
काममर्थं च धर्मान्स्वान्दोग्धि भूयः पिपर्ति तान् ॥ १ ॥

**कपिल महामुनि म्हणाले:**—माते देवहूति, जो पुरुष गृहस्था-

( १ ) ज्ञानप्रकरण १५ वा अध्याय पहा.

श्रमधर्मांचें आचरण करून धर्म, अर्थ व काम ह्यांची प्राप्ति करून घेण्याचें साधन चालवितो, तो ज्याप्रमाणें गाईला चारा घालून दूध काढून घेणारा पुरुष पुनः पुनः चारा घालून दूधच मिळवितो. त्याप्रमाणें तींच तीं कामरूप फळें पुनःपुनः मिळवितो. त्याहून पर जें ' ब्रह्म ' तें त्याला प्राप्त होत नाहीं. अशा प्रकारचा विषयोपभोगाची इच्छा करणारा पुरुष भक्तिपुरःसर यज्ञ करून देव आणि पितर यांची आराधना करितो. व त्या नादीं लागून भागवतधर्माकडे दुर्लक्ष करितो; देव आणि पितर हेच काय ते पूज्य आहेत असा त्याच्या बुद्धीला पक्का विश्वास वाटून तो पुरुष त्यांना संतुष्ट करण्यासाठीं अनेक व्रतें व नियम करितो. पण त्या नियमांचें फळ त्याला फारच क्षुद्र मिळतें. म्हणजे चंद्रलोकापर्यंत जाऊन सोमपान करण्यापलीकडे त्याला कांहीं मिळत नाहीं. बरें, तें तरी फार दिवस राहतें असें नाहीं! तें फळ त्याला एकदां मिळालें कीं, त्याचें पुण्य क्षीण होतें आणि त्याला फिरून मृत्युलोकीं यावें लागतें. ज्याप्रमाणें द्रव्य देऊन त्याच्या ऐवजीं कांहीं पदार्थ घेतला असतां त्या द्रव्याबद्दल त्याला मिळालेल्या वस्तूपेक्षां जसें कांहीं अधिक मिळत नाहीं; इतकेंच नव्हे, पण त्याच्या द्रव्याबद्दलचा मोबदला त्याला मिळाल्यानंतर तेथें उभें राहण्याचें देखील त्याचें कारण संपतें; त्याप्रमाणें काम्यकर्मांची स्थिति आहे. पण हें तत्त्व त्या काम्यकर्में करणाऱ्या पुरुषाच्या लक्षांत येत नाहीं; आणि ईश्वरार्पण बुद्धीनें निष्कामकर्में करणें, ह्या भागवत धर्माकडे तो अगदीं दुर्लक्ष करितो. सकामकर्में

( १ ) ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशन्ति । एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥ " **अर्थ**—विशाल अशा त्या स्वर्गलोकाचा उपभोग घेऊन संचित पुण्य नाहींसें झालें, ह्मणजे फिरून मृत्युलोकाप्रत येतात. याप्रमाणें सकामबुद्धीनें तिन्ही वेदांतील विधींना अनुसरणारे लोक जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतात. —**गीता.**

करणाऱ्या पुरुषांना जे लोक प्राप्त होतात, ते ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवशीं जो जगाचा प्रलय होतो. त्यांत लय पावतात; पण भगवद्भक्तांची गोष्ट अगदीं निराळी आहे. आतां भगवद्भक्तांची गति कशी तें सांगतों.

**भगवद्भक्तांची गति**—माते देवहूति. भगवद्भक्त लोक काम आणि अर्थ मिळविण्याकडे स्वधर्माचरणाचा विनियोग करीत नाहींत. आसक्ति न ठेवितां केलेलीं कर्में परमेश्वराला अर्पण करितात; स्वतांचें अंतःकरण अत्यंत शांत व शुद्ध ठेवून निष्काम धर्मावर पराकाष्ठेची प्रीति करितात; आणि ममता व अहंकार अगदीं मोडून देतात. हेंच भागवतधर्म आचरण करणारे लोक होत. त्यांचें अंतःकरण उत्तम ( निष्काम ) स्वधर्माचरण केल्यामुळें सर्वतोपरी शुद्ध होतें; व त्यामुळें ते सूर्यलोकाच्या द्वारानें परमेश्वराच्या स्वरूपास प्राप्त होतात. परमेश्वराचें स्वरूप सर्वत्र पसरलेलें आहे, तो स्थावरजंगमात्मक सृष्टीचें नियमन करणारा, सर्व कार्यांवरोवर असणारा कारणरूपी असून ह्या जगाची उत्पत्ति, संहार आणि पालन करीत असतो; ही त्याची विनोदार्थ क्रीडा होय. जे हिरण्यगर्भाची परमेश्वरबुद्धीनें उपासना करितात, ते दोन परार्धांच्या शेवटीं ब्रह्मदेवाचा प्रलय होईपर्यंत त्याच्या सत्यलोकीं राहतात, व जेव्हां त्या त्रिगुणात्मक श्रेष्ठ ब्रह्मदेवाला पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, इंद्रियें, शब्दादि विषय व भूतें यांचें आदिकारण अहंकार ह्यांनीं चोहोंकडून भरलेल्या ब्रह्मांडाचा लय करण्याची इच्छा होते, व तो द्विपरार्धसंज्ञक कालपर्यंत अधिकाराचा अनुभव घेऊन शेवटीं ईश्वराच्या स्वरूपीं प्रवेश करितो; तेव्हां ते योगी त्याच ब्रह्मदेवाबरोबर ब्रह्मरूपास प्राप्त होतात. त्यांनीं प्राणवायु आणि मन हीं दोन्ही स्वाधीन करून घेतलेलीं असतात, व त्यांचें वैराग्य कडकडीत असतें; पण त्यांचा अभिमान मात्र नाहींसा झालेला नसतो. ह्मणून ते मुक्त न होतां इतके लांब सत्यलोकापर्यंत जाऊन हिरण्यगर्भरूपी भगवत्स्वरूपांत मिळून राहिले असता-

त, व पुढें ब्रह्मदेवाच्या बरोबर ब्रह्मरूपीं ऐक्य पावतात. तें ब्रह्मरूप परमानंदानें भरलेलें आहे. ह्मणून हे माते, तूं भक्तीनें त्या परमेश्वराला शरण जा. तो सर्व भूतांच्या हृदयकमलीं वास करीत असून त्याचा पराक्रम अतर्क्य होय. इति १७।

---

# अध्याय १८ वा.

## संसारचक्राचा प्रभाववर्णन ( ७-९ )

प्रल्हाद उवाच—

**त्रस्तोऽस्म्यहं कृपणवत्सल दुःसहोग्रसंसारचक्रकदनात्ग्रसतां प्रणीतः ॥ बद्धः स्वकर्मभिरुशत्तम तेऽङ्घ्रिमूलं प्रीतोऽपवर्गमरणं ह्वयसे कदा नु ॥ १६ ॥**

**प्रल्हाद ह्मणालाः**—देवा, दुःसह व उग्र अशा संसारचक्रांतील दुःखानें मी गांजून गेलों आहें; त्यांतही स्वकर्मांनीं मला बांधून हिंस्र पशु जे काम-क्रोधादिक विकार, त्यांच्या तडाक्यांत मी सांपडलों आहें. हे दीनवत्सला, तूं या दीनावर प्रसन्न होऊन मला आपल्या मोक्षरूपी अशा निर्भय चरणकमलांजवळ केव्हां बरें बोलावणार? नरहरे! प्रिय वस्तूंचा वियोग आणि अप्रिय वस्तूंचा समागम घडल्यामुळें उद्भवलेला शोकाग्नि सर्वदा मला छळीत असतो. दुःखपरिहारार्थ जर कांहीं औषध घ्यावें, तर त्यापासून देखील दुःखच प्राप्त होतें. याप्रमाणें व्यर्थ मीं या जड देहाचा अभिमान धरिल्यामुळें या संसारचक्रांत भ्रमण करीत आहें. त्यांतून निघण्याचा उपाय ह्मणजे तुझी सेवा करणें हाच होय; तो मला निवेदन कर. नरहरे! माझें प्रिय, हितकर व उपास्य दैवत काय तें तूं! ब्रह्मदेवानें तुझ्या लीला गाइल्या, त्या तुझ्या चरणांचा

आश्रय करणाऱ्या साधूंचा समागम घडल्यामुळें परंपरेनें मला माहीत झाल्या. आतां मी नित्यशः त्या लीलांचें गायन करितों; ह्मणून माझीं सर्व दुःखें नष्ट होऊन, व तीं उद्भवण्यास कारण जे रागद्वेषादि गुण त्यांनीं मजपासून पलायन केलें आहे. हे विश्वव्यापका! दुःखनिवारण करण्याचे म्हणून जे जे उपाय जगांत प्रसिद्ध आहेत, ते तुझ्या कृपेमुळेंच फलदायक होतात. तूं उपेक्षा केलीस तर त्यांचा कांहीं एक उपयोग नाहीं. पहा—मुलांचें पालन करणारे आणि त्यांना सुख देणारे काय ते आईबाप; पण तेंही यथार्थ नव्हे; कारण रक्षण करीत असतां थोड्यांना कां दुःख होतें? फार काय सांगावें? अजीगर्तासारखे बाप, तर मुलांना उलटें दुःखच देतात. अशीं उदाहरणें किती तरी आढळतील! रोग्याचें तारण ह्मणजे औषध. हें म्हणणें मुळीं खरें नव्हें; कारण, औषध चालू असूनही रोगी मरायचे ते मरतातच. तसेंच समुद्रांत बुडणाराला नौका तारण म्हणावें, तर तसेंही ह्मणतां येत नाहीं; कारण, समुद्रांत थोड्या का नौका बुडतात!

हे नृसिंह देवा! या जगांत अनेक प्राणी जन्म पावतात, त्यांचे गुणही निरनिराळे असतात. कोणी सत्वगुणी असतो; कोणी तमोगुणी असतो; कोणी मिश्रगुणी म्हणजे रजोगुणी असतो. त्या प्राण्यांचें जनन ज्यापासून होतें तो पिता; त्याला उत्पन्न करणारा ब्रह्मदेव; त्याच्या जन्मास निमित्त असलेलें पूर्वार्जित कर्म; तो ज्यावेळीं जन्म पावला असेल ती वेळ; तो ज्या कारणासाठीं या जगांत उत्पन्न झाला असेल तें कारण; पूर्वकर्मसंबंधानें तो ज्या ठिकाणीं उत्पन्न झाला असेल तें ठिकाण व तो संबंध; त्याच्या जन्मास साहाय्यभूत व आधार असणारीं महत्तत्त्वादि महाभूतें; त्यांस प्रेरणा देणारा काल; आणि त्याच्या जन्माचा किंवा मृत्यूचा प्रकार हीं सर्व तुझींच रूपें होत. देवा! कालानें मायेच्या गुणांत क्षोभ केला असतां, जर तुझ्या अंशभूत पुरुषाची तिजवर दृष्टि पडली, तर

कार्ये करणारें मन ( लिंगदेह ह्यांत मन मुख्य असल्यामुळें ह्याला मनच म्हटलें ) निर्मिते. हें मन जिंकणें फार कठीण आहे. वेदामध्यें वर्णिलेलीं कर्मे ही त्या मनाला मुख्य कर्तव्य वाटतें. ह्या मनालाच संसारचक्र म्हणतात. अविद्येनें जीवाला भोग मिळावे म्हणून ह्या चक्राला मनसहित एकादश इंद्रियें आणि पंचमहाभूतें मिळून सोळा पाकळ्या लावून दिल्या आहेत. देवा, तुझी भक्ति न करणारा कोणता बरें प्राणी ह्या चक्रांतून निसटून जाण्यास समर्थ होईल? भगवंता ! तुझ्या चैतन्यशक्तीचें सामर्थ्य अवर्णनीय व अनंत आहे ! तिच्या योगानें तूं बुद्धीचे सर्व गुण सदोदित जिंकिले आहेस, आणि काल म्हणजे मायेला प्रेरणा देणारा तूंच आहेस. अर्थात् उत्पन्न होणाऱ्या कार्यांच्या व उत्पादक साधनांच्या शक्ति तुझ्या आधीन आहेत ! ईश्वरा, माया मला या सोळा आरांच्या चक्रांत घालून पिळून निःसत्व करीत असते, म्हणून मीं तुला शरण आलों; त्यांतून माझा उद्धार कर. विभो, स्वर्गादि सुखैश्वर्यांची योग्यता काय आहे, ती मला पक्की समजली. कारण. तेथाल अधिपति जे लोकपाल, ते माझ्या पित्याची भुंवई किंचित् वक्र झाली असतां थरथर कांपत असत ! असा जो महापराक्रमी त्याचा देखील तूं वध केलास; तस्मात् तुझें सामर्थ्य असाधारण होय. असल्या त्या स्वर्गलोकींच्या तुच्छ सुखांत काय अर्थ ? याचप्रमाणें ब्रह्मदेवापासून तों तहत अगदीं अल्पायु मनुष्यानें आयुष्य, इंद्रियसुख, संपत्ति इत्यादि भोग आणि कालगतीनें नाश पावणाऱ्या आणिमादि सिद्धि या सर्वांची योग्यता मला कळून आली आहे; त्यांची मी मुळींच आशा करीत नाहीं. म्हणून तुझे भक्त जे तुझ्या चरणांसमीप वास करितात, त्यांच्या जवळ मला ने म्हणजे झालें! ह्या सर्व उपभोगांचें वर्णन ऐकिलें म्हणजे तें कानांस फार गोड लागतें, आणि तें प्राप्त व्हावें म्हणून प्राण्यांच्या मनांत लालसा उत्पन्न होऊन तो त्यांच्या प्राप्तीसाठीं यत्न करूं लागतो; पण खरें पाहूं

गेलें तर ते सर्व उपभोग केवळ मृगजळासारखे मिथ्या होत. हे सकल भोग आणि आपलें शरीर देखील मिथ्या आहे, इतकें कळत असूनही लोक विरक्त होत नाहींत, उलट दुर्मिळ वाटणाऱ्या रतिसुखाची प्राप्ति करून घेण्याकरितां मोठ्या कष्टानें द्रव्य संपादून ते कामाग्नीचें शांतवन करीत बसतात; तेव्हां देवा, केवढा तरी तुझ्या मायेचा अद्भुत प्रभाव हा ! ! इति १८ ।

---

# अध्याय १९ वा.

## संसारतरणोपायवर्णन. ( ४-२२ )

पृथु उवाचः—

> कच्चिन्नः कुशलं नाथा इंद्रियार्थार्थवेदिनाम् ॥
> व्यसनावाप एतस्मिन्पतितानां स्वकर्मभिः ॥ १३ ॥

**पृथुराजा म्हणाला**:—सनत्कुमारहो ! आपली थोरवी मीं काय व किती वर्णन करावी ? ह्या दुःखमय संसारांत आह्मी आपल्या कर्मामुळें येऊन पडलों आहों, आणि इंद्रियांचे विषय हेच आम्हांला पुरुषार्थ वाटतात ! तेव्हां आमच्या कल्याणाचा कांहीं उपाय कृपा करून सांगा.

**सनत्कुमार म्हणाले**:—राजा, तूं स्वतः ज्ञानी असून केवळ अज्ञ जनांचे कल्याणाकरितां हा उत्तम प्रश्न केलास; फार कल्याणकारक झालें. अशी बुद्धि सत्पुरुषावांचून इतरांस व्हावयाची नाहीं. तेव्हां तुजसारख्या साधुपुरुषांचा समागम आम्हांस घडत आहे हा एक अलभ्य लाभच होय; असें आह्मी समजतों. राजा, मधुसूदनाच्या चरणकमलांचे गुण वर्णन करण्याविषयीं वार्तालाप करण्याला अंतरीं प्रेम उत्पन्न होणें फार कठीण आहे. पण त्याविषयींची तुझी निश्चल भक्ति पाहून आ-

म्हांस फार आनंद वाटतो. प्राण्याच्या मनाला कामरूपी मळ लागला कीं, तो कधींही निःशेष होत नाहीं; परंतु भगवद्गुणकथेवर प्रीति जडली असतां मनावरील मळ अगदीं नाहींसा होतो. या जड देहादिकांवर आसक्ति न ठेवितां निर्गुणब्रह्मरूप जो आत्मा, त्याच्या स्वरूपींच रत असावें, असें शास्त्राचेंही मत आहे. आतां ही स्थिति प्राप्त होणें कठीण तर खरेंच; पण प्रयत्न केला असतां साध्य होण्यासारखी आहे. उत्तम अधिकारी असेल त्याला नुसत्या श्रवणानें प्राप्त होईल, इतरांना आपआपल्या अधिकाराप्रमाणें थोडेबहुत जास्त श्रम करावे लागतील. पण त्याचा परिणाम त्या मनुष्याची भक्ति हळु हळु वृद्धिंगत होऊन त्याला ती स्थिति प्राप्त झाली, असाच होणार.

**आत्मप्राप्तीचीं साधनें व त्यांचें फळ**–राजा! गुरूच्या आणि शास्त्रांच्या वचनांवर विश्वास ठेवावा; भागवतधर्माचें आचरण करावें; ज्ञानप्राप्तीची इच्छा धरावी; योगाभ्यासांत तत्परता राखावी; योगेश्वर परमात्म्याची उपासना करावी; पुण्यकीर्ति ईश्वराच्या पवित्र चरित्रांचें

---

(१) " भोगैकवासनां त्यक्त्वा त्यज त्वं भेदवासनाम् । भावाभावौ ततस्त्यक्त्वा निर्विकल्पः स्थिरोभव ॥ " **अर्थ**–सकल उपभोग पदार्थांची वासना नाहींशी करून त्यागबंधी भेदबुद्धि ही सोडून द्यावी; आणि त्यांच्या अभावाभावामध्यें उद्भवणारे रागद्वेष त्याग करून कल्पनारहित होऊन रहावें. **श्रुति**

(२) " श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः । ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ " **अर्थ** इंद्रियनिग्रह करून गुरूच्या ठिकाणीं व वेदांतशास्त्रांच्या ठिकाणीं श्रद्धा ठेवणाऱ्या भाविकालाच ज्ञान प्राप्त होतें, आणि ज्ञान आल्यावर लवकरच मोक्षरूपी शांति मिळते.–**गीता.** (३) " ओळखिला हरि सांठविला पोटीं । होतां त्याची भेटी दुःख कैचें ॥ "–**नाथ.** (४) नर अथवा नारी होका दुराचारी । मुखीं गातां हरि पवित्र तो । पवित्र तें कुळ धन्य त्याची माय । हरिनाम गाये नित्यनेमें ॥ "—**नाथ.**

नित्य कीर्तन करावें; द्रव्यप्राप्ति आणि इंद्रियतृप्ति या खटाटोपांतच रममाण झालेल्या राजस व तामस लोकांशीं सहवास करण्याची इच्छा सोडून द्यावी; तसल्या जनांचे प्रिय विषय जे अर्थ आणि काम त्यांचा आसक्तिपूर्वक स्वीकार करूं नये; एकांतवासाची आवड धरावी, व आत्मस्वरूपाचा विचार करण्यांत दक्षता आणि संतोष मानावा; जर परमेश्वराचें कथामृत प्राशन करण्यास मिळत असेल, तर एकांतवासाचा त्याग करण्याचा जरी प्रसंग आला तरी हरकत नाहीं; परमहंसासारखी शांत वृत्ति ठेवावी; निरिच्छपणें यमनियमादि नियम पाळावे; शीत-उष्ण, सुख-दुःख, लाभ-हानि, मान अपमान इत्यादि द्वंद्वें सहन करावीं; हिंसा करूं नये; उदरपोषणासाठीं अनेक प्रकारचे पदार्थ संग्रहीं असावे म्हणून भलत्याच भानगडींत पडूं नये; सहज मिळालेल्या पदार्थांपासून कार्य उरकून घ्यावें; ईश्वरेच्छेनें प्राप्त झालेले भोग संतोषानें भोगावे; ईश्वरावर दृढ विश्वास ठेवून त्याच्या गुणांचें वर्णन करावें, किंवा ऐकावें; म्हणजे

(१) "खळांची सुगीत उपयोगासी नये । आपुला अपाय त्याचे संगें ॥" -**नाथ.** (२) योगप्रकरण ९ वा अध्याय पहा. (३) "मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः । आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ यंहि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ । समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ **अर्थ**—हे अर्जुना ! थंडी, ऊन, सुख, दुःख इत्यादि इंद्रियांना घडणारे क्षणिक विकार होतात, जातात. भारता, ते सोसले पाहिजेत. कारण, हे नरश्रेष्ठा, सुखदुःखें सारखीं मानणाऱ्या ज्या शहाण्या पुरुषाला हे पीडा देत नाहींत, तर तो मोक्षाला पात्र होतो. --**गीता.** (४) "आवडीनें भावें हरिनाम घेसी । तुझी चिंता त्यासी सर्व आहे । नको खेद धरूं कोणत्ये गोष्टीचा । पति लक्ष्मीचा जाणतसे ॥ सकळ जीवांचा करितो संभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ जैसी स्थिति आहे तैशा परि राहे । कौतुक तूं पाहे संचिताचें । एका जनार्दनीं भोग प्रारब्धाचा । हरिकृपें त्याचा नाश झाला ॥"—**नाथ.**

मनुष्याची श्रद्धा वाढून त्याच्या योगानें या जड देहावरील आसक्ति नाहींशी होते; व निर्गुण ब्रह्मरूप आत्म्याच्या ठिकाणीं आपोआप भक्ति जडते. ब्रह्मरूप आत्म्याच्या ठिकाणीं अशी निश्चल भक्ति जडली, म्हणजे पुढें त्याला सद्गुरु भेटतो. नंतर त्या सद्गुरूच्या उपदेशानें ज्ञान आणि वैराग्य प्राप्त झालें म्हणजे काम, क्रोध, लोभ इत्यादि षड्रिपूंची त्या मनुष्याला पीडा होत नाहीं. 'अहंकार, ममकार' नाहींसे झाले, म्हणजे मग अर्थातच कशाचीही वासना रहात नाहीं; आणि अंतःकरणाला कसलीही वासना राहिली नाहीं, म्हणजे तें सर्व विषय विसरून जाऊन आत्मस्वरूपीं रत होतें. मग तें अंतःकरण ब्रह्मरूप आत्म्याशीं ऐक्य पावल्यामुळें, जसा काष्ठापासून उत्पन्न झालेला अग्नि त्या काष्ठाला जाळून टाकितो, त्याप्रमाणें तो पुरुष, ज्या अंतःकरणाच्या साह्यानें ज्ञान आणि वैराग्य उत्पन्न झालें, त्या अंतःकरणांतील रागद्वेषांना त्या ज्ञा-

(१) "अमानित्वमदम्भित्वमहिंसा क्षांतिरार्जवं । आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः॥ इंद्रियार्थेषु वैराग्यमनहंकार एव च । जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनं ॥ असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु । नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ मयि चानान्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी॥विविक्तदेशसेवित्वमरतिर्जनसंसदि॥ अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् । एतज्ज्ञानमिति प्रोक्तमज्ञानं यदतोऽन्यथा॥ " **अर्थ**-हे अर्जुना! निरभिमानता दंभरहितता, अहिंसा, सहनशीलता, सरळपणा, गुरूची उपासना, शुद्धता, स्थिरता, आत्मनिग्रह, इंद्रियजयासंबधानें वैराग्य, अहंकारशून्यता, जन्म, मृत्यु, वार्धक्य, व्याधि, दुःख यांमधले दोष जाणणें, औदासिन्य, बायकामुलें, घरदार यांसंबधानें निष्प्रेमभाव, बरावाईट कोणताही प्रसंग गुदरला असतां नेहमीं सारखी मनोवृत्ति ठेवणें, एकनिष्ठतेनें मजवर शुद्धभक्ति ठेवणें, एकांतवास करणें, लोकांमध्यें राहण्याचें न आवडणें, नेहमीं आत्मविचारामध्यें गढून राहणें, तत्त्वज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव घेणें, ह्या सर्वांना 'ज्ञान' ही संज्ञा आहे—अर्थात ज्ञानप्राप्तीचीं हीं साधनें होत. यांहून निराळें तें अज्ञान समजावें.—**गीता.**

नाच्या व वैराग्याच्या प्रभावानेंच जाळून टाकितो. अशा प्रकारें ज्ञानाच्या योगानें अंतःकरणाचें आत्म्याशीं ऐक्य झाल्यावर, सर्व विकार नाहींसे होऊन मग त्याला या देहाचें भान रहात नाहीं. व देह मिथ्या आहे हें त्या वेळीं प्रतीतीस येतें. स्वप्नांत एखादें दुःख किंवा सुख भोगतांना मध्येंच जागृत आल्यावर " तें मला कांहीं नव्हतें किंवा तो मी नव्हतों" असें वाटतें व तें सर्व खोटें होतें असें प्रतीतीस येतें. उदाहरण स्वप्नांतील मिथ्याभूत व्यापारापासून सुटण्यास ज्याप्रमाणें जागें झालें पाहिजे, त्याप्रमाणें या पंचभूतात्मक मिथ्या संसारापासून सुटण्यास जीवाला परमात्म्याचें ज्ञान आलें पाहिजे. व तें प्राप्त होण्याकरितां प्रथम भगवद्भक्ति करावयास पाहिजे. ती करितां करितां परमात्म्याच्या ठिकाणीं निश्चलभाव जडला म्हणजे मग सहजच सर्व गोष्टी क्रमाक्रमानें घडून येतात. आतां आत्म्याच्या ठिकाणीं भक्ति न ठेवितां देहादिक व्यापार खरे मानून त्यांतच तल्लीन झालें असतां त्याचा काय परिणाम होतो. तें सांगतोः—

**विषयासक्तीचा दुष्परिणाम**—राजा! प्रथम मनुष्याच्या मनांत आपल्याजवळ विपुल संपत्ति असून सर्व सौख्यें आपल्याला उपभोगास मिळावीं असें वाटतें; ती प्राप्त झाली म्हणजे सुंदर स्त्री पाहिजे; तिच्या संगसुखांत रहतां यावें याकरितां उत्तम घर, वाडा, किंवा बंगला पाहिजे; तेथें गायन, वादन, नृत्य इत्यादि नानाविलास पाहिजेत. अशा प्रकारें एकामागून एक गरजा वाढूं लागतात. कोणतीही एक वस्तु मिळाली कीं, तिला आणखी कशाची तरी अनुकूलता असल्यावांचून निव्वळ तिच्यापासून सुख प्राप्त होत नाहीं. अंतःकरणाची ओढ एकसारखी पुढें अ-

(१) " यथैधांसि समिद्धोऽग्नि भस्मसात्कुरुतेऽर्जुन । ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा ॥ " **अर्थ**—हे अर्जुना! ज्याप्रमाणें पेटलेला अग्नि लांकडें जाळून भस्म करितो, त्याप्रमाणें ज्ञानरूप अग्नि सकल कर्मांचा नाश करितो.—**गीता.**

मते व अमुक केलें किंवा अमुक मिळालें म्हणजे सुख हातीं लागेल, असें नेहमीं चिंतीत असल्यामुळें त्याला कधींच समाधान वाटत नाहीं. काय केलें म्हणजे पूर्ण सुख प्राप्त होईल हा विचार त्याला उद्भवत नाहीं. 'हें करूं कां तें करूं' अशी मनाची स्थिति होऊन शेवटीं मनुष्य अविचारी बनतो. एकादी इष्ट वस्तु प्राप्त झाली नाहीं, म्हणजे ती मिळविण्याकरितां वाटेल तें करण्यास तो प्रवृत्त होतो. त्याची विचारशक्ति नाहींशी झाली असल्यामुळें त्याला पूर्वानुसंधान राहत नाहीं; मग तो ज्ञानभ्रष्ट होतो. ज्ञानभ्रष्ट होणारालाच मूर्ख म्हणतात. विषयांच्या नादानें जो मूर्ख बनला, त्यानें आपला नाश आपणच करून घेतला, असें ज्ञानी ह्मणतात. राजा, ज्याच्या सुखाकरितां सर्व वस्तु प्रिय वाटतात, त्याचा जर स्वतः आपण होऊनच नाश केला, तर त्यापेक्षां अधिक नाश तो कोणता आहे बरें? कोणताच नाहीं. म्हणून अर्थासाठीं व इंद्रियतृप्तीसाठीं सतत चिंतन करीत असणें म्हणजे सर्व पुरुषार्थांचा नाश करून घेणें हा होय. असा मनुष्य आपल्याला मिळणाऱ्या परम सौख्याला मुकून ज्ञानभ्रष्ट झाल्यामुळें त्याला वृक्षपाषाणादि योनींत जन्म घेऊन अनंत काल दुःख भोगीत पडावें लागतें! म्हणून ज्या प्राण्या-

(१) "बहुतां सुकृतें नरदेह लाधला। भक्तीविण गेला अधोगति॥ पाप भाग्य कैसें नरेरची कर्म। न कळेची वर्म अरे मूढा॥ अनंत जन्मांचें सुकृत पदरीं। त्याचे मुखीं हरि पैठा होय॥ रावरंक हो कां उंच नीच यातीं। भक्तीविण माती मुखीं त्याच्या॥ एकाजनार्दनीं हरि हरि ह्मणतां। मुक्ति सायुज्यता पायीं लागे॥"

(२) "भक्तीविण पशु कशासी वाढला। सटवीनें नेला कैसा नाहीं॥ काय माया गेली होती भूतापाशीं। हरि नये मुखासी अरे मूढा॥ पातकें करितां पुढें आहे पुरता। काय उत्तर देता होशील तूं॥ अनेक यातना यम करवील। कोण सोडवील तेथें तुला॥ एकाजनार्दनीं सांगतां हें तोंडें। आहा वाचा रडे बोलतांची॥"

च्या मनांत या दुःखमय संसारांतून तरून जाण्याची इच्छा असेल त्यानें धर्म, अर्थ, काम व मोक्ष ह्या चतुर्विध पुरुषार्थांचा नाश करणाऱ्या वस्तूंवर कधींही आसक्ति ठेवूं नये. राजा, संसार हा समुद्र आहे व काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर आणि अहंकार हे त्या समुद्रांतील भयंकर मगर आहेत. असा भवसागर तरून जाणें झाल्यास ईश्वराच्या चरणनौकेचाच आश्रय केला पाहिजे. तिचा आश्रय न करितां जे लोक योगादि क्लेशदायक साधनांच्या आश्रयानें हा भवसागर तरून जाण्याची इच्छा करितात, त्यांस अतिशय कष्ट पडतात! याकरितां राजा, सर्वांत सुलभ उपाय म्हणजे परमेश्वराचें चरणकमल सेवन, तो तूं कर; आणि त्याच्या चरणरूपी नौकेचा आश्रय करून हा दुस्तर भवसमुद्र सुखानें तरून जा. इति १९।

---

# अध्याय २० वा.

## विरक्तोपदेश ( २–२ ).

श्रीशुक उवाच —

**शब्दस्य हि ब्रह्मण एष पंथा यन्नामभिर्ध्यायति धीरपार्थैः।**
**परिभ्रमंस्तत्र न विंदतेऽर्थान् मायामये वासनया शयानः ॥ २ ॥**

( १ ) " पिंड देह स्थिति ब्रह्मांडीं पसारा। हरीविण सारा व्यर्थ भ्रम ॥ शुक याज्ञवल्क्य दत्त कपिल मुनी। हरिशीं जाणूनी हरिचे झाले ॥ यारे यारे धरू हरिनाम तारू। भवाचा सागरू भय नाहीं ॥ साधु संत गेले आनंदीं राहिले। हरिनामीं झाले कृतकृत्य ॥ एकाजनार्दनीं ,मांडिलें दुकान। देतो मोलाविण सकळ वस्तु ॥ "—**नाथ.**

**श्रीशुकाचार्य म्हणतात:**—राजा परीक्षिते! वेदामध्यें कर्ममार्ग प्रतिपादन करण्याची अशी मरणी आहे कीं, कर्मांचीं फळें तुच्छ असतांही त्यांना स्वर्गलोक, पितृलोक, अशीं मोठमोठालीं नांवें देऊन त्यांचें गौरव करावयाचें, आणि खरोखरच अशीं नांवें ऐकिलीं म्हणजे साधकाच्या बुद्धीला तीं फळें आपणांस प्राप्त व्हावीं असें वाटूं लागतें; व त्या फलांचेंच चिंतन करूं लागतो; आणि त्या मायावी फलानें सुख प्राप्त होईल अशी आशा धरून राहतो; पण शेवटीं तेथें गेल्यावर आपणांस अनेक सुखें मिळतील व चिरकालापर्यंत अनेक उपभोग प्राप्त होतील हीं त्यांचीं मनोराज्यें केवळ मनोराज्येंच होतात! यामुळें. त्यांची जी निराशा होते. तिजसंबंधीं आश्चर्य वाटावयास नको. असें हें होणारच. कारण, जितक्या म्हणून उपभोग्य वस्तु आहेत. त्या कधींना कधीं तरी नष्ट होणारच; मग त्यांना हवीं तितकीं मोठमोठालीं नांवें दिलीं. तरी त्या शाश्वत होणार आहेत कीं काय? याकरितां विरक्त पुरुषानें मोह पाडणाऱ्या कर्मफलांविषयीं अगदीं निरिच्छ असलें पाहिजे. अवश्यकतेपेक्षां यांशीं जास्त संबंध ठेवितां कामा नये. आत्मप्राप्ति करून घेण्याकरितां शरीराचें अस्तित्व असणें हें आवश्यक आहे. म्हणून केवळ त्याच्या संरक्षणापुरताच त्यांचा उपयोग करून घ्यावा. या पलीकडे या नश्वर शरीरास सुखप्राप्ति होण्याकरितां नानाप्रकारचे प्रयत्न करूं नयेत. आतां कदाचित् तूं अशी शंका घेशील कीं. 'शरीर हें नाशवंत आहे., म्हणून आत्मप्राप्तीपुढें त्याची कांहीं मातबरी नाहीं असें जर आहे; तर मग त्याच्या संरक्षणाचा तरी त्रास परमेश्वरानें मनुष्यप्राण्याच्या मागें कां लावून दिला?' त्याचें समाधान असें कीं. विरक्त पुरुषाला शरीरसंरक्षणाकरितां यत्न करणें भाग पडावें अशी कांहीं पर-

मेश्वराची इच्छा नाहीं; व त्याची व्यवस्थाही तशी दिसून येत नाहीं. शरीराच्या रक्षणास आवश्यक तेवढें साहित्य श्रमावांचून मिळण्याची योजना करून त्यासंबंधीं सर्व साधनें परमेश्वरानें सिद्ध करून ठेविलीं आहेत. पहा. राहण्याकरितां व निजण्याकरितां भूमि तयार आहे; उशाला घेण्याकरितां ज्याचे त्याला हात आहेत; नेसण्याकरितां किंवा पांघरण्याकरितां दिशा अथवा झाडांच्या साली आहेत; पाणी पिण्यासाठीं ज्याची त्याला स्वतःची ओंजळ आहे; पाणी सांठविण्यास नद्या आहेत; क्षुधाशांतीकरितां झाडांचीं फळें, कंद, पाला हीं आहेतच. आणि इतकें असूनही " जो मला अनन्यभावानें शरण येईल, त्याच्या योगक्षेमाचा भार सर्वस्वीं मी संभाळीन. "(१) अशी परमेश्वराची प्रतिज्ञा आहे. मग मोक्षेच्छु विरक्त पुरुषास शरीरसंरक्षणाचा कोणता त्रास उरला आहे ? मग त्याला द्रव्यमदांध लोकांचें आर्जव करण्याचें तरी प्रयोजन काय ? राजा, विरक्त पुरुषास शरीरसंरक्षणाविषयीं यत्न करावयाची आवश्यकता नाहीं, ह्मणून जें मी सांगितलें. त्याचें येथपर्यंत स्पष्टीकरण केलें. आतां परमात्मपद प्राप्तीचें साधन कोणतें, तें तुला सांगतोंः—

**परमात्मपद प्राप्तीचें साधनः**—राजा, जन्ममरणरूप संसार प्राप्त होण्याला अज्ञान हेंच कारण होय. ह्मणून प्रथमतः त्याची निवृत्ति होण्याकरितां विरक्त पुरुषानें भगवत्स्वरूपाविषयीं निश्चल बुद्धि धारण करावी; आणि आपल्या चित्तामध्यें स्वतःसिद्ध असणारा जो तेजोमय

(१) " अनन्याश्चिंतयन्तोमाम् ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् " **अर्थ** — जे लोक माझें ध्यान करून अनन्य भावानें माझीच उपासना करितात, त्यांचें योगक्षेम मी,चालवितों. व मला तसें करणें भाग पडतें. कारण, त्यांची माझ्याच ठिकाणीं एक निष्ठा असते– **गीता.**

प्रिय आत्मा त्याचें प्रसन्न अंतःकरणानें भजन करावें. ह्मणजे अज्ञान नष्ट होऊन त्यास परमपद ( मोक्ष ) प्राप्त होतो ! इति २०।

---

# अध्याय २१ वा.

## ब्रह्मचाऱ्याचे धर्म ( ७-१२ )

नारद उवाच—

ब्रह्मचारी गुरुकुले वसन्दान्तो गुरोर्हितम् ॥
आचरन्दासवन्नीचो गुरौ सुदृढसौहृदः ॥ १ ॥

**नारद ह्मणाले:**—धर्मराजा, ब्रह्मचाऱ्यानें इंद्रियनिग्रह करून गुरुगृहीं वास करावा; दासाप्रमाणें अगदीं नमून वागावें, गुरूचें हित करीत जावें, गुरूवर दृढप्रेम ठेवावें, सकाळीं आणि संध्याकाळीं गुरु, अग्नि, सूर्य व श्रीविष्णु यांची उपासना करीत असावें, एकाग्र मनानें गायत्रीचा जप करून त्रिकाळ संध्या करावी. सूर्योदयीं आणि सूर्यास्तसमयीं संध्याकाल निमित्त मौन धारण करावें, गुरुजींनीं हांक मारिली तरच ( स्वतः आग्रह न धरितां ) जवळ जाऊन सुव्यवस्थित रीतीनें त्यांजपासून वेद शिकावे, अध्ययनाच्या प्रारंभीं व अंतीं गुरुजींच्या चरणांस वंदन करावें, शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें कटिसूत्र, मृगचर्म, जटा, यज्ञोपवीत, दंड, कमंडलु आणि हाताचे ठायीं दर्भ हीं धारण करावीं; मध्याह्नकाळीं भिक्षा मागावी, व तींत जें कांहीं प्राप्त होईल तें सर्व गुरूला अर्पण करावें. गुरुजींनीं आज्ञा दिली तरच भोजन करावें. एखादवेळीं आज्ञा नच दिली तर त्या दिवशीं उपोषण करावें; ब्रह्मचाऱ्यानें सुस्वभाव, मिताहार, दक्षता, इंद्रियनिग्रह आणि श्रद्धा इतके गुण अंगीं वागवावे. स्त्रियांशीं अथवा स्त्रीलंपट पुरुषांशीं कारणापुरतेंच भाषण करावें;

त्यांनीं स्त्रियांच्या गोष्टी मुळींच बोलूं नयेत; कारण, इंद्रियग्राम बलवान आहे. तो मोठमोठ्या जितेंद्रिय पुरुषांची देखील त्रेधा उडवून सोडतो. तसेंच, तरुण ब्रह्मचारी पुरुषानें आपले केंस विंचरवून घेणें, अंग मर्दन करून घेणें किंवा अभ्यंग वगैरे गुरुपत्न्या अथवा इतर तरुण स्त्रिया यांजकडून कधींही करवून घेऊं नये. कारण, "अग्निकुंडसमा नारी घृतकुंभसमो नरः" म्हणजे स्त्री प्रत्यक्ष अग्निरूप असून पुरुष हा तुपानें भरलेल्या घटासारिखा आहे ! पुरुषानें प्रत्यक्ष कन्येशीं देखील कारणापुरतें बोलावें. एकांतीं तर मुळींच बसूं नये. धर्मराजा, स्वस्वरूपाचा साक्षात्कार होऊन, हें सर्व जग आभासमात्र आहे, असें जोंपर्यंत निश्चयात्मक वाटूं लागलें नाहीं, तोंपर्यंत हा जीव स्वतंत्र होत नाहीं; आणि ह्मणूनच तावत्कालपर्यंत मी आणि तूं अशी भेदबुद्धि कायम राहते; याकरितांच हे सर्व प्रतिबंधक गुण सांगितले आहेत. हे सांगितलेले सर्व गुण गृहस्थ आणि यति यांनाही आवश्यक आहेत. गृहस्थाश्रमी पुरुषानें ऋतुकालीं स्वस्त्रीशीं गमन करावें; गुरूचा परामर्ष घ्यावा; परंतु संसार भागवून जर गुरूची उपजीविका चालविण्याचें त्याचें सामर्थ्य असेल, तर त्यानें मोठ्या प्रेमानें चालवावी; अन्यत्र न चालविली तरी हरकत नाहीं. ब्रह्मचाऱ्यानें अंगाला किंवा डोक्याला तेल लावणें, अंग रगडून घेणें, स्त्रियांशीं भाषण करणें, स्त्रियांचीं चित्रें काढणें, मद्य किंवा मांस यांचें सेवन करणें, माळा, उटी, अलंकार वगैरे धारण करणें, हीं सर्व कर्में वर्ज्य करावीं. राजा, द्विजांनीं अशा प्रकारें गुरुगृहीं राहून उपनिषदें आणि अंगें यासुद्धां तिनही वेदांचें आपल्या शक्त्यनुसार अध्ययन करून ज्ञान संपादावें. नंतर आपलें सामर्थ्य असेल, तर इच्छित गुरुदक्षिणा देऊन गुरूंना संतोषित करावें; आणि त्यांनीं आज्ञा दिली, तर गृहस्थ, वानप्रस्थ किंवा संन्यास आश्रम घ्यावा; अथवा नैष्ठिक ब्रह्मचारी होऊन गुरुगृहींच वास करावा. अग्निमध्यें, गुरूचे ठायीं, स्वतःमध्यें आणि सर्व भूतांत

आश्रयभूत परमात्मा वास करीत आहे, अशी बुद्धि धारण करावी. राजा, 'कोणत्याही वर्णाश्रमाचा पुरुष. या सांगितलेल्या धर्ममर्यादांचें पालन करून परमेश्वरस्वरूपीं रत राहील. तर त्यास ज्ञान उत्पन्न होऊन, अंतीं मोक्षपद प्राप्त होईल.' इति २१ ।

---

# अध्याय २२ वा.

## गृहस्थाश्रमी पुरुषाचे धर्म ( १-१४ )

युधिष्ठिर उवाच.—

गृहस्थ एतां पदवीं विधिना येन चाञ्जसा ॥
याति देवऋषे ब्रूहि मादृशो गृहमूढधीः ॥ १ ॥

**धर्मराज ह्मणाला:**—देवर्षे (नारदा) ! संसारांतल्या एखाद्या मनुष्याचें मन जर गृहस्थाश्रमामध्यें आसक्त होऊन मूढ बनलें असेल. तर त्याला अनायासें कोणत्या विधीच्या आचरणानें हें मोक्षपद प्राप्त होईल, तें मला निवेदन करावें.

**नारद म्हणाले:**—राजा. गृहस्थाश्रमी पुरुषानें आपल्या आश्रमाला योग्य अशीं कर्में आचरून तीं भगवदर्पण करावीं, आणि मोठमोठ्या साधूंची सेवा करीत नेहमीं भगवद्भक्तांच्या समागमांत असावें, व कर्मानुष्ठानाच्या वेळाखेरीज जो वेळ जाईल, तो भगवंताच्या कथा श्रवणांत आणि नामस्मरणांत घालवावा. शरीर, स्त्री, पुत्र इत्यादि मंडळीचा वियोग कालगतीनें आपोआप होतच असतो; हें नेहमीं ध्यानांत ठेवून स्वप्नांतील स्त्रीपुत्रांवरील आसक्ति मिथ्या जाणून आपण जसा त्या-

ग करितां, तशी सत्समागमाच्या बळें करून हळू हळू शरीरादिकांवरील आसक्ति सोडीत जावी. बुद्धिमान् मनुष्यानें शरीराशीं आणि गृहादिकांशीं संबंध केवळ कार्यापुरता राखावा. एकंदरींत अंतरीं विरक्त असून बाह्यात्कारीं मात्र आसक्तासारखें वागावें. ज्ञातिजन, आईबाप, इष्टमित्र, पुत्रभ्राते इत्यादि सर्व जन जें जें कांहीं बोलतील अथवा इच्छितील, त्याविषयीं ममता न धरितां त्यांस अनुमोदन द्यावें, म्हणजे कोणाचाही अभिमान न बाळगितां गृहांतील वस्तूंनी त्यांची इच्छा पुरवावी राजा, गृहस्थानें वृष्टिपासून उत्पन्न झालेलें धान्य वगैरे, भूमिगत द्रव्य, अथवा अयाचित ( आपोआप मिळालेलें ), असें स्वतां ईश्वरानें निर्मिलेले जे जे पदार्थ दैवयोगानें मिळेल त्या सर्वांचा उपभोग घेत या कर्माचें आचरण करावें. उदरनिर्वाहास जितकें लागेल तितक्यावरच प्राण्याचें स्वामित्व आहे. त्यापेक्षां अधिकावर सत्ता ठेवणारा पुरुष निंद्य होय. तो शिक्षेस पात्र आहे. म्हणून दैववशात् जरी पुष्कळ द्रव्य मिळालें, तरी त्याजवर आसक्ति ठेवूं नये. हरिण, उंट, गाढव, वानर, उंदिर, सर्प, पक्षी, माशा इत्यादिक प्राणीमात्रांवर सुद्धां आपल्या पोटच्या पोराप्रमाणें प्रेम करावें.[2] त्यांच्यांत व आपल्या मुलाबाळांत काय अंतर आहे? गृहस्थाश्रमी पुरुषानें द्रव्य संपादन करून धर्म, अर्थ व काम या त्रिविध पुरुषार्थांचेंच आचरण करीत असून राहूं नये. दैववशात् प्राप्त होईल तेवढ्यांतच हे तीन पुरुषार्थ साधावे. कुत्रे, पतित व चांडाल ह्या वर्गा-

( १ ) " सर्वहिताकारणें संगती साधूंचा । भावें भक्ति हरीची भेटे तेणें ॥ हरि तेथें संत संत तेथें हरि । ऐसें वेद चारी बोलताती ॥ "—**नाथ.**

( २ ) " विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि । शुनि चैव श्वपाके च पंडिताः समदर्शिनः ॥ " **अर्थ**–उत्तम विद्येच्या योगानें विनयशील झालेल्या ब्राह्मणाच्या ठिकाणीं, गाईचे ठायीं, हत्तीचे ठायीं, कुत्र्याचे ठायीं, तसेंच चांडाळाच्या ठिकाणीं सुद्धां विद्वान् लोक सारख्या दृष्टीनें पहातात.—**गीता.**

पर्यंत सगळ्यांना ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें अन्नादि पदार्थ विभागून द्यावे; आणि आपल्या अत्यंत प्रिय अशा धर्मपत्नीला देखील अतिथि अभ्यागतांच्या सेवेला लावावें. ज्या स्त्रीच्या प्रेमपाशांत बद्ध होऊन वेळ पडल्यास मनुष्य प्राण सुद्धां देतो, व प्रसंगीं गुरूचा किंवा पित्याचा वध करण्यास देखील मागें पुढें पहात नाहीं, त्या सर्वघातक अशा स्त्रीवरील अभिमान सोडून द्यावा. हेंच योग्य होय. जरी ईश्वरास कोणी जिंकण्यास समर्थ नाहीं. तरी अशा रीतीनें वागून नामस्मरण करणाऱ्यांच्या तो अगदीं आधीन असतो. राजा शरीराचा परिणाम माती किंवा राखुंडी ह्यांपैकीं कांहीं तरी व्हावयाचा हें निश्चयात्मक होय. तर मग अशा शरीराची काय महति बरें ? हें तुच्छ शरीर कोणीकडे. व त्या शरीराच्या अल्पमात्र सुखाचें साधन जी बायको ती काय ? आणि स्वतःच्या महिम्यानें आकाशाला देखील व्यापून टाकणारा हा आत्मा कोणीकडे ? म्हणून मनुष्यानें गृहादिकांवरील आसक्ति सोडून आत्मप्राप्तीचा यत्न करावा. दैवयोगानें प्राप्त झालेल्या अन्नादि पदार्थांच्या योगानें पंचमहायज्ञादि कर्में करून जें अवशिष्ट राहील त्यावर निर्वाह चालवावा. अशा रीतीनें जो पुरुष वागेल तो मुज्ञ परमहंसाच्या पदवीला पोंहोंचेल. मनुष्यानें आपल्या व्यवहारांत "न्यायार्जितधनंचापि विधिवद्यत्प्रदीयते" म्हणजे न्यायपूर्वक मिळविलेल्या द्रव्यद्वारें प्रतिदिनीं देव. ऋषि, पितर, अतिथि आणि इतर प्राणी, ह्या पां-

(१) "भवाब्धि तारण रामकृष्ण नाम। रोहिणीची मात्र सकळ दिसे॥ नाम हेंचि थोर नाम हेंचि सार। वैकुंठीं बिढार राम नाम॥ राम हें निशाण जपतांचि अढळ। वैकुंठ तात्काळ तया जीवा॥ नामा ह्मणे वैकुंठ नामेंचि जोडेल। अंतीं तुज पावेल नाम एक॥"

चांच्या उद्देशांनीं यज्ञ करावे. बाकी उरेल त्यांतच आपला उदरनिर्वाह चालवावा. याप्रमाणें पंचमहायज्ञाच्या योगानें आणि जठराग्नि शांततेच्या योगानें अंतर्यामी जो परमात्मा त्याचेंच आराधन घडतें असें समजावें. जर कदाचित् सर्व यज्ञसामुग्रि अनुकूल असली, तर शास्त्रोक्त विधीनें अग्निहोत्रादि यज्ञ करावे; पण त्याविषयीं फारच आग्रह धरूं नये. कारण, ब्राह्मणभोजन केलें असतां परमेश्वर जितका संतुष्ट होतो, तितका यज्ञकुंडांतील आहुतींनीं होत नाहीं. ह्मणून ब्राह्मण, देव, ऋषि इत्यादिकांना संतुष्ट करून अंतर्गतम्यानें पूजन करीत जावें. त्यांतही ब्रह्मवेत्त्या ब्राह्मणांचें पूजन आधीं करावयाचें हा नियम नेहमीं लक्षांत बाळगावा. इति २२।

---

( १ ) " यज्ञशिष्टाशिनः संतो मुच्यंते सर्वकिल्बिषैः। भुंजते ते त्वघं पापा येपचंत्यात्मकारणात ॥ " **अर्थ** पंचमहायज्ञ करून राहिलेलें जे सेवन करतात, ते सर्व पापांपासून मुक्त होतात. जे पापी केवळ आपल्या पोटासाठीं अन्न शिजवितात, ते पापी लोक तें अन्न न खातां केवळ पापच खातात.—**गीता.**

( २ ) ये मे मतमिदं नित्यमनुतिष्ठंति मानवाः। श्रद्धावंतोऽनसूयंतो मुच्यंते तेऽपि कर्मभिः ॥ ये त्वेतदभ्यसूयंतो नानुतिष्ठंति मे मतम्। सर्वज्ञानविमूढांस्तान्विद्धि नष्टानचेतसः ॥ " **अर्थ**—जे लोक नेहमीं विश्वासानें व असूया न करितां ह्या माझ्या सांगण्याप्रमाणें वागतात, ते सर्व कर्मपाशापासून मुक्त होतात. परंतु जे या नियमाची चिकित्सा करीत राहून या माझ्या म्हणण्याप्रमाणें वागत नाहींत, ते सर्वपरी सावध असले तरी त्यांची बुद्धि नष्ट होऊन नाश पावावयाचे हें निश्चयानें समज.—**गीता.**

# अध्याय २३ वा

## वानप्रस्थांचे धर्म ( ११-१८ ).

श्रीभगवानुवाच--

वनं विविक्षुः पुत्रेषु भार्यां न्यस्य सहैव वा ॥
वन एव वसेच्छांतस्तृतीयं भागमायुषः ॥ १ ॥

**श्रीकृष्ण ह्मणाले:**—बा उद्धवा, येथपर्यंत ब्रह्मचाऱ्याचे आणि गृहस्थाश्रम्यांचे धर्म सांगितले. आतां अनुक्रमानें प्राप्त झालेले वानप्रस्थाचे धर्म सांगतों: —वानप्रस्थ आश्रम अंगीकार करूं इच्छिणाऱ्या पुरुषानें आपल्या भार्येच्या रक्षणाचें कार्य आपल्या पुत्राकडे सोंपवून आपण एकटेंच वनांत जावें, किंवा भार्येसहवर्तमान वनांत प्रवेश करावा. त्यानें आपल्या आयुष्याचा तिसरा भाग ह्मणजे पाउणशें वर्षे समाप्त होत तोंपर्यंतचा काल वनांत घालवावा. अर्थात् पाऊणशें वर्षे भरलीं कीं इंद्रियें क्षीण होतातच. चित्ताची शांति बाळगणें हें ह्या आश्रमांतील मुख्य कर्तव्य होय. वानप्रस्थानें कंद, मुळें, फळें, नीवार इत्यादि वनांत उत्पन्न होणाऱ्या पवित्र पदार्थांवर उपजीविका चालवावी; वल्कलें परिधान करून गवत, पानें व मृगचर्म ह्यांचा शरीराच्छादनाच्या कामीं उपयोग करावा; केस, रोम, नखें, दाढी व मिशा हीं तशींच वाढूं द्यावीं; शरीराची फारशी स्वच्छता करण्याच्या उद्योगास लागूं नये; शीतोदकांत त्रिकाळ स्नान करावें; आणि पृथ्वीवर शयन करावें शिवाय त्यानें भर उन्हाळ्यांत पंचाग्निसाधन करावें; [ चोहों दिशांस चार व समोर एक असे पांच अग्नि प्रज्वलित करून मध्यंतरीं बसावें, मग त्या पांचां-

( १ ) " शतायु पुरुष मर्यादा श्रुति । त्याच्या तृतीयभागाची स्थिति । साासष्ठी क्रमिलिया अंतीं । निघावें घराप्रति ॥ "-**नाथ.**

चा ताप व वरून सूर्याचा ताप हे सहन करावे. ] भर पावसाळ्यामध्यें वृष्टि सहन करावी; ह्याला अभ्रावकाश नामक व्रत ह्मणतात. आणि भर हिंवाळ्यामध्यें गळ्यापर्यंत पाण्यामध्यें बसावें; ह्याला उदकवास नांवाचें व्रत ह्मणतात. हे नियम पाळून वानप्रस्थानें तपश्चर्या चालवावी. तपस्वीनें कंद व मुळें भाजून किंवा शिजवून खावीं; नीवारादिक मुनिधान्यें शिजवून भक्षण करावीं; फळें वगैरे वृक्षांवर पिकलेलीं असतील, तीं सेवन करावीं; आणि टणक पदार्थ कुटून किंवा तसेंच चावून खावे. वानप्रस्थानें निर्वाहास लागणाऱ्या वस्तु स्वतः वेळच्यावेळीं मिळवाव्या; दुसऱ्यानें आणलेल्या किंवा आपणच पूर्वी संग्रह करून ठेविलेल्या पदार्थांचा पुढें कालांतरीं उपयोग करूं नये; वेळच्यावेळीं निर्वाहापुरते पदार्थ आणून घेत असावे; कारण संग्रह केला कीं, त्या पदार्थांच्या जतनेसाठीं वेळेचा अपव्यय होईल, आणि त्या पदार्थांवर आसक्ति जडेल. वानप्रस्थाश्रम्याचें आद्य कर्तव्य आसक्ति सोडून वैराग्य होणें हें होय. संग्रहानें आपला तो उद्देश साध्य होणार नाहीं; परंतु देश, काल व बल ह्यांजवर लक्ष देऊन प्रसंगविशेषीं या नियमाचें उल्लंघन करणें भाग पडल्यास करावें. वानप्रस्थानें वनांत उत्पन्न होणाऱ्या वऱ्या, राजगिरा इत्यादि धान्यांचे चरुपुरोडाशादिक करून त्यांच्या योगें त्या त्या काळीं विहित अशीं कर्में करावीं; परंतु वेदामध्यें सांगितलेल्या पशुयज्ञानें मात्र माझी आराधना करूं नये. अग्निहोत्र, दर्श, पूर्णमास व चातुर्मास्यें हीं गृहस्थाप्रमाणेंच वानप्रस्थानेंही करावीं. असें वेदवेत्त्या ऋषींनीं ठरविलें आहे.

उद्धवा. याप्रमाणें तीव्रतप केलें असतां केवळ शरीराचा अस्थिपंजर व शिरांचें जाळें अवशिष्ट राहतील, आणि कदाचित् त्यास त्या आ-

(१) "लब्धे नवे नवे ऽन्नाद्ये पुराणं तु परित्यजेत् ॥" **अर्थ–नवीन नवीन अन्नादिक मिळालें कीं, पूर्वीचें जुनें टाकून द्यावें.—नारद.**

श्रमांत मृत्यूही येईल, हें खरें; परंतु वानप्रस्थानें अशा निकट तपश्चर्येनें माझ्या यज्ञस्वरूपाची आराधना केली, व त्याची पूर्ण चित्तशुद्धि होऊन त्याच्या ठिकाणीं भक्ति उत्पन्न झाली, तर तो एकदम जीवन्मुक्त होईल ! आणि जर आराधना करून पूर्णपणें चित्तशुद्धि झाली नाहीं, तर तो महर्लोकीं जाऊन तेथून तपोलोकीं जाईल, व अंतीं माझ्या स्वरूपांत ऐक्य पावेल ! उद्धवा वानप्रस्थाश्रमीं पुरुषाची तपश्चर्या किती अवघड आहे पहा; व त्या तपश्चर्येचें फलही किती अपूर्व आहे बरें ! हें तुझ्या लक्षांत आलें असेलच. ह्या तपश्चर्येनें प्रत्यक्ष मोक्ष देखील सुलभ होतो, अशी हिची योग्यता आहे. असें असतांही कित्येक पुरुष केवळ विषयसुखाच्या लोभानेंही तपश्चर्या करितात, व परिणामीं तीं तुच्छ सुखें मिळवून मोक्षासारखें श्रेष्ठ सुख [१]हातचें घालवितात. तेव्हां त्यांस किती मूर्ख म्हणावें बरें ! उद्धवा, ह्या आश्रमांतील व्रतवैकल्यांचें व तपश्चर्येचें आचरण करीत असतां, मध्यंतरीं त्यास जरेनें गांठलें व त्याचें शरीर शिथिल होऊन तो आपलीं कर्में करण्यास असमर्थ झाला, तर त्यानें अग्निहोत्रादिकांचा समारोप आपल्या आत्म्यामध्यें करून आपलें चित्त माझ्या ठिकाणीं लीन करावें, आणि अग्नींत प्रवेश करावा. उद्धवा, वानप्रस्थाश्रमांत साध्य झाली पाहिजे ती गोष्ट ही कीं, " कर्मयोगानें प्राप्त झालेले स्वर्गादिलोक तुच्छ आहेत, ह्यास्तव त्यास काकविष्ठावत् मानण्यास हरकत नाहीं. असें ह्या आश्रमांतील पुरुषास वाटावें. " ज्या पुरुषास अशा प्रकारचें तीव्र वैराग्य वानप्रस्थश्रमाचा काल संपण्याच्यापूर्वींच प्राप्त होईल, त्यानें त्या आश्रमाच्या कालांतच परमहंस दीक्षा घ्यावी; ज्या पुरुषास इतकें वैराग्य उत्पन्न न होतां अंशतः वैराग्य उत्पन्न

(१) " जेवीं कां चिंतामणीचिये साठीं । मागे चातीलागीं खापरखुटी । कां परीस देवोनी पालटी । काळी गोमटी वीट मागे ॥ तेवीं मनुष्यपणाचिये स्थिति । उत्तम जन्में तपःप्राप्ती । ते तपःक्रिया व्यर्थ करिती । काम वांछिती ते मूर्ख " **नाथ.**

होईल, त्यानें वानप्रस्थाश्रमाच्या कालानंतर संन्यासग्रहण करावें; आणि ज्यास हें वैराग्य मुळींच प्राप्त होणार नाहीं, त्यानें आमरणपर्यंत वानप्रस्थाश्रमच चालवावा. इति २३ ।

---

# अध्याय २४ वा.

---

## संन्याशांचे धर्म ( ११-२८ ).

श्रीभगवान् उवाच -

इष्ट्वा यथोपदेशं मां दत्वा सर्वस्वमृत्विजे ॥
अग्नीन्स्वप्राण आवेश्य निरपेक्षः परिव्रजेत् ॥ १३ ॥

भगवान श्रीकृष्ण ह्मणाले: —उद्धवा, चतुर्थाश्रम म्हणजे संन्यासाश्रम घेऊं इच्छिणाऱ्या पुरुषानें धर्मशास्त्रांत सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें प्रथम आठ श्राद्धें करून, प्राजापत्य नामक इष्टीच्यायोगें माझी आराधना करावी; सर्वस्व ऋत्विजांस देऊन टाकावें; अग्नीचा समारोप आपल्या आत्म्याच्या ठिकाणीं करावा; आणि सर्व वासना परित्याग करून संन्यासाश्रम स्वीकारावा. उद्धवा, संन्यासाश्रम हा विप्रानेंच घ्यावयाचा आहे. ब्राह्मण संन्यास घेऊं लागला म्हणजे देवांना वैषम्य उत्पन्न होतें, म्हणून ते देव स्त्रीपुत्रादिकांच्या द्वारें त्याला विघ्न करितात. म्हणजे नानाप्रकारें मोहांत घालूं लागतात. कारण, देवांना वाटतें कीं, हा पुरुष संन्यासदीक्षा घेऊन आपल्यापेक्षां मोठ्या पदवीस पावेल.

हे नरश्रेष्ठा उद्धवा, संन्याशानें मुळीं नग्न रहावें हाच उत्तम पक्ष. पण जर त्यास वस्त्रादिकांची आवश्यकता असेल तर त्यानें फक्त गुह्याच्छादनाकरितां कौपीन धारण करावी, त्यावांचून दुसरें घेऊं नये. त्यानें संन्यास ग्रहण करण्याच्या पूर्वीच सर्वस्वाचा त्याग केलेला असतो. ह्यास्तव आपत्कालाशिवाय दंड व कमंडलु हीं खेरीजकरून दुसरें कांहीं एक त्यानें ग्रहण करूं नये. चालतांना शुद्ध दृष्टीनें पाऊल टाकावें म्हणजे जेथें पाऊल टाकावयाचें त्या जागेवर कांहीं अपवित्र पदार्थ किंवा जीवजंतु नाहींत असें पाहून मग तेथें पाऊल टाकावें. वस्त्रानें गाळून शुद्ध केलेलें पाणी प्यावें. खऱ्याखोट्याचा किंवा बऱ्यावाईटाचा विचार करून भाषण करावें; आणि मनानें विचार करून जें शुद्ध वाटेल तेंच आचरण चालवावें. बा उद्धवा, यतीनें कायिक, वाचिक व मानसिक दंड धारण केला नाहीं, तर केवळ काष्ठदंड धारण करण्यानेंच त्यास कधींही परमार्थ लाभ होणार नाहीं. काम्यकर्माचा त्याग हा कायिक दंड होय. मौन हा वाचिक दंड होय. आणि प्राणायाम हा मानसिक दंड होय. संन्याशानें भिक्षान्नावर आपला चरितार्थ चालवावा. त्यानें चारी वृत्तीच्या ब्राह्मणांकडे भिक्षा घेण्यास हरकत नाहीं. पण त्या ब्राह्मणांपैकीं बहिष्कृत, पतित वगैरे कोणी असल्यास त्यांकडे त्यानें भिक्षा घेऊं नये. ब्राह्मणांच्या चार वृत्ति म्हणजे प्रतिग्रह, याजन, अध्यापन व शिलोंछ ह्या होत, म्हणून ह्या वृत्तींवर गृहस्थाश्रम चालविणाऱ्या कोणत्याही पवित्र ब्राह्मणाकडे संन्याशास भिक्षा घेण्यास प्रतिबंध नाहीं. त्यानें भिक्षा मागावयाची ती सात घरींच मागावी. अमुक घरीं गेल्यास सुग्रास मिळेल इत्यादि संकल्प त्यानें मुळींच करूं नये, व अशा प्रकारें यदृच्छेनें सात घरीं जी कांहीं भिक्षा प्राप्त होईल तेवढ्यावर आपला निर्वाह करावा. अन्न मिळवून आणिल्यावर संन्याशानें गांवाबाहेर जलाशयावर जाऊन तेथें हातपाय धुवावे, आचमन करून मौन धारण क-

रावें, आणि भिक्षान्नावर प्रोक्षण करून त्याचे विभाग करावे. नंतर त्यापैकीं विष्णु, ब्रह्मा, सूर्य व भूतें ह्यांस त्यांचे भाग अर्पण करून, त्यानें अवशिष्ट राहिलेलें सर्व अन्न भक्षण करावें. उद्धवा, संन्याशानें भूतलावर एकटेंच फिरावें. कोणाशीं संगति ( आसक्ति ) धरूं नये; इंद्रियांचा अत्यंत निग्रह करावा, नित्य ब्रह्मचिंतनांत मग्न असावें. ब्रह्मस्वरूपाची व्याप्ति सर्वत्र आहे, असें मनांत आणून संतोष मानावा. विवेक धारण करावा, आणि सर्वत्र समदृष्टि ठेवावी. संन्याशानें निर्जनस्थलीं रहावें. त्यास मनुष्यवसतीमध्यें रहाणें झाल्यास जेथें आपल्या चित्तास विषयमोह उत्पन्न होणार नाहीं, अशा स्थलीं त्यानें रहावें, परमात्म्यावर दृढ भक्ति ठेवून चित्त निर्मल राखावें. आणि आत्मा एक असून मजशीं ( ईश्वराशीं ) अभिन्न आहे, असें चिंतन चालवावें. हें चराचर ब्रह्मांड नश्वर व अशाश्वत आहे, आणि परमात्म्याचें स्वरूप हें नित्य व चिन्मय आहे, असा पूर्ण विश्वास ठेवून संन्याशानें जीवाला बंध व मोक्ष कशानें प्राप्त होतात त्याचा ज्ञाननिष्ठेनें विचार करावा. जीवाची इंद्रियसुखाकडे आसक्ति होणें ह्याचेंच नांव बंध व इंद्रियसुखापासून निवृत्ति होणें ह्याचेंच नांव मोक्ष. हें त्यास उत्तम रीतीनें समजणें अवश्य आहे. ह्यास्तव संन्याशानें पंचज्ञानेंद्रियें व मन ह्यांचा निरोध करून केवळ माझ्या ( परमात्म्याच्या ) सनातन स्वरूपावर दृढ भक्ति ठेवावी, आणि क्षुद्र विषयांविषयीं तीव्र वैराग्य धारण करून नित्य ब्रह्मचिंतनांत

( १ ) " मधुकरं तु नैवेद्यं देवे नान्येषु दीयते । नैवेद्यकं क्षिपेदप्सु त्रितयं भौतिकं बहिः " **अर्थ**—मधुकरानें आणिलेल्या भिक्षान्नांतून नैवेद्य द्यावे; इतर वृत्तींमध्ये नैवेद्य नाहीं; तो नैवेद्य उदकांत टाकावे आणि भूतांचा भाग बाहेरच ठेवावा किंवा दुसरा अर्थ—' तितक्यांत कोणी अन्नाची याचना केली तर त्याला थोडें विभागून देऊन बाकीचें सगळें आपण स्वतः भक्षण करावें '–**स्मृति.**

( २ ) बन्धनं विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतम " **अर्थ**—विषयासक्ततेमुळें बंधनाला कारण होतें; आणि तेंच निर्विषय झालें म्हणजे मुक्ति होते.–**श्रुति.**

रममाण व्हावें. उद्धवा, यतीनें एके ठिकाणीं केव्हांही वसती करूं नये. नगरें, गांव, गौळवाडे व यात्रीक जनांचे समुदाय ह्यांमध्यें भिक्षेसाठीं मात्र प्रवेश करावा; आणि पृथ्वीवरील पवित्र देश, नद्या, पर्वत, वनें व आश्रम ह्यांच्या यात्रा करीत फिरत असावें. त्यानें वानप्रस्थांच्या आश्रमस्थलीं भिक्षेस वारंवार जात असावें. कारण, वानप्रस्थ पुरुष शिलावृत्तीवर उपजीविका चालवितात आणि ह्यामुळें त्या पवित्र अन्नानें यतीची चित्तशुद्धि होऊन त्यास लवकर सद्गति प्राप्त होते ! उद्धवा, नगरांतील मिष्टान्न टाकून वनांतील शिलान्न कसें भक्षण करावें असें कदाचित् तूं म्हणशील, पण यतीनें इंद्रियतृप्तीकडे मुळींच लक्ष द्यावयाचें नाहीं, तर केवळ देहनिर्वाहाकडे लक्ष द्यावयाचें आहे, हें मनांत आण. बाबा, मिष्टान्नादिक दृश्य पदार्थ नश्वर आहेत, त्यापासून घडणारीं ऐहिक सुखें व यज्ञयागादिक क्रियांपासून प्राप्त होणारीं स्वर्गादिक सुखें हीं सर्व मिथ्या आहेत; असें समजून संन्याशानें त्यांविषयीं उपरति स्वीकारावी. " मिष्टान्नादिक दृश्य पदार्थ नश्वर असले तरी त्यांपासून अल्प कालापर्यंत तरी सुख मिळत आहेना ? मग त्यांचा उपभोग कां घेऊं नये ? " अशी मात्र शंका घेऊं नको. कारण, परमेश्वराची जी माया म्हणून म्हणतात ती हीच होय ! परमात्म्याच्या नित्य, निर्मल व निर्विकार स्वरूपा मायेनें हा सर्व व्यूह रचिला असून, प्राणी अज्ञानामुळें त्या मायेच्या विचित्र कृतींत रंगून जातात, व ब्रह्मस्वरूपाविषयीं मूढ बनतात ! उद्धवा, ज्या ज्या बऱ्या वाईट वस्तूंचें मनानें अनुमान करण्यांत येतें, वाणीनें वर्णन करण्यांत येतें व देहधर्मावरून अस्तित्व प्रत्ययास येतें, त्या त्या सर्व वस्तु केवळ भासमान आहेत; त्यांपासून अनुभवास येणारें सुख

तें सुखच नव्हे; स्वप्नांत थोडीं का सुखें अनुभवास येतात? तोच प्रकार हा होय. असा निश्चय करून भासमान सुखांची अनुकूल वेदना विसरावी आणि आत्मनिष्ठ होऊन त्यांचें चिंतन सोडून द्यावें.

उद्धवा, संन्याशांचे चार प्रकार आहेत:-( १ ) कुटीचक, ( २ ) बहूदक, ( ३ ) हंस व ( ४ ) परमहंस. ह्या चारही प्रकारांत परमहंस हे श्रेष्ठ होत. हा वेळपर्यंत जे धर्म तुला सांगितले, त्यावरून संन्याशांचे सामान्य धर्म तुझ्या लक्षांत आलेच असतील. कुटीचकादि तीन प्रकारचे संन्यासी बहुतांशी ह्याच धर्मानें आचरण करितात. परमहंसामध्यें मात्र कांहीं धर्म विशेष आहेत. ह्यास्तव पुढील अध्यायीं त्यांचे धर्म निरूपण करितों. इति २४।

---

# अध्याय २५ वा.

## परमहंसाचे धर्म. ( ११-१८ )

श्रीकृष्ण उवाच -

ज्ञाननिष्ठो विरक्तो वा मद्भक्तो वाऽनपेक्षकः ॥
सलिंगानाश्रमांस्त्यक्त्वा चरेदविधिगोचरः ॥ २८ ॥

**श्रीकृष्ण म्हणाले:**--उद्धवा, हें चराचर विश्व मिथ्या आहे, असें

( १ ) " जगा स्वप्नाचा व्यवहार । तैसें भासे चराचर । ऐसें मिथ्या जाणोनी साचार । पुढती स्मरणादर स्फुरेना ॥ जो जागा झाला इत्थंभूत । तें स्वप्नभोग न वांछी चित्त । तेवीं स्वरूपीं सुनिश्चित । तो प्रपंचजात स्मरेना. " **नाथ.**

( २ ) " योऽन्तःसुखोऽन्तरारामस्तथान्तर्ज्योतिरेव यः । स योगी ब्रह्म निर्वाणं ब्रह्मभूतोऽधिगच्छति ॥ " **अर्थ**-आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं आनंदी राहून आत्मस्वरूपच ज्याला विश्रांतिस्थान होतें, व जो आत्मस्वरूपानेंच प्रकाशिला जातो, त्या ब्रह्ममय झालेल्या योग्याला अखंड ब्रह्मसुख मिळतें!-**गीता.**

ज्ञान होऊन जो यति ऐहिक विषयांविषयीं पूर्ण विरक्त होतो. अथवा जो भगवद्भक्त माझ्या स्वरूपांत इतका तल्लीन होतो कीं, त्यास मोक्षाची सुद्धां अपेक्षा रहात नाहीं. त्यानें आश्रमधर्म पाळण्याची मुळींच आवश्यकता नाहीं. परमहंसास मान व अपमान कळत असला तरी, त्यानें अज्ञान मुलांप्रमाणें तो कळत नाहीं असें मानून वागावें; व्यवहारादिकांत निपुण असूनही त्यानें एखाद्या मङ्ठ व मूढ पुरुषाप्रमाणें कोठें तरी फिरावें व कांहीं तरी करावें; वेदादिकांमध्यें प्राविण्य असलें तरी त्यानें वेड्यापिशाप्रमाणें भाषण करावें; आणि वेदार्थाचें रहस्य उत्तम समजत असलें तरी पशूप्रमाणें मौन धरावें ; परमहंसानें वेदांतील श्रौतस्मार्त कर्मांविषयीं व्याख्यानादि करूं नये; देवधर्म इत्यादि मिथ्या होत. असें पाखंडही प्रतिपादूं नये; तर्कवितर्कादिक काढून वाद माजवूं नयेत. आणि एखाद्या जागीं निरर्थक किंवा तुच्छ वादविवाद चालू असल्यास कोणताच पक्ष घेऊं नये; म्हणजे त्या वादविवादांविषयीं औदासिन्य धारण करावें. लोकांनीं उपसर्ग केला असतां बिलकुल भीति बाळगूं नये. त्यानें आपण होऊन कोणत्याही पुरुषाला उपसर्ग करूं नये, लोकांनीं निंदा केली असतां ती सहन करावी. परमहंसानें आपण होऊन कोणाचाही अवमान करूं नये; आणि एखाद्या पशूप्रमाणें ह्या देहाच्या सुखासाठीं कोणाशींही वैरभाव चालवूं नये. कारण, जसा एकच चंद्र उदकानें भरलेल्या अनेक घटांमध्यें प्रतिबिंबित राहतो; तसा देहादिकांहून वेगळा असा आत्मा समस्त प्राण्यांच्या आणि आपल्याही देहांत रहात असतो; आणि तीं सगळीं इतर प्राण्यांचीं व आपलीं अशा सर्व शरीरांची कारणें विचारानें पाहिलीं असतां एकरूपच (पंचभूतात्मकच) आहेत, अर्थात् कोणाशीं वैर धरण्याचें कारणच राहिलें नाहीं. ह्यास्तव, एखाद्या वेळीं अन्न मिळेल, व एखाद्या वेळीं कदाचित् तें मिळणारही नाहीं, परंतु त्याबद्दल हर्ष अथवा विषाद न मानितां परमहंसानें शांत स्थितींत

कालक्षेप करावा. अन्नप्राप्ति होणं किंवा न होणं हीं दोन्हीही दैवाधीन आहेत, अशी त्याची पक्की समजूत असली पाहिजे. आहारासाठीं परमहंसानें प्रयत्न केलाच पाहिजे. शरीर रक्षण करणें अगत्याचें आहे, कारण शरीर रक्षण न केल्यास ब्रह्मचिंतन अंतरेल, व नंतर मोक्षप्राप्ति होणं दुरापास्त होईल. एवढ्याकरितां परमहंसानें मिष्टान्नाची हाव मुळींच बाळगूं नये. तर सहजगत्या जें प्राप्त होईल तें अन्न चांगलें किंवा वाईट कसेंही असो. त्याविषयीं मनांत संशय न आणतां प्रारब्धानुसार जें मिळेल तें भक्षण करून त्यावर निर्वाह करावा. आणि स्थळ किंवा निरगुटपांघरूण कोणत्याही प्रकारचें मिळालें तरी त्यावर मुनीनें संतुष्ट रहावें. देहशुद्धि, आचमन, स्नान व दुसरेही नियम ज्ञानी पुरुषानें वेदाज्ञा ह्मणून पाळण्याची आवश्यकता नाहीं. तर जसा मी ईश्वर. केवळ स्वतंत्रतेनें व लीलेनें सर्व कांहीं कर्मे करितों. तसेंच त्यानें करावयाचें आहे ! परमहंसाच्या ठिकाणीं निर्विकल्प ज्ञानाचें वास्तव्य असल्यामुळें त्याची भेदबुद्धि बहुतेक अंशीं नष्ट झालेली असते. जो कांहीं अल्प अंश उरलेला असतो. त्याचा देहपतनाबरोबर नाश होतो, आणि मग तो यति माझ्या स्वरूपांत मिळून जातो अर्थात् मुक्त होतो. उद्धवा, परमहंसाचें मुख्य लक्षण हें कीं. त्यास ज्ञान व विज्ञान ह्यांची प्राप्ति झालेली असल्यामुळें तो जीवन्मुक्तच झालेला असतो. इति २९।

---

(१) " यथा नद्यः स्यंदमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय ॥० तथा विद्वान्नामरूपादिमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् "—**श्रुति.** " उगम संगम प्रवाह गती । सरितेचीं नामरूपव्यक्ती । जेवीं प्रळयोदकीं हरपती । तेवीं समरसतां मजमाजीं ज्ञाते "—**नाथ.**

# अध्याय २६ वा.

## कलियुगांतील स्थिति ( १२-२ )

श्रीशुक उवाच--

ततश्चानुदिनं धर्मः सत्यं शौचं क्षमा दया ॥
कालेन बलिना राजन्नंक्ष्यत्यायुर्बलं स्मृतिः ॥ १ ॥

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:** राजा परीक्षिते! कालाची गति विलक्षण असल्यामुळें, कलियुगामध्यें दिवसानुदिवस धर्म, सत्य, शुद्धि, क्षमा, दया, आयुष्य, बल व विवेक हीं सर्व नष्ट होत जातील. ज्यांपाशीं द्रव्य असेल त्यांसच कुलीन, सज्जन व गुणवान् ह्या संज्ञा मिळतील! धर्म व न्याय हीं बळाच्या जोरावर चालतील; धर्मशास्त्राची अथवा सत्यासत्यविचाराची वगैरे कांहीं अपेक्षा राहणार नाहीं. कोणीही वधुवरांच्या कुलगोत्रांची वगैरे पृसतपास करीत बसणार नाहीं. उभयतांचीं मनें एक झालीं कीं, तितक्यावरच स्त्रीपुरुषयोग घडून येईल. व्यापारधंद्यांत कपट हेंच मुख्य होऊन बसेल. स्त्रियांच्या व पुरुषांच्या अंगीं रतिकौशल्याचें मात्र चातुर्य दिसेल; शांति, दातृत्व इत्यादि सद्गुणांचा केवळ अभावच आढळेल! ब्राह्मण हा केवळ यज्ञोपवीतावरून ओळखावा लागेल; त्याच्या ठायीं आत्मज्ञानाच्या नांवानें शून्य दिसेल. दंड, कमंडलु इत्यादि चिन्हांवरून आश्रम ओळखावे लागतील; त्या त्या आश्रमानुरूप आचरणाचा पूर्ण लोप होऊन जाईल. एका आश्रमांतून दुसऱ्या आश्रमांत जाणें ह्मणजे वेष बदलणें हेंच होईल ( गृहस्थाश्रमांतून संन्यासाश्रमांत जाणें ह्मणजे पांढरीं वस्त्रें भगवीं करणें एवढाच अर्थ होईल. वैराग्य, सर्वसंगपरित्याग ह्यांची अपेक्षा मुळींच राहणार नाहीं )! न्यायादिकांत लबाडी होईल; ' खोल पैसा देख तमासा ' म्हणजे ज्याचा पैसा त्याचाच न्याय होईल; मनमानेल

तसें बोलतां येणें हेंच पंडिताचें लक्षण समजतील. गरिबी पदरीं असली कीं, त्याच्यावर चोरीचे वगैरे आरोप येतील. दांभिक पुरुषांना साधु समजतील. विवाहादिकांस विधीची अपेक्षा राहणार नाहीं. स्नान हें केवळ शरीरस्वच्छतेसाठींच करण्यांत येईल. गुरु वगैरे पुण्यपुरुषांचें तीर्थ घेण्याची अपेक्षा राहणार नाहीं; दूर अंतरावरचीं तीर्थें पुण्यकारक मानिलीं जातील; सौंदर्याकरितां केश धारण करणें हें प्रमुख ठरेल; पोट भरणें हाच पुरुषार्थ होऊन बसेल. खरें बोलणारास दांडगा ह्मणतील. स्त्रीपुत्रादिकांचें पोषण करणें हेंच मोठें शहाणपणाचें काम ठरेल; आणि धर्माचरण करावयाचें तें केवळ कीर्तीसाठीं असें होईल.

राजा, अशा प्रकारें ह्या भूतलावर अधर्म वळावला असतां ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र ह्यांच्यांपैकीं जो कोणी बली असेल तोच राजा होऊन बसेल. नंतर त्याचे सेवक व आप्तसुहृद् हे चोरांप्रमाणें वागतील. इंद्रियतृप्तीपलीकडे दुसऱ्या कोणत्याही गोष्टीस ते महत्त्व देणार नाहींत. ते लोभाविष्ट होऊन निर्दयपणानें प्रजांची संपत्ति व स्त्रिया ह्यांचें हरण करतील. मग प्रजांना " दे माय धरणी ठाय " असें होईल. नंतर, त्या ( प्रजा ) गिरिकंदरांत व अरण्यांत पलायन करतील. तेथें शाक, मुळें, मांस, मध, फळें, फुलें, बिया खाऊन निर्वाह करून राहतील. पाऊस पडणार नाहीं. दुष्काळ वारंवार पडतील. करांच्या ओझ्यामुळें प्रजा जर्जर होतील. थंडी, वारा, ऊन्ह, पाऊस व परस्परांशीं कलह आणि मारामाऱ्या ह्यांच्या त्रासानें प्रजांची दुर्दशा उडेल. अवशिष्ट राहिलेल्या प्रजेस क्षुधा, तृष्णा, व्याधि व चिंता ह्यांच्यामुळें फार त्रास भोगावे लागतील. कलियुगामध्यें मनुष्यांच्या आयुष्याची परम मर्यादा ह्मणजे वीस किंवा तीस वर्षें होऊन बसेल. कलिदोषांमुळें प्राण्यांचीं शरीरें लहान होऊन जातील. वैदिक धर्ममार्ग नष्ट होतील, आणि धर्मामध्यें पाखंडांचें वर्चस्व राहील. राजे व चोर ह्यांच्यामध्यें भेद उरणार

नाहीं. मग प्रजाही राजाप्रमाणें अनीतिमान् होतील. लोक चोरी, असत्य, हिंसा इत्यादिकांनीं निर्वाह करूं लागतील. चारी वर्ण बहुतेक शूद्रतुल्य होतील. गाई शेळ्यामारख्या शरीरानें लहान व दूधही थोडें देणाऱ्या बनतील. चारी आश्रमांतले पुरुष गृहस्थाप्रमाणें वर्तन करतील. अन्नामध्यें सत्वाचा अंश राहणार नाहीं. वृक्ष शमीसारखे छायारहित होतील. मेघ बहुतेक विजामय होतील ह्मणजे विजा पुष्कळ चमकतील. पण पावसाचा अभाव होईल. गृहादिकांत धर्माचरणाच्या नांवानें शून्यता असेल. अशा प्रकारें कलियुगांत शेवटीं शेवटीं लोकांचीं आचरणें दुःसह होऊन गेलीं असतां. धर्मरक्षणासाठीं भगवान् सत्वगुणाच्या योगें ह्या भूतलावर अवतार घेईल !

**कल्कि अवतार**— राजा परीक्षिते ! ह्या स्थावरजंगमात्मक जगाचा अधिपति व विश्वाचा सर्वांतर्यामी जो भगवान् परमात्मा. धर्मसंरक्षण करण्यासाठीं व साधूंचा कर्मक्षय करून त्यांस मोक्ष देण्यासाठीं ह्या जगांत अवतीर्ण होतो ! कलियुगामध्यें सर्वत्र अनाचार माजला असतां तो जगन्नियंता परमेश्वर शंबल ग्रामांत विष्णुयशा नामक पवित्र ब्राह्मणाच्या घरीं कल्किरूपानें प्रकट होईल. तो अणिमादि अष्टसिद्धींनीं युक्त असा महातेजस्वी भगवान् देवदत्त नामक अश्वावर बसून मोठ्या वेगानें ह्या भूतलावर संचार करीत चोरांसारख्या वागणाऱ्या कोट्यवधि लोकांचा घात करील !

**कृतयुगास प्रारंभ**—राजा परीक्षिते ! अशा प्रकारें सर्व दुष्टांचा नाश झाला असतां. वासुदेवाच्या आंगावरील उटीच्या अति पवित्र सुगंधानें युक्त असा वायु शरीराला लागत असल्यामुळें सर्वत्र लोकांचीं मनें निर्मळ होतील. त्यांच्या हृदयांत भगवान् वासुदेव राहूं लागला कीं, त्यांची प्रजासंतति उत्तरोत्तर मोठी निपजत जाईल. राजा धर्मसंरक्षक भगवान् कल्कि ज्या वेळीं अवतार घेईल त्या वेळीं कृतयुगास प्रारंभ

होईल व प्रजांची उत्पत्ति सात्त्विक होऊं लागेल. कृतयुगाच्या आरंभाची खूण ही कीं, त्या वेळीं चंद्र, सूर्य व गुरु हे एकदम पुष्य नक्षत्रीं प्रवेश करतील. पुढें कृतयुगांतील प्रजा केवळ धर्मप्रवर्तक होतील. इति २६ ।

---

# अध्याय २७ वा.

## चतुर्युगांतील लोकस्थिति ( १२-३ )

राजोवाच--

केनोपायेन भगवन्कलेर्दोषान्कलौ जनाः ॥
विधमिष्यन्त्युपचितांस्तन्मे ब्रूहि यथा मुने ॥ १ ॥

**राजा परीक्षिति ह्मणालाः**—सर्वज्ञ मुने ! कलियुगामध्यें वृद्धिंगत झालेले कलीचे दोष. लोकांना कोणत्या उपायानें नष्ट करितां येतील, तें मला पूर्णपणें सांगण्याची कृपा करावी. तसेंच युगें कोणतीं, प्रत्येक युगाचे धर्म कोणकोणते, प्रलय व कल्प ह्यांचें मान काय, आणि ईश्वररूप जो काल त्याची गति कशी आहे, हें सर्व सविस्तर सांगावें.

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**—राजा तुझ्या प्रश्नाचें उत्तर सांगतों तें सावधानचित्तानें श्रवण कर. आतां कृतयुगांतील लोकस्थिति सांगतोंः-

( १ ) **कृतयुगांतील लोकस्थितिः**—राजा, कृतयुगामध्यें धर्म चारी चरणांनीं युक्त असतो. त्या वेळचे लोक त्याचें उत्तम प्रकारें पालन करितात. त्या धर्माचे सत्य, दया, तप व दान हे चार चरण होत. कृतयुगांतले लोक प्रायः सगळे संतुष्ट व दयाळु असून सर्वांशीं मैत्री ठेवणारे असतात, त्यांचें चित्त शांत असून इंद्रियनिग्रही असतें. सर्वांभूतीं समदृष्टि असून कसाही प्रसंग आला असतां सहनशीलतेपा-

सून ढळत नाहींत; व ते ब्रह्मचिंतनांत निमग्न असतात आणि देहाचें सार्थक करितात.

( २ ) **त्रेतायुगांतील लोकस्थितिः**— राजा, पूर्वोक्त धर्माप्रमाणें अधर्माचेही असत्य, हिंसा, असंतोष व कलह हे चार पाद आहेत. त्रेतायुगामध्यें अधर्माच्या चारी चरणांना वाढावयास हळूहळू अवकाश मिळतो. अर्थात् धर्माच्या चारी चरणांपैकीं चवथा भाग धर्म घटतो. ह्या युगांतील लोक कर्में करण्यांत दक्ष, तपश्चर्येंत निमग्न, हिंसा करण्यास प्रायः प्रतिकूल व अल्प मानानें विषयासक्त असे असतात. ह्या युगांतील लोक धर्म, अर्थ आणि काम हे त्रिविध पुरुषार्थ साधण्यांत दक्ष असतात. त्या वेळच्या वर्णांत ब्राह्मण अधिक असून ते तीन वेदांमध्यें म्हणजे कर्मकांडांत निष्णात असतात.

( ३ ) **द्वापरयुगांतील लोकस्थितिः**—राजा, द्वापरयुगांत अधर्माचे चार पाद जे हिंसा, असंतोष, असत्य व द्वेष ह्यांच्या योगें तप, सत्य, दया व दान ह्या धर्माच्या चार चरणांतून अर्धा भाग धर्म नष्ट होतो. ह्या युगामध्यें लोकांना कीर्तीची फार आवड असते; ते स्वभावानें उदार, स्वाध्यायपठनांत तत्पर, धनधान्यादिकांनीं संपन्न, कुटुंबवत्सल असून अगदीं आनंदी असतात; आणि त्या वेळीं वर्णांमध्यें ब्राह्मण व क्षत्रिय ह्यांचें प्राधान्य असतें.

( ४ ) **कलियुगांतील लोकस्थितिः**—राजा, कलियुगामध्यें तर अधर्माचें चरण वाढत जाऊन त्यामुळें धर्माच्या चरणांपैकीं चवथा भाग उरलेला असतो व सांप्रत तशीच स्थिति आहे; आणि दिवसेंदिवस तो अवशिष्ट चतुर्थ अंशही क्षीण होत जाऊन शेवटीं अगदीं नाहींसा होईल ! कलियुगांतले लोक लोभी, दुराचारी, निर्दय, शुष्क कामासाठीं वैर करणारे, दुर्दैवी व हावरे असतात. ह्या युगामध्यें शूद्र आणि धीवर ( मासे मारणारे ) यांचें प्राधान्य असतें. पुरुषाच्या ठिकाणीं सत्व, रज

आणि तम हे तीन गुण दिसून येतात; आणि कालाच्या प्रेरणेप्रमाणें त्यांच्या चित्ताच्या ठिकाणीं भिन्न भिन्न वृत्ति उद्भवत असतात.

( ३ ) **कृत, त्रेता व द्वापर ह्यांचीं लक्षणें:**—राजा, ( १ ) कृतयुगामध्यें सत्वगुणाचें प्राधान्य असतें. मन, बुद्धि व इंद्रियें ह्यांची प्रवृत्ति सात्विक कृत्यांतच असते; आणि ब्रह्मज्ञान व तपश्चर्या ह्यांविषयीं अत्यंत प्रीति वाटत असते. ( २ ) त्रेतायुगामध्यें रजोगुणाचें प्राधान्य असतें; आणि मनाची ओढ धर्म, अर्थ व काम हे त्रिविध पुरुषार्थ साधण्याकडे असते. ( ३ ) द्वापरयुगामध्यें रज व तम ह्या मिश्र गुणाचें प्राधान्य असतें; व लोभ, असंतोष, मान, दंभ व मत्सर हे विकार बळावतात; आणि सकाम कर्मे करण्याची अभिरुचि उत्पन्न होते.

( ४ ) **कलीचीं लक्षणें:**—राजा, कलियुगामध्यें तमोगुणाचें प्राबल्य असतें. लोकांचे ठिकाणीं कपट, असत्य, आळस, निद्रा, हिंसा, शोक, खेद, मोह, भय आणि दैन्य हीं वास करितात. कलीच्या प्रभावामुळें मनुष्यांच्या बुद्धि मंदावतील; भाग्यें अल्प होतील; आहार वाढतील; दारिद्र्य बळावेल; कामवासना अनिवार होतील. स्त्रिया जारिणी व दुष्ट निपजतील, देशांत चोरांचा सुकाळ होईल, जिकडे तिकडे पाखंड माजेल. राजे प्रजांना छळतील, ब्राह्मण शिश्नोदरपरायण बनतील, ब्रह्मचारी विहित आचरण करणार नाहींत व अपवित्र बनून राहतील, गृहस्थ स्वतः भिक्षा मागूं लागतील अर्थात् कोणाला भिक्षा घालणार नाहींत, वनांत राहणारे तपस्वी वन सोडून गांवांत येऊन राहतील, संन्यासी अत्यंत द्रव्यलोभी बनतील. ह्या युगांत स्त्रियांचीं शरीरें खुजट होतील, व आहार वाढतील, त्यांना मुलें अतिशय होतील, त्यांची लज्जा नाहींशी होईल. त्या नित्य कटु भाषण करतील आणि चोरी, कपट व विपुल साहसी कृत्यें करण्यांत काळ घालवितील, वाणी उदमी लोक खोटीं वजनें, मापें करितील, लोक आपत्ति नसतांही अयोग्य आचरण करितील,

सेवकजन आपल्या धन्यांजवळील द्रव्य संपलें कीं, त्यांचा त्याग करतील. व धनीही आपल्या कुलपरंपरागत चाकराला रोग वगैरे झाला असतां काढून टाकितील. गाई आटल्या कीं, मग त्यांस घालवून देतील! कलियुगामध्यें पुरुष स्त्रीलंपट, दीन व सुरतसुखावर आसक्त होऊन जातील; ते आईबाप, भाऊ, मित्र, ज्ञाति ह्यांना सोडून मेहुणे ह्यांजपाशींच आपल्या सुखदुःखांच्या गोष्टी करूं लागतील, शूद्र तपस्व्याचा वेष धारण करून त्यावर निर्वाह चालवितील व दानें घेत जातील; ज्यांना धर्माचें ज्ञान लेश सुद्धां नसतांही ते लोक उत्तमासनीं म्हणजे आचार्यांच्या आसनावर बसून धर्मोपदेश करूं लागतील! राजा, भूतलावर वृष्टि होत नाहींशी झाली कीं, लोक फार भयाभीत होतील; वेळेवर अन्न मिळणार नाहीं. लोकांचीं मनें नित्य खिन्न असतील, त्यांना दुष्काळ आणि कर ह्यांपासून फार त्रास भोगावे लागतील! कलियुगामध्यें जनांना अन्न, वस्त्र, उदक, शय्या, सुरत, स्नान व भूषणें हे उपभोग मिळणार नाहींत, आणि ते पिशाच्चतुल्य बनतील. कलीमध्यें लोक दमडीसाठींही स्नेह टाकून भांडत बसतील; पैशासाठीं आपल्या स्वतःचा किंवा स्वकीयांचा प्राणघात करतील! लोक शिश्न आणि उदर ह्या क्षुद्र कर्मांत परम दक्ष होतील; ते आपल्या वृद्ध आईबापांचें देखील रक्षण करणार नाहींत; मग दुसऱ्यांच्या पोषणाची गोष्ट पाहिजे कशाला? आणि सगळ्या व्यवसायांत निपुण अशा मुलांचें मात्र लालनपालन चालवतील! जगन्नायक परमेश्वराची आराधना मुळींच कोणी चालविणार नाहींत; फार काय त्याचें नांव देखिल घेणार नाहींत.

( १ ) **भगवद्भक्तीचा महिमा**:—राजा, कलीचे दोष दूर करण्यास भगवद्भक्तीसारखें साधन नाहीं; पण कलियुगामध्यें लोकांचीं मनें पाखंड मार्गाच्या योगें अगदीं बिघडून जातील, ते प्रायः भगवंताची आराधना करणार नाहींत. मनुष्यानें मरणोन्मुख स्थितींत, आतुर दशेंत

पडल्यांना किंवा कोणत्याही प्रकारच्या पराधीन स्थितींत ज्याचें नांव उच्चारिलें असतां कर्मरूप प्रतिबंध दूर होऊन त्याला उत्तम गति प्राप्त होते; त्या प्रभूला कलियुगांतील जन भजणार नाहींत ! भगवंताचें श्रवण. कीर्तन, ध्यान किंवा पूजन केलें असतां तो त्या मनुष्याच्या हृदयांत प्रकट होऊन त्याचीं हजारों जन्मांतील पापें दूर करितो. भगवान् अनंत हृदयांत स्फुरण पावूं लागला असतां अंतरात्म्याला जशी अत्यंत शुद्धि प्राप्त होते, तसी देवतांची उपासना, तपश्चर्या. प्राणायाम, सर्वांशीं मैत्री. तीर्थस्नानें, व्रतें. दानें. जप ह्या कशाच्याही योगानें मिळत नाहीं. म्हणून राजा. तूं ह्या मरणोन्मुख स्थितींत एकाग्रपणें सर्वात्मभावानें परमेश्वराला हृदयांत जागरूक ठेव, तेणेंकरून उत्तम गतीला जाशील. मरणोन्मुख जनांनीं भगवान् परमेश्वराचें ध्यान करावें; तो सर्वात्मा आपलें ध्यान करणाराला आत्मस्वरूपीं नेतो.

( २ ) कलियुग चें फळः--राजा. हें कलियुग सर्व दोषांची रास आहे. तरी ह्याच्यामध्यें एक मोठा गुण आहे. तो हाः—मनुष्य सर्व ठिकाणची आसक्ति सोडून देऊन कृष्णपरमात्म्याचें नुसतें कीर्तन करूं लागला कीं. उत्तम पदास जातो. कृतयुगांत विष्णूचें ध्यान करणाराला जें फळ मिळे. त्रेतायुगांत यज्ञांच्या योगें त्याची आराधना करणारा जें फळ मिळवी, व द्वापरांत पूजा केल्यापासून जें फळ प्राप्त होई, तें फळ कलियुगामध्यें हरीचें नुसतें कीर्तन केलें असतां मिळतें. इति. १७ ।'

# अध्याय २८ वा.

## अजगर मुनीची कथा. ( ७-१३ )

नारद उवाच:—

तं शयानं धरोपस्थे कावेर्यां सह्यसानुनि ॥
रजस्वलैस्तनूदेशैर्निगूढामलतेजसम् ॥ १२ ॥

**नारद ह्मणाले:**—राजा, अजगर नांवाचे एक मुनि सह्यपर्वताच्या शिखरीं कावेरी सन्निध सदोदित भूतलावर निजलेले असत. म्हणून शरीराचे अवयव धूळीनें भरलेले असल्यामुळें त्यांचें निर्मल तेज आच्छादून गेलें होतें. भक्तश्रेष्ठ प्रल्हाद कित्येक प्रधानांना बरोबर घेऊन तत्त्वज्ञानाच्या इच्छेनें जगांत फिरत असतां एके समयीं अजगरमुनि त्याच्या दृष्टीस पडले! कर्म, आकृति, वाणी, वर्ण व आश्रम इत्यादि चिन्हांवरून त्या मुनीविषयीं लोकांना हा सिद्ध आहे किंवा कोण आहे, याची कांहींच कल्पना होत नसे; पण तो महाभगवद्भक्त प्रल्हाद जाणता होता, म्हणून त्यानें त्या अजगरमुनीला वंदन करून यथाविधि पूजा अर्पिली, आणि चरणीं मस्तक ठेवून तत्त्वज्ञानाच्या इच्छेनें त्यास असा प्रश्न केला.

**प्रल्हाद म्हणाला:**—" मुने एखाद्या उद्योगी व भोगी पुरुषाप्रमाणें आपलें शरीर पुष्ट आहे. मनुष्यानें भोग भोगिले तरच शरीर पुष्ट होतें, अन्यथा होत नाहीं. ह्या जगांत द्रव्यसाधन असलें तरच उपभोग मिळतात, आणि द्रव्य उद्योग करणारांना मिळतें. ब्रह्मन्! आपण तर येथें पडून राहतां, उद्योग कांहीं करीत नाहीं, अर्थात भोगप्राप्तीचें साधन द्रव्य आपल्याजवळ नाहीं, हें उघड आहे; पण मी असें म्हणतों कीं, आपलें शरीर भोग भोगिल्यावांचून पुष्ट राहिलें याचें कारण योग्य वाटत असेल तर आह्मांला सांगा. शिवाय लोक द्रव्य मिळविण्याचें अं-

गीं सामर्थ्य नसलें तरी खटपटी करीत असतात, आणि आपण तर विद्वान्, दक्ष, चतुर व चमत्कार वाटण्याजोग्या मधुर कथा सांगणारे व निःपक्षपाती आहां; इतके गुण अंगीं असूनही स्वस्थ पडून राहिलां ह्याचें कारण काय?

**अजगर मुनि ह्मणाले**:—दैत्यराज प्रल्हादा! तूं तर ज्ञानी पुरुषांना मान्य आहेस. तेव्हां आपल्या ज्ञानदृष्टीनें प्रवृत्ति आणि निवृत्ति ह्या दोन मार्गांत मनुष्यांना कोणतीं फळें मिळतात, तीं तुला कळून आलीं असतीलच. तुझ्या हृदयांत प्रत्यक्ष नारायण वास करीत आहे. जसा सूर्यमंडळांत अंधकार नसतो, तशी तुझ्या ठिकाणीं अज्ञानांधकाराची मुळीं वार्ता सुद्धां नाहीं. अर्थात् तुला सकल ज्ञान असलेंच पाहिजे. तथापि हे राजा, आह्मी तुझ्या प्रश्नांचीं उत्तरें जशीं ऐकिलीं आहेत तशीं देतों. कारण, तूं मुमुक्षु पुरुषांत श्रेष्ठ आहेस. राजा! यथायोग्य उपभोगांनींही तृप्त न होणाऱ्या संसार-प्रवाहांत तृष्णेनें मला ढकलून दिलें; आणि नानाप्रकारचीं कर्में करवून अनेक योनींत जन्म घ्यावयास लाविलें. कर्मानुसार भ्रमण करितां करितां दैवयोगानें मी ह्या मनुष्य योनींत आलों. हा मनुष्य देह ह्मणजे चहूंकडे जाण्याचें साधनरूप द्वार होय. म्हणजे यांत धर्माचरण केलें तर स्वर्ग प्राप्त होतो. अधर्माच्या योगानें श्वान, सूकर इत्यादि जन्म प्राप्त होतात. धर्म व अधर्म यांचें समान आचरण केलें तर हाच मानवजन्म पुनः प्राप्त होतो आणि निवृत्तिमार्गाचें आचरण केलें तर मोक्षप्राप्ति होते. अशा मानवजन्मांत येऊनही सुखप्राप्तीकरितां अविश्रांत श्रम करणाऱ्या स्त्रीपुरुषांना उलट दुःखरूप फळ मिळतें, हें पाहून मीं त्या खटपटी सोडून दिल्या. राजा, जीवाचें जें स्वरूप, तोच आनंद होय. कारण, तो जीव सच्चिदानंदरूप आहे.

(१) " ब्रह्माभिन्नसच्चिदानंदलक्षणत्वात् ब्रह्मवत " **अर्थ**—ब्रह्माहून अभिन्न असून सत्, चित्, व आनंद या लक्षणांनीं युक्त आहे, तोच आत्मा होय.

आतां तें दिसत नाहीं खरें, परंतु सकळ इच्छा सुटल्या कीं तें स्वरूप (आनंद) आपोआप प्रकाशमान होतें. भोग म्हणजे केवळ मनाचे खेळ ( मनोराज्यें ) आहेत, अर्थात ते मिथ्या होत. असें जाणूनच त्यांचा त्याग करून केवळ प्रारब्धकर्म भोगण्यासाठींच भोग भोगीत मी येथें स्वस्थ पडलों आहे. प्रल्हादा, स्वतःजवळ आत्म्याचें आनंदस्वरूप नित्य सिद्ध असूनही लोक विसरून जातात, म्हणून त्यांना जन्ममरणादि दुःखरूप संसारसमुद्रांत पडावें लागतें! राजा, शेवाळ, वेली वगैरेंनीं आच्छादित असलेल्या वास्तविक जलाचा अज्ञानामुळें त्याग करून जसा मृगजलाकडे धांवत सुटतो, आणि शेवटीं फसतो, त्याप्रमाणें निजात्मसुख प्राप्त करून घेण्याचे परम पुरुषार्थ टाकून प्राणी विषयांच्या सुखाची हांव बाळगितो. म्हणून त्यास मुकतो. राजा, देहादिक सर्व दैवाच्या स्वाधीन आहेत, हें जाणूनही मनुष्य देहांच्या त्या सुखप्राप्तीसाठीं व दुःखनिवृत्तीसाठीं अनेक यत्न करीत असतो; पण दैव प्रतिकूल असलें कीं, ते सर्व निष्फळ होतात. कदाचित् ते प्रयत्न सफल झाले, तरी त्यांचा उपयोग काय? कारण, आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक असे त्रिविध तापांनीं पीडित झालेल्या प्राण्यास, मोठ्या कष्टानें प्राप्त करून घेतलेले उपभोग आणि ऐश्वर्य यांजपासून कितीसें सुख होणार? मोठ्या श्रीमंतांना देखील किती दुःखें भोगावीं लागतात, तें मी पहात आहेच! त्यांचा लोभ कधीं सुटत नाहीं, त्यांचीं इंद्रियें स्वाधीन नसतात, चोर येतील कीं काय ह्या भीतीमुळें झोंप लागत नाहीं. आणि सर्व प्रकारें ( प्रत्यक्ष पुत्रांबद्दल देखील ) मनांत शंका येत असतात. द्रव्यलोभी श्रीमानांना राजाचें, चोरांचें, शत्रूंचें, स्वजनांचें, पशूंचें, पक्ष्यांचें, याचकांचें, काळाचें व स्वतःचें इतक्यांचीं नित्य भयें असतात. मनुष्यांना शोक, मोह, भय, क्रोध, राग, द्वेष, श्रम इत्यादि त्रास ऋणामुळें आणि द्रव्यामुळें भोगावे लागतात; म्हणून शहाण्या मनुष्यानें त्यांवरील इच्छा सोडून द्यावी.

**हे भक्तश्रेष्ठा !** आह्मीं ह्या जगांत दोन उत्तम गुरू पाहिले. त्यांच्यापासून शिकलेल्या आचरणाप्रमाणें आमचें वर्तन असतें. ते गुरु ह्मणजे एक मधमाशी व दुसरा अजगर. " मधमाशी अनेक प्रयत्नांनीं मध सांचवून ठेविते. व तो भलताच कोणी घेऊन जातो; तसें मनुष्यही अनेक संकटें भोगून द्रव्य संपादून ठेवितो. आणि तें दुसराच कोणी तरी हरण करितो ! हें जाणून सर्व उपभोगापासून विरक्त असणें, अर्थात् वैराग्यवृत्ति मी मधमाशीजवळ शिकलों. आणि अजगरापासून सर्वदा संतोष अशी वृत्ति ( अजगरवृत्ति ) स्वीकारली. " मी कोणताही व्यापार करीत नाहीं, अनायासें मिळेल तेवढ्यांत संतुष्ट असतों. कांहीं नच मिळालें तरी अजगराप्रमाणें धैर्य धरून तसाच पडून राहतों !" प्रल्हादा, एखादे वेळी थोडें. एखादे वेळीं पुष्कळ. केव्हां गोड, केव्हां बेचव, कधीं उत्तम. कधीं कनिष्ठ असें जें मिळेल तें अन्न मी भक्षण करितों. एखादे प्रसंगीं कोणी भक्तिपूर्वक आणून देतो, केव्हां अनादरानें देतो, मला त्याचें कांहीं वाटत नाहीं. कोणी कसेंही आणिलें तरी मी त्याचा स्वीकार करितों. कधीं दिवसां जेवायाला मिळतें, कधीं रात्रीं मिळतें, कधीं कधीं मुळींच मिळत नाहीं. केव्हां दिवसां दोनदां भोजनाचा प्रसंग येतो. एखादे प्रसंगीं रात्रीं तसेंच होतें; ह्मणूनच माझें शरीर पुष्ट आहे. पीतांबर. कद. चर्म, चिंध्या, वल्कल किंवा दुसरें जें कांहीं मिळेल तें पांघरतों. व प्रारब्ध कर्म भोगीत मी नेहमीं संतुष्ट असतों, मी कधीं भूमीवर, कधीं गवतावर. कधीं पाचोळ्यावर, कधीं दगडावर, कधीं धुळीमध्यें स्वस्थ निजतों; केव्हां केव्हां राजाच्या मंचकावरही लोळतों. दुसऱ्याच्या इच्छेनें कधीं स्नान करून आंगाला उट्या लावितों, आणि चांगलें वस्त्र नेसून गळ्यांत माळा व अलंकार लटकावून रथांत, हत्तीवर किंवा घोड्यावर बसून फिरावयाला जातों; व केव्हां केव्हां तर पिशाच्यासारखा दिगंबर वृत्तीनें भटकत असतो. राजा, जन वेगवेग-

ळ्या स्वभावांचे आहेत. त्या विषम जनांची मी स्तुति अथवा निंदा काहींच करीत नाहीं; उलट त्या सर्व लोकांचें कल्याण व्हावें व त्यांना परमात्मरूपीं ऐक्य मिळावें असें इच्छितों! प्रल्हादा! मंदमति जनांना माझें चारित्र लोकाचाराला व शास्त्रमर्यादेला सोडून आहे असें वाटतें; पण खरी स्थिति तशी नाहीं. हें तुला सांगावयाला नकोच! हें फार गुप्त आहे. तरी तूं महा भगवद्भक्त असल्यामुळें सांगितलें. इति २८।

वैराग्य-प्रकरण समाप्त.



॥ ॐ नमो नारायणाय ॥



# भक्तिप्रकरण.

## अध्याय १ ला.

### मुमुक्षोपदेश ( ११—१० )

श्रीभगवान् उवाच—

मयोदितेष्ववहितः स्वधर्मेषु मदाश्रयः ॥
वर्णाश्रमकुलाचारमकामात्मा समाचरेत् ॥ १ ॥

**भगवान् श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा, मीं पंच रात्रादिक ग्रंथांत जे स्वधर्म सांगून ठेविले आहेत, त्यांकडे दुर्लक्ष न करितां मुमुक्षूनें वर्ण, कुल व आश्रम ह्यांना अनुसरून विहित असलेलीं कर्मे करावीं; पण तीं

करितांना चित्तामध्यें फलप्राप्तीची इच्छा धरूं नये; तर मग तीं करणें हें आपलें अवश्य कर्तव्य आहे. असें समजून त्यानें तीं सर्व कर्में मला अर्पण करावींत. अशा प्रकारें निष्काम बुद्धीनें कर्में केलीं. ह्मणजे साधकाचें चित्त शुद्ध होतें. मग विषयादिकांत गढून गेलेले जीव. विषय सत्य मानून सुखाकरितां जी खटपट करीत असतात. ती सर्व व्यर्थ आहे. अशी त्यांची पूर्ण खातरी होते. उद्धवा, हा प्रपंच व ह्यांतील सुखें हीं सर्व द्वैतमूलक असल्यामुळें असत्य व मिथ्या आहेत. पहा— झोपेंत असलेल्या मनुष्याला स्वप्नामध्यें अनेक गोष्टींचा भास होतो. अथवा मनोराज्यांत गढून गेलेल्या मनुष्याला अनेक तर्क खरे वाटतात; परंतु तें स्वप्न संपतांच अथवा ती मनोराज्याची उसळलेली लाट नाहींशी होतांच त्या गोष्टी किंवा ते तर्क जागच्या जागीं मावळून, त्यांच्या असत्यपणाची किंवा मिथ्यात्वाची खातरी पटते. ह्या शरीराच्या व इंद्रियांच्या सुखाकरितां जीव नानाविध यत्न करितो; ह्याचें बीज—सुखतृष्णेनें त्याच्या मनांत देहादिकांविषयीं सत्यत्व बुद्धि उत्पन्न होते, हें होय. परंतु हा सर्व अज्ञानाचा परिणाम असल्यामुळें, तें अज्ञान दूर होऊन ज्ञान प्रगट होतांच " हा सर्व प्रापंचिक पसारा मिथ्या होय, " असा त्यास तत्काल अनुभव येतो.

---

( १ ) " कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः । जन्मबंधविनिर्मुक्ताः पदं गच्छंत्यनामयं ॥ " **अर्थ**—सम्यक् बुद्धिमान् लोक कर्मजन्य फळाची इच्छा त्याग करून जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटतात; आणि उपद्रवरहित अशा श्रेष्ठ मोक्षपदाला जातात. —**गीता**. ( २ ) " बैलाची कांस दुहिता सिंपीभरी दूध नये हाता । तेवीं मनोरथ उपासितां । न लभे सर्वथा निजसुख "—**नाथ**. ( ३ ) " स्वप्नीं देखिलें जन्ममरण । जागृतीं मिथ्या ह्मणे आपण । तैसा स्वरूपीं जागा जाहल्या जाण । जन्ममरण त्या नाहीं. " —**नाथ**. ( ४ ) " देहाऽत्मबुद्धिजं पापं न तद्गोवधकोटिभिः " **अर्थ**–जड देहच आत्मा आहे अशी बुद्धि राहणें हें कोटी गोहत्यांपेक्षां अधिक पाप आहे.

**मुमुक्षूचें आचरण**--उद्धवा. देहादिक असत्य वस्तूंच्या सुखासाठीं प्रयत्न करणें. हा वेडेपणा होय. शाश्वत सुखाकरितां ह्मणजे माझ्या प्राप्तीकरितां प्रयत्न करणें हेंच मुमुक्षूचें खरें खरें कर्तव्य आहे. ह्यासाठीं मुमुक्षूनें सदासर्वकाळ माझ्या चिंतनांत रममाण असावें; तो जीं जीं कर्में करील, त्यांपासून त्यास सुखोपभोग मिळण्याची इच्छा नसावी; जीं कर्में अवश्य केलीं पाहिजेत, ह्मणजे जेणेंकरून कर्में केलीं असतां कर्में करणारास कांहींच फलप्राप्ति होत नाहीं. अशीं स्नानसंध्यादिक व श्राद्धपक्षादिक नित्यनैमित्तिक कर्में मात्र त्यानें करावीं. यज्ञयागादिक भोगैश्वर्यदायक कर्में त्यानें मुळींच करूं नयेत; ब्रह्मस्वरूप समजून घेण्याचा उद्योग नित्य करावा; व त्या उद्योगानें जसजसा अधिकार वाढत जाईल, तसतसा नित्यनैमित्तिक कर्मांवरचा आदरही कमी कमी करीत जावा. ब्रह्मचिंतनांत तत्पर असलेल्या पुरुषानें यम ह्मणजे ब्रह्मचर्य, अहिंसा, दया, शांति इत्यादिक मन व इंद्रियें यांचें अकलन करणारीं कृत्यें मोठ्या आवडीनें करावींत; व नियम ह्मणजे शौच, ईज्या, तप, दान, व्रत, उपवास इत्यादिक श्रुतिस्मृतिप्रणीत कृत्यें शक्त्यनुसार व सवडीप्रमाणें, ब्रह्मचिंतनास व्यत्यय येणार नाहीं अशा बेतानें करावींत; आणि रागद्वेषरहित व माझ्या ज्ञानानें ब्रह्मरूप बनलेल्या अशा शांतिसंपन्न सद्गुरूची उपासना करावी. सद्गुरू केवळ मद्रूप (ईशरूप) होय. उद्धवा. आतां शिष्याचें आचरण कसें असावें. तें तुला सांगतों:—

(१) " मोक्षार्थी न प्रवर्तेत तत्र काम्यनिषिद्धयोः ॥ नित्यनैमित्तिके कुर्यात्प्रत्यवायजिहासया " **अर्थ**—मोक्ष मिळवूं इच्छिणारानें सकाम व निषिद्ध कर्में करण्यास प्रवर्तूं नये; प्रत्यवाय न घडावा, एवढ्यासाठीं नित्यनैमित्तिक कर्में मात्र करीत जावें. "—**स्मृति**. (२) " स्वकर्म केलिया फळ काये । चित्ताचा मळ मात्र जाये । भक्तजन निर्मळ होये । बाधू न लाहे स्वकर्में "—**नाथ**. (३) " गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुः गुरुर्देवो महेश्वरः" **अर्थ**-गुरूच ब्रह्मा, गुरूच विष्णु, गुरूच महेश्वर आहे.-**गुरुगीता.**

**शिष्याचें आचरणः**—उद्धवा, सद्गुरूची सेवा करून ब्रह्मज्ञान जोडण्याकरितां शिष्याच्या अंगीं सुपात्रता यावी लागते. प्रथम शिष्याचा अभिमान सुटला पाहिजे, दुसऱ्याचा उत्कर्ष पाहून त्यास वाईट वाटतां उपयोगीं नाहीं. त्यानें नेहमीं ब्रह्मप्राप्तीचा उद्योग करण्याविषयीं सावध असावें, त्याच्या ठिकाणीं स्त्रीपुत्रादिकांविषयीं ममत्व असूं नये, त्यानें गुरूविषयीं अत्यंत श्रद्धा बाळगावी, ज्ञान संपादन करण्याविषयीं आपलें चित्त त्यानें एकाग्र ठेवावें, ब्रह्मजिज्ञासा धरावी, दुसऱ्याच्या निंदेस प्रवृत्त होऊं नये, मिथ्या भाषण वर्ज्य करावें आणि आत्म्याची—(परब्रह्माची) चेतनशक्ति सर्वत्र ओतप्रोत भरलेली असून अभेदरूपानें आहे असें मनांत आणून स्त्रीपुत्र, घरदार, आप्तस्वकीय, शेतवाडी, धनदौलत इत्यादिकांविषयीं उदासीन व विरक्त असावें. इतके गुण शिष्याच्या अंगीं असतील तरच तो आत्मविद्येचा अधिकारी होईल, व त्यानेंच सद्गुरूचा आश्रय करून ब्रह्मप्राप्तीचा उद्योग करावा. इति १।

---

## अध्याय २ रा.

### सद्गुरूचा आश्रय कां करावा ( १०-८७. )

श्रुत्युवाच—

विजितहृषीकवायुभिरदांतमनस्तुरगं य
इह यतंति यंतुमतिलोलमुपाय खिदः ॥
व्यसनशतान्विताः समवहाय गुरोश्चरणं
वणिज इवाज संत्यक्तकर्णधरा जलधौ ॥ २० ॥

**श्रुति सांगतातः**—हे परमेश्वरा ! तुझ्याविषयीं दृढ भक्ति उत्पन्न होण्याला प्रथम मनोनिग्रह करितां येणें अवश्य आहे. एक वेळ इंद्रि-

यांचा जय करितां येईल; अथवा प्राणांचाही निरोध करितां येईल, परंतु मनाचें नियंत्रण करणें हें फार अवघड आहे. मोठमोठे योगी इंद्रियें व प्राण ह्यांचें नियमन करण्यास समर्थ होतात, पण त्यांना मनाला जिंकितां न आल्यामुळें त्यांचा इंद्रियजय व प्राणनिरोध व्यर्थ होतो; व मनाचा वरपगडा होऊन ते आत्मसुखास मुकतात! ह्मणून प्रथम मनाचा निरोध करितां आल्याशिवाय भगवद्भक्ति सुसाध्य नाहीं. 'मनोरूपी वेगवान् घोड्याचें संयमन करण्यास प्रथम लगामरूपी सद्गुरूंचा आश्रय केला पाहिजे. मनाचा आवर करण्याकरितां अन्य उपाय केले असतां केवळ क्लेश मात्र होतील. व नानाप्रकारचीं विघ्नें उत्पन्न होऊन सरतेसीं निराशा होईल! उदाहरण—समुद्रामध्यें नौकेवर सर्व सामुग्री यथास्थित असून नावाडी नसेल तर उतारूची जशी स्थिति होते, तशीच अवस्था, भगवद्भक्तीकरितां अन्य साधनें अनुकूल असून सद्गुरु नसेल तर होईल!

हे सर्वव्यापक परमेश्वरा, सद्गुरूचा लाभ होऊन अखंड भक्तियोग प्राप्त झाल्यावर मुमुक्षूला तुझ्या ब्रह्मतत्त्वाचें ज्ञान होऊन त्याचा मायामोह समूळ नष्ट होतो. तुझ्या पूर्णानंदस्वरूपांत मग तो निमग्न झाला, ह्मणजे स्त्री, पुत्र, देह, आप्त, सुहृत्, धन, भूमि, प्राण इत्यादि इंद्रियतृप्तीचे विषय त्यास अति तुच्छ वाटतात. जो कोणी मायेच्या उपाधीमुळें तुझें खरें तत्त्व समजून घेण्याचा प्रयत्न किंवा इच्छा करीत नाहीं, तो मात्र सदासर्वकाल भोगसाधनांत निमग्न राहून स्त्रीसुखांत रममाण होतो; परंतु स्वतःच नाशवंत व क्षुद्र अशा ह्या विषयोपभोगापासून त्यास

(१) "न करितां गुरुभजन। नव्हे भववृक्षाचें छेदन। जरी कोटि कोटि साधन। आनेआन केलिया॥ भववृक्षातें छेदिती। केवळ जाण गुरुभक्ति। अरि निर्दळणीं निश्चितीं। जेवीं निजशक्ति सुरांची॥ दुरी करावया दुरित। जेवीं गंगाजळ समर्थ। तेवीं भवभया भस्म करित। जाण निश्चित गुरुभक्ति॥" —**नाथ.**

खरें खरें सुख न होतां तो अधिकाधिक विपत्तींत पडतो! प्रभो, सद्गुरूची प्राप्ति होऊन भगवद्भक्तिद्वारा ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यावर प्राण्याला सदसद्विवेक उत्पन्न होतो. मग तो नानाप्रकारचीं विषयसुखें क्षुद्र व मिथ्या मानून त्यांचा तिरस्कार करितो. हें सर्व खरें: परंतु इतक्यावर भागलें असें मात्र समजणें प्रशस्त नव्हे. कारण, गुरूपदेशानें प्राप्त झालेली विवेकबुद्धि कदाचित् सुस्थिर न झाल्यास ती पुनः चंचल होईल, व त्यायोगें तो पुरुष फिरून पूर्वस्थितीला येईल; याकरितां इकडे अवधान असणें अवश्य आहे. म्हणून विवेकबुद्धि सुदृढ होण्यास सत्समसमागम नित्य घडला पाहिजे. देवाधिदेवा! मोठमोठे ऋषिही ह्याच मार्गाचें नित्य अवलंबन करितात. त्या ऋषींची योग्यता कांहीं सामान्य असते असें नाहीं, ब्रह्मतत्त्वाच्या उज्ज्वल ज्ञानानें त्यांनीं अहंकारग्रंथि तोडून टाकिलेली असते; तुझीं चरणकमलें नित्य त्यांच्या अंतःकरणांत वास करीत असतात; व त्यांना तुझ्या भक्तीमुळें इतकें पावनत्व आलेलें असतें कीं, त्यांच्या पादतीर्थानें अखिल पातकांचा नाश तत्क्षणांत होतो; तरी मन हें फार चंचल आहे, केव्हां बिघडेल त्याचा नियम नाहीं; असा निर्धार करून ह्या पृथ्वीवर असलेल्या अनेक पुण्यतीर्थांचा व देवालयांचा ते आश्रय करितात. कारण, अशा पवित्र स्थलींच महात्म्यांचें दर्शन घडून त्यांपाशीं सहवास करावयास सांपडतो. परमेश्वरा, सद्गुरुकृपेनें व सत्समागमानें जे पुरुष तुझ्या ध्यानमननांत सदैव रममाण होतात; ते मग गृहसौख्याचें कधींही सेवन करीत नाहींत. विवेक, स्थैर्य, धैर्य, क्षमा, दया, शांति इत्यादि सद्गुण संपादन करून सर्व वसु-

(१) " नाकळे तें कळे कळे तें नाकळे । कळ तें न कळे गुरूवीण । निर्गुणीं पावले सगुणीं भजतां । विकल्प धरितां जिव्हा झडे ॥"—**नाथ.**

(२) " सत्संगत्वे निस्संगत्वं निसंगत्वे निर्मोहत्वं निर्मोहत्वे निश्चलतत्त्वं निश्चलतत्त्वे जीवन्मुक्तः ॥—**आचार्य.**

येनें किंबहुना सर्व विश्वाचें कल्याण करणें हें आपलें कर्तव्य होय, असें मानून ब्रह्मचिंतन करणारे पुरुष ह्या सद्गुणांचा लोप करणाऱ्या प्रपंचांत पडत नाहींत. इति २।

## अध्याय ३ रा.

### सद्गुरूपासून काय शिकावें ( ११-३. )

प्रबुद्ध उवाच—

तस्माद्गुरुं प्रपद्येत जिज्ञासुः श्रेय उत्तमम् ॥
शाब्दे परे च निष्णातं ब्रह्मण्युपशमाश्रयम् ॥ २१ ॥

**योगेश्वर प्रबुद्ध म्हणाला:**—निमिराजा, विषयांपासून सुख नाहीं; म्हणून शिष्यानें निजसुख कोणतें तें जाणण्याची इच्छा धरून सद्गुरूला शरण जावें. तो सद्गुरु वेदार्थज्ञानांत आणि अपरोक्ष अनुभवांत ( ब्रह्मसाक्षात्कारांत ) निष्णात असावा. त्याला वेदार्थाचें न्यायघटित पूर्णज्ञान नसेल तर शिष्याचे संशय घालवितां येणार नाहींत, व ब्रह्मसाक्षात्कार घडलेला नसेल तर शिष्याच्या अंतरीं बोध ठसवितां येणार नाहीं. असा सद्गुरु ओळखितां यावा म्हणून त्याची खूण अशी कीं, ज्याचें चित्त सर्वकाळ ब्रह्मस्वरूपामध्यें लीन असतें, तो केवळ शांतीचें माहेरघरच, दयावान, निरहंकारी, वेदशास्त्रादिक पूर्ण जाणणारा, सर्वदेशी, सत्य असा असतो. तेथें मनुष्यानें गुरूच आपला आत्मा व देव होय अशी

( १ ) " तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत्समित्पाणिः श्रोत्रियं ब्रह्मनिष्ठम् " **अर्थ**—तें ब्रह्मज्ञान मिळण्यासाठीं जिज्ञासु पुरुषानें हातीं कांहीं तरी भेट घेऊन श्रुत्यर्थवेत्ता व ब्रह्मसाक्षात्कारवान् अशा गुरूला शरण जावें. ( २ ) "आचार्यवान् पुरुषो वेद " **अर्थ**—श्रेष्ठ पुरुष वेदार्थज्ञानांत आणि अपरोक्षानुभवांत निष्णात असतात.

बुद्धि ठेवून त्याची निष्कपटपणें सेवा चालवावी आणि त्याजजवळ भागवतधर्म शिकावा; त्या धर्माच्या आचरणानें परमेश्वर संतोष पावतो. तो हरि सर्वांचा आत्मा असून उपासकांना आत्मस्वरूपाची प्राप्ति करून देणारा आहे म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार करून देतो, व जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सोडवितो. राजा, प्रथम देह, स्त्री, पुत्र इत्यादि सर्व ठिकाणीं मन आसक्त न होऊं देणें हें शिकावें; नंतर सत्पुरुषांचा सहवास कसा संपादन करावा हें शिकावें; पुढें प्राणिमात्रांशीं ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें दया, मैत्री व विनय हीं ठेवण्याचा प्रकार तत्त्वतः ( निष्कपटपणें ) अवगत करून घ्यावा; ह्मणजे दीनावर दया, समानाशीं मैत्री व उत्तमाशीं विनयबुद्धि बाळगणें शिकावें; मग शरीराची व मनाची शुद्धि ( मृत्तिका, जल इत्यादिकांच्या योगें शरीराची बाह्यतः शुद्धि आणि दंभ, मान इत्यादि सोडून देणें ही अभ्यंतर शुद्धि ) कशी करावी. स्वधर्माचरण कसें करावें, परपीडा सहन करण्याचा उपाय कोणता, निरर्थक भाषण न करणें, अधिकारानुरूप वेदपाठादिक, सरळपणा, ब्रह्मचर्य (ऋतुकालींच स्त्रीशीं गमन इत्यादि जसें उचित तसें), विषयसुखाचा उपभोग करितांना कोणत्या मर्यादा पाळाव्या, दुसऱ्यास कोणत्याही प्रकारची पीडा न होण्याकरितां कोणती खबरदारी ठेवावी; सुखदुःख, शीत-

( १ ) " यस्य देवे पराभक्तिर्यथादेवे तथा गुरौ " **अर्थ**—ज्याप्रमाणें परमेश्वराच्या ठिकाणीं श्रेष्ठ भक्ति असते; जशी भक्ति देवावर असते तशी गुरूवर असावी.—**गुरुगीता.**

( २ ) " नैष तर्केण मतिरापनेया प्रोक्ताऽन्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठा " ब्रह्मज्ञान नुसत्या तर्कानें प्राप्त होत नाहीं, बा प्रियतमा, गुरूनें उपदेश केला असतां तें उत्तम साक्षात्काराला साधन होतें.—**श्रुति.**

( ३ ) " शरीर हिंवें जरी कांपे । तेणें देह कांपे साधकु न कांपे । शरीर अति उष्णें तापे । परी साधकु न तापे देहतापामाजीं ॥ "—**नाथ.**

उष्ण, जय-अपजय, इत्यादि द्वंद्वांपैकीं कोणतेही अनुकूल व प्रतिकूल स्थितींत मनाची उत्तम समता कशी व कां ठेवावी; सर्व प्राण्यांचे ठिकाणीं परमात्म्याचें तद्रूपात्मक वास्तव्य कसें आहे; एकांतीं वास करून ब्रह्मचिंतन करण्याची आवश्यकता कां? गृहादिकांवरचा अभिमान न बाळगणें. कोनाकोपऱ्यांत पडलेल्या किंवा जरूर नाहीं म्हणून टाकून दिलेल्या चिंध्यांवर अथवा वल्कलांवर कां निर्वाह करून घ्यावा; अनायासें मिळेल तितक्यांतच कसा चरितार्थ चालवावा इत्यादि गोष्टी सद्गुरूपासून फार कळकळीनें शिकाव्या.

**शिष्याचरणाचे नियमः**—राजा, ज्या शास्त्रामध्यें ईश्वराचें अस्तित्व व महत्त्व प्रतिपादन केलें असेल, त्या शास्त्रावर दृढ श्रद्धा ठेवावी; इतर शास्त्रांविषयीं प्रेम बाळगणें जरी सर्वथा वर्ज्य, तरी त्या शास्त्रांविषयीं तुच्छता किंवा निंदा इत्यादि प्रगट करूं नये; प्राणायाम करून मनाचा निग्रह करावा; मौन धरून वाणी आवरावी; औदासीन्यानें कर्माचा वेग क्षीण करावा; खरेपणा बाळगावा, अंतरिंद्रियांचा जय करावा. बाह्येंद्रियें वश करावीं, अद्भुत लीला करणाऱ्या हरीच्या गुणांचें, चरित्रांचें व अवतारांचें श्रवण. कीर्तन व ध्यान करावें; आपण जीं जीं कर्में करितों. तीं तीं भगवत्पदीं अर्पावीं, यज्ञ. दान, तप, व्रत, जप इत्यादिकांचें फल परमात्म्यास अर्पावें, घरदार, स्त्रीपुत्र, प्राण हीं सर्व भगवंताचींच आहेत अशी उदार बुद्धि ठेवावी, ईश्वरभजनीं रंगून जाणाऱ्या महात्म्यास फार मान देऊन त्याशीं मैत्री करावी, सर्व लोकांशीं गोडीनें वागावें. सुज्ञ मनुष्यें व सत्पुरुष ह्यांच्याविषयीं विशेष पूज्य बुद्धि धरावी. साधुसंतांचा समागम करून भगवंताच्या गुणानुवादांची चर्चा व कीर्तन करावें. त्यांबरोबर भगवंताचें पुण्यकारक यश नेहमीं गात जावें. परस्परांनीं ईशभजनांत परस्परांस गोडी उत्पन्न करावी, परस्परांनीं परस्परांस भगवंताच्या नानाविध लीला सांगून संतुष्ट करावें.

व उभयतांनीं आपापल्यामध्यें वसत असलेल्या दुःखांची निवृत्ति करण्यास झटावें. राजा, अखिल पातकांचा संहार करणाऱ्या भगवंतास स्मरून, भक्तांस इतकी विलक्षण स्फूर्ति उत्पन्न होते कीं, एकदम त्यांच्या अंगावर रोमांच उभे राहून गहिंवर येतो व भगवद्भजनांत स्वतः देहासह तल्लीन होऊन ते इतरांसही तल्लीन करून सोडतात. ते अच्युताच्या चिंतनांत निमग्न होऊन लोकव्यवहार सुद्धां विसरतात. व मग पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ते कधीं हंसत सुटतात, कधीं आनंदानें आपल्याशींच बोलत राहतात, कधीं नाचूं लागतात व अखेरीस ईशस्तवनांत निमग्न होऊन ब्रह्मरूप बनतात. अशा प्रकारें भागवत धर्माचें ज्ञान करून घेऊन नारायणाचें चिंतन करीत ते अनायासानें हा दुस्तर भवसमुद्र तरून जातात. इति ३ ।

---

# अध्याय ४ था.

## हरिभक्तीवांचून जीवांचें वैयर्थ्य ( २–३ )

शौनक उवाचः—

एतच्छुश्रूषतां विद्वान्सूत नो ऽर्हसि भाषितुम् ॥
कथा हरिकथोदर्काः सतां स्युः सदसि ध्रुवम् ॥ १४ ॥

**शौनकऋषि ह्मणाले:**—हे सूता, भगवद्भक्त एके ठिकाणीं जमले असतां, तेथें हरिकथेचीच चर्चा चालावयाची. भगवत्कथा फार आनंददायक असून चित्तास शांति उत्पन्न करणाऱ्या होत. त्या हरिकथांचेंच वर्णन नेहमीं ज्यांच्या संवादांत येतें, तो त्या उभयतांचा संवाद

ऐकण्याविषयीं आह्मांस फार आतुरता उत्पन्न झाली आहे. हरिकथा ऐकावयास मिळाव्या, एवढ्याच सद्धेतूनें मी हा प्रश्न विचारितों. कारण, भगवत्कथाश्रवणांत जो काल जातो, तोच सार्थकीं लागतो. त्या व्यतिरिक्त जेवढा म्हणून आयुष्याचा काल जाईल तो व्यर्थ आहे. बहुत कालपर्यंत वांचणें, श्वासोच्छ्वासादिक क्रिया घडणें आणि आहार, निद्रा व मैथुन यांतच निमग्न होऊन राहणें, म्हणजे कांहीं आयुष्याचें खरें साफल्य नव्हे. हेंच जर खरें साफल्य असेल, तर मग बहुत कालपर्यंत वांचणारे वृक्ष, श्वासोच्छ्वास करणारे सोनारलोहारादिकांचे भाते, आहार मैथुनादिकांतच रत असणारे इतर पशु, यांत आणि मनुष्यांत भेद तो कोणता? ज्यानें श्रीहरीचें नामसंकीर्तन कधींही श्रवण केलें नसेल, तो पुरुष श्वानसूकरादिकांहून देखील निंद्य होय. कारण त्या पशूंमध्यें सुद्धां आहारमैथुनादिकांविषयीं नियम असून शिवाय ते लोकांच्या उपयोगीं तरी पडतात. परंतु मनुष्यास तसे कांहीं नियम नसून तो यत्किंचित् देखील कोणाच्या उपयोगीं पडत नाहीं.

**देहविभिन्नता:**—हे सूता, जो मनुष्य परमेश्वराच्या लीला श्रवण करीत नाहीं, त्याचे कान म्हणजे भिंतीस असलेल्या बिळांसारखेंच होत. मस्तकावर मौल्यवान् मुकुट किंवा इतर भूषण घालून तें बहुत सुशोभित केलें, पण तें मस्तक जर परमेश्वरापुढें व संतांपुढें नम्र होत नाहीं तर तें मस्तक ह्मणजे निव्वळ ओझें होय; जी जिव्हा परमेश्वराचें

( १ ) " बहुतां सुकृतें, नरदेह लाधला । भक्तीविण गेला, अधोगती ॥ पाप भाग्य कैसें नरोरचा कर्म । नकळेचि वर्म, अरे मूढा ॥ अनंताजन्माचें, सुकृतपदरीं । त्याचे मुखा हरि, पैठा होय ॥ रावरंक होको उंचनीचयाती । भक्तीविण माती मुखीं त्याच्या ॥ एकाजनार्दनीं हरिहरि ह्मणतां । मुक्तिसायुज्यता पाठी लागे ॥"—**नाथ.**

( २ ) " नामाविणमुख सर्पाचें तें बीळ । जिव्हा नव्हे काळसर्प आहे ॥ वाचा नव्हे लाव जळो त्याचें जिणें । यातना भोगणें यमपुरीं ॥ "—**नाथ.**

नामस्मरण करीत नाहीं, ती जिव्हा ह्मणजे बेडकाच्या जिव्हेप्रमाणें व्यर्थ बडबड करणारी होय. हातांत मौल्यवान् कंकणें घालून जरी ते सुशोभित केले, तर ते केवळ प्रेताच्या हातासारखेच होत; मनुष्याचे डोळे जर परमेश्वराचें दर्शन घेत नसतील, तर ते नेत्र मोराच्या पिसाऱ्यावरील नेत्रांप्रमाणें व्यर्थ असून केवळ शोभेकरितां होत. मनुष्याचे चरण जर तीर्थयात्रा करीत नसतील, किंवा विष्णुमूर्तीचें दर्शन घेण्यास जात नसतील, तर ते चरण केवळ झाडाच्या खोडाप्रमाणें होत. ज्या मनुष्याचा देह भगवद्भक्तांच्या चरणधूलीनें कधींही पुनीत झाला नसेल त्याचें शरीर प्रेततुल्य होय; तसेंच ज्या पुरुषानें यावज्जन्म श्री विष्णुपदावरील तुलसीचें अवघ्राण केलें नसेल, तर तो जिवंत असून मेल्यासारखाच होय; ईश्वराच्या नामोच्चाराच्या योगानें अथवा कथाश्रवणानें ज्याचें चित्त द्रवत नाहीं, तो केवळ दगड असून त्याचें अंतःकरणही गोट्याप्रमाणेंच कठिण होय असें समजावें.

ऋषी हो, अशा प्रकारचे शुकाचार्यांचें तें देहबीभित्सता ईशश्रद्धताबोधक भाषण ऐकून श्रीकृष्णाच्या ठिकाणीं दृढभक्ति ठेवावयाची, असा परीक्षितीच्या मनाचा निश्चय झाला. त्यानें आपलें सर्व राज्य, अपार संपत्ति व ऐश्वर्य, सुंदर आणि सुशील अशी पत्नी, आज्ञाधारक पुत्र आणि स्वतःचें शरीर या सर्वांवरील ममता पार सोडून दिली; आणि दृढ प्रेमानें आपलें लक्ष्य ईश्वराकडे लावून त्या ईशभक्तींत तल्लीन झाला. इति ४ ।

---

# अध्याय ५ वा.

## विविध मतें (११-१४).

उद्धव उवाच –

वदन्ति कृष्ण श्रेयांसि बहूनि ब्रह्मवादिनः ॥
तेषां विकल्पप्राधान्यमुताहो एकमुख्यता ॥ १ ॥
भवतोदाहृतः स्वामिन्भक्तियोगोऽनपेक्षितः ॥
निरस्य सर्वतः संगं येन त्वय्याविशेन्मनः ॥ २ ॥

**उद्धव म्हणाला:**—श्रीकृष्णा! ह्या जन्माचें सार्थक कसें करावें, याविषयीं ज्ञाते लोकांचीं भिन्न भिन्न मतें आहेत. व ते आपापल्या मतांस अनुसरून साध्य वस्तूंच्या अनुरोधानें निरनिराळ्या मार्गांचें प्रतिपादन करितात; तेव्हां भिन्न भिन्न पुरुषार्थ व त्यांचीं साधनें यांमध्यें एका विशिष्ट पुरुषार्थाचें व साधनाचें प्राधान्य आहे; आणि बाकीचे पुरुषार्थ व त्यांचीं साधनें गौण आहेत. ह्याविषयीं विवेचन करून सांग. देवा, तुझा कटाक्ष तर सर्वसंगपरित्याग करून भगवद्भक्तीमध्यें रममाण व्हावें व ब्रह्मरूपीं मिळून जावें ह्यावर विशेष आहे. तेव्हां हाच मार्ग सर्व मार्गांमध्यें अत्यंत श्रेयस्कर आहे कीं काय?

**भगवान श्रीकृष्ण म्हणाले:**—बा उद्धवा, ह्या जन्माचें खरें कर्तव्य सायुज्य मिळविणें हेंच होय, व त्याकरितां उत्तम साधन निष्काम भक्ति हेंच आहे. आतां लोक निरनिराळीं मतें कां प्रतिपादन करितात, त्याचें बीज तुला सांगतों, ऐक. उद्धवा, देव, दानव गुह्यक इत्यादि प्रजा सत्वादिक गुणांच्या न्यूनाधिक्यामुळें निरनिराळ्या प्रकृतीच्या बनल्या

(१) "सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः। निबध्नन्ति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥" **अर्थ**--सत्व, रज व तम हे प्रकृतीपासून उत्पन्न झालेले गुण असत ते ह्या अविनाशी पुरुषाला ह्या देहामध्यें जखडून टाकतात.—**गीता.**

कारणानें त्यांच्या वासनाही प्रकृत्यनुरूप निरनिराळ्या झाल्या. ह्याप्रमाणें ह्या विश्वांतील पुरुष भिन्न भिन्न प्रकृतीचे झाल्यामुळें पुढें त्यांची संततिही तशीच पिंडानुसार भिन्न भिन्न प्रतीची झाली, आणि हाच क्रम अव्याहत चालू आहे; अर्थात् सत्वादिक गुणांच्या न्यूनाधिक्यामुळें जसें प्रकृतिवैचित्र्य निर्माण झालें, तसें ऐहिक कर्तव्याचें लक्षणही बदललें; आणि नंतर आपापल्या कर्तव्यावर दृष्टि देऊन, जो तो भगवद्वाक्यांचा आधार घेण्याकरितां वेदांचा अर्थ आपापल्या इच्छेप्रमाणें लावण्याचा प्रयत्न करूं लागला. महाज्ञानी व विद्वान् लोक खेरीज करून बाकीच्या लोकांनीं वेदांची फारच ओढाताण केली व करीत असतात. ज्ञानाचा अभाव असल्यामुळें कित्येक लोकांनीं केवळ गुरुसांप्रदायाप्रमाणें वेदांचा अर्थ केला, व ह्यामुळें कित्येक वेळां प्रधान गोष्टी दृष्टिआड होऊन एकाद्या गौण गोष्टीस महत्त्व मिळालें, आणि नास्तिक लोक तर वेदांचा अर्थच विपरीत करण्यांत निमग्न झाले. अशी एकंदर व्यवस्था आहे. असो. स्वभाववैचित्र्यामुळें मनुष्यांच्या बुद्धि भेद पावतातः—कित्येक पुरुष आत्मविचार वगैरे कांहीं करीत नाहींत, पण उपदेशपरंपरेनें वागत असतात म्हणून त्यांच्या बुद्धींत भेद उत्पन्न होतो; कांहीं लोकां-

(१) " यामिमां पुष्पितां वाचं प्रवदंत्यविपश्चितः । वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदां । क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ " **अर्थ**—वेदवचनांच्या अगदीं वरवर दिसणाऱ्या शब्दार्थामध्येंच गढून जाऊन त्यावांचून कांहीं नाहीं असें ह्मणणारे सकाम बुद्धीनें स्वर्गाच्या पाठीस लागतात, आणि भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं पुनः जन्म, पुनः कर्म असें फळ देणाऱ्या निरनिराळ्या पुष्कळ क्रिया ज्यांमध्यें सांगितल्या आहेत, अशा त्या वाक्यांची विशेष स्तुति करितात. परंतु अशा प्रकारच्या वेदवाक्यांचा वरपांगी अर्थ करून भोग व ऐश्वर्य यांमध्यें गढून त्यानें वेडावलेल्या ह्या मूर्खांची समाधीच्या वेळीं बुद्धि निश्चल राहूं शकत नाहीं.—**गीता.**

च्या बुद्धि तर वेदविरुद्ध अर्थाकडेच लागलेल्या असतात. हे पुरुषश्रेष्ठा, सगळ्या प्रकृतींना मूळकारण माया होय. अर्थात् माझ्या मायेनें बुद्धींना मोह घातल्यामुळें ते लोक स्वतःच्या कर्मानुसार व रुचीप्रमाणें कल्याणमार्ग अनेक प्रकारचे सांगत असतात. कित्येक लोकें नित्यनैमित्तिक कर्मच मोक्षसाधन म्हणतात; कित्येकांस आपला यशोदुंदुभि स्वर्गापर्यंत ऐकूं जावा अशी इच्छा असते, व ते त्यासाठीं लोकोत्तर पराक्रम करून दाखवावा म्हणून उपदेश करितात; कित्येक पुरुष, ह्या दुष्प्राप्य तनूचें लालनपालन करून सुखोपभोग मिळवावे असेंच सांगत सुटतात; कित्येक ' शांतीपरतें नाहीं सुख, येर अवघेंची दुःख ' ह्या वाक्याचा आग्रहानें अनुवाद करितात; कित्येक ' सत्य हेंच ब्रीद ' मानून ह्या जगांत सत्यानें वर्तावें असें प्रतिपादितात; कित्येक इंद्रियांचा जय केला असतां जन्माचें सार्थक होईल. असें निरूपण करितात; कि-

( १ ) " मोक्षार्थी न प्रवर्तेत तत्र काम्यनिषिद्धयोः । नित्यनैमित्तिके कुर्यात्प्रत्यवायजिहासया " अर्थ- मोक्ष मिळावा इच्छिणारानें सकाम व निषिद्ध कर्में करण्यास प्रवर्तू नये; प्रत्यवाय न घडावा एतदर्थासाठीं नित्यनैमित्तिक कर्में मात्र करीत जावीं. ( हें मीमांसक मत होय. )

( २ ) " यावत्कीर्तिर्मनुष्यस्य पुण्या लोकेषु गीयते । तावद्वर्षसहस्राणि स्वर्गलोके महीयते " अर्थ- जोंपर्यंत मनुष्याची निर्मळ कीर्ति लोकांमध्यें वर्णिली जात असते, तोंपर्यंत हजारों वर्षे तो स्वर्गलोकीं आनंदानें नांदत राहतो. ( असें अलंकारशास्त्रकार म्हणतात. )

( ३ ) " शास्त्रमर्यादात्यागपूर्वक भोजनं विषयोपभोगमेव पुरुषार्थं वदन्ति भस्मीभूतस्य देहस्य पुनरागमनं कुतः । तस्मात्सर्वप्रयत्नेन ऋणं कृत्वा घृतं पिबेतिवचनात् " अर्थ-शास्त्रमर्यादा सोडून विषय भोगणें हाच पुरुषार्थ म्हणतात. कारण, शरीर जळून भस्मीभूत झाल्यावर पुन्हां असा नरतनु मिळेल कोठून ? म्हणून होतील तितक्या प्रयत्नांनीं ऋण करून तूप पिणें योग्य होय. ( असें नास्तिकांचें मत आहे. )

त्येक वैभव हाच परम पुरुषार्थ असें वर्णन करितात; कित्येक सर्वसंगपरित्यागासच प्रधानपद देतात; कित्येक भोगप्राप्तीशिवाय इतर सर्व गोष्टी गौण मानितात; आणि कित्येक यज्ञयागादि क्रिया व व्रतेंकल्यें करून यमनियमादि साधनें अनुकूल करावीं म्हणून सांगत असतात.

उद्धवा. त्याप्रमाणें अनेक गोष्टी प्राप्त करून घेण्याकरितां लोक अनेक मार्गांची शिफारस करितात खरें, परंतु त्या सर्वच गोष्टी व त्यांच्या सिद्धीकरितां सांगितलेले सर्वच मार्ग वस्तुतः श्रेयस्कर आहेत, अशी तुझी समजूत असल्यास ती चुकीची आहे. कर्में करून मिळविलेले स्वर्गादिक लोक नाशवंत आहेत. त्यांचा परिणाम अखेरीस दुःखदायकच होतो; फार कशाला. उपभोगकालींसुद्धां निंदा, स्तुति, द्वेष. हेवा इत्यादिकांच्या अस्तित्वामुळें उपभोक्त्याला फारसा आनंद होत नाहीं. हे साधो, ज्यानें विषयांची इच्छा सोडून माझ्या ठिकाणीं चित्त लाविलें, त्याच्या अंतरीं मी परमानंदरूपानें प्रकाशमान होतों; मग त्या स्वस्वरू-

(१) " सदृशं चेष्टते स्वस्याः प्रकृतेर्ज्ञानवानपि । प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रहः किं करिष्यति ॥ " **अर्थ**-मनुष्य कितीही ज्ञानवान व निश्चयी असला तरी आपल्या प्रकृत्यनुरूप वागत असतो. तसेंच सर्व भूतमात्र सुद्धां आपापल्या प्रकृतीच्या वळणावर जात असतात. तेव्हां आग्रहपूर्वक अमुक एखादी गोष्ट करावयाची नाहीं, असा त्यांनी निश्चय केल्यास त्याचा काय उपयोग होणार.-**गीता**.

(२) " यत्कृतकं तत्तदनश्वरमिति व्याप्तिः " **अर्थ**—जें केलेलें तें नाशवंत, असा नियम आहे.—**बालप्रबोधिनी**.

(३) " सांडूनि फलाशा देहाभिमान । मज नार्पितां जे साधन । त्याचें फल दुःखरूप जाण । जन्ममरणदायक ॥ तिहीं साधनीं साधिले लोक । ते अंतवंत नश्वर देख । ते लोकींचें जें जें सुख । साखरेसि विख रांधिलें ॥ त्याचें जिव्हाग्रीं गोडपण । परिपाकीं अचुक मरण। तैसा तो क्षुद्रानंद जाण । शोकासी कारण समूळ ॥"

(४) " आभाळ गेलिया सविता । सहजेंचि दिसे आतौता । तेवीं गेलिया विषयावस्था । मी स्वभावता प्रकटची ॥ "--**नाथ**.

पसून परमानंदाच्या योगें त्याला जें सुख मिळतें. तें सुख विषयोपभोग मिळविण्यास हपापलेल्या पुरुषाला कधींही मिळत नाहीं. द्रव्यादिकांचा संग्रह न करणारा, इंद्रियें स्वाधीन ठेवणारा, चित्तवृत्तीनें आकलन करणारा, सर्वत्र समदृष्टीनें पाहणारा आणि माझ्या प्राप्तीमुळें संतुष्ट होणारा पुरुष सर्वकाळीं सर्वत्र आनंदांतच असतो. माझ्या चिंतनांत निमग्न असलेल्या पुरुषाला ब्रह्मदेवाचा अधिकार, इंद्राचें पद, भूमंडलाचें आधिपत्य, पातालांतर्गत सत्ता आणि अणिमादिक योगसिद्धि किंवा प्रत्यक्ष मोक्ष यांनींही महत्त्व वाटत नाहीं म्हणून ब्रह्मनिष्ठ पुरुष माझ्याशिवाय दुसऱ्या कशाचीही अपेक्षा करीत नाहीं. व त्यामुळें माझ्या व्यतिरिक्त बाकीचे सर्व विषय तो तुच्छ मानितो. इति १।

# अध्याय ६ वा.

## भक्तियोगाचे प्रकार ( ३–१०. )

देवहूतिरुवाच

**भक्तियोगस्य मे मार्गं ब्रूहि विस्तरतः प्रभो ॥ २ ॥**

**देवहूति म्हणाली:**—हे प्रभो कपिला ! तत्त्वांचें ज्ञान करून घेण्याचा मुख्य उद्देश भक्ति उत्पन्न व्हावी हा होय, असें सर्व विद्वान् म्हणतात. म्हणून आतां तूं त्या भक्तियोगाचा मार्ग कसा आचरावा तो विस्तारानें मला सांग.

(१) "बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विंदत्यात्मनि यत्सुखं। स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥" **अर्थ**-शब्दस्पर्शादि बाह्य विषयांमध्यें ज्याचें अंतःकरण गढलें नाहीं, व ब्रह्माशीं तादात्म्य पावलें आहे, अशा त्या योगयुक्त पुरुषाला आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं जें सुख मिळतें, तो त्या अक्षय्य सुखाचा उपभोग घेतो.-**गीता.**

**कपिलमहामुनि म्हणाले:**—माते देवहूति, भक्तियोग आचरण करण्याचे वेगवेगळे मार्ग अनेक असल्यामुळें भक्तियोग अनेक प्रकारचा झाला आहे. मनुष्यांच्या प्रकृति सत्व, रज व तम या तीन गुणांच्या होण्यानें त्यांच्या वृत्ति निरनिराळ्या असतात. म्हणून त्यांचे अभिप्राय-ही भिन्नभिन्न राहतात; ह्मणजे भक्ति करण्यामध्यें कोणाचा कांहीं एक प्रकारचें फल मिळविण्याचा संकल्प असतो, कोणाचा दुसरेंच कांहीं मिळविण्याचा उद्देश असतो. अशा निरनिराळ्या संकल्पावरून भक्तीचे-ही अनेक भेद झाले आहेत. त्यांत तामस, राजस व सात्विक हे तीन भेद मुख्य असून त्या प्रत्येकाचे आणखीही तीन तीन पोटभेद आहेत. आतां त्यांचे प्रकार सांगतों:—

**तामस भक्तीचे प्रकार:**-माते, मजविषयीं भेदबुद्धि (शंकर वेगळा व विष्णु वेगळा अशा प्रकारची समजूत) बाळगून मनांत दुसऱ्याविषयीं मत्सर किंवा हिंसा बुद्धिही ठेवून, अथवा दंभानें जे लोक माझी भक्ति करितात, ते तामस ( कनिष्ठ प्रतीचे ) भक्त होत. ह्या तामस भक्तांम-ध्येंही अधम, मध्यम व उत्तम असे तीन पोटभेद आहेत:-[१] हिं-सेसाठीं भक्ति करणारा अत्यंत अधम, [२] ढोंगी मध्यम, [३] मत्सरी ह्या तिघांत उत्तम.

**राजस भक्तीचे प्रकार:**-माते, भेदबुद्धि ठेवून विषयोपभोग, कीर्ति किंवा ऐश्वर्य मिळविण्याच्या इच्छेनें मूर्ति आदिकरून आराधना करणारे जे पुरुष ते राजस ( मध्यम प्रतीचे ) भक्त होत. ह्या राजस भक्तांचेही तीन भेद आहेत:-विषयोपभोगासाठीं भक्ति करणारा अधम, [२] कीर्तीसाठीं भक्ति करणारा मध्यम व [३] ऐश्वर्यासाठीं भक्ति करणा-रा ह्या तिघांत उत्तम.

**सात्त्विक भक्तीचे प्रकार:**-माते, माझ्या ठिकाणीं द्वैतभाव असून, पण त्यांतही केवळ पापक्षालनार्थ किंवा ईश्वरप्राप्तीसाठीं अथवा वेदाज्ञेचें

पालन करण्याकरितां जो पुरुष माझी भक्ति करितो तो सात्विक भक्त जाणावा. ह्या सात्विक भक्तांतही तीन भेद आहेत:—[१] पापक्षालनासाठीं भक्ति करणारा कनिष्ठ प्रतीचा होय; [२] ईश्वरप्राप्तीसाठीं सहेतुक भजणारा मध्यम आणि [३] वेदाज्ञापालक सर्वांत उत्तम होय. एतावता सात्विक, राजस आणि तामस असे भक्तीचे तीन प्रकार झाले त्या त्रिविध भक्तींचे आणखी तीन तीन भेद होऊन याचे एकंदर नऊ प्रकार आहेत. आतां त्या नवविधा भक्तीचे प्रकार सांगतों:-

नवविधा भक्तिः —

" श्रवणं कीर्तनं विष्णोः स्मरणं पादसेवनम् ॥
अर्चनं वंदनं दास्यं सख्यमात्मनिवेदनम् ॥ "

अर्थ—श्रवण, कीर्तन, स्मरण, चरणसेवा, अर्चन, वंदन, दास्य, सख्य आणि आत्मनिवेदन असे भक्तीचे नऊ प्रकार आहेत. ह्या प्रत्येकीचे आणखी नऊ नऊ भेद आहेत, मिळून एकंदर सगुण भक्तीचे प्रकार एक्यायशीं झाले. मात देवहूति, निर्गुणभक्ति तशी नव्हें; त्याचा प्रकार एकच आहे. तो सांगतों:-

**निर्गुण भक्ति**—माझ्या लीला श्रवण करूनच ज्यांचें अंतःकरण कोणत्याही फलाची इच्छा आणि भेदबुद्धि न धरितां, केवळ भक्तिरसानें परिप्लुत होतें, आणि गंगोदकाचा ओघ जसा समुद्राकडेसच असतो, त्याप्रमाणें ज्याचा अंतःकरणाचा ओघ नेहमीं मजकडेसच असतो. त्याचें तें निष्काम अंतःकरण तेथेंच रममाण होतें, अशा स्थितीलाच निर्गुणभक्तीचें लक्षण ह्मटलें आहे. अशी निर्गुणभक्ति करणाऱ्या पुरुषांना मी

सालोक्य, सार्ष्टि, सामीप्य, सारूप्य आणि सायुज्य या मुक्ति दिल्या तरी देखील ते घेत नाहींत. कारण, त्यांना माझी सेवा करण्याची मात्र गोडी लागलेली असते, म्हणून त्याशिवाय इतर कांहीं एक नकोसें वाटतें. तर मग ऐहिक वस्तूंविषयीं इच्छा कोठून उद्भवणार बरें ? म्हणून ह्यालाच ' आत्यंतिक ( अढळ ) ' भक्तियोग असें म्हणतात. ह्याच्या योगानें मनुष्य सत्त्व, रज व तम ह्या त्रिगुणांचें कार्य जो संसारसमुद्र त्याचें उल्लंघन करून माझ्या ब्रह्मरूपास प्राप्त होतो. माते, आतां अशी भक्ति उत्पन्न होण्याला योग्य साधन कोणतें, तें तुला सांगतो:—

**भागवतधर्माचरण**—माते, प्रथम मनुष्यानें निश्चिंतपणें विश्वासपूर्वक उत्तम रीतीनें परमेश्वरार्पणबुद्धि ठेवून स्वधर्माचरण करावें; निष्काम बुद्धीनें यज्ञयागादिकांपुरतीच हिंसा करून 'पंचरात्रादि आगमामध्यें सांगितलेल्या पद्धतीप्रमाणें माझें पूजन करावें. माझ्या मूर्तीचें दर्शन, अर्चन, पूजन, स्तुति, वंदन आणि सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणीं अभेदत्वें " हीं माझींच ( परमेश्वराचींच ) स्वरूपें आहेत " अशी भावना ठेवावी; अंतःकरण गंभीर राखावें; कोणत्याही विषयांच्या ठिकाणीं आसक्ति ठेवूं नये, म्हणजे विरक्त असावें; आपल्याशीं समानशील असणाऱ्या लोकांशीं मैत्री ठेवावी; सत्पुरुषांचा योग्य सन्मान करावा; अनाथांवर दया करावी; यमनियमादिकांचें धारण करावें; माझें नामस्मरण करावें; आत्मस्वरूपाचें प्रतिपादन करणाऱ्या शास्त्रांचें वारंवार श्रवण आणि अवलो-

( १ ) मजबरोबर एका लोकीं राहणें. ( २ ) माझ्यासारखीं ऐश्वर्यें भोगणें. ( ३ ) माझ्याजवळ असणें. ( ४ ) माझ्यासारखें रूप असणें. ( ५ ) माझ्या स्वरूपीं ऐक्य पावणें. ( ६ ) योगप्रकरण ९ वा अध्याय पहा. ( ७ ) " श्रद्धावांल्लभते ज्ञानं तत्परः संयतेंद्रियः । ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधि गच्छति ॥ " **अर्थ**—इंद्रियनिग्रह करून गुरुशास्त्रांच्या ठिकाणीं दक्ष असणाऱ्या भाविकालाच ज्ञान प्राप्त होतें. आणि ज्ञान झाल्यावर लवकरच मोक्षरूपी श्रेष्ठ शांति मिळते.—**गीता**.

करून करावें; मन नेहमीं शांत व सरळ ठेवावें; सत्पुरुषांची संगति धरावी; तसेंच देहादिकांविषयीं अभिमान सोडून द्यावा. याप्रमाणें वर सांगितलेलीं हें सर्व आचरण करून जो पुरुष भागवत धर्माचें आचरण करितो, त्याचें अंतःकरण अगदीं निर्मळ होतें. व त्यानें भगवद्गुण श्रवण केले कीं, तात्काळच त्याचें अंतःकरण त्या ठिकाणीं जडून जातें. ह्याचा पुष्कळांना अनुभव आला आहे. पद्म–पुष्पादि पदार्थांच्या योगानें वायु जसा घ्राणेंद्रियास आपल्या स्वाधीन करून घेतो. ह्मणजे सारखा वासच घेत रहातें असें करतें; तसें अंतःकरण निर्विकल्प होऊन भक्तियोगांत रममाण होऊं लागलें ह्मणजे तें मन परमेश्वराला वश करून घेतें. मी सर्व प्राण्यांचा आत्मा असल्यामुळें सर्व प्राणिमात्रांचे अंतर्यामीं मी नेहमीं वास करितो. हें न ओळखितां जो पुरुष केवळ अनात्मदेहावरच ( जड शरीरावरच ) आत्मदृष्टि ठेऊन माझ्या मूर्तीचें पूजन करितो, तो नुसता ढोंगी होय. सर्वांतर्यामी जो मी, त्या मला ( ब्रह्मस्वरूपाला ) न ओळखितां जो मूर्तिपूजा करीत बसतो, तो नुसत्या भस्मामध्येंच आहुति देतो. अर्थात् भस्मांत होम करणें जसें कांहीं अर्थाचें नाहीं, त्याप्रमाणें सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणीं भेदबुद्धि ठेवून माझ्या मूर्तीचें पूजन करणें निरर्थक होय. कोणत्याही प्राण्याशीं वैर करणें ह्मणजे त्याच्या शरीरांत राहणाऱ्या माझ्याशीं द्वेष करणेंच होय. जो मानी पुरुष " आपला आत्मा वेगळा व दुसऱ्याचा आत्मा वेगळा " अशी भेदबुद्धि ठेवून दुसऱ्याच्या शरीरांत राहणाऱ्या माझ्याशीं द्वेष करितो, त्याचें मन कधींही शांति पावत नाहीं देवहूति, जो मनुष्य स्वतांमध्यें आणि दुसऱ्यामध्यें स्वल्पही अंतर आहे असें मानून प्राणिमात्रांबरोबर वैरभाव धरितो, त्यानें

( १ ) " देहाभिमाने गलिते विज्ञाते परमात्मनि ॥ यत्रयत्रमनोयाति तत्रतत्र समाधयः ॥ " अर्थ—देहादिकांचा अभिमान नष्ट होऊन परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यावर जेथें जेथें मन जाईल तेथें तेथेंच त्याला समाधि राहते.—**शंकराचार्य.**

सर्वतोपचारांनीं जरी माझी पूजा केली, तरी मी मुळींच संतुष्ट होत नाहीं. याकरितां माझें सर्वांतर्यामीं वास्तव्य आहे, हें न ओळखणाऱ्या पुरुषानेंच आपलीं नित्यनैमित्तिक कर्मे करून सांपडेल तितक्या अवकाशांत मूर्तीचे ठिकाणीं माझें पूजन करावें. " जो मनुष्य स्वतःहून किंवा प्राणिमात्रांहून परमेश्वर निराळा आहे असें मानितो, त्या भेददृष्टि पुरुषाला मी स्वतःच संसारदुःख देतो आणि मृत्युभयही उत्पन्न करितो. " म्हणून मनुष्यानें प्रिय वस्तूंचें दान, सत्कार, मैत्री व समदृष्टि ह्या साधनांच्या योगानें सर्वांतर्यामीं वास करणारा जो मी, त्या माझें सर्वांभूतीं पूजन करावें. त्याचा प्रकार असाः—आपल्यापेक्षां जे श्रेष्ठ असतील त्यांचा बहुमान करावा, आपल्याबरोबरीचे असतील त्यांच्याशीं स्नेह राखावा, आपल्यापेक्षां हीन असतील त्यांचें प्रेम संपादून त्यांस संतुष्ट राखावें व सर्वांभूतीं समदृष्टि असूं द्यावी. अशा प्रकारें पूजन करणाऱ्या पुरुषास उत्तम भक्ति प्राप्त होते; त्यायोगें तो परमपदास पावतो. इति६।

---

(१) "उदरमंतरंकुरुतेऽथतस्यभयंभवति" **अर्थ**—ईश्वरापासून मी (आत्मा) निराळा आहे असें जो जाणतो त्याला भय प्राप्त होतें, म्हणजे जन्ममरणरूपी यंत्रांत सांपडून भ्रमण करतो.—**श्रुति**.

(२) " अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च । निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः । मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ **अर्थ**—कोणाही भूतमात्रांचा द्वेष न करितां सर्वांशीं मित्रत्वानें राहून सर्वांवर करुणा करणारा, ममकार व अहंकार दूर करून सुखदुःखें सारखींच समजणारा, क्षमाशील व संतुष्ट राहून दृढनिश्चयानें आत्म्याचेठायीं रत असणारा योगी, असा जो माझ्या ठिकाणीं मन व बुद्धि लाविलेला; तो माझा भक्त मला आवडतो.-**गीता**.

# अध्याय ७ वा.

## ईश्वराला प्रिय भक्ति. ( ११—११ ).

उद्धव उवाच.—

एतन्मे पुरुषाध्यक्ष लोकाध्यक्ष जगत्प्रभो ॥
प्रणतायाऽनुरक्ताय प्रपन्नाय च कथ्यताम् ॥ २७ ॥

**उद्धव म्हणाला**:—भगवंता, तूं ब्रह्मदेवादिकांचा नियामक, सकल लोकांचा अध्यक्ष व जगाचा पालक आहेस. माझें तुजवर अत्यंत प्रेम असून मी तुला शरण आलों व तुझ्या चरणीं लीन झालों आहें. करितां प्रभो, तुला प्रिय अशा भक्तांचें लक्षण मला निवेदन करावें.

**भगवान् श्रीकृष्ण म्हणाले**:—उद्धवा, साधकानें माझ्या मूर्तीचें व भगवद्भक्तजनांचें दर्शन घ्यावें; त्यांना आलिंगन द्यावें; त्यांची पूजा करावी; सेवा करावी; त्यांचे गुणानुवाद गावे; त्यांना साष्टांग प्रणिपात करावे; त्यांचीं स्तोत्रें ह्मणावीं; त्यांचीं चरित्रें वर्णावीं; माझी कथा ऐकण्याविषयीं श्रद्धा बाळगावी; माझें चिंतन चालवावें; जें कांहीं मिळेल तें मला अर्पण करावें; माझ्या सेवेंत प्रत्यक्ष आपला देहही मला अर्पण करावा; माझ्या अवतारांचें वर्णन करावें; जन्माष्टमी, एकादशी व इतर पर्वकाळीं माझे उत्सव करावे, माझ्या मंदिरांत गाणें, वजावणें, नाचणें, कथा वगैरे सुरू करवावीं. संवत्सरभर पर्वापर्वास माझ्या यात्रा कराव्या;

( १ ) " दर्शनादर्चनादस्य त्रिसप्तकुलसंयुताः । अज्ञा मुक्तिपदं यांति किं पुनस्तत्परायणाः ॥ " **अर्थ**—साधूचे दर्शनापासून आणि सेवेपासून अज्ञानी लोकांच्या एकवीस पिढ्या मुक्ति पावतात, तर मग जो ब्रह्मनिष्ठ आहे त्याचे विषयीं तर बोलावयासच नको.

( २ ) " जेवीं दुधालागीं मांजर । सैंधी पहावया सादर । तेवी सेवावया कथासार निरंतर उल्हासू ॥ "—**नाथ.**

पूजा आटोपून महानैवेद्य समर्पण करावे; वेदोक्त किंवा पुराणोक्त दीक्षा धारण करून मजकरितां व्रतवैकल्यें करावीं; माझी मूर्ति स्थापन करण्याविषयीं आदरबुद्धि धरावी; सामर्थ्य असल्यास स्वतः किंवा सामर्थ्य नसल्यास चारचौघांनीं मिळून देवळें, सभामंडप, फुलबाग, गांव व नगरें स्थापन करण्याचा उद्योग करावा; माझ्या देवळांत झाडलोट करणें, सडासंमार्जन करणें, रांगोळी वगैरे घालणें व इतर सर्व व्यवस्था ठेवणें इत्यादि कृत्यें त्यानें मनापासून चालवावींत; चाकर जशीं कामें करितो, तशीं हीं कामें माझ्याकरितां न लाजतां करावीं; मनाची अपेक्षा नसावी, ढोंग माजवूं नये; आपण केलेल्या सत्कृत्यांबद्दल परिस्फोट करूं नये; मला अर्पण केलेल्या वस्तूंचा उपभोग घेऊं नये; फार कशाला, माझे देवळांत लाविलेल्या दिव्याच्या प्रकाशाचा सुद्धां स्वार्थाकडे उपयोग करूं नये. व जो जो पदार्थ लोकांत सर्वांना आवडता असेल, अथवा आपल्याला अत्यंत प्रियकर असेल, तो तो पदार्थ मला अर्पण करावा, ह्मणजे त्यापासून अनंतफल प्राप्त होतें.

---

( १ ) हाट हाटवटिया चौपासीं । नगर वसवावें देवापाशीं । वेदाध्ययन शास्त्रश्रवणेशीं । अहर्निशीं कीर्तनें ॥ ''--**नाथ.**

( २ ) '' षड्भिर्मासोपवासैस्तु यत्फलं परिकीर्तितम् । विष्णोर्नैवेद्यसिक्थेन तत्फलं भुंजतां कलौ ॥ हृदि रूपं मुखे नाम नैवेद्यमुदरे हरेः । पादोदकं च निर्माल्यं मस्तके यस्य सोऽच्युतः ॥ '' **अर्थ**—सहा महिने उपवास केले असतां जें फल मिळतें आहे, तें फळ कलियुगामध्यें विष्णूला अर्पिलेल्या नैवेद्यांतील एक शीत भक्षण करणाराला प्राप्त होतें. जो मनुष्य हृदयामध्यें हरीचें रूप, मुखामध्यें नाम, उदरामध्यें नैवेद्य व चरणतीर्थ आणि मस्तकी निर्माल्य वागवितो तो साक्षात अच्युत होय.—**श्रीधर**, तसेंच नाथ ह्मणतातः—'' देवासी समर्पिलें आपण । कां आणिकीं केलें निवेदन । तें घेऊं नये आपण । देवलकपण तो दोष ॥ देवाचा प्रसाद घेतां । लोभें न घ्यावा सर्वथा । आधीं वांटावा समस्तां । अल्प मात्र तो स्वयें घ्यावा । दीपू समर्पिला श्रीहरि । तेणें नँ वर्तावें गृहव्यापारीं । हें बोलिलें आगमशास्त्रीं । स्मृतिकारीं सज्ञानीं ॥ ''

उद्धवा; सूर्य. अग्नि. ब्राह्मण, गाई, विष्णुभक्त, आकाश, वायु, उदक, पृथ्वी, आत्मा व सकल भूतें ह्या अकरांच्या ठिकाणीं माझी विभूति असल्यामुळें हीं सर्व पूज्य होत. अर्थात् ह्यांच्या ठिकाणीं केलेली पूजा ती माझीच होय. तिन्हीं वेदांत सांगितलेल्या सूक्तांनीं सूर्याची आराधना करावी. होमद्रव्यांनीं अग्नीमध्यें हवन करावें; ब्राह्मणांचें आतिथ्य करावें; गाईंना तृणादिक आहार घालावे; वैष्णवांना ( भगवद्भक्तांना ) आपल्या बंधूंप्रमाणें मानून त्यांची शुश्रूषा करावी; आकाशाची पूजा करण्यास हृदयाकाशांत माझें ध्यान करावें; वायूची पूजा करण्यासाठीं वायु हा आपला प्राण आहे, ही भावना दृढ करावी; उदकामध्यें असलेल्या माझ्या विभूतीचें त्याच उदकाच्या योगानें व दुसऱ्या पूजासाहित्यानें पूजन करावें; पृथ्वीची[1] पूजा करणें. ती भूमीवर स्थंडिलें करून त्या स्थंडिलांची वेदमंत्रांनीं पूजा करावी; आत्म्याची पूजा करावयाची ती देहात्म्यास उपभोग्य वस्तू अर्पण करून पूजा करावी; व सर्व भूतांची पूजा करितांना सर्वांच्या ठिकाणीं समभावानें मी वास करितों, असें मनांत आणून माझें अर्चन करावें. ह्या एकादश वस्तूंमध्यें माझी चतुर्भुज आणि शंख. चक्र, गदा व पद्म धारण करणारी शांत मूर्ति वास करिते, असें चिंतन करून एकाग्र चित्तानें माझी पूजा करावी. उद्धवा. साधकानें इंद्रियें स्वाधीन ठेवावी, यज्ञयागादिक वैदिक कर्मांचें अनुष्ठान करावें, व विहिरी, तलाव. घाट, धर्मशाळा वगैरे बांधाव्या, ह्मणजे माझी दृढभक्ति उत्पन्न होते, आणि नंतर साधकानें साधूंची सेवा केली ह्मणजे तत्त्वज्ञान प्राप्त होऊन माझ्या ध्यानांत तो रममाण होतो. बाबा, भगवद्भक्ति व साधुसमागम ह्यांवांचून संसार तरून जाण्यास दुसरा

( १ ) भक्तिप्रकरणाच्या एकवीसाव्या अध्यायांतील अग्निपूजेचा प्रकार पहा.

उत्तम उपाय नाहीं. साधूंचा अंतरात्मा माझ्या ठिकाणीं नित्य आसक्त असल्यामुळें त्यांच्या समागमानें माझी प्राप्ति सहजच सुलभपणें होते. इति ७।

---

# अध्याय ८ वा.

## वरपांगी भक्तिवर्णन ( १०-८९ ).

श्रुत्युवाच—

**यदि न समुद्धरंति यतवो हृदि कामजटा दुरधिगमो ऽसतां गतो ऽमृतकंठमणि ॥ असुतृदयोगिनामुभयतो ऽप्यसुखं भगव-न्ननपगतांन धादनधिकृढपदाद्भवतः ॥ ३९. ॥**

**श्रुति सांगतात**:—हे लोकनायका! जीवांना नानाविध दुःखें भोगावीं लागतात, ह्याचें कारण त्यांनीं अंगिकारलेली माया ही होय. ही मायोपाधि नष्ट होण्याकरितां जीवांनीं आपलें चित्त अंतर्मुख करून तुझ्या ध्यानमननादिकांत निमग्न झालें पाहिजे. जीवांनीं तुझ्या ( परमात्म्याच्या ) प्राप्तीसाठीं हृद्गत कामवासना आधीं निर्मूल करावी. सर्वसंगपरित्याग करूनही हृदयांत विषयांची इच्छा स्थिर राहिल्यास विचारानें त्या त्या पदार्थांतील दोष लक्षांत आणून वैराग्यबळेंकरून त्या विषयांशीं त्यागपूर्वक वागावें, म्हणजे भगवत्प्राप्तीच्या साधनांमध्यें मुळींच प्रमाद उद्भवणार नाहीं. हृद्गत भोगेच्छा उपटून न टाकितां अंतर्यामीं तुझें ध्यान करीत राहिल्यानें कांहींच अर्थलाभ होत नाहीं. यावर **उदाहरण**—आपल्या गळ्यांत घातलेल्या कंठमालेचें विस्मरण झा-

---

( १ ) " सोनें साडेपंधरें चोखडें । त्यासि रत्नाची संगति जोडे । तें अधिकाधिक मोल चढे । मुकुटीं चढे महिंद्रचे ॥ तैशी पुण्यें पुरुषा सत्संगति । जाहल्या अनंत सुख पावती ॥ सुरवर त्यातें वंदिती । शिवादि येति भेटीसी ॥"-**नाथ.**

त्यानें जशी ती समीप असून वाया जाते; तसेंच हृदयग्रंथी ( संशयाची गांठ ) भेदण्याचा पुरुषार्थ न करितां भव्य यतिवेष धारण करून तुझें भजन करीत राहण्याचें बाह्य अवडंबर व्यर्थ होय. व अंतरींची दुर्बुद्धि नष्ट न होतां अंतःकरणांत कितीही परमेश्वर आठविला, तरी तो पावत नाहीं. अशा संन्याशांनीं इंद्रियांच्या तृप्तीसाठीं एक प्रकारचें सोंगच स्वीकारिलें असावें, असें ह्मणावयास हरकत नाहीं. अशा संन्याशांना " इदं च नास्ति न परं न लभ्यते " अशी स्थिति प्राप्त होते. गृहस्थाश्रम करून जीं ऐहिक सुखें त्यांस प्रसिद्धपणानें उपभोगितां येतात, तीं त्यांस चोरून उपभोगावीं लागतात. आपण विरक्ताचें सोंग आणिलें आहे. उघडपणें भोग भोगावे तर ' छिः थू : ' होईल; आणि लोकांचें आर्जव करणें, धनादिक मिळविणें वगैरे गोष्टी करूं लागल्यास आपणांस लोक हंसतील अशी भीति वाटून त्या ढोंग्यांस मनांत तळमळावें लागतें. कारण, तुझ्या स्वरूपाच्या अप्राप्तीमुळें त्यांची अविद्या सुटलेली नसते. आणि त्यांनीं ढोंग्यासारखी बनावणी करण्यासाठीं स्वधर्मा-

( १ ) " लभन्ते ब्रह्मनिर्वाणमृषयः क्षीणकल्मषाः । छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रताः ॥ " **अर्थ** - अर्जुना, संशयाची गांठ तोडून आत्मनिग्रह करून सकल प्राणिमात्रांच्या हितामध्यें गर्क झालेल्या धूतपाप साधुनाच अखंड **ब्रह्मसुखाचा** लाभ मिळतो. - **गीता.**

( २ ) " अनाश्रितः कर्मफलं कार्यं कर्म करोति यः । स संन्यासी च योगी च न निरग्निर्न चाक्रियः ॥ " **अर्थ—कर्मफलावर** आशा न ठेवतां जो कर्तव्यकर्म करीत असतो, तोच संन्यासी, तोच योगी समजावा. ज्यानें अग्निकार्य किंवा ज्ञानसाधनें सोडून दिलीं आहेत, तो कांहीं संन्यासी नव्हे, किंवा योगीही ह्मणवीत नाहीं. – **गीता.**

( ३ ) " कर्मेन्द्रियाणि संयम्य य आस्ते मनसा स्मरन् । इंद्रियार्थान्विमूढात्मा मिथ्याचारः स उच्यते ॥ " **अर्थ—कर्मेंद्रियांचा निग्रह करून जो मूर्ख मनानें विषयांचें चिंतन करीत असतो, त्याला ढोंगी ह्मणतात.—गीता.**

चरण त्याग केलेला असतो. म्हणून त्यांना परलोकीं नरकयातना भोगणें भाग पडते. एकंदरींत जें शास्त्रोक्त साधन सामुग्रीनें भगवंताची सेवा करितात, ते मात्र संसार तरून जातात; इतर संसारदुःख भोगीत राहतात, हा निश्चय होय. कोणी संन्याशाचें बाह्य सोंग घेऊन वमनतुल्य विषयांचे आंतून आसक्तीपूर्वक उपभोग चालवतील तर त्यांना भगवत्प्राप्ति होणार नाहीं; इतकेंच नव्हे तर त्यांना इहलोकीं सुख होणार नाहींच, पण उलट अनेक कुयोनींत जन्म घ्यावे लागतील हा सिद्धांत होय. ह्यावर कोणी शंका घेईल कीं, ' अहो, संन्याशाला कर्तव्य असें कांहींच नसतें; तो सुख भोगून केवळ प्रारब्ध कर्माचा क्षय करीत असतो; मग तुह्मी त्याला उभयलोकीं दुःख भोगावें लागतें, अशी व्यर्थ त्याची निंदा कां करितां? ' तर त्याचेंही उत्तर सांगतोः—

हे षड्गुणैश्वर्यसंपन्न ईश्वरा, साधकानें देहाभिमान सोडल्याशिवाय त्याला तुझें ( परमात्म्याचें ) यथार्थ ज्ञान होऊन त्याची जन्ममरणपरंपरा सुटत नाहीं; ह्याकरितां ऐहिक सुखाविषयीं पूर्ण विरक्ति धारण करून तुझ्या प्राप्तीसाठीं साधकानें सर्वदा प्रयत्न करावा. एकदां अशा रीतीनें तुझ्या उपासनेंत व परब्रह्मस्वरूपांत प्राणी रंगून गेला, म्हणजे तो आपल्या प्राक्तन कर्माचीं तुझ्याकडून प्राप्त झालेलीं सुखदुःखात्मक फळें उपभोगीत असतां त्यांविषयीं सुखसंवेदना किंवा दुःखसंवेदना त्यास मुळींच होत नाहींत. मग त्याला अमुक एक कर्तव्य अथवा अमुक एक अकर्तव्य अशी ओळखसुद्धां नसतें, व तो प्रत्येक युगांतील संप्र-

( १ ) " कामान्यः कामयते मन्यमानः स कर्मभिर्जायते तत्र तत्र " **अर्थ**—जो पुरुष विषयांचे दोष लक्षांत न आणितां त्यांच्या गुणाकडे चित्त देऊन त्यांच्या भोगाची इच्छा धरितो, तो त्या इच्छेमुळें विषयप्राप्तीसाठीं त्या त्या योनीस जातो, **म्हणजे कामवासना त्याला वेगवेगळीं कर्में** करायाला लावितात, आणि त्या कर्मांमुळें **तो कामवेष्टित जीव त्या त्या योनींत जन्मास येतो.**

दायानुरूप तुझ्या ध्यानमननादिकांत केवळ यदृच्छेनें निमग्न होऊन तुझें स्वरूप चित्तांत सांठवितो, आणि तुझ्या कृपेनें मोक्ष सुलभ करून घेतो. इति ८।

---

# अध्याय ९ वा.

## भेदभक्तिवर्णन ( ३-३२ )

कपिल उवाच —

आद्यः स्थिरचराणां यो वेदगर्भः सहर्षिभिः ॥
योगेश्वरैः कुमाराद्यैः सिद्धैर्योगप्रवर्तकैः ॥ १२ ॥
भेददृष्ट्या ऽभिमानेन निःसंगेनापि कर्मणा ॥
कर्तृत्वात्सगुणं ब्रह्म पुरुषं पुरुषर्षभम् ॥ १३ ॥

कपिल महामुनि म्हणाले:-माते देवहुति, ईश्वराची अभेदबुद्धीनें भक्ति केली असतां भगवद्भक्तांना तत्काल भगवंताची निरंतर प्राप्ति होते; व भेदबुद्धि न ठेवितां म्हणजे परमेश्वरबुद्धीनेंच हिरण्यगर्भाची उपासना करणारांना क्रमानें मुक्ति मिळते; परंतु भेददृष्टीनें उपासना केली तर मात्र तिच्यापासून नित्यमुक्ति मिळत नाहीं. ह्याच गोष्टीचें स्पष्टीकरण तुला सांगतो. पहा—ब्रह्मदेव सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टि उत्पन्न करतो, तेव्हां त्याच्या प्रभावाबद्दल विशेष कांहीं सांगायाला नकोच; व त्याचें ज्ञान देखील अपरंपार आहे. कारण, सर्व ज्ञानाचें भांडार जे वेद ते त्याच्या उदरांत आहेत. तो निष्काम कर्में करीत असतो. मरीचिप्रभृति ऋषि, सनत्कुमार आदिकरून मोठमोठे योगी व योगमार्ग प्रवृत्तणारे दुसरे पातंजलादिक सिद्ध पुरुष ह्यांची योग्यताही ब्रह्मदेवासार-

खीच आहे. तो सर्वसिद्ध, मुनि व ब्रह्मदेव आपल्या निष्काम कर्मांमुळें सर्वांच्या अंतर्यामीं राहणाऱ्या व नाना ऐश्वर्य आदिकरून गुणांनीं भरलेल्या श्रेष्ठ परमेश्वररूपी ब्रह्मपदास प्राप्त होतात. पण "मी सृष्टिकर्ता" अशा अधिकारामुळें उत्पन्न झालेल्या अभिमानानें म्हणजे 'देह व आत्मा वेगळे' अशा भेदबुद्धीमुळें व सृष्टीच्या आरंभीं ईश्वररूपी कालाच्या योगानें सत्व, रज व तम ह्या तीन गुणांत न्यूनाधिक्य झाल्यामुळें त्या ब्रह्मदेवाला पुनः पहिल्याप्रमाणें जन्म घ्यावा लागतो. त्याचप्रमाणें ऋषिप्रभृतींचीही तीच स्थिति होते. त्यांनाही पुन्हां जन्म घेऊन आपापल्या अधिकारावर यावें लागतें. कारण त्यांचाही अभिमान नष्ट झालेला नसतो. याप्रमाणें प्रत्यक्ष ब्रह्मदेवास निष्काम पण भेदबुद्धीनें जर उपासना केली, तर पुनर्जन्म घ्यावा लागतो; तर मग कामनीक भक्ति करणारांना तो घ्यावा लागतो यांत नवल तें काय? माते, आतां काम्यकर्मांचीं लक्षणें व योग्यता तुला सांगतोंः—

**काम्यकर्मांचा परिणामः**–माते, अमुक फळ मिळविण्याची इच्छा असेल तर अमुक कर्म करावें, असें ज्या कर्मांबद्दल सांगितलेलें असतें, तीं काम्यकर्में होत. हीं कर्में फलाची इच्छा नसेल तर करूंच नयेत असें मात्र कोठें सांगितलें नाहीं; परंतु त्यांचीं फलें तुच्छ व नश्वर असल्यामुळें तीं निंद्य आहेत. ह्या जगांत कित्येक लोक कर्में करण्यामध्यें मनाची आसक्ति ठेवून व ह्यांच्या योगानेंच आह्मांला उत्तम गति मिळेल असा विश्वास बाळगून काम्य आणि नित्य ( स्नान संध्यादि ) अशीं सर्व प्रकाराचीं कर्में करीत असतात. कारण, रजोगुणानें त्यांच्या मनाला

( १ ) " दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय। बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः॥ " **अर्थ—**हे अर्जुना! सकाम बुद्धीनें केलेलें कर्म फारच वाईट. ह्मणून कर्मप्रवर्तक त्या समबुद्धीला शरण जा. फळाचा हेतु धरून कर्म करणारे कृपण ( क्षुद्र ) हेत.—**गीता.**

बंधन प्राप्त झालेलें असतें. उपभोग्य पदार्थांकडे त्यांच्या चित्ताची ओढ असते. म्हणून इंद्रियें त्यांच्या स्वाधीन नसतात. गृहकृत्यांत ते अगदीं गढून गेलेले असतात; व ते प्रतिदिवशीं पितरांची आराधना करितात. असे पुरुष, धर्म, अर्थ व काम या त्रिविध पुरुषार्थांविषयींच तत्पर असल्यामुळें भगवान् मधुसूदनाच्या कथेविषयीं विन्मुख होतात. हें साहाजिकच होय. विष्ठाभक्षण करणाऱ्या प्राण्यांच्या पुढें पड्रसान्न ठेविलें तर त्यांना जसें तें प्रिय न वाटून विष्ठाच गोड लागते; त्याप्रमाणेंच हे लोक परमेश्वराचें कथामृत टाकून देऊन दुसऱ्या अभद्र गोष्टीच श्रवण करितात; यास्तव ते पुरुष खरोखर दुर्दैवी होत. गर्भाधान संस्कारापासून स्मशानविधीपर्यंत सर्व संस्कारविधि करणारे लोक धूम नांवाच्या दक्षिणमार्गानें अर्यमा नांवाच्या पितरांच्या राजाच्या पितृलोकास जातात, व तेथून पुनः आपल्या पुत्रादिकांच्या उदरीं जन्मास येतात. हे महापतिव्रते देवहूति. हे लोक कर्माधीन असतात, म्हणून ते अस्थिर होत; कारण, कर्मानें उत्पन्न झालेलें संचित पुण्य संपलें कीं, देव तत्काल त्यांचीं भोगसाधनें काढून घेतात; व मग अर्थातच ते लोक फिरून मृत्युलोकास येतात; म्हणून काम्यकर्म अत्यंत निंद्य होत. याकरितां तूं परमेश्वराची निष्काम उपासना कर.

माते देवहूति ! परमेश्वराच्या ठिकाणीं निष्काम भक्ति करणाऱ्या मनुष्याला संसाराविषयीं उपरति उत्पन्न होते; व त्या योगानें वैराग्य प्राप्त झालें असतां परब्रह्माचा साक्षात्कार करून देणारें अपरोक्षज्ञान त्याला होतें. अशा भक्ताचें चित्त भगवद्गुणाच्या प्रीतीनें त्याच्या ठिकाणीं निश्चल होऊन, इंद्रियांच्या धर्मामुळें उत्पन्न होणारें "अमुक मला आवडतात, व तमुक आवडत नाहींत" अशा प्रकारचें वैषम्य त्याच्या ठिकाणीं राहत नाहीं. अशी स्थिति झाली कीं, त्या शुद्ध झालेल्या अंतःकरणाच्या योगानें त्या मनुष्याला "मी परमानंद सुखास प्राप्त

झालों आहे, " असें लागलीच निश्चयात्मक ज्ञान उत्पन्न होतें. त्यास चिदानंदरूपी आत्म्याच्या ठिकाणीं त्याज्य अथवा ग्राह्य हा भेद मुळींच नसतो. ह्मणून तो निःसंग, निर्विकल्प, ज्ञानरूपी आहे. इति ९ !

---

# अध्याय १० वा.

## भगवद्भक्तांचीं लक्षणें ( ११-२. )

राजोवाच—

अथ भागवतं ब्रूत यद्धर्मो यादृशो नृणाम् ॥
यथाचरति यद्ब्रूते यैर्लिंगैर्भगवत्प्रियः ॥ ४४ ॥

**विदेहराजा ह्मणालाः**— मुनिवर्य ! मला आतां भगवद्भक्ताचीं लक्षणें नीट समजावून सांगा. भगवद्भक्त कोणत्या धर्माचें आचरण करण्यांत तत्पर असतो. त्याचा स्वभाव कसा असतो, लोकांत त्याची वागणूक कशी असते, त्याचा भाषणप्रकार कसा असतो, व तो कोणत्या विशेष गोष्टीमुळें भगवंताला प्रिय होतो; कृपा करून हें सर्व मला निवेदन करा.

**योगेश्वर हरि म्हणतातः**—राजा, जो पुरुष " मी स्वतः ब्रह्मरूप आहें " असें जाणून सर्व भूतांच्या ठिकाणीं माझेंच रूप आहे; व माझ्या ( आत्म्याच्या[१] ) ठिकाणीं सकल भूतें आहेत, अशी दृष्टि ठेवितो तोच उत्तम भगवद्भक्त होय. राजा, ईश्वर, भक्त, मूढ आणि शत्रु ह्या चौघांवर जो अनुक्रमानें प्रेम, मैत्री, कृपा आणि उपेक्षा ठेवितो म्हणजे जो पुरुष ईश्वरावर प्रेम, भगवद्भक्तांशीं मैत्री, अज्ञजनांवर दया व शत्रू-

( १ ) " सर्वां भूतीं मी भगवंत । सर्व भूतें तीं मज आंत । भूतां भूतात्मा मींचि समस्त । मीच मी येथ परमात्मा ॥"—नाथ

ना क्षमा करितो, तो मध्यम प्रतीचा भगवद्भक्त समजावा. कारण, त्याच्या ठिकाणीं अंशतः भेदभावना वास करिते. जो कोणी भगवंताच्या प्रतिमेची मात्र श्रद्धाभक्तिपूर्वक पूजा करितो, परंतु भगवद्भक्तांची देखील करीत नाहीं; तर मग इतरांची करणार नाहीं हें उघडच आहे. तो भक्त प्राकृत ( संस्कारहीन ) किंवा अगदीं नवशिक्या ( ज्यानें भक्तीला नुकताच प्रारंभ केला असा होतकरू ) समजावा. कारण, त्याच्या ठिकाणीं द्वैतभावना विशेष असून ईशप्राप्तीची इच्छा मात्र दिसून येते. हीं उत्तम, मध्यम व प्राकृत अशा भगवद्भक्तांचीं संक्षिप्त लक्षणें तुला सांगितलीं. आतां उत्तम भागवतांचीं सविस्तर लक्षणें सांगतों, तीं ऐक:—

**उत्तम भागवतपुरुषांचीं लक्षणें:**—राजा, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पांच विषयांचे ठिकाणीं ज्या पुरुषाची आसक्ति नसते, व यदाकदाचित् त्यांची प्राप्ति झाली, तरी ते विषय व तज्जन्य सुखदुःख हें सर्व मायिक आहे, असें ज्ञान होऊन ज्याच्या मनावर त्यापासून होणाऱ्या क्षुद्र सुखाचा किंवा दुःखाचा परिणाम होत नाहीं; त्यासच उत्तम भागवत समजावा. चित्ताचा वासुदेवरूपीं लय लागल्यामुळें ज्याला विषयांची आवडनिवड कांहीं नसते; अर्थात् इंद्रियांनीं बरेवाईट कमलेंही विषय भोगले, तरी ज्याला हर्ष-विषाद होत नाहीं; पण हें विश्व विष्णूच्या मायेचा खेळ आहे असें वाटत असते, तो उत्तम भगवद्भक्त होय. उत्तम भागवत पुरुषास असें वाटतें कीं, जन्म-मरण हे देहाचे धर्म आहेत, सुखदुःख हे इंद्रियांचे धर्म आहेत, क्षुधा—तृषा हे प्राणा-

( १ ) "पाषाणप्रतिमा हाचि देवो । तेथेंचि ज्याचा पूर्ण भावो । भक्तजनासि पहाहो । अणुमात्र देहो लवों नेदी ॥ ते ठायीं साधारण जन । त्यांची वार्ता पुसे कोण । त्यांसि स्वप्नींही नाहीं सन्मान । यापरी भजन प्राकृताचें ॥ " —**नाथ**

( २ ) मृगजळांत वाहणारा जसा कोरडा राहतो, तसा जो पुरुष विषय भोगूनही अलिप्त असतो तो उत्तम भक्त.—**एकनाथांचा अभिप्राय.**

चे धर्म आहेत, संकल्प, विकल्प हे मनाचे धर्म आहेत, निश्चय हा बुद्धीचा धर्म आहे; पण मी यांचा साक्षी ( पाहणारा ) आहें, असा समजणारा उत्तम भक्त होय. जो पुरुष हरीचें नित्य स्मरण ठेवितो, आणि विषयेच्छेनें व देह, इंद्रियें, प्राण, मन व बुद्धि यांच्या क्रमानें जन्म-मरण सुखदुःख, क्षुधा-तृषा, संकल्प-विकल्प, निश्चयात्मक ह्या धर्मांनीं मोह पावत नाहीं; तो भगवद्भक्तांमध्यें प्रधान भक्त होय. राजा, या उत्तम भागवताचें ह्याशिवाय आणखी लक्षण असें कीं, त्याच्या ठिकाणीं बीजरूप वासना, त्यापासून उत्पन्न झालेली इच्छा व इच्छेमुळें उद्भवलेलें कर्म ह्यांचा मुळींच प्रादुर्भाव नसतो, आणि त्याचें मन नित्य भगवच्चरणारविंदीं निमग्न असतें. राजा, चांगल्या कुलांत जन्म, तपश्चर्यादि कर्में, ब्राह्मणादि वर्णांत जन्म, ब्रह्मचर्यादि आश्रम व धर्म ह्यांमुळें ज्याचा ह्या देहावर अभिमान जडत नाहीं, तो पुरुष परमेश्वराला प्रिय होतो. आणि ज्याला वित्ताविषयीं 'हें माझें व तें दुसऱ्याचें' असा भेद वाटत नाहीं, अथवा आत्म्याविषयीं 'हा मी आणि तो परका' अशी भेदबुद्धि असत नाहीं, उलट जो सर्व भूतांशीं समभावानें वागतो, व नित्य शांत असतो, त्याला उत्तम भगवद्भक्त ह्मणतात. आणखी, त्रैलोक्याचें

---

( १ ) हरिस्मरणाचा असा विलक्षण प्रभाव आहे कीं, तें करणाराला क्षुधा भय, इत्यादि संसार धर्मांचें स्मरणच होत नाहीं.—**नाथांचा** अभिप्राय.

( २ ) " अद्वेष्टसर्वभूतानां मैत्रःकरुणएव च । निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ संतुष्टःसततं योगी यतात्मा दृढ निश्चयः । मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ " **अर्थ**—कोणाही भूतमात्राचा द्वेष न करितां सर्वांशीं मित्रत्वानें राहून सर्वांवर दया करणारा, ममता व अहंकार दूर करून सुखदुःखें सारखींच समजणारा, क्षमाशील व सदा संतुष्ट राहून दृढ निश्चयानें आत्मनिग्रह करून नेहमीं योगामध्यें गढलेला असा जो माझा भक्त, आपलें मन व बुद्धि माझ्या ठिकाणीं लावून असतो, तो मला आवडतो.—**गीता.**

राज्यैश्वर्य मिळत असलें तरी जो भगवंताच्या चरणकमलापासून लवमात्र सुद्धां ढळत नाहीं. व ईशचरणा वेगळें दुसरें कोठें कांहीं सार नाहीं अशी स्मृति ज्याच्या चित्तांत जागरूक असते. तोच उत्तम विष्णु भक्त होय !

**भगवद्भक्तांचें माहात्म्यः**—राजा, देव सनकादिक ऋषि, ज्यांच्या ध्यानांत सदैव निमग्न असतात, अशा भगवच्चरणकमलांच्या ठिकाणीं उत्तम भागवत पुरुषाचें मन इतकें रत झालेलें असतें कीं, त्यास त्रैलोक्याचें राज्यवैभव द्यावयास तयार झाले, तरी त्यास भगवत्पदाचा महिमा पूर्णपणें अवगत झाल्यामुळें तो राज्यवैभवाचा मुळींच अंगीकार करीत नाहीं. उदाहरण—चंद्राच्या शीतलतेनें शांति झाल्यावर, ज्याप्रमाणें सूर्याच्या तापाचा प्रभाव* चालत नाहीं, त्याप्रमाणें भगवत्पदाच्या नखरूप चंद्रकांत मण्यांच्या शीतल प्रकाशानें एकदा परमशांति उत्पन्न झाल्यावर विषयोपभोगांविषयीं प्रेरणा करणाऱ्या मायामोहाचा प्रभाव भगवद्भक्तांच्या मनावर चालत नाहीं. राजा, भक्तीचा महिमा असा कांहीं विलक्षण आहे कीं मनुष्यानें संकटसमयीं देखील जरी भगवंताचें नांव मात्र घेतलें, तरी तो भक्तांच्या सर्व पातकांचें क्षालन करून स्वतः त्याच्या मनांत जाऊन वसतो; व जर तेथें अन्य वासना उद्भवूं लागेल, तर ती तत्काल नाहींशी करून टाकतो ! भगवान् भक्तांच्या अंतर्यामीं वास करून भक्तांची जी ही सेवा करितो, तिचें कारण, भक्तानें प्रेमरूप पाशाच्या योगानें भगवंतास असें बांधून टाकलेलें असतें कीं, भक्तांचें हित करणें हें त्या परमेश्वरास अगदीं भाग पडतें. इति १० ।

---

( १ ) " बाळ पालवीं ( पदरीं ) घाली पिळा । तेणें बाप राहे थोपला । तरी काय तो निर्बळ जाहला । ना तो स्नेहें भूलला ढळेना ॥ "—**नाथ.**

न्यता वाटून नेत्रांतून आनंदाश्रूंचा लोट वाहवयास पाहिजे! उद्धवा, अशा भक्तीनें पहिलें फल चित्ताची शुद्धता हें होय. एकदा भक्ताचें चित्त निर्मल होऊन ब्रह्मसाक्षात्काराच्या योगें प्रसन्न झालें, म्हणजे तो भगवद्गुणकीर्तनांत रंगून जाऊन आनंदभरित होतो. परमात्म्याच्या अनुग्रहामुळें त्याच्या चित्तास पाझर फुटतो; त्याचें देहभान नाहींसें होऊन तो कधीं कधीं वेड्यासारखा हंसत व रडतही सुटतो. आणि भगवंताचें यश गात असतां जनलज्जा सोडून देऊन ओरडावयास व नाचावयासही लागतो! अशा प्रकारें माझे भजनांत रंगून गेलेला माझा भक्त इतका सामर्थ्यवान् असतो कीं, तो आपल्या स्वतःस जन्म-मरणरूप संसारांतून मुक्त करितो, इतकेंच नव्हे, तर त्याचें दर्शन अर्चनादिक करणाऱ्या सर्व पुरुषांस तो सायुज्यपद प्राप्त करवून देतो!

**भक्तीचें माहात्म्य**—उद्धवा, माझ्या प्राप्तीकरितां प्रथम साधन चित्ताची शुद्धि संपादणें हेंच मुख्य होय. चित्तशुद्धीला भगवद्भक्तीवांचून अन्य उपाय केवळ गौण आहेत. पहा–सुवर्णाची पूर्ण शुद्धि करावयाची झाल्यास त्यास अग्नि हेंच प्रधान साधन आहे; इतर साधनांनीं सुवर्णाची अंतःशुद्धि कधींही घडत नाहीं; तद्वत्, चित्ताच्या शुद्धीकरितां भक्तिच श्रेष्ठ साधन आहे. म्हणून भक्तीच्या योगानें चित्ताची कर्मजन्य वासना दग्ध होते; मग त्या कर्मजन्य वासनेचा नाश होतांच, भगवद्भक्त माझ्या सच्चिदानंद स्वरूपांत ऐक्य पावतो. उद्धवा, निर्मल भक्तीच्या योगानें साधकाला माझ्या स्वरूपाचें अपरोक्षज्ञान होऊन तो मद्रूप होऊन जातो, ही गोष्ट सकृद्दर्शनीं अशक्य वाटते; परंतु निर्मल

(१) "दर्शनादर्चनादस्य त्रिसप्तकुलसंयुताः। अज्ञा मुक्तिपदं यांति किं पुनस्तत्परायणाः॥" **अर्थ**--योगी पुरुषाच्या दर्शनानें व अन्नोदक वगैरे अर्चना-(पूजन) ने अज्ञाचीं एकवीड कुळें पावन होतात; मग त्यांत जे निमग्न असतात, त्यांच्याविषयीं संशय घेणें नकोच!—**आचार्य.**

भक्तीपासून उत्पन्न होणाऱ्या अभेद बुद्धीनें विचार केला, म्हणजे असंभावनादि संशय निश्चयानें दूर होतात. भगवद्गुण कथांचें श्रवणमननादिक सुरू झालें कीं, चित्तशुद्धि होण्यास प्रारंभ होऊं लागतो; व त्या शुद्धीबरोबर अंतःकरणांत अपरोक्षज्ञानाचा प्रादुर्भाव होऊन त्याला आत्मसाक्षात्कार होतो. पहा—कलुषित झालेल्या नेत्रांत अंजन घातलें असतां, त्यांना निर्मलत्व प्राप्त होऊन जसे ते सूक्ष्म वस्तू पाहण्यास समर्थ होतात; तद्वत भगवद्भक्त ह्या भक्तिरूप अंजनानें अंतःकरणरूप नेत्र शुद्ध करून त्यायोगें ब्रह्मानुसंधानद्वारें ब्रह्मसाक्षात्कार करण्यास समर्थ होतो! शब्दादि पंच विषयांत गढून गेलेल्या पुरुषाचें मन जसें त्यांतच अधिकाधिक मग्न होऊन जातें, तसें भगवद्भजनांत निमग्न झालेल्या साधकाचें मन भगवद्भक्तींत अधिकाधिक रंगून जातें; आणि शेवटीं माझ्या ठिकाणीं पूर्ण लय पावतें.

( ३ ) **भक्तिविघ्न निवृत्त्युपाय**—उद्धवा, ऐहिक स्रक्‌चंदनवनितादि विषयोपभोग हीं स्वप्नगत विषयांप्रमाणें मिथ्या मानून त्याग कर, व माझ्या भक्तीनें पवित्र केलेलें आपलें मन माझ्या स्वरूपचिंतनांत निमग्न कर. बाबा, स्त्रिया व स्त्रीलंपट पुरुष भगवद्भक्तीमध्यें व्यत्यय आणण्यांत अग्रगण्य असतात; ह्यास्तव त्या उभय विषयलंपटांच्या संगतीपासून दूर रहा. ही गोष्ट घडण्याकरितां मनाचा पूर्णपणें निग्रह कर; आणि ज्या ठिकाणीं भगवच्चिंतनास व्यत्यय आणणारीं विघ्नें तयार असतील, त्या ठिकाणीं मुळींच वास्तव्य न करितां निरुपद्रव अशा एकांत स्थळीं वसती कर; व सर्व उपाधि टाकून तेथें निरालसपणानें माझ्याच चिंतनाचा अभ्यास चालीव, म्हणजे परमपद अर्थात् मोक्ष प्राप्त होतो. इति ११ ।

---

# अध्याय १२ वा.

## भक्तिप्राप्तीचा उपाय ( ७-७ ).

प्रल्हाद उवाच—

तत्रोपायसहस्राणामयं भगवतोदितः ॥
यदीश्वरे भगवति यथा यैरञ्जसा रतिः ॥ २९ ॥

**प्रल्हाद म्हणालेः**--हे दैत्यपुत्रांनो, ज्ञान प्राप्त करून घेण्याचे हजारों उपाय आहेत; पण त्यांपैकीं सुलभोपाय नारदांनीं मला सांगितला तो हा कीं, ज्यांच्या पूर्ण अनुष्ठानानें षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वरावर अचल भक्ति जडेल, त्याच धर्मांचें आचरण करावें. तें असें:--गुरूची सेवा, ईश्वराची आणि साधूंची भक्ति करावी, व त्यांजवर पूर्ण प्रेम ठेवावें; मिळालेल्या सर्व वस्तु त्यांना अर्पाव्या; साधूंची व भक्तांची संगति धरावी; त्यांची मनोभावानें पूजा करावी; त्यांच्या चरणकमलांचें ध्यान करावें; त्यांचीं गुण व चरित्रें गावीं; त्यांच्या मूर्तीचें दर्शन करीत असावें; आणि सर्वांभूतीं भगवान् सर्वत्र भरलेला आहे, अशी दृढबुद्धि ठेवून प्राण्यांच्या त्या त्या इच्छा पुरवाव्या, व सर्वांचा उत्तम प्रकारें सन्मान करावा. याप्रमाणें साधन करीत जे लोक कामक्रोधादि षड्रिपूंना जिंकून इंद्रियांचें दमन करितात, आणि परमेश्वराची निष्कामसेवा करतात, त्यांची ईश्वरावर दृढभक्ति जडते. अशा प्रकारें ज्याची परमेश्वरावर दृढभक्ति जडली, तो पुरुष त्याचीं चरित्रें मोठ्या प्रेमानें गातो, त्या वेळीं त्याला आपल्या देहाचें भान राहत नाहीं; आणि त्या निस्सीम भक्ताची वृत्ति तल्लीन होऊन तो नाचूं लागतो. त्याच्या अंगावर रोमांच उभे राहतात; त्याचा कंठ आनंदानें सद्गदित होतो; डोळे आनंदाश्रूंनीं भरून येतात; आणि त्याच्या मनांत ईश्वराच्या ज्या ज्या लीला

येतील तशाच तो करूं लागतो. यामुळें तो जगाच्या दृष्टीनें अगदीं वेड्यासारखा दिसतो. कारण तो कधीं हंसतो, कधीं रडतो, कधीं ओरडत फिरतो, कधीं टाळ्या वाजवूं लागतो, आणि कधीं कधीं नाचूं लागतो. त्याला ईश्वरावांचून दुसरें कांहींच दिसत नाहीं. मग जग आपल्याबद्दल हंसतें आहे कां रडतें आहे हें त्याला कशानें समजणार? अशी स्थिति झाली कीं, त्या पुरुषाचीं सर्व बंधनें तुटून जातात; संसाराचें मुख्य बीज जे रागद्वेष व त्याचें कारण अज्ञान हीं सुद्धां जळून जातात; आणि निस्सीम भक्तीच्या योगानें तो आत्मस्वरूपीं लय पावतो, म्हणजे त्याचें जन्ममरणरूप संसृतिचक्र मोडून जातें. आणि तो ब्रह्मस्वरूपीं लय (मोक्ष) रूप परमानंद सुखास प्राप्त होतो. बालकांनो, तुह्मी आपल्या हृदयांत असणाऱ्या आत्म्याचें चिंतन चालवा. त्याच्या साक्षात्काराचें साधन फारच सोपें आहे. पहा,—त्याच्या पूजेकरितां व त्याला वश करून घेण्याकरितां अनेक साधनें जुळविण्याची कांहीं गरज नाहीं. फक्त अंतःकरणरूप पुष्पमात्र त्याला वाहिलें, ह्मणजे सर्व जगांतील सर्व पदार्थ त्याला अर्पण केल्यासारखेंच होत !

**विषयतुच्छता**—मुलांनो, द्रव्य, घर, ऐश्वर्य, पुत्र व आपलें शरीर हीं सर्व नाशवंत आहेत. मनुष्याच्या क्षणभंगुर आयुष्यांत त्यांचा उपभोग तो त्याला कितपत मिळणार ! बरें, यज्ञयागादि कर्में करून स्वर्ग प्राप्त करून घ्यावा, तर तोही नश्वर. मग त्यापेक्षां आत्मप्राप्तीच्या साधनाकडे लागलें तर काय वाईट? पहा,—या लोकीं सुखप्राप्तीकरितां जीं जीं कर्में करावीं, त्यांचें फल अगदीं विपरीत मिळतें, अर्थात् त्याच्या इच्छेची तृप्ति होत नाहीं, हें उघडच आहे ! बरें, कदाचित् सुख प्राप्त होतें असें कल्पिलें, तर तें भोगणारा जो देह तो तरी शाश्वत आहे का? तेंही मुळींच नाहीं. मग अशा अशाश्वताकरितां अशाश्वताचा संग्रह करण्यांत लाभ तरी कोणता? मनुष्य ज्याच्यासाठीं काम्य-

कर्मे करून भोग मिळविण्याची इच्छा करितो, तो देह तर क्षणभंगुर आहे; व केव्हांच नाहींसा होतो, आणि लागलाच दुसरा नवा मिळतो. ही देहाची जर अशी स्थिति, तर मग स्त्रिया, घर, ऐश्वर्य, पुत्र यांची तर गोष्टच बोलावयास नको. देह सुद्धां हे सगळे पदार्थ तुच्छ व नश्वर असून हितकर्त्यासारखे भासतात; पण ते अनर्थकारी आहेत. आत्म्याला ह्यांचा उपयोग काय ? तो तर नित्य आनंदाचाच महासागर होय. दैत्यपुत्रहो ! तुह्मीच विचार करा कीं, या संसारांत प्राण्याचा स्वार्थ आहे तरी कोणता ? गर्भवासापासून तों तहत देहांतापर्यंत त्याला यत्किंचित् तरी सुख मिळतें काय ? पूर्व कर्मांमुळें हा प्राणी देह पावतो, आणि मनाच्या इच्छेप्रमाणें वागून पुनः देहद्वारा कर्मेंच करीत असतो. ह्मणून जन्मास यावें आणि मरावें या चक्रांतून केव्हांही बाहेर पडत नाहीं. यास्तव या कर्मांचाच नाश करणारें असें जें ईश्वराचें निष्कामभजन तें तुह्मी स्वच्छंदानें करा; ह्मणजे स्वरेश्वर तुमचें कल्याण होईल ! मग तुह्मी दैत्य असा, देव असा, यक्ष असा, गंधर्व असा किंवा कोणीही असा, त्या ईश्वरापाशीं कपलाही भेदभाव नाहीं. तो निष्कामभक्ति करणाऱ्याला सर्व दुःखांपासून मुक्त करितो, आणि सायुज्यही देतो. दैत्यहो ! आजपर्यंत यक्ष, राक्षस, स्त्रिया, शूद्र, गवळी, पशू, पक्षी इत्यादि थोडे कां या भक्तीच्या योगानें तरले आहेत ! या लोकीं प्राण्याचा खरा स्वार्थ म्हटला ह्मणजे इतकाच आहे कीं, सर्वांभूतीं ईश्वर आहे असें मानावें, आणि त्यांची निस्सीम भक्ति करावी. इति. १२ ।

# अध्याय १३ वा.

## साधूंचीं लक्षणें ( ११-११. )

उद्धव उवाच—

साधुस्त्वयोत्तमश्लोक मतः कीदृग्विधः प्रभो ॥ २६ ॥

**उद्धव ह्मणाला:**—प्रभो, जगामध्यें ज्याच्या त्याच्या बुद्धीप्रमाणें कल्पिलेले साधु अनेक आहेत; पण तुला मान्य असा साधु कोणत्या प्रकारचा असतो, व त्याचीं लक्षणें कशीं असतात, तें मला सांग.

**भगवान श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा, मला मान्य अशा साधूंचीं लक्षणें कोणतीं ह्मणून तूं विचारतोस, तर तीं सांगतों ऐक—तो साधु पुरुष फार दयाळु असतो; तो कोणाशींही द्रोह करीत नाहीं; त्याचें चित्त नित्य प्रसन्न असतें; तो सत्यापासून कधींहि ढळत नाहीं; कधीं कोणाच्याही निंदा स्तुति करण्याच्या भानगडींत पडत नाहीं; सुख किंवा दुःख कसलाही प्रसंग असला, तरी त्याची चित्तवृत्ति सारखी ( हर्षविषादरहित ) असते; तो सर्वांवर यथानुशक्ति उपकार करीत असतो; तो आसक्तिरहित असल्यामुळें विषयादिकांपासून त्याच्या चित्ताला क्षोभ होत नाहीं; तो अगदीं जितेंद्रिय असतो; तो सदाचारसंपन्न असतो ह्मणून त्याचें चित्त दीनांचें दुःख पाहून कळवळतें; तो धनादि सुखोत्पादक पदार्थांचा स्वीकार करीत नाहीं; तो ऐहिक भोगसाधनाविषयीं लुब्ध नसतो; तो देहनिर्वाहापुरताच अल्प आहार करितो; तो अत्यंत विरक्त असतो, ह्मणून त्याची बुद्धि धर्माच्या ठिकाणीं स्थिर राहते; तो सर्वथैव माझ्या ध्यानमननांत तत्पर असतो; तो सदैव ब्रह्मचिंतनांत निमग्न राहतो; अगदीं हयगय करीत नाहीं ह्मणून त्याचें चित्त गंभीर असतें; कधीं संकटाचा प्रसंग आला तरी तो धैर्य धरून असतो, अर्थात्

त्याच्या ठिकाणीं उत्तम विवेक असतो; क्षुधा, तृषा, शोक. मोह, जरा, मृत्यु ह्या साही विकारांना जिंकिलेला असतो; तो स्वतः मानाची अपेक्षा धरीत नाहीं, पण दुसऱ्याला मान देण्यांत तत्पर असतो; तो इतरांना ज्ञानोपदेश करण्यांत दक्ष असतो; तो कोणाल्याही फसविण्याची हांव बाळगीत नाहीं, परंतु करुणेनेंच एखादें परोपकाराचें काम करण्यास प्रवृत्त होतो, व त्याला सकल गोष्टींचें सम्यक् ज्ञान असतें. उद्धवा, वेद हें माझेंच स्वरूप होय, त्या रूपानें मींच धर्म सांगून टेविले आहेत. हे वेदप्रणीत धर्म आचरिल्यानें चित्त शुद्ध व ज्ञान प्राप्त होतें. आणि न आचरिल्यानें चित्तभ्रंश व नरक प्राप्त होतो. हें जरी खरें आहे तरी पण हे धर्म भगवद्ध्यानांत विक्षेप करूं लागल्यास त्यांस तो सोडूनही देतो, आणि ईश्वरभक्तीनेंच सकल धर्म साध्य होतात.१ अशा निश्चयानें माझ्या भक्तीमध्यें सदा निमग्न असतो ! उद्धवा, साधूच्या अंगीं मुख्य हें असावें कीं, त्यानें अनन्यभावानें माझी भक्ति करावी; मग त्यास माझ्या सच्चिदानंद स्वरूपाचें ज्ञान होवो किंवा न होवो, पण तो माझ्या मतें अत्यंत श्रेष्ठ साधू होय. इति १३ ।

---

# अध्याय १४ वा.

## साधुसमागममाहात्म्य ( ११-१२. )

श्रीभगवानुवाच—

**न रोधयति मां योगो न सांख्यं धर्म एव च ॥**
**न स्वाध्यायस्तपस्त्यागो नेष्टापूर्तं न दक्षिणा ॥ १ ॥**
**व्रतानि यज्ञश्छंदांसि तीर्थानि नियमा यमाः ॥**
**यथाऽवरुंधे सत्संगः सर्वसंगापहो हि माम् ॥ २ ॥**

---

( १ ) " अजाण " या ठिकाणीं " जाणता " असाच अर्थ करावा. कारण भक्तीचा महिमा अगाध असल्यामुळें, 'जाणता' असा अर्थ करावयास प्रत्यवाय नाहीं.

**भगवान श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा, ऐहिक विषयांवरील आसक्ति निवृत्त करण्यास साधुसमागमासारखें दुसरें साधन नाहीं. साधक पुरुषानें साधुसमागम केला असतां त्यास जसा मी वश होतों, तसा आसनप्राणायामादि अष्टांगयोग, तत्वविचार, अहिंसादि धर्म, वेदाध्ययन, चांद्रायणादि तप, संन्यास. अग्निहोत्रादि कर्म, कूप ( आड ), आराम ( बाग ) इत्यादिकांचें निर्माण, दान, दक्षिणा. उपवासादिक व्रतें, देवतार्चन. मंत्रजप, गंगादिक तीर्थें व यमनियम इत्यादिकांच्या योगानें होत नाहीं. केवळ सत्संगानेंच दैत्य, राक्षस. पशू, गंधर्व, अप्सरा, नाग, सिद्ध, चारण. गुह्यक आणि विद्याधर. तसेंच मानवांमध्यें वैश्य, शूद्र, स्त्रिया व अंत्यज हे सर्व राजस व तामस प्रकृतीचे असून त्या त्या युगाचे ठायीं माझ्या पदास प्राप्त झाले आहेत; ह्मणजे वृत्रासुर, प्रल्हाद, वृषपर्वा, बलि, बाणासुर, मयासुर. बिभीषण, सुग्रीव, हनुमान्, जांबुवंत, गजेंद्र, जटायु, तुलाधार, व्याध, कुब्जा, ऋषिपत्न्या, गोकुळांतील गोपिका इत्यादि पुष्कळांना सत्समागमानेंच माझ्या परमपदाची प्राप्ति झाली आहे. ह्या सांगितलेल्या लोकांपैकीं कोणी वेदाध्ययन केलें नव्हतें, कोणा महात्म्याची सेवा केली नव्हती, कोणतींही व्रतवैकल्यें आचरलीं नव्हतीं, किंवा तपश्चर्याही केली नव्हती. तर केवळ माझ्या व मद्भक्त जे साधु त्यांच्या

( १ ) " ते यमनियम वाग वारा । आणि सकळ साधनसंभारा । यावया माझिया नगरा । मार्ग पुढारा चालेना ॥ ते रिघालिया संतांच्या द्वारा । धरूनि साधूंच्या आधारा । अवघा आला माझिया घरा । एवं परंपरा मत्प्राप्ति ॥ तैसी नव्हे सत्संगति । संगें सकळ संगातें छेदिती । ठाकठोक माझी प्राप्ति । परिस्त नव्हती आणिका ॥ "—**नाथ.**

( २ ) " सोनें साडेपंधरें चोखडें । त्यासि रत्नाची संगति जोडे । तें अधिकाधिक मोल चढे । मुकुटीं चढे महेंद्राचे ॥ तैसें पुण्यें पुरुषा सत्संगति । जाहल्या अनंत सुख पावती । सुरवर त्यातें वंदिती । शिवादि येती भेटीसी"—**नाथ.**

समागमानें ते मद्रूपतेस प्राप्त झाले आहेत. त्यांपैकीं वृत्रासुरादि कित्येक दैत्यांना दुसऱ्या साधनांचा संभव तरी होता, परंतु गोपी, गाई इत्यादिकांना दुसरें कोणतेंही साधन नव्हतें. उद्धवा, गोपींनीं जो कांहीं सहवास केला तो माझाच; व माझ्यावर निस्सीम प्रेम करूनच त्या उद्धरून गेल्या. गोपींप्रमाणेंच गाई, यमलार्जुनादि वृक्ष, गजेंद्रादि पशू, कालियादि नाग, तुलाधारादि वैश्य आणि इतरही अनेक मूढ जीव अनायासें कृतार्थ होऊन सुखानें मजप्रत प्राप्त झाले आहेत. बा उद्धवा, ह्या सर्वांनीं माझा व माझ्या भक्तांचा समागम केला, हेंच ह्यांच्या मोक्षाचें मुख्य कारण होय! बा उद्धवा, माझी प्राप्ति तर इतकी दुर्लभ आहे कीं, योग, सांख्य, दानें, व्रतें, तपें, यज्ञ, व्याख्यानें, वेदशास्त्राध्ययन आणि संन्यास इत्यादि साधनांनीं अत्यंत[1] यत्न करणारा देखील मजप्रत प्राप्त होत नाहीं.

**प्रेमलक्षणभक्तिः**—बा उद्धवा, गोपींचें मजवर जें कांहीं विलक्षण प्रेम होतें, त्याचें मला वर्णनही करितां येत नाहीं. अक्रुरानें ज्या वेळीं बलरामाला व मला गोकुळांतून मथुरेस नेलें, त्या वेळीं अत्यंत दृढप्रेमानें मजवर ज्यांचीं मनें आसक्त झालीं होतीं, त्या गोपींना माझ्या वियोगामुळें दुःसह मनस्ताप होऊन त्यांना जगांत सुखकारक असें दुसरें कांहीं दिसलें नाहीं. बा उद्धवा, गोपींना अत्यंत प्रिय असा मी गोकुळांत असतांना माझ्या समागमानें ज्या रात्री त्यांना क्षणार्धाप्रमाणें वाटत असत त्याच रात्री माझ्या वियोगानें त्यांना केवळ कल्पांसारख्या भासूं लागल्या. किंबहुना माझ्या विरहानें त्यांची चित्तवृत्ति इतकी अस्वस्थ व उदासीन झाली कीं, त्यांस स्वतःचा देह, पतिपुत्रादि आप्त, ऐहिक कृत्यें व पार-

(१) " मज वेगळें जें जें सुख । तें गोपिकांस केवळ दुःख । कैशी आवडी अलौकिक । मज हृदयीं देख न विसंबती "—**नाथ.**

लौकिक भावनें ह्यांचें भानही राहिलें नाहीं! त्यांचें सर्व लक्ष माझ्या ठिकाणीं लागल्यामुळें जणूं काय ब्रह्मनिष्ठाप्रमाणें त्यांनीं समाधीच धारण केली. उदाहरण—नद्यांचें उदक समुद्रांत मिळून गेल्यावर जसें त्यांस नाम-रूप ह्यांपैकीं कांहींही अवशिष्ट रहात नाहीं; तसें त्या गोपिकांना आम्ही कोण आहों. आतां काय करीत आहों इत्यादिक कोणत्याही भावना अवशिष्ट राहिल्या नाहींत. त्या सहस्रावधि गोपिकांनीं जरी माझें स्वरूप यथार्थ न जाणतां केवळ जारबुद्धीनें माझ्याशीं सहवास केला. तरी त्या माझ्या परब्रह्मपदीं ऐक्य पावल्या! तेव्हां हें लहान-सहान आश्चर्य आहे काय? उद्धवा, माझ्या प्रेमलक्षण भक्तीचें असें सामर्थ्य आहे, त्याअर्थीं तूं श्रुति स्मृतिप्रणित विधिनिषेध, प्रवृत्ति-निवृत्तिपर कर्मे, धर्माधर्म आणि आजवर मिळविलेलें व पुढें मिळवावयाचें शास्त्रज्ञान. हीं सर्व सोडून देऊन सर्व जीवांचा आत्मा जो मी, त्या मलाच एक सर्वात्मबुद्धीनें शरण ये, म्हणजे तुला कसलीही भीति रहात नाहीं. इति। १४.

---

# अध्याय १५ वा.

## साधु व देव यांची तुलना ( ११-२. )

वसुदेव उवाचः--

भगवन्भवतो यात्रा स्वस्तये सर्वदेहिनाम् ॥
कृपणानां यथा पित्रोरुत्तमश्लोकवर्त्मनाम् ॥ ४ ॥
भूतानां देवचरितं दुःखाय च सुखाय च ॥
सुखायैव हि साधूनां त्वादृशामच्युतात्मनाम् ॥ ५ ॥

वसुदेव ह्मणाले:—मुनिश्रेष्ठ नारदा, जसें मातापितरांचें येणें मु-

ल्यांच्या कल्याणासाठीं असतें. तसें प्रभूच्या प्राप्तीचे मार्ग दाखविणारे अशा सत्पुरुषांचें आगमन संसारत्रस्त दीन प्राण्यांच्या उद्धारासाठीं असतें; त्याप्रमाणें आपणही लोकांमध्यें जें पर्यटण करितां. तें प्राणिमात्रांच्या दुःखनिरसनासाठीं होय ! भगवत्पदीं लीन झालेल्या तुजसारख्या साधूंना देवाची उपमा देणें हें देखील अयोग्यच. कारण, देवांच्या पुष्कळ कृति प्राण्यांना सुख देतात खऱ्या; परंतु त्यांच्याच अतिवृष्टि-अनावृष्टि वगैरे कृतींपासून प्रसंगानुसार प्राण्यांना दुःखही भोगावें लागतें; आणि अच्युताकडे चित्त लावून राहणाऱ्या तुजसारख्या साधूंचीं चरित्रें तर नेहमीं सुखदायकच असतात; व ते साधु तापत्रयापासून प्राण्यांची मुक्ति कशी होईल ह्याचाही विचार करून नानाविध उपायांनीं प्राण्यांस सुखच होण्याचा यत्न करितात, परंतु दुःख कधींच द्यावयाचीं नाहींत. हे ब्रह्मन्! देवांची गोष्ट अशी आहे कीं, 'देवांपासून सुख मिळतें हें खरें; परंतु तें केवळ व्यापारवत् होय.' पहा--जे जे लोक देवांची ज्याप्रमाणानें सेवा करितात, त्या लोकांना देवही त्याचप्रमाणाचीं फळें देतात. (लहान यज्ञ केला तर फळ अल्प मिळतें, मोठा केला तर तसें मिळतें.) एकंदरींत देव छायेसारखे कर्माच्या साह्याची अपेक्षा धरणारे आहेत. दृष्टांत—छाया जशी प्राणी नाचेल तशी नाचते; तसेच देव प्राण्याला त्याच्या कर्मानुसार फलें देत असतात. महर्षे, तुजसारख्या महात्म्याची गोष्ट तशी नाहीं. तुम्ही निष्काम बुद्धीनें केवळ परोपकारार्थच नेहमीं झटत असतां, तेव्हां तुमचें महात्म्य किती वर्णावें बरें ? हे ब्रह्मनिष्ठा ! तूं माझे घरीं आलास, एवढ्यानेंच माझ्या जन्माचें सार्थक झालें असें

( १ ) " देवांच्या एकाच कृतीपासून कांहीं प्राण्यांना सुख मिळतें व कांहींना दुःख भोगावें लागतें. "—**बालप्रबोधिनी.**

( २ ) " प्रत्युपकाराची इच्छा न धरितां प्राण्यांचे ताप दूर करतात."—**नाथ.**

मीं समजतों; तथापि ज्या भागवत धर्माच्या आचरणानें श्रीभगवान् महाविष्णु तुझ्यावर प्रसन्न झाले व ज्यांचें एकनिष्ठेनें श्रवण केलें असतां मानव अखिल भयापासून मुक्त होतो, ते धर्म मला कृपा करून सांग. हे मुनिवर्य, मोक्ष देणारा जो अनंत त्याची मीं पूर्वी एकाग्रभक्ति करून प्रत्यक्ष त्यानेंच माझा पुत्र व्हावें असा वर मागितला व त्या माझ्या प्रार्थनेप्रमाणें भगवान् श्रीकृष्ण परमात्मा हा माझ्या उदरीं आला. हें सर्व खरें; परंतु त्या वेळीं मीं मायामोहांत गुंतून जाऊन त्या योगें भलतीच कामना व्यक्त केली, असें मला आतां वाटूं लागलें. वास्तविक पाहतां मीं तेव्हां सायुज्यच मागावयास पाहिजे होतें. असो. तें सायुज्य प्राप्त करून देणाऱ्या भागवतधर्मांचें ज्ञान जर आतां तुझ्यापासून मला प्राप्त होईल, तर अजूनही मला ह्या नरजन्माचें साफल्य करून घेतां येईल. ह्यास्तव हे नारदा, अनेक विघ्नांनीं परिपूर्ण अशा ह्या महाभयंकर संसारसागरांतून अनायासें सुटका होईल असा मार्ग मला सांग. यावर नारद सांगतात तें असें:—

**नारद ह्मणतातः**—यदुकुलोत्तमा, हा तुझा विचार फारच उत्तम आहे. ज्या भागवतधर्मांचें वर्णन करण्याविषयीं तूं मला विचारीत आहेस, ते सकल विश्वाचें पातक दूर करितात. जो कोणी भागवतधर्म ऐकतो, पठण करितो व मनन करितो, अथवा त्या धर्माप्रमाणें वागणाऱ्यांचा जो बहुमान करितो किंवा महिमा गातो, त्याजकडून सर्व जगाशीं द्रोह घडला असला, तरी त्याचीं सर्व पातकें क्षणांत नष्ट होतात! वसुदेवा, भगवद्गुणांचा असा अद्भुत प्रभाव आहे कीं, त्यांचें वर्णन करणाराला व श्रवण करणाराला मोठें पुण्य घडतें, तर मग अशा भागवतधर्माचरणसंपन्न साधूचा महिमा किती वर्णन करावा! इति । १९.

———

(१) भक्तिप्रकरण १६ वा अध्याय पहा.

# अध्याय १६ वा.

## भागवतधर्म ( ११–२९. )

श्रीकृष्ण उवाचः—

**कुर्यात्सर्वाणि कर्माणि मदर्थं शनकैः स्मरन् ॥**
**मय्यर्पितमनश्चित्तो मद्धर्मात्ममनोरतिः ॥ ९ ॥**

**श्रीकृष्ण ह्मणालेः**—बा उद्धवा, मुमुक्षुपुरुषानें नित्य माझें स्मरण करावें; माझ्या ठिकाणीं चित्ताचा लय करावा; माझी प्राप्ति हेंच मुख्य कर्तव्य मानावें आणि सप्रेम अंतःकरणानें सर्व कर्में मत्प्रीत्यर्थ आचरीत असावीं. हीं गोष्ट एकदम साध्य होण्यासारखी नाहीं हें खरें; परंतु हाच क्रम हळूहळू चालवीत गेलें असतां, शेवटीं यशप्राप्ति होईल ह्यांत संदेह नाहीं. उद्धवा, माझ्या भक्तींत निमग्न असणारे ज्ञानी पुरुष जेथें वास करितात, ते देश पुण्यकारक होत. देव, दैत्य, मानव, इत्यादिकांपैकीं जे कोणीं माझे भक्त होऊन गेले किंवा विद्यमान आहेत, त्या महात्म्यांचीं चरित्रें वर्णावीं; किंवा त्यांच्याप्रमाणें वर्तन ठेवावें. माझ्या प्रसन्नतेकरितां प्रति पर्वणीस यात्रा, उत्सव वगैरे करीत जावें; हीं कृत्यें करण्यास एकट्याला सामर्थ्य नसल्यास पुष्कळ लोक मिळून करावीं; यात्रेच्या वेळीं व उत्सवप्रसंगीं मला सार्वभौम राजासारखे ऐश्वर्यभोग आणि गायननृत्य इत्यादि उपचार अर्पण करावेत. उद्धवा, आतां अंतरंग भक्तीचें लक्षण सांगतोंः--पुरुषानें आपलें चित्त निर्मल (रागद्वेषादि विकारांनीं रहित ) ठेवावें, आणि सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं व स्वतःच्या अंतरींही मी ईश्वर ओतप्रोत भरलेला असून अपरिच्छिन्न आहें, अशी भावना धरावी. एकटा ईश्वर सर्वत्र कसा राहतो, अशी शंका घेण्याचें प्रयोजन नाहीं, कारण, तो आवरणरहित असल्यामुळें आकाशाप्रमाणें सर्वत्र आंत बाहेर भरलेला आहे.

भागवतधर्माचरणः—उद्धवा, तूं अतिशय ज्ञानसंपन्न आहेस. जो मनुष्य अशा रीतीनें व केवळ ज्ञानरूप दृष्टीच्या आश्रयानें सकल प्राणिमात्र मद्रूप ( ईश्वररूप ) होत, असें मानितो आणि त्यांचें गौरवही करितो, तसेंच जो ब्राह्मणादिक उच्च वर्णाविषयीं, चांडलादिक नीच वर्णाविषयीं, ब्राह्मणाचें द्रव्य हरण करणाऱ्या चोरांविषयीं, ब्राह्मणपूजक भक्तांविषयीं, तेजोनिधि सूर्याविषयीं, बारीकशा अग्नीच्या ठिणगीविषयीं, शांत स्वभावाचे महात्म्याविषयीं आणि परपीडेंत निमग्न असणाऱ्या खलांविषयीं समान बुद्धि धारण करितो, तोच मुक्त पुरुष होय. याविषयीं कोणत्याही प्रकारचा संशय घेऊं नये. कारण, त्याच्या मनांत द्वैतभाव मुळींच नसतो. एकंदरींत जातीनें, कृतीनें, गुणानें व स्वभावानें परस्परांशीं अगदीं विरुद्ध अशा पदार्थांच्या किंवा व्यक्तीच्या अंतरीं मी एकटाच भरलेला आहें, असें जो पाहतो तोच पंडित होय, असें विद्वानांचें मत आहे. जो सर्व मनुष्यांच्या ठिकाणीं नित्य माझी ( ईश्वराची ) भावना करीत जाईल, त्या मनुष्याची स्पर्धा म्हणजे बरोबरीच्या मनुष्याविषयीं हेवा, असूया म्हणजे आपल्यापेक्षां मोठ्या योग्यतेच्या पुरुषांना उगाच दोष देणें, तिरस्कार म्हणजे हीन मनुष्यांबद्दल अवहेलना, स्वतःबद्दल अहंकार, हे सर्व दोष लवकरच समूळ नाहींसे होतात. मनुष्यानें देहाभिमानामुळें " मी चांगला, तो वाईट " अशी दृष्टि व त्या योगें उद्भवणारी 'लज्जा' ही सोडून द्यावी; आणि कुत्रे, बैल, गर्दभ अथवा चांडाल ह्या सुद्धां सर्व प्राण्यांना त्यांच्या अंतरीं ईश्वर आहे, अशा दृष्टीनें भूमीवर दंडवत् वंदन करीत जावें. असें केलें म्हणजे कदाचित् खुळा म्हणून आपले आप्तजन, इष्टमित्र हंसूं लागतील व उपहास करतील, तरी पण तें अगदीं मनांत आणूं नये. आतां असें आचरण किती काळपर्यंत ठेवावें तें सांगतोंः—सकल प्राण्यांचे ठिकाणीं मी ( ईश्वर ) भरलेला आहें, अशी भावना जावत्कालपर्यंत उत्पन्न होणार नाहीं,

तावत्कालपर्यंतच शरीर, वाणी व मन या त्रिवारपूर्वक अशीच उपासना चालवावी. असें वर्तन ठेविलें असतां मनुष्याला सर्वत्र ईश्वर वास करितो असा अनुभव येतो; यामुळें त्याचे असंभावनादि संशय दूर होतात, आणि मग समस्त विश्व ब्रह्मरूप दिसूं लागतें. नंतर सर्वत्र ब्रह्मदृष्टि झाल्यावर मग त्यानें यच्चयावत् क्रिया सोडून देण्यास हरकत नाहीं.

**भागवतधर्माचरणाची श्रेष्ठता**—उद्धवा, कल्याणप्राप्तीचे उपाय दुसरे अनेक आहेत; पण माझें मत असें आहे कीं, माझ्या ठिकाणीं त्रिकरणपूर्वक ( शरीर, वाणी व मन यापूर्वक ) भावना राखणें, हाच उपाय सर्व उपायांत उत्तम आहे. भागवतधर्म आचरण करणें हाच उपाय सकल उपायांत श्रेष्ठ कां, तें ऐक:—बा उद्धवा, मनुष्यानें निष्कामपणें भागवतधर्म आचरण करण्यास प्रारंभ केला असतां त्याला त्यांत कोणतेंहि विघ्न येण्याचा संभव नसतो. कारण, हा धर्म मीं स्वतः निर्गुण ह्मणून उत्तम ठरविला आहे; यास्तव हें निर्विवाद आहे. हे साधुश्रेष्ठा ! फार काय सांगावें. भागवतधर्माचा प्रताप इतका आहे कीं, भय वाटण्याचा प्रसंग आला असतां पळून जाणें, दुःखाचा प्रसंग आला असतां आक्रोश करणें, हीं क्षुल्लक कृत्यें निष्कामबुद्धीनें मज परमात्म्याकडे अर्पिलीं जातील, तर तीं देखील धर्मरूपच होतील. एतावता सिद्धांत हा कीं, ह्या जगामध्यें मिथ्या व नाशवंत अशा शरीराच्यायोगें सत्य व अविनाशी अशा माझी प्राप्ति करून घेणें, हेंच विवेकी पुरुषांचें कर्तव्य होय व ज्ञानी पुरुषांचें ज्ञान तें हेंच होय. इति । १६.

# अध्याय १७ वा.

## कवीयोगीश्वराचा उपदेश (११-२.)

विदेह उवाच

दुर्लभो मानुषो देहो देहिनां क्षणभंगुरः ॥
तत्रापि दुर्लभं मन्ये वैकुंठप्रियदर्शनम् ॥ २९ ॥
अत आत्यंतिकं क्षेमं पृच्छामो भवतोऽनघाः ॥
संसारेऽस्मिन्क्षणार्धोऽपि सत्संगः शेवधिर्नृणाम् ॥३०॥
धर्मान्भागवतान्ब्रूत यदि नः श्रुतये क्षमम् ॥
यैः प्रसन्नः प्रपन्नाय दास्यत्यात्मानमप्यजः ॥ ३१ ॥

विदेह ह्मणाले:—हे ब्रह्मन्. प्राण्यांना हा मनुष्य देह मिळणें हें मोठें दुर्लभ असूनही क्षणभंगुर आहे! उत्तम पुरुषार्थाचें साधन काय तें ह्या देहानेंच घडतें. बरें. यदाकदाचित् मनुष्य देह मिळाला तरी त्यामध्यें विष्णूच्या प्रिय भक्तांचें दर्शन घडणें परम दुर्मिळ! ह्मणून हे पुण्य पुरुषा! आज मी जीवांचें अत्युत्तम कल्याणमार्ग कोणते ते आपणांकडून विचारून घेतों. ह्या संसारामध्यें मनुष्यांना अर्धक्षण जरी सत्समागम घडला, तरी तो एखादा ठेवा सांपडल्यासारखा होय, ह्मणजे

(१) पुण्य व पाप ह्यांचें प्रमाण समान झालें कीं, मनुष्यदेह प्राप्त होतो, असा सिद्धांत आहे. तर मग मनुष्यांची समबुद्धि कां नसते? तर त्याचें कारण असें:—वजन करतांना तराजूच्या एका पारड्यांत मोठी थोरली पापाची धोंड घातली आणि दुसऱ्या पारड्यांत बारीक सारीक पुण्य कर्में गोळा करून कसें तरी वजन बरोबर होण्याची भर केली, अशा रीतीनें ज्याला मनुष्ययोनि मिळाली त्याची पापाकडे ओढ फार असणार हें उघडच आहे; एकाद्याचें पुण्य थोर आणि पाप किरकोळ, मिळून प्रमाण सारखें झालेलें असतें, त्याची पुण्यबुद्धि दृढ असते. हेच लोक पुण्य व पाप अशा उभय कर्मांचा क्षय करून मुक्ति पावतात.—नाथ.

द्रव्याचा ठेवा सांपडला असतां जसा आनंद होतो, तसा साधूंचा सहवास घडला असतां परमानंद मिळतो. तेव्हां मुनिवरहो, भागवतधर्म ऐकण्यास पात्र असेन तर तो मला सांगा. मी असें ऐकितों कीं, त्या भागवतधर्माचें आचरण करून जो पुरुष भगवत्पदीं लीन होतो, त्यास परमेश्वर सायुज्यही अर्पण करितो !

**कवी योगीश्वर म्हणालाः**—हे निमिराजा, ह्या संसारामध्यें मनुष्य मिथ्याभूत देहादिकांवर हाच आत्मा अशा भावनेनें ममत्व ठेवितो; म्हणून त्याची बुद्धि सर्वदा खेद पावते. माझ्या मनाचा तर असा निश्चय झालेला आहे कीं, अच्युताच्या चरणकमलांची आराधना करणें हाच सर्वांचा निर्भय आश्रय होय! ह्मणजे भगवच्चरणीं निष्ठापूर्वक भक्ति करतील, तर त्यांचा मायामोह दूर होऊन आत्मज्ञान प्राप्त होईल, व फिरून देहादिकांच्या ठिकाणीं यत्किंचितही "अहं मम" ( मी व माझें ) अशी भावना उत्पन्न होणार नाहीं. राजा, परमेश्वरानें शास्त्रव्युत्पत्तिरहित अज्ञानी प्राण्यांना सुद्धां अनायासें आत्मप्राप्ति व्हावी, ह्यासाठीं हा भागवतधर्म स्वतः निरूपण केला आहे. हा धर्म फार सोपा असल्यामुळें ह्याचें अवलंबन केलें असतां मनुष्याच्या आचरणांत कधींही प्रमाद घडणार नाहीं; आणि योगाभ्यासामध्यें किंवा कर्मानुष्ठानांत विघ्नांची व प्रमाद घडण्याचा फार भीति असते. हा भागवतधर्ममार्ग तर इतका सुलभ आहे कीं, याचें वाटेल तसें आचरण केलें असतांही त्यापासून विपरीत फलप्राप्तीची मुळींच भीति नाहीं. यदाकदाचित् अनवधान होऊन कित्येक कृत्यें वगळलीं जाऊन दुसऱ्यांचें आचरण घडलें; अथवा जीं कृत्यें केलीं त्यांतही कांहीं ह्यांतलें त्यांत व त्यांतलें ह्यांत असा प्रकार झाला, तरी श्रुतिस्मृतिप्रणीत योगाभ्यास किंवा

( १ ) " न करितां वेदशास्त्रव्युत्पत्ति । ऐशिया अज्ञांना निजात्मप्राप्ति । सुगम जोडे ब्रह्मस्थिति । यालागीं हरिभक्ति प्रकाशिली देवें ॥ "—नाथ.

कर्मकांडविधींचें आचरण करतांना प्रमाद घडले असतां जसें वैगुण्य पडून फळ मिळत नाहीं; तसें भागवतधर्म-मार्गांतील एखादी कृति सोडली तरी प्रत्यवाय घडत नाहीं. किंवा फळाला ही मुकावें लागत नाहीं.

**भगवत्प्राप्तीचा उपाय**—राजा, मनुष्य मनानें, बुद्धीनें, चित्तानें, तसेंच इंद्रियांच्या योगें, वाणीनें, शरीरानें जन्मस्वभावानुसार जें जें कर्म करील, तें तें सर्व त्यानें, "परमेश्वराला" म्हणून समर्पण करावें. असें केलें असतां.सर्व कर्म भागवतधर्माचरण होतें. ह्यावर कोणी शंका घेईल कीं, 'भय (संसार) अज्ञानामुळें कल्पिलें गेलें आहे; त्याची निवृत्ति ज्ञानानेंच होते; तें ज्ञान संपादावें म्हणजे झालें; ईश्वरभक्तीचा खटाटोप पाहिजे कशाला.' तर त्यासही उत्तर सांगतों. राजा, ज्ञानानें अज्ञानाची निवृत्ति होते ही गोष्ट खरी आहे, तथापि ज्ञान हें ब्रह्मरूपच आहे. मनुष्य ब्रह्मरूप आत्म्यापासून विमुख झाला कीं त्या भगवंताच्या मायेमुळें पर-

(१) "इंद्रियें कोंडावीं न लागतां। सहज राहे विषयासक्ति। एवढें सामर्थ्य हरिभक्तां। जाण निश्चयें नृपवर्या॥ योगी इंद्रियें कोंडिती। ते भक्त लाविती भगवद्भक्तां। योगी विषय जे त्यागिती। ते भक्त अर्पिती भगवंतीं। योगी विषय त्यागिती। त्यागितां देह दुःखी होती। भक्त भगवंतां अर्पिति॥ तेणें ते होती नित्य मुक्त॥" आणि "जेवीं स्वामीचिया बाळा। अवरोध न करवे द्वारपाळा। तेवीं भागवतधर्म भजनशीळा। कर्मगळा बांधूं न शके॥"—**नाथ.**

(२) "यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्। यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम्॥" **अर्थ**—अर्जुना, तूं जें करितोस, जें भक्षितोस, जें हवन करितोस, जें देतोस व जें तप करितोस तें सर्व मला अर्पित जा.—**गीता.**

(२) "दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया। मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते॥" **अर्थ**—ही माझी अद्भुत त्रिगुणात्मक माया उल्लंघून जाण्यास फार कठीण आहे. जे पुरुष मलाच शरण येतात, ते हिला तरून जातात.—**गीता.**

मात्मस्वरूपाचें विस्मरण घडतें, व ' देहच आत्मा ' अशी विपरीत भावना उत्पन्न होते. अशा प्रकारें आत्म्याहून वेगळा देहादिकाचा अभिमान उद्भवला कीं भय पुढें आहेच. एतावता, भयाचें आदिकारण " मी ईश्वराहून भिन्न आहें " असें समजणें हें होय. म्हणून समंजस प्राण्यानें गुरु हाच आपलें दैवत असें जाणून अत्यंत प्रेमपूर्वक अचल भक्तीनें त्यांची सेवा चालवीत ईश्वराचें चिंतन करीत असावें. ह्यावरही पुनः कोणी शंका घेईल कीं, 'प्राण्यांचें मन विषयांच्या ओढीमुळें नेहमीं चंचल असतें' तेव्हां प्रथम अचलभक्ति ठवणेंच असंभवनीय दिसतें; मग भय दूर होण्याची गोष्ट तर लांबच राहिली.' तर याचें समाधान असें–विषय जर खरे असतील तर योग्य होईल; पण विषय मुळीं मनाचे काल्पनिक खेळच होत, खरे नव्हत. केवळ कल्पनेच्या योगानें बनलेला द्वैतप्रपंच, ह्मणजे शरीर इंद्रियें, घट, पट इत्यादि खरा नसतांही खरा असा भासतो. उदाहरण–स्वप्नाची व मनोराज्याची सृष्टि म्हणजे स्वप्नामध्यें मनुष्य केवळ मनाच्या योगें कल्पनामय सृष्टि निर्मितो, त्याला स्वप्नसृष्टि ह्मणतात; ती खरी असते काय? तसेंच मनोराज्यांत ' मी राजा बनलों आहें, चाकर माणसें माझ्या सेवेंत दक्ष आहेत, ' असे नानाप्रकारच्या सहस्रावधि कल्पना करीत काल्पनीक सुखांचे अनुभव घेत असतो. ह्या स्वप्नसृष्टींतील व मनोराज्यांतील विषय जसे खोटे; तसेच व्यवहारदशेंत दृश्यमान शरीर, गृह, स्त्री, पुत्र इत्यादि पदार्थ मिथ्या होत. अशा मिथ्याभूत पदार्थांच्या ठिकाणीं आसक्ति जडली कीं, ईश्वरस्वरूपाचा विसर पडतो; व मग सर्वत्र द्वैत भासूं लागतें. यास्तव तत्त्वांचें किंवा पदार्थांचें सत्य अथवा असत्य ज्ञान करून देणारें जें मन, त्याची माये-

(१) " उदरमंतरंकुरुतेऽथतस्यभयंभवति " **अर्थ**—ईश्वरापासून मी ( आत्मा ) निराळा आहें, असें जो जाणतो, त्याला भय प्राप्त होतें, ह्मणजे तो जन्ममरणरूपी यंत्रांत सांपडून भ्रमण करतो.—**श्रुति.**

पासून निवृत्ति केल्यास मनुष्याला परमात्मस्वरूपाचा विसर पडण्याची बिलकूल भीति उरणार नाहीं. म्हणून विचारी पुरुषानें विविध कर्मांविषयींच्या संकल्प व विकल्प चालविणाऱ्या मनाचें नियमन करावें. मन स्वाधीन झालें कीं अचलभक्ति साध्य होते. अचल भावानें ईश्वराची सेवा केली असतां तेणेंकरून अभय मिळतें. राजा, मनोनिग्रह करणें हें कृत्य देखील सोपें नाहीं. हें मला कबूल आहे. परंतु तो मनोनिग्रह घडण्यास दुसरा सोपा मार्ग असा आहे कीं. ईश्वरानें सृष्टीमध्यें अत्यंत मंगलकारक जे जे अवतार घेतले. ज्या ज्या लीला केल्या व त्या अवतारांसाठीं जीं जीं नांवें स्वीकारलीं, तीं तीं असंख्य असल्यामुळें सगळीं कळण्याचा संभव नाहीं. तरी त्यांपैकीं लोकांत जीं गायलीं जातात. म्हणजे प्रसिद्ध आहेत. त्यांचें मनुष्यानें अगदीं लाज न धरितां श्रवण व गायन करीत फिरत असावें. याप्रमाणें कोणत्याही प्रकारची इच्छा न धरितां हा निदिध्यास त्यानें ठेविला म्हणजे मग त्याला मायातीत होऊन अखंड सच्चिदानंदसुखानुभव घेतां येतो.

**भगवद्भक्ताची वृत्तिः** —हे निमिराजा ! एकदां मनुष्याची वृत्ति अशा प्रकारची बनून गेली. म्हणजे त्यास भगवद्भजनाशिवाय दुसरी कशाचीहि आवड नसते, रात्रंदिवस त्यास भगवद्गुणानुवादच आवडतात.

(१) भगवद्गुण ऐकण्यास मन कीर्तन तत्पर असावें ह्याविषयीं नाथांनीं म्हटलें आहे:—" चुकल्या पुत्राची शुद्धिवार्ता। जेणें आदरें ऐके माता। तेणें आदरें हरिकथा। सार्थकता परमार्थी ॥"

(२) कीर्तनाचा प्रभाव नाथांनीं वर्णिला आहे. तो असा—" कीर्तनानें लोकांचे समस्त दोष निर्दाळिले, म्हणून जपतपांना कोणी पुसेना, तीं निराश होऊन बसलीं; यमनगरी ओसाड पडली, तिकडे कोणीच जाईना; तीर्थें पातक्यांची वाट पाहून पाहून थकलीं, पातकच नाहीं तेव्हां त्याच्याकडे जातो कोण ? यमनियमांना उपास पडूं लागले व योगाभ्यास मरायाला टेंकले."

ऐहिक पदार्थांवरील त्याच्या मनांतील आसक्ति शिथिल होत जाऊन शेवटीं अगदीं नाहींशी होते. मग ईश्वरानुग्रहाचा लाभ माझ्या हस्तगत झाला, असें जाणून तो मोठ्यानें खिदळूं लागतो. आजपर्यंत मी आपला कालक्षेप अयोग्य प्रकारें केला असें ह्मणून रडूं लागतो. भगवंता ! आतां मला तुझ्या स्वरूपाचा विसर पडूं देऊं नको असा मोठ्यानें आक्रोश करितो, व मग अशा रीतीनें मायाविमोहित लोकांच्या आचारपद्धतीस सोडून देऊन आणि ईश्वरभजनांत गर्क होऊन राहतो. त्याची वृत्ति एखाद्या पिशाच्चानें झपाटलेल्या मनुष्यासारखी झालेली असते. तो मुळीं देहभानावरच नसतो. तर परवश होऊन गावयास व नाचावयास लागतो. मग त्या पुरुषास पृथ्वी, आप, तेज, वायु आकाश, नक्षत्रें, जीवजंतु, सभोंवतालचें वातावरण, झाडझुडूप, नद्या, समुद्र व दुसरे जे कांहीं पदार्थ आढळतील, ते सर्व परमात्मस्वरूपच आहेत, असें भासतें व मग अशा प्रकारच्या अभेदबुद्धीनें यावत् पदार्थमात्राला " परमेश्वर " अशी भावना करून तो प्रेमपूर्वक वंदनही करितो ! ह्यावरही कोणी शंका घेईल कीं, " ही गति ज्यांचा योगाभ्यास दृढ झाला असेल त्यांना देखील पुष्कळ जन्मांनींही मिळण्यास कठीण असून मग ती नुसत्या हरिकीर्तनानें एकाच जन्मांत लाभावी कशी ? " तर तिचेंही उत्तर सांगतों:—मनुष्य भोजनास बसला ह्मणजे क्रमानें

---

( १ ) " यद्यत्पश्यति चक्षुर्भ्याम् तत्तदात्मेति भावयेत् " **अर्थ**—जे जे पदार्थ डोळ्यांस दिसून येतात, त्या त्या पदार्थांच्या ठिकाणीं आत्मभावना करावी.–**श्रुति.** तसेंच नाथ ह्मणतातः—" जें जें दृष्टि दिसे तें तें हरिरूप । पूजा ध्यान जप त्यासी नाहीं ॥ वैकुंठ कैलासीं तीर्थ क्षेत्रीं देव । तयाविण ठाव रिता कोठें ॥ वैष्णवांचें गुह्य मोक्षाचा एकांत । अनंतासि अंत पाहतां नाहीं ॥ आदिमध्यअंतीं अवघा हरि एक । एकचि अनेक एक हरी ॥ एकाकार झाले जीव शिव दोन्ही । एकाजनार्दनीं ऐसें केलें ॥ "

एकेक घांस घेत जातो: तेव्हां प्रत्येक घांस घेतला असतां त्याला पोटाची भर, क्षुधेचा नाश आणि सुख हीं तिन्हीं एकदम घडतात कीं नाहींत? अर्थात् घडतात. जेवणाराला जशा उदरभरण, क्षुधानाश आणि सुखप्राप्ति ह्या तीन गोष्टी एकाचकाळीं प्राप्त होतात; त्याप्रमाणेंच ईश्वराची सेवा करणाऱ्याला भगवंतावर प्रेम, भगवत्स्वरूपाचा साक्षात्कार आणि अखंड सच्चिदानंदसुख ह्या तिन्ही गोष्टी एकदम साधतात. राजा, ह्याप्रमाणें अच्युताच्या चरणांची सेवा करणाऱ्या भगवद्भक्ताला भक्ति, वैराग्य आणि भगवत्स्वरूपाचा साक्षात्कार हीं पूर्ण प्राप्त होतात, आणि त्यामुळें तो प्रत्यक्ष परम शांति पावतो, ह्मणजे त्याला संसारदुःखाची निवृत्ति होऊन परमानंद भगवंताची प्राप्ति होते. इति । १७.

# अध्याय १८ वा.

## कपिलोपदेश ( ३-२५. )

देवहूतिरुवाचः--

अथ मे देव संमोहमपाक्रष्टुं त्वमर्हसि ॥
योऽवग्रहोऽहं ममेतीत्येतस्मिन्योजितस्त्वया ॥ १० ॥
तं त्वागताऽहं शरणं शरण्यं स्वभृत्यसंसारतरोः कुठारम् ॥
जिज्ञासयाऽहं प्रकृतेः पुरुषस्य नमामि सद्धर्मविदां वरिष्ठम् ११॥

**देवहूति ह्मणालीः**—कपिला ! शरीर, घरदार इत्यादिक वस्तूंवर तूंच " मी आणि माझें " असा सर्वांना अभिमान लावून दिला आहेस; अर्थातच त्या अभिमानामुळें, राग, लोभ हे विकार उत्पन्न होतात, तो देखील तुझ्याच मायेचा प्रभाव होय. ईश्वरा, तो दुरभिमान नाहींसा करण्याचें सामर्थ्य तुझ्याच अंगीं आहे, ह्मणून मीं प्रार्थना करितें कीं,

आतां एवढें माझें अज्ञान दूर कर. ईश्वरा ! प्रकृति आणि पुरुष ह्यांच्या स्वरूपाचें ज्ञान करून घ्यावें, ह्या इच्छेनें मी तुला शरण आलें आहे. तूं आपल्या भक्तांचा संसाररूपी वृक्ष तोडून टाकितोस, ह्मणजे भक्तांना मुक्ति देतोस, ह्मणून मी तुला वंदन करतें.

**कपिलमुनि ह्मणाले:**—माते ! मनुष्यांच्या कल्याणाचा उपाय म्हटला ह्मणजे एक अध्यात्मयोग होय. कारण, तो योग प्राप्त झाला असतां संसारसंबंधीं दुःखाचा व विषयसुखाचा सर्वथा नाश होतो. देवहूति, पूर्वी हा योगमार्ग जाणण्याची इच्छा ऋषींस झाली असतां त्यांस तो मीं सांगितला होता. तोच आतां तुलाही त्यांतील सर्व अंगांसुद्धां सांगतों. ह्या आत्म्याला बंध किंवा मोक्ष प्राप्त होण्याला कारण, एक[1] मन होय. ह्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं. तेंच विषयांवर आसक्त[2] झालें तर बंधाला कारण होतें; आणि निर्विषय होऊन ईश्वराच्या ठिकाणीं रत झालें, तर मुक्तीला कारण होतें. एक मन स्वाधीन करून घेतलें म्हणजे सर्व पुरुषार्थ सिद्ध होतात. पहा-' अहंकार ' आणि ' ममकार ' अशा दोन प्रकारच्या अभिमानापासून[3] काम, क्रोध, लोभ इत्यादि मलदोष (पापसमूह) उत्पन्न झालेले असतात. अभिमान सुटला कीं, ते नष्ट होतात, अर्थात् चित्त शुद्ध होतें. तेव्हां तें मन सुखदुःखरहित होऊन सर्वत्र समवृत्तीनें शांत राहतें. अशी अंतःमनाची स्थिति

( १ ) " मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः " **अर्थ**—मनुष्यांच्या बंधमोक्षांला कारण एक मनच होय.—**श्रुति.**

( २ ) " बन्धनं विषयासक्तं मुक्त्यै निर्विषयं स्मृतम् " **अर्थ**—विषयासक्ततेमुळें बंधनाला कारण होतें; आणि तेंच निर्विषय झालें ह्मणजे मुक्ति होते.—**श्रुति.**

( ३ ) " देहादीनात्मत्वेनाभिमन्यते सोऽभिमान आत्मनो बन्धः " **अर्थ**—देहादि अनात्म वस्तूंच्या ठिकाणीं आत्मभावना करून त्याविषयींचा अभिमान धरणें हेंच आत्म्याचें बंधन होय.—**श्रुति.**

झाली कीं, मग त्यांत भक्ति, ज्ञान, वैराग्य हीं उत्पन्न होऊन त्याला आत्मसाक्षात्कार होतो. त्यायोगानें तो पुरुष आत्म्याला प्रकृतीहून पलीकडचा, भेदरहित, स्वयंप्रकाश, अत्यंत सूक्ष्म, अखंडित व उदासीन असा पाहतो. योगाभ्यास करणाऱ्या पुरुषांना ब्रह्मप्राप्तीचा सुगम मार्ग म्हटला म्हणजे निष्काम भक्ति करणें, हाच होय. ह्याच्यासारखा दुसरा मार्ग नाहीं. विषयांवर आसक्ति ठेवणें हें आत्मबंधनास कारण होय, असें विद्वानांचें मत आहे; म्हणून सत्पुरुषांचा सहवास करावा. जो पुरुष सत्पुरुषांची संगत धरितो, त्याला मोक्षद्वार उघडेंच आहे असें समजावें. माते, सत्पुरुष ओळखावे कसे तें सांगतों ऐक:-

**सत्पुरुषांचीं लक्षणें:**—माते, सत्पुरुष अत्यंत दयाळू आणि सहनशील असतात; त्यांचा स्वभाव शांत असतो; ते सर्वांशीं मित्रभावानें वागतात; शास्त्रपद्धतीप्रमाणें वर्तन करण्यांत ते अगदीं दक्ष असतात; सुशीलता हेंच त्यांचें भूषण होय; ते अनन्यभावानें माझी दृढभक्ति करीत असतात; सर्व कर्मे मलाच अर्पण करितात; माझ्यासाठीं आपले इष्ट-मित्र व बंधुवर्ग यांस सोडून देतात; केवळ माझ्या संबंधाच्या मधुर कथांचें श्रवण आणि कीर्तन करीत असतात व त्यांचीं अंतःकरणें एकसारखीं मजकडे लागलेलीं असल्यामुळें अध्यात्मिक ताप त्यांना मुळींच बाधत नाहींत. ह्या सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त अशा साधु पुरुषांच्या संगतीला राहणाऱ्या मनुष्याचे सर्व दोष दूर होतात. म्हणून तूं सत्समागमाची इच्छा ठेव. सत्पुरुषांच्या समागमानेंच मनुष्याला माझ्या कथा श्रवण करावयास मिळतात; आणि त्यामुळें माझ्या पराक्रमाचें यथार्थ ज्ञान होतें, अर्थात् त्याचें अज्ञान नष्ट होतें. अज्ञानाची निवृत्ति म्हणजे ज्ञानरूप मोक्ष होय, आणि परमेश्वरप्राप्तीचा मार्ग तरी हाच होय. ईशकथा श्रवण करण्यानें प्रथमतः मनुष्याची ईश्वराविषयीं आस्तिक बुद्धि उत्पन्न होते, नंतर लवकरच त्या मनुष्याला ईश्वराविषयीं प्रीति आणि भक्ति

अनुक्रमानें उत्पन्न होऊन त्या वाढत जातात. तदनंतर ईशसृष्टीच्या लीलांचा तो विचार करूं लागतो; त्या विचाराच्या योगानें त्याला ह्या लोकांत दिसणाऱ्या विषयोपभोगांचा व स्वर्गादिकांत असलेल्या ऐकीव विषयसुखांचा तिरस्कार वाटत जातो. अशा रीतीनें त्याला वैराग्य प्राप्त झालें असतां भक्तिप्रधान योगमार्गानें इंद्रियांचा निग्रह करून व चित्ताची एकाग्रता करून तो आत्मसाक्षात्कारसाधनांच्या उद्योगास लागतो. याप्रमाणें त्रिगुणात्मक भोगैश्वर्यांचा त्याग करून योगबलानें ह्या देहानेंच ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति करून घेतो.

**देवहूति म्हणाली**:—हे संकटनाशका कपिला, ज्या भक्तीच्या योगानें तुझ्या ज्ञानात्मक स्वरूपाला मी तत्काल प्राप्त होईन अशी मला करतां येणारी भक्ति कोणती? तें तूं मला सांग.

**कपिल महामुनि म्हणाले**:—माते, प्राण्याला शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या विषयांचें ज्यांच्या योगानें ज्ञान होतें तींच इंद्रियें होत. विषयांचा अनुभव आणून देणें हा त्यांचा अंगस्वभावच होय, हें जरी खरें आहे, तथापि त्यांचें मुख्य कर्तव्य म्हटलें ह्मणजे वेदांत सांगितलेल्या कर्मांचें अनुष्ठान करणें हें होय. त्या कर्मांच्या आचरणाचे योगानें मनुष्याचें अंतःकरण शुद्ध व सत्वगुणी होतें; असें झालें म्हणजे यत्नावांचून त्या पुरुषाचीं इंद्रियें ईश्वराच्या ठिकाणीं निष्कामवृत्ति होतात; ह्यासच भगवद्भक्ति म्हणतात. ही भक्ति अणिमामहिमादि अष्टसिद्धींपेक्षांही अधिक महत्वाची आहे. ईश्वराविषयीं ज्या पुरुषास अशी निष्कामभक्ति जडली त्यास मोक्ष सहज प्राप्त होतो. कारण, प्राण्यांनीं भक्षिलेलें अन्न जसें जठराग्नि पचवून टाकितो, त्याप्रमाणें ही निष्कामभक्ति सतरा तत्त्वांच्या लिंगदेहाचा भंग करून टाकिते. लिंगदेहाचा भंग होणें हीच मोक्षप्राप्ति होय. माते, सर्व साधनांपेक्षां भक्ति हेंच साधन उत्तम होय. कित्येक लोक तर इतकी निःसीम भक्ति करितात कीं, त्यांना सायुज्य देखील

नको असतें; केवळ माझ्या चरणसेवेंतच निमग्न असून सर्व कर्मे माझ्यासाठीं करीत असतात. असे जे भगवद्भक्त अतिशय प्रेमपूर्वक एकमेकांत ईश्वराच्या लीलांचें वर्णन करीत बसतात, ते सत्पुरुष परमेश्वराच्या दिव्य व मनोहर अशा स्वरूपाचें नित्य दर्शन घेतात, व त्यांच्याशीं प्रेमळ भाषणें करितात. त्यांना मोक्षाची इच्छाच नसते, तथापि माझी भक्ति त्यांना बळेंच मुक्ति प्राप्त करून देते. भक्ति उत्पन्न झाली कीं तिच्या मागून अणिमामहिमा आदिकरून आठही सिद्धि अशा भक्तांस प्राप्यरूपच असतात; पण ते निरिच्छ भक्त त्यांच्या उपभोगाची इच्छा देखील करीत नाहींत; इतकेंच नव्हे, तर वैकुंठांतील जीं अत्युत्तम ऐश्वर्ये, त्यांस देखील ते तुच्छ मानितात. ईश्वराच्या चरणसेवेवांचून त्यांचीं अंतःकरणें अन्यत्र कोठेंही रमत नाहींत. मुने, तुझा स्वभाव आधींच गंभीर आहे, म्हणून हा भक्तियोग तुला असाध्य नाहीं. माझी ( परमेश्वराची ) भक्ति करूं लागलेल्या प्राण्यांचा नाश कधींही व्हावयाचा नाहीं; व माझें कालचक्र त्याचा स्वीकार करावयाचें नाहीं. कारण त्यांचा प्रिय आत्मा, पुत्र, मित्र, गुरु आणि उपास्य देवता हे सर्व मीच असतों; म्हणून सर्व ठिकाणीं मला त्यांचें रक्षण करावें लागतें; यामुळें ईश्वराच्या भक्तांना कोणत्याही प्रकारचे अपाय घडत नाहींत. जे इहपरलोकांतील सुखांचा त्याग करून अनन्यभावानें ईश्वराचें भजन करितात, त्यांस तो मृत्युरूप संसारापासून पार पाडितो. परमात्मस्वरूपीं कोणतेंही भय नाहीं. सूर्य, चंद्र, अग्नि, वायु व मृत्यु हे त्या परमेश्वराच्या भयानेंच आपापलीं कर्तव्यें बजावितात. ह्मणून आत्महित साधणारे योगी पुरुष त्या परमेश्वरालाच शरण जातात. ह्या जगांत मनुष्यानें सद्भावपूर्वक ईश्वराची भक्ति करणें, हाच त्याच्या कल्याणाचा उत्तम मार्ग होय. इति । १८.

---

# अध्याय १९ वा.

## नारदाचा उपदेश. ( ४-२९ ).

नारद उवाचः—

**प्राणेंद्रियमनोधर्मा नात्मन्यध्यस्य निर्गुणः ॥**
**शेते कामलवान्ध्यायन्ममाहमिति कर्मकृत् ॥ २५ ॥**

**नारद ह्मणालेः**—प्राचीनबर्हि राजा, जीवात्मा वास्तविक निर्गुण असूनही अज्ञानानें क्षुधा, तृषा हे प्राणधर्म, संकल्पविकल्प हे मनोधर्म, ग्रहणत्याग हे इंद्रियधर्म, इत्यादि धर्म आपल्या ठिकाणीं आरोपित करितो, व विषयसुखाच्या लोलुपतेमुळें जडदेहाच्या ठिकाणीं " मी व माझे " असा अभिमान धारण करून कर्माधीन बनून राहतो ! ह्यास्तव त्याला सर्वव्यापी श्रेष्ठ गुरु जो भगवान् परमात्मा, त्याचा विसर पडतो. मग तो प्रकृतीच्या कार्यरूप गुणांत आसक्त होऊन जातो, नंतर तो परतंत्र होऊन कर्मेंच करीत राहतो त्याच्या हातून सात्विक, राजस किंवा तामस ह्यांपैकीं कोणते तरी गुणानें जसजसें कर्म घडेल, तसतसें तो देव-मनुष्यादि योनींत जन्म घेतो. तें असें:—सात्विक कर्माच्या योगानें उज्ज्वल अशा देवयोनींत जन्मास येऊन सुख पावतो; केव्हां केव्हां राजस कर्माच्या योगानें मानवयोनींत जन्म घेऊन दुःख व आयास भोगतो आणि कधीं कधीं तामस कर्माच्या योगानें तिर्यग्योनींत जन्मून मूलाज्ञान व नित्य यातना अशा अधमगतीस पात्र होतो. एकंदरींत त्यानें जीं जीं कर्में व गुण संपादन केले असतील, त्याप्रमाणें त्याला देव, मनुष्य किंवा तिर्यक् ( पशुपक्ष्यादिक ) योनींत जन्म मिळतो. उदाहरण, जसा एखादा भुकेनें व्याकुळ झालेला कुत्रा, घरोघर फिरत असतां त्याच्या दैवानुसार कोठें गोड खाद्य मिळतें, कोठें कोरडाओला भाकरीचा

तुकडा मिळतो व कोठें तर मारही खावा लागतो; त्याप्रमाणें कामाधीन झालेल्या जीवास विधिनिषेध मार्गांनीं देवलोक, मानवलोक किंवा नरकलोक हे फिरत असतां आपल्या दैवाप्रमाणें कोठें सुख, कोठें दुःख व कोठें यातना प्राप्त होत असतात. राजा, अधिदैविक, अधिभौतिक व अध्यात्मिक हीं दुःखें त्यास इतकीं निकटून असतात कीं, ह्यांपैकीं कोणतें तरी एखादें दुःख त्याला होतेंच, त्यामुळें प्रतिकार करितां येत नाहीं; तेव्हां सर्व दुःखांच्या प्रतिकारांचा यत्न करीत असणें, म्हणजे डोक्यावरचें ओझें खांद्यावर घ्यावयाचें इतकेंच, म्हणजे एका प्रकारचें दुःख भोगून कंटाळा आला कीं, दुसऱ्या प्रकारच्या दुःखाचा भोग पुढें तयार असतोच! कारण, दुःखांच्या प्रतिकारासाठीं जीं जीं कर्में करावयाचीं तीं तीं सर्व दुःखरूपच*असतात. हे पुण्यपुरुषा, मनुष्य निद्रेंत असतां त्यास स्वप्न पडलें, तर तें जसें जागृत झाल्यावांचून अगदीं नष्ट होत नाहीं; त्याप्रमाणें दुःखांच्या मूलभूत कर्माचा निःशेष (वासनांसह) प्रतिकार ज्ञानरहित कर्माच्या योगेंकरून कधींही होणें नाहीं. कारण, तीं दोन्ही प्रकारचीं कर्में अज्ञानानेंच प्राप्त झालेलीं असतात. व तीं दोन्हीं परस्परांशीं अविरुद्ध आहेत; ह्मणून एका कर्मापासून दुसऱ्या कर्माचा समूळ नाश होणें शक्य नाहीं. उदाहरण—जसें लांकूड तोडण्याला कुऱ्हाड पाहिजे, तसें कर्मनाशाला ज्ञानच पाहिजे; तसेंच स्वप्नांतील सर्व पदार्थ खोटे आहेत हें सर्वांना माहित असतें; परंतु जोंपर्यंत पुरुष उपाधिभूत मनासहवर्तमान स्वप्नांत रममाण असतो, तोंपर्यंत तेथें दिसणाऱ्या वस्तुतः खोट्या सर्पव्याघ्रादिकांपासून त्याला भय वाटत असतें; त्याप्रमाणें जागृत अवस्थेमध्यें हा प्रपंचरूप संसार आत्म्याच्या ठिकाणीं मुळींच नसतांही, अज्ञानानें तो खरा भासूं लागतो. अज्ञान नष्ट होईपर्यंत त्याची निवृत्ति होत नाहीं. ह्याकरितां मिथ्या प्रपंचांतील अनर्थ

दूर करावयाचा मार्ग ह्मटला ह्मणजे सद्गुरूच्या ठिकाणीं उत्तम भक्ति बाळगून ज्ञान प्राप्त करून घेणें हाच होय.

**भगवद्भक्तीचें फळः**—राजा, षड्गुणैश्वर्यसंपन्न जगन्निवास ईश्वराविषयीं निष्काम बुद्धीनें भक्तियोग चालविला असतां त्या योगें प्रथम उत्तम प्रकारचें वैराग्य उत्पन्न होतें, आणि नंतर क्रमानें ज्ञानही प्राप्त होतें. उत्तम भक्तियोग चालविणाऱ्या भगवद्भक्ताला भगवान् वासुदेवाच्या कथा श्रवण करण्याविषयीं गोडी तेव्हांच उत्पन्न होते; व एकदां तो श्रद्धापूर्वक त्या कथा श्रवण करूं लागला ह्मणजे त्याची भक्ति उत्तरोत्तर अधिकाधिक दृढ होत जाते. राजा, भगवद्भक्त पुरुष वासुदेवाच्या कथा ऐकण्यांत व सांगण्यांत जसजसे निमग्न होतात, तसतशा त्यांच्या वासना क्षीण होत जाऊन साधुलोकांनीं वर्णन केलेल्या मधुसूदनाच्या चरित्ररूप सुधेनें भरलेल्या चोहोंकडून वाहणाऱ्या नद्यांचें अमृत ते अधिकाधिक प्राशन करूं लागतात. त्यांनीं तें कितीही प्राशन केलें, तरी त्यानें त्यांची तृष्णा कमी न होतां अधिकाधिकच वाढते. ह्याप्रमाणें त्यांचे अवयव कृष्णकथेंत तल्लीन झाल्यावर त्यांस क्षुधा, तृषा, भय, शोक, मोह इत्यादिकांची कधींही बाधा व्हावयाची नाहीं. क्षुधा, तृषा इत्यादि स्वभावतः प्राप्त झालेल्या विकारांच्या आधीन झालेलीं मनुष्यें भगवान् श्रीकृष्णाच्या सुधातुल्य गुणकीर्तनांत रममाण होत नाहींत; ह्मणून ते खरोखर दुर्दैवी होत !

**भगवत्प्राप्तीचा उपायः**—राजा, परमेश्वराचें स्वरूप जाणणें फार अवघड आहे. मोठमोठे विद्वान व ज्ञानी पुरुषही मंत्रांनीं प्रतिपादन केलेल्या इंद्रादि देवांच्या रूपानें भिन्न भिन्न भासणाऱ्या परमेश्वराच्या स्वरूपाला जाणत नाहींत. अंतःकरणांत भगवच्चिंतन करीत गेलें ह्मणजे परमात्मा पुरुषावर अनुग्रह करितो; तेव्हां तो पुरुष लौकिक किंवा वैदिक कर्मांत आसक्त झालेला बुद्धिग्रह सोडून देतो. ह्याकरितां क-

मींपासून पुरुषार्थाची प्राप्ति होईल, असें जें आपण ऐकतों व सत्य मानतों तें व्यर्थ आहे हें लक्षांत आण. वेद हे स्वर्गादि सुख साध्य करून देण्याकरितां कर्ममार्गाचें प्रतिपादन करितात, असें ह्मणणाऱ्या लोकांच्या बुद्धि मलीन झाल्या असल्यामुळें त्यांस वेदांचें रहस्य कळलें नाहीं असें समजावें. राजा, आतां स्वतः तूं आपल्याविषयीं विचार कर. पूर्वेकडे अग्रें केलेल्या दर्भांनीं ( अनेक यज्ञांनीं ) भूमंडल आच्छादून टाकून बहुत पशूंस मारून " मी मोठा यज्ञकर्ता " असा तुला अभिमान झाला असल्यामुळें तुला कर्माचें तत्त्व काय ? विद्येचें स्वरूप कोणतें ? ह्याचें मुळींच ज्ञान नाहीं. राजा, परमात्म्याला स्वाधीन करून घ्यावा, हाच कर्माचा हेतु होय; व परमात्म्याच्या ठिकाणीं चित्त स्थिर करावें, हाच विद्येचा उद्देश असें पक्कें समज. तो व्यापक ईश्वर सर्व प्राण्यांचा आत्मा होय. कारण, त्याच्यापासूनच सर्व प्राण्यांची उत्पत्ति होते. त्या भगवंताचें चरणकमल हें लोकांचें आश्रयस्थान असून त्याच्याच आश्रयानें सर्वांचें कल्याण होतें. लोकांस अत्यंत प्रिय जो आत्मा तो प्रत्यक्ष परमेश्वरच आहे, व "त्याच्या ज्ञानानें सकल भयें नाहींशीं होतात." असें जो जाणतो तोच विद्वान्, तोच गुरु व तोच प्रत्यक्ष परमेश्वर जाणावा. आतां आपल्या उद्धारासाठीं त्वां काय करावें, ह्याबद्दल श्रेष्ठ पुरुषांनीं ठरविलेला अत्यंत गुह्य असा एक सिद्धांत उपाय मी तुला सांगतों, लक्षपूर्वक ऐकून घे.

सिद्धांतिक उपायः—राजा, एक हरिण फुलांच्या बागेमध्यें आपल्या स्त्रीच्या समागमांत आसक्त झालेला थोडें थोडें तृण भक्षण करीत करीत पुढें पुढें चाललेला आहे; भ्रमरसमूहाचीं गायनें कर्णद्वारें ऐकण्यांत त्याचें चित्त गर्क झालेलें आहे; त्याच्या पाठीशीं लांडगे लागले असतां त्यांस तो न जुमानितां पुढें चालला आहे; व अशा स्थितींत त्यास पारध्याचे बाण लागले आहेत; अशा हरणास शोधून काढ. राजा,

माझ्या दृष्टांतांतील अभिप्राय तुझ्या ध्यानांत आलासें दिसत नाहीं; तर तो स्पष्ट करून दाखवितों:—येथें पुष्पांची बाग ह्मणजे घर होय. तींतील फुलें ह्मणजे बायका समजावें; फुलांत यत्किंचित् मधु व गंध असतो, त्याप्रमाणें येथेंही जिव्हा, उपस्थ इत्यादि इंद्रियांचें कामसुख होय. तें अतिशय क्षुद्र व केवळ लेशमात्र असतें खरें; तथापि तें मिळविण्याकरितां जीव स्त्री इत्यादिकांचा आश्रय धरून राहतो. त्याच्या अंतःकरणाला त्या त्या वस्तूंबद्दल—'अहंता ममता' वाटूं लागते; आणि उपभोगबुद्धीमुळें भ्रमराप्रमाणें मनोहर अशा स्त्रीपुत्रादिकांच्या भाषणांत मनुष्य रमून जातो. काल हा लांडग्याप्रमाणें दिवस, रात्र. घटका इत्यादिकांच्या योगानें आयुष्य हरण करीत असतां त्यास न जुमानतां मनुष्य आपलीं कर्मे एकसारखीं करीतच असतो; व मृत्युरूप पारधी कोणालाही न जुमानतां बेलाशक त्याजवर बाण टाकीतच असतो. राजा, हा हरिण ह्मणजे तूं स्वतः आहेस हें ध्यानांत आण. ह्या मृगाच्या वृत्तांतावरून आपलें चित्त विषयांपासून निवृत्त करून अंतरात्म्याच्या ठिकाणीं स्थापन कर; व सर्व इंद्रियांची बहिर्वृत्ति नाहींशी करून त्यांचा आत्म्याच्या ठिकाणीं लय कर. आणि संसारसुखाविषयीं वैराग्य धारण करून अंतीं भगवत्प्राप्ति करून घे. इति । १९.

---

# अध्याय २० वा.

## प्रल्हादाचे उद्गार (७–९.)

प्रल्हाद उवाचः—

**नैतन्मनस्तव कथासु विकुंठनाथ संप्रीयते दु-**
**रितदुष्टमसाधु तीव्रम् ॥ कामातुरं हर्षशोकभ-**
**यैषणार्तं तस्मिन्कथं तव गतिं विमृशामि दीनः ॥ ३९ ॥**

प्रल्हाद म्हणाला: हे वैकुंठनाथा, हें माझें मन पापांमुळें दुष्ट, विषयोन्मुख, आवरण्यास कठिण, कामानें व्याकुळ आणि हर्ष, शोक व भय ह्या विकारांच्या योगें पीडित झालें आहे; म्हणून त्याला तुझ्या कथांची गोडी लागत नाहीं. अशा अस्थिर मनाच्या साहाय्यानें या दीनानें तुझ्या तत्त्वरूपाचा विचार करावा कसा? हे अच्युता, जिव्हेची तृप्ति न झाल्यामुळें ती मला एकीकडे ओढीत असते. शिश्न दुसरीकडे ओढितें, त्वचा, नेत्र व कान भलतीकडे ओढून नेत असतात; कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांनींही ओढाताण चालविलीच आहे. एकंदरीत जशा पुष्कळशा सवती घरधन्याची ओढाताण करितात; तसा हा इंद्रियगण माझ्या मनाला आपापल्या विषयाकडे ओढाताण करीत आहे. अशी स्थिति केवळ माझ्याच मनाची आहे असें नाहीं; तर स्वकर्मामुळें संसाररूप वैतरणी नदीमध्यें दुसरेही जे अनेक लोक पडले आहेत, त्यांची सुद्धां हीच स्थिति आहे. परस्परांच्या संगतीमुळें स्वकीयाविषयीं प्रेम व परकीयांविषयीं अप्रेम वाटत असतें. हे नित्यमुक्ता, ह्यांची ही कष्टद स्थिति तुला दिसत आहे. तेव्हां कृपा करून ह्या मूढ जनांना उद्धरून ने. भगवंता, तूं सर्वांचा गुरु आहेस; व एकटा ह्या विश्वाचे उत्पत्ति, स्थिति व लय चालवितोस, अर्थात् इतक्या लोकांना उद्धरून नेण्यास तुला आयास कितीसा पडणार! आतां "तुला एकट्यालाच उद्धरितों" असें तूं कदाचित् म्हणशील तर मला त्याची गरज नाहीं. कारण, तुझ्या भक्तांची आम्ही नित्य सेवा करीत असतों, तेव्हां आम्ही मुक्तच आहों. याकरितां तूं या सर्व मूढ जनांना उद्धरून नेशील तर मोठा अनुग्रह होईल. दुःखितांना साहाय्य करणें हें तुझें कर्तव्य आहे. हे सर्वोत्तमा, ही दुस्तर संसाररूप नदी तरून जाणें फार दुर्घट खरें; पण मला तिचें मुळींच भय वाटत नाहीं. कारण, माझें मन सदैव तुझ्या लीला गात असून त्या आनंदांत रममाण असतें. जे मूर्ख या अखंडानंदाला परा-

ङ्मुख असतात व इंद्रियांच्या तृप्तीसाठीं मिथ्यासुखप्राप्त्यर्थ कुटुंबभार वाहतात, त्या मूर्खांबद्दल मात्र मला कींव येते. देवा, मुनींना आपल्याला मुक्ति मिळावी अशी इच्छा असते; परंतु ते एकांतीं मौन धरून बसतात, ह्मणजे तुजपाशीं मोक्ष मागण्यासाठीं तोंड उघडीत नाहींत; ह्याचें कारण बहुधा त्यांना दुसऱ्याचें कार्य साधण्याची इच्छा असावी हें होय. ह्मणून ह्या दीन जनांना टाकून मीं एकट्यानेंच मुक्त व्हावें अशी माझी इच्छा नाहीं. बरें, दुसऱ्या कोणाचा आश्रय करावा तर ह्या संसारचक्रांत फिरत राहणाऱ्या दीन जनांना तुजवांचून दुसरा कोणताही आधार मला दिसत नाहीं. मैथुनादि तुच्छ गृहसुखप्राप्तीनें हे जन संतुष्ट असतात खरे; परंतु त्या सुखाचा परिणाम कसा आहे, हें त्या कामीजनांच्या लक्षांत येत नाहीं. पहा—एखाद्याला खरूज झाली असतां कंड सुटली कीं, तो एकसारखा खाजवीत बसतो; पण त्याचा परिणाम आग होऊन मागाहून त्रास भोगावा लागतो, हें जाणत असूनही पुनः कंड सुटली कीं तो पुनरपि खाजविण्यास कमी करीत नाहींच! ह्या जगांत दीन कामीजन संसारांतील अनेक दुःखें भोगीत असूनही त्यांना विषयांतील दोष दिसून येत नाहींत! विवेकी पुरुष मात्र कामवासनेला खरजेच्या कंडूप्रमाणें न खाजवितां सोशितात.

देवा! मौनधारण, व्रताचरण, सच्छास्त्रश्रवण, तप, वेदाध्ययन, स्वधर्माचरण, ग्रंथव्याख्यान, एकांतवास, जप आणि समाधि हीं दहा मोक्षसाधनें आहेत खरीं; पण त्यांपासून त्या विषयलोलुपांना काय लाभ? ते लोक या साधनांच्या लाभाचा उपयोग मोक्षाकडे न करितां अर्थात् ज्ञानाची प्राप्ति न करून घेतां उदर भरण्याच्या कामीं उपयोग करितात; म्हणजे हीं साधनें विकून त्यांवर आपलीं उपभोगसाहित्यें संपादितात. दांभिकांना तर निर्वाहाची देखील मारामार पडते. देवा! आह्मां मनुष्यांना ओळखण्यास ज्याप्रमाणें काळा, गोरा इत्यादि खुणा असता-

न; त्याप्रमाणें तुला ओळखण्याचें कांहीं साधन नाहीं. कारण, तूं निर्गुण, निराकार असा आहेस; पण अशा तुलाही ओळखितां यावें ह्मणून वेदांनीं बीजांकुरवत् कारण व कार्य हीं रूपें उपलक्षणाकरितां सांगितलीं आहेत. त्या योगानें अग्निहोत्री जसे काष्ठाचे ठिकाणीं असलेला अग्नि मंथनानें प्राप्त करून घेतात. किंवा वृक्षरूपी कार्यांत बीजरूपी कारण आहे असें विचारी पुरुष जाणतात; त्याप्रमाणें इंद्रियनिग्रही योगी कार्यकारणांच्या ठिकाणीं व्यापकत्वें असणाऱ्या तुला भक्तिमार्गानें ओळखितात. हे सर्वव्यापका ! पृथ्वी. आप, तेज, वायु, आकाश हीं पंचमहाभूतें; शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हीं पांच सूक्ष्मभूतें; प्राण, इंद्रियें, मन. अहंकार. देवता इत्यादि स्थूल आणि सूक्ष्म हीं सर्व तुजपासून वेगळीं नाहींत. सत्वादि गुण, गुणाभिमानी देवता. महत्तत्त्वादि सर्व तत्त्वें व मनुष्यें हीं सर्व जन्ममरणाधीन आहेत. कारण, त्यांना लिंगदेह हा उपाधि असतो. तूं निरुपाधि असल्यामुळें तुला जन्ममरण नाहीं, अर्थात् त्या देवादिकांना तुझें यथार्थ ज्ञान नसतें. विद्वान लोक ही गोष्ट मनांत आणून अध्ययनादि व्यापार बंद करून केवळ तुझी उपासना चालवितात. हे परमपूज्या ! वंदन. स्तुति. सर्व कर्मसमर्पण, चरणसेवा, नामस्मरण व कथाश्रवण अशी सहा अंगांनीं युक्त सेवा केल्याशिवाय पुरुषाला तुझी भक्ति लाभावी कशी ? तुझी प्राप्ति फक्त परमहंस जनांना मात्र होते. ह्मणून दीनोद्धारका ! ज्याअर्थी भक्तीवांचून मोक्ष नाहीं, आणि उत्तम सेवेवांचून भक्ति उद्भवणार नाहीं; त्याअर्थी मीं पूर्वीं मागितलेला दास्ययोगच तूं मला दे ह्मणजे झालें. इति । २०.

---

# अध्याय २१ वा.

## पूजाविधान प्रकार ( ११-२७ ).

उद्धव उवाचः—

क्रियायोगं समाचक्ष्व भवदाराधनं प्रभो ॥
यस्मात्त्वां ये यथाऽर्चंति सात्वताः सात्वतर्षभ ॥ १ ॥

**उद्धव म्हणालाः**—हे भगवंता ! भगवद्भक्त ज्या विधानानें तुझी पूजा करितात. तें विधान मला निवेदन कर. ह्मणजे कोणते भक्त कोणत्या कारणासाठीं, कोणत्या आश्रयावर ( मूर्ति इत्यादि स्थानीं ) कशा प्रकारें तुझी पूजा करितात, तें मला कृपा करून सविस्तर सांग.

**भगवान श्रीकृष्ण ह्मणालेः**—उद्धवा, पूजाविधान म्हटलें म्हणजे केवळ कर्मकांडच होय. हें कर्मकांड अनंत, अपार आहे. व वास्तव त्याविषयींचें प्रतिपादन करणारे अनेक ग्रंथ आहेत. व त्यांतील अनुष्ठानांचे प्रकारही अपरंपार सांगितलेले आहेत. तथापि मी तुला पूजाविधि अनुक्रमानें यथासांग निवेदन करितों.

( १ ) **पूजेचे प्रकार व कालः**—उद्धवा, माझी पूजा करण्याचे मुख्यत्वेंकरून तीन प्रकार आहेत. पहिला—वैदिक, दुसरा—तांत्रिक आणि तिसरा—मिश्र: [१] केवळ वैदिक म्हणजे ज्यांत वेदोक्त मंत्र आणि वैदिकच अंगें आहेत तो, पुरुषसूक्तांत वगैरे सांगितलेला; [ २ ] तांत्रिक म्हणजे तंत्रोक्त मंत्र व तंत्रोक्तच अंगें ज्यांत तो, पंचरात्रादि आगमांत वर्णिलेला; आणि [ ३ ] मिश्र म्हणजे ज्यांत वेदोक्त व तंत्रोक्त अशा दोन्ही पद्धतींचा समावेश केलेला असतो तो, अष्टाक्षरादि. ह्या तिन्हीं प्रकारांपैकीं पूजकानें आपल्या मनास वाटेल त्या एखाद्या प्र-

कारानें माझी पूजा करावी. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ह्या तीन वर्णांनीं आपापल्या वर्णाश्रमधर्मानुसार योग्यकालीं उपनयन संस्कार झाल्यावर मजवर विश्वास ठेवून भक्तिपूर्वक माझी पूजा करावी.

( २ ) **पूजेचीं अधिष्ठानें:**—प्रतिमा, स्थंडिल, अग्नि, सूर्य, उदक, हृदय(१) व ब्राह्मण ( ब्रह्मवेत्ता ), हीं पूजेचीं सात अधिष्ठानें ( आधार ) होत. पूजकानें अंतरीं मजविषयीं भक्ति धरून मीच ( ईश्वरच ) आपला गुरु होय; अशा भावनेनें ह्या सात अधिष्ठानांपैकीं कोणत्याही एका अधिष्ठानाचे ठायीं गंधमाल्यादि उपचारांच्यायोगें निर्मळ मनानें माझी पूजा करावी.

( ३ ) **पूर्वविधि:**—उद्धवा, पूजकानें पूजा करण्यास सिद्ध होण्यापूर्वीं प्रथम दंतधावन व मुखप्रक्षालन करावें, नंतर शरीरशुद्धीसाठीं वेदोक्त व तंत्रोक्त असा उभय विधिमंत्र ह्मणून मृत्तिका व गोमय ह्यांचें देहावर अनुलेपन करावें, आणि मग समंत्रक स्नान करावें. स्नान झाल्यानंतर संध्योपासना, ब्रह्मयज्ञ इत्यादि नित्य कर्में अवश्य करावींत, व त्या कर्मांसह नित्य माझी पूजा करीत जावें. अंतःकरणामध्यें केवळ ईश्वरविषयींचेंच चिंतन चालवावें; इतर विषयोपभोगांचे संकल्प करूं नयेत. अशा रीतीनें पूजा केली असतां पूजकाच्या संचित व क्रियमाण अशा दोन्ही कर्मांचा समूळ क्षय होतो ! हे साधो, पूर्वीं माझ्या पूजेचीं सात अधिष्ठानें सांगितलीं त्यांपैकीं पहिलें अधिष्ठान जी मूर्ति, तिचे प्रकार सांगतों.

( ४ ) **प्रतिमेचे प्रकार:**—१ पाषाणमय मूर्ति, २ काष्ठमय मूर्ति, ३ सुवर्णादि धातुमय मूर्ति, ४ मृत्तिकामय मूर्ति, ५ चित्ररूप मूर्ति, ६ वालुकामय मूर्ति, ७ मनोमय मूर्ति, व ८ रत्नमय मूर्ति. याप्रमाणें असे प्रकार.

---

( १ ) " हृदयीं जें माझें आवाहन । तें पूजा स्थान साहावें ॥ "—नाथ.

आठ सांगितले आहेत. उद्धवा ! ज्यांच्या आधारें ईश्वरप्राप्ति होते, तीं सर्व भगवंताचीं मंदिरें होत. त्या मंदिररूप प्रतिमांचे चल प्रतिमा व अचल प्रतिमा असे अवांतर दोन भेद आहेत.

( ५ ) **आवाहन व विसर्जनः**— अचल प्रतिमेची पूजा करितांना आवाहन व विसर्जन करूं नयेत; परंतु चल प्रतिमेवर तीं कोणी करितात व कोणी करीत नाहींत असा विकल्प आहे; ह्मणजे शालिग्रामावर आवाहन व विसर्जन केव्हांही करूं नये, व वालुकामय प्रतिमेवर तें नित्य अवश्य करावें. स्थंडिल पूजेंत आवाहन व विसर्जन दोन्ही केलींच पाहिजेत.

( ६ ) **प्रतिमेचें स्नानः**—मूर्ति मातीची, चंदनाची किंवा चित्ररूप असल्यास तिजवर केवळ मार्जन करावें; आणि दुसऱ्या प्रकारची प्रतिमा असल्यास तिला स्नान घालावें.

( ७ ) **पूजासामुग्रीः**—उद्धवा, प्रतिमादिकांच्या पूजेसाठीं उत्तम सामुग्री मिळवावी; परंतु हा नियम सकाम उपासकांसच विशेषतः लागू आहे. निष्काम उपासकांनीं जे कांहीं पदार्थ सहज मिळतील त्यांच्यायोगें पूजा केली तरी चालते. त्यांस कित्येक पदार्थ मिळाले नाहींत, तर त्यांनीं मनामध्यें त्यांची भावना करावी ह्मणजे झालें !

( ८ ) **अधिष्ठानाप्रमाणें उपचारभेदः**—उद्धवा, स्नान घालणें व भूषणें अलंकार लेवविणें हे उपचार प्रतिमांसच अर्पण करणें प्रशस्त होय. स्थंडिलांची पूजा करावयाची असेल तेव्हां त्यावर योग्य स्थानीं त्या त्या मंत्रांनीं अंग देवतांची स्थापना व प्रधान देवतांची स्थापना करावी; अग्नीची करावयाची झाल्यास आज्ययुक्त हविर्भागांच्या आहुति द्याव्या; सूर्याच्या पूजेंत उपस्थान व अर्घ्यप्रदान हेच उपचार प्रशस्त समजावे; आणि उदकाची पूजा कर्तव्य असल्यास उदकानें तर्पण

करावें इत्यादि उपचारांच्या योगें करावी. उद्धवा, आतां तुला एक मुख्य नियम सांगतों —

(९) मुख्य नियम:—भक्तानें केवळ भक्तिपुरःसर जरी उदक अर्पण केलें, तरी तें मला अतिशय प्रिय वाटतें; परंतु अभक्तानें गंध, पुष्पें, धूप, दीप, नैवेद्य, वगैरे अनेक पदार्थ अर्पण केले, तरी मी मुळींच संतोष पावत नाहीं. ही अधिकारादिकांची व्यवस्था सांगितली. आतां पूजा कशी करावी, तो प्रकार सांगतों:—

(१०) पूजोपक्रम—मनुष्यानें दंतधावन, स्नान इत्यादि करून शुद्ध व्हावें; मग पूजोपचार सिद्ध केल्यावर पूर्वेकडे अग्रेंकरून दर्भांचें आसन मांडावें, आणि त्यावर पूर्वेकडे किंवा उत्तरेकडे तोंड करून बसावें; प्रतिमा अचल असेल तर प्रतिमेकडे मुख करून बसावें व पूजेस आरंभ करावा. प्रथम आचार्यांस व वडील माणसांस नमस्कार करावा. नंतर शरीरावर यथाशास्त्र न्यास करावे; पुढें माझ्या प्रतिमेवर मूलमंत्रानें न्यास करावे, मग निर्माल्य, गंधलेप वगैरे काढून पुसून प्रतिमा स्वच्छ करावी; आणि मग कलश, प्रोक्षणपात्र ह्यांची गंधपुष्पादिकांनीं पूजा करावी. नंतर कलशांतील उदकानें पूजेचें स्थान, पूजाद्रव्यें व स्वतःचें शरीर ह्यावर प्रोक्षण करावें; आणि त्या कलशांतील उदकानेंच अर्घ्य, पाद्य व आचमनीय ह्यांकरितां तीन पात्रें भरून ठेवावीं. अर्घ्योदकांत गंध, पुष्प, अक्षता, यव, दर्भाग्र, तिळ, सर्षप आणि दुर्वा हीं

(१) " पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति । तदहं भक्त्युपहृतमश्नामि प्रयतात्मनः ॥ " अर्थ—पत्र, पुष्प, फळ, पाणी यांपैकीं जें कांहीं मला जो कोणी भक्तिपूर्वक देतो, तें निर्मळ अंतःकरणानें दिलेलें मी आनंदानें स्वीकारितों. —गीता.

(२) " जेवीं रजस्वलेचें पक्वान्न । उत्तम परि तें अति हीन । तेवीं अभक्ताचें भजन । कदा जनार्दन स्पर्शेना ॥ "—नाथ.

आठ द्रव्यें घालावींत, पाद्योदकांत सांवे, दुर्वा, कमल व विष्णुक्रांत इत्यादि द्रव्यें असावींत, व आंवळकठी, लवंग व कंकोळ ह्या द्रव्यांनीं आचमनीयोदक सिद्ध करावें; आणि अर्घ्य, पाद्य, आचमनीय ह्या तिन्हींपैकीं प्रत्येक पात्रावर अनुक्रमें गायत्रीच्या हृदय, शीर्ष, व शिखा, ह्या एकेक मंत्रानें प्रोक्षण करून पुनः गायत्रीमंत्रानें त्यांचें अभिमंत्रण करावें. नंतर माझ्या स्वरूपाचें ध्यान करावें. आतां तो ध्यानविधि सांगतों.

( ११ ) **ध्यानविधिः**—साधकानें प्रथम प्राणायामादिकांनीं देहांतील प्राणवायूचा व उदरांतील जठराग्नीचा निरोध करावा; आणि नंतर प्रणवनादाच्या शेवटीं, सिद्ध पुरुष जिचें ध्यान करितात. त्या हृदयकमलांतर्वर्ती व सूक्ष्म अशा माझ्या शुद्ध व श्रेष्ठ जीवकलेचें ह्मणजे श्रीनारायण मूर्तीचें ध्यान करावें. याप्रमाणें ध्यानयोग चालविला असतां हृदयांतर्गत साक्षी आत्म्याचें दीपकाप्रमाणें तेजोमय स्वरूप दृग्गोचर होऊन साधकाची तदाकार वृत्ति बनते.

( १२ ) **प्रधानपूजाः**—मानसोपचारांनीं हृदयांतर्गत श्रीनारायण मूर्तीची पूजा करावी, व नंतर अधिष्ठानावर तिचें आवाहन, न्यास वगैरे करून पूजेस प्रारंभ करावा. प्रथम धर्मादिकांच्या आणि नऊ शक्तींच्या योगें माझें आसन कल्पून त्यावर कर्णिका ( गाभा ) आणि

( १ ) गायत्रीच्या तीन चरणांला अनुक्रमें हृदय, शीर्ष व शिखा अशीं नांवें आहेत, असें कित्येक ह्मणतात. कोणी मूलमंत्राच्या तीन भागांना हीं नांवें कल्पितात.

( २ ) प्रणवाचीं पांच अंगें आहेतः—अकार, उकार, मकार, बिंदु व नाद. ह्यांपैकीं पांचही अंगांच्या अंतीं श्रीनारायणाचें ध्यान करितात.

( ३ ) " तेव्हां मूर्तीचें जडपण । निःशेष न देखावें आपण । मूर्ति भावावी चैतन्यघन । मुख्य आवाहन या नांव ॥ "—**नाथ.**

केसर (फुलांतील तंतू) यांच्या योगें देदीप्यमान असें अष्टदल कमल कल्पावें (धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य हे माझ्या आसनरूपी मंचकाचे अग्नेयी, नैर्ऋत्य, वायव्य व ईशान्य ह्या चार दिशांकडील पाय असें कल्पावें; अधर्म, अज्ञान, वैराग्याभाव व अनैश्वर्य हीं माझ्या मंचकाचीं चार दिशांकडील गात्रें मानावीत; सत्व, रज व तम हे तीन गुण माझ्या मंचकाच्या पट्टीचा समजाव्या; त्या मंचकावर एक अष्टदल कमल आहे असें मानावें; त्या कमलाच्या आठ दलांत व गर्भामध्यें विमला, उत्कर्षिणि, ज्ञाना, क्रिया, योगा, प्रव्ही, सत्या, ईशाना व अनुग्रहा ह्या नऊ शक्तींची स्थापना करावी; आणि त्या कमलाची कर्णिका व केसर हीं चंद्र, सूर्य व अग्नी होत अशी कल्पना करावी ). अशा प्रकारच्या ह्या कमलावर माझी मूर्ति अधिष्ठित आहे, असें मानून तिला वैदिक व तांत्रिक मंत्रांनीं पाद्य, आचमन व अर्घ्य हीं समर्पण करावीत.

( १३ ) उपपूजाः--सुदर्शन ( चक्र ), पांचजन्य ( शंख ), कौमोदकी ( गदा ), नंदक ( खड्ग ), बाण, शार्ङ्ग ( धनुष्य ), नांगर आणि मुसळ ह्या आठ आयुधांचें पूजन अष्टदिशांस करावें. कौस्तुभमणि वैजयंतिमाला आणि श्रीवत्सलांछन यांचें वक्षस्थलीं पूजन करावें; नंद, सुनंद, प्रचंड, चंड, कुमुद, कुमुदेक्षण, महाबल व बल ह्या पार्षदांची अष्टदिग्भागीं आणि गरुडाची अग्रभागीं पूजा करावी. चार कोनांमध्यें दुर्गा, विनायक, व्यास आणि विष्वक्सेन, वामभागीं गुरु, परमगुरु, परमेष्ठिगुरु आणि परात्परगुरु यांची स्थापना करावी; आणि अष्ट दिशांकडे इंद्रादि लोकपाल असून परमेश्वराकडे मुख करून बसलेले आहेत, असें कल्पून त्यांची अर्घ्यादिकांनीं पूजा करावी.

( १४ ) स्नानविधिः--पूजकानें द्रव्याची अनुकूलता असेल त्याप्रमाणें चंदन, वाळा, कापूर, केशर, कृष्णागर इत्यादिकांनीं उदक सु-

गंधित करून त्याच्या योगें मला स्नान घालावें. स्नान घालतांना स्वर्णघर्मानुवाक ( सुवर्ण घर्म परिवेदनं ) हा मंत्र ह्मणावा; महापुरुषविद्या ( जितं ते पुंडरीकाक्ष ) हें स्तोत्र म्हणावें; पुरुषसूक्ताचा ( ॐ सहस्रशीर्षा ) जप करावा; आणि राजन् ( इंद्रंनरोनेमधिताहवन्ते ) इत्यादि साममंत्र गावेत. नंतर अर्चना करावी.

( १९ ) **अर्चनविधिः**—माझ्या भक्तानें प्रेमपूर्वक मला वस्त्र, उपवस्त्र व अलंकार हीं अर्पण करावीं; मग गालावर, वक्षःस्थलीं व हस्तभागीं गंधादिकांच्या वेली काढाव्या; आणि पुढें गंधविलेपन, पुष्पमा-

( १ ) " स्नानार्गी आणिलें पंचामृत । पय दधि घृत मधुपर्क ॥ पृथक पृथक नाहाणियेलें देवें । वारंवार नवा वस्त्रावरी ॥ शुद्धोदक मग सप्रेम घालित केला मेघश्यामें काया शुद्ध ॥ तुका ह्मणे शुद्धाशुद्ध कोण करी । चालवीन हरि लाड माझा ॥ "

( २ ) " पिंवळा पितांबर दोरंगी नेटका । जरीकांठी देखा घवघवीत ॥ रुई फुलें चित्र विचित्र करवती । चुर्णनियां हातीं दिधलें देवा ॥ नेसला प्रीतीनें पतितपावन । निरिया घालोन मागें पुढें ॥ तुका ह्मणे प्रभु गर्वाचा अंबर । परि उपचार घेत माझा ॥ "

( ३ ) " रत्नांचीं कुंडलें मोतीयांचा तुरा । शिरपेंच बरा कलगीवरी ॥ पांच रत्न मोती माणीकहीं रेख । अर्पिलें सुरेख हार चांचे ॥ कंठीं भुजबंद पोंची कमरबंद । मुद्रिका स्वच्छंद नानापरी ॥ तुका ह्मणे माझे इच्छेचें करणें । ऐसीं हीं भूषणें त्याला देवा ॥ "

( ४ ) " सुरभीचें केशर मेदीनी बारीक । सांकळीनें देख पुंड्र केला ॥ रगडोनी कस्तूरी त्यावरी तिलक । करोनी सुरेख आदर्श ते ॥ दाखियेलें दिव्हा चंदनाची उटी । अगरुबरवटी मलयादिक ॥ तुका ह्मणे ऐसें गंध समर्पिलें । तेंही स्वीकारिलें जगन्नाथें ॥ जाईजुई तैसी गुलाब सेवती । तगर मालती शतपत्रें ॥ चंपक मोगरा तो पारिजातक । ऐसीं पुष्पें देख नानाविध ॥ तुळसी समवेत हारतुरेगजरे । समर्पिलें सारें अधोक्षजा ॥ तुका ह्मणे ऐसा देव भाग्यवंत । सर्व पुष्पजात पूजीयेला ॥ दशांग गुग्गुल ऊद जनार्दनीं । उदबत्या आणोनी लावीयेल्या ॥ माझा देवराव गंधाचा सुगंध । परि मकरंद घेत याचा ॥ देत अगरबत्या चंदनाचे धूप । करोनी साक्षेपें अर्चियेलें ॥ तुका ह्मणे माझा पतितपावन । करा अवघ्राण संतोषानें ॥ "

ला इत्यादिकांनीं प्रेमपुरःसर सजा भूषित करावें. याप्रमाणेंच नैवेद्यादि उपचार करावेत.

( १६ ) **नैवेद्य समर्पण**:—पूजकानें पाद्य. आचमनीय. गंध. पुष्प. अक्षता. धूप. दीप आणि नैवेद्य हे उपचार भक्तिपुरःसर निवेदन करावे. नैवेद्यासाठीं सामर्थ्य असल्यास गूळ. दूध. तूप. करंज्या. मांडे, अनरसे. मोदक. शिरा. दहीं, चटण्या, कोशिंबिरी इत्यादि पदार्थ सिद्ध करावे; आणि सामर्थ्य नसल्यास जेवढे मिळतील तेवढे घ्यावे.

अभ्यंगस्नान. सुगंधि द्रव्यांचें अनुलेपन, आदर्शदर्शन, दंतधावन, पंचामृताभिषेक. वस्त्रालंकारादि अर्चन. भक्ष्यभोज्यादि नैवेद्य. गायन, नर्तन वगैरे उपचार पर्वकालीं किंवा सामर्थ्य असल्यास नित्य समर्पण करावे. ज्याला अधिक फलाची अपेक्षा असेल त्यानें अग्नीचीही पूजा करावी.

( १७ ) **अग्निपूजा**:—गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणें अग्नीच्या संस्थापनेकरितां प्रथम मेखला, गर्त. वेदिका यांनीं युक्त असें कुंड सिद्ध करावें; त्यामध्यें अग्नीची प्रतिष्ठापना करावी; आणि प्रदीप्त झालेल्या अग्नीला हातानें परिसमूहन करावें; मग दर्भांचीं परिस्तरणें घालून उद्)कानें सभोंवतीं प्रोक्षण ( पर्युक्षण ) करावें. पुढें व्याहृति ( मंत्रऋचा ) म्हणून यथाविधि समिधाहुति द्यावी. नंतर अग्नीच्या उत्तरभागीं होमद्र-

( १ ) " जेवितांचे ताटीं भोगिला नैवेद्य । अन्न पंचखाद्य-समवेत ॥ घिवर जिलेब्या करंजा गुळवळ्या । दळी मुगदळी मांडे फेण्या ॥ कढी क्षीर तेलीं आंबव्या वरण । दूध घृत पूर्ण दधि मधु ॥ तुका म्हणे देवा सर्व शाकपाक । शिता गुळादिक समर्पिलें ॥ "

( २ ) " दधि दुग्ध साय साकर । नैवेद्य वाढिले परिकर । देव न पाहे उपचार । श्रद्धेनें श्रीधर तृप्त होय ॥ "—**नाथ.**

( ३ ) " देव विसरला देवपणासी । तें देवपण भेटे देवासी । ऐशिया दास्यत्वाचें आदर्शासी । तेणें देव देवासी उल्हासू ॥ "—**नाथ.**

र्व्ये मांडून प्रोक्षणीय उदकानें त्यावर प्रोक्षण करावें; आणि पुढें सांगितल्याप्रमाणें अग्नीच्या ठायीं माझ्या स्वरूपाचें ध्यान करावें. तो प्रकार असा–माझा देह तापविलेल्या सुवर्णाप्रमाणें देदीप्यमान असून शंख, चक्र, गदा व पद्म ह्या आयुधांच्या योगें माझ्या चारी भुजा शोभत आहेत; रूप शांत असून कमलकेसराप्रमाणें आरक्त वस्त्र परिधान केलेलें आहे. देहावर किरीट, कडीं, कटिसूत्र व बाहुभूषणें ह्यांची प्रभा पसरली आहे; वक्षस्थलावर श्रीवत्स चिन्ह असून कौस्तुभमणी झळकत आहे; कंठामध्यें वनमाला धारण केलेली आहे. याप्रमाणें मूर्तीचें ध्यान करून तिची मानसिक पूजा करावी. त्यानंतर हवन करावें.

( १८ ) **हवनविधिः**—वाळलेल्या समिधांवर तूप ओतून त्या अग्निदेवतेस अर्पण कराव्या; मग (प्रजापतये स्वाहा । इंद्राय स्वाहा ।) ह्या दोन मंत्रांनीं कुंडाच्या वायव्य कोनापासून अग्नीवरून अग्नेयी कोनापर्यंत एक व नैर्ऋत्य कोनापासून आरंभून अग्नीवरून ईशान्य कोनापर्यंत दुसरी अशा दोन आज्यधारा पाडणें. ह्याला आघार होम ह्मणतात; तो आघारहोम करावा. पुढें ( अग्नये स्वाहा । सोमाय स्वाहा । ) ह्या दोन मंत्रांनीं दोन आज्याहुती द्याव्या; आणि अष्टाक्षरी मूलमंत्रानें व तसेंच पुरुषसूक्तानें घृतयुक्त हविर्द्रव्यांच्या आहुती देऊन होम करावा. नंतर धर्म, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य व अधर्म इत्यादिक आसनस्थानीं स्थापित देवतांना केवळ नाममंत्रानें ( धर्माय स्वाहा । ज्ञानाय स्वाहा । अधर्माय स्वाहा । ) नामोच्चारणपूर्वक आहुती देऊन शेवटीं ( अग्नये स्विष्टकृते स्वाहा । ) असा जप करून आहुती द्यावी; व स्विष्टकृत होम संपूर्ण करावा. नंतर समारोप करावयास प्रारंभ करावा.

( १९ ) **अग्निपूजेचा समारोपः**—अग्निनारायणाची नमस्कारपूर्वक पूजा करावी; अष्टदिशांस नंदादि पार्षदांना बली अर्पण करावेत; पूजास्थानीं परत येऊन अग्निनारायणाच्या समोर बसावें; परब्रह्माचें चिंतन

करीत मूलमंत्राचा यथाशक्ति जप करावा. भगवंताला आचमनीय अर्पण करावें; अग्नि व अग्निनारायण ह्या दोहोंचें भोजन झालें असें मानावें. वर्ली दिल्यावर अवशिष्ट राहिलेला भाग विष्वक्सेनास ( मरुद्गणास ) अर्पण करावा. आणि अखेरीस मुखवासार्थ सुगंधिक तांबूलादि देऊन मंत्रपुष्प समर्पावें.

( २० ) **पूजेनंतरचीं कर्तव्यें:**—प्रतिमादिकांची पूजा समाप्त झाल्यावर पूजकानें माझ्या चरित्रांचें गायन व कीर्तन करीत नृत्य करावें; माझ्या लीलांचें अनुकरण दाखवावें; माझ्या कथा लोकांना ऐकवाव्या; स्वतः श्रवण कराव्या व मुहूर्तभर उत्सवांत निमग्न व्हावें; पुराणांतील लहान मोठीं स्तोत्रें म्हणावीं. प्राकृत पदांनींही माझी स्तुति करावी; आणि प्रसीद भगवन् ( देवा, मला प्रसन्न हो ) असें म्हणून साष्टांग नमस्कार घालावा. नंतर वंदन कसें करावें तें सांगतो:—पूजकानें उजव्या हातानें माझा उजवा पाय व डाव्या हातानें माझा डावा पाय धरावा; आणि मस्तक माझ्या चरणावर ठेवून " ईश्वरा, दुस्तर अशा भवसागरांतून मला पार कर व मृत्युपिशाचापासून मुक्त कर " अशी प्रार्थना करावी. मग माझा प्रसाद म्हणून निर्माल्य मस्तकीं धारण करावा आणि प्रतिमादिकांचें विसर्जन करणें असल्यास पूर्वी प्रतिमादिकांवर ज्याचा

( १ ) " निर्लज्ज नटाचे परी । हरिरंगणीं नृत्य करी । हावभाव कटाक्ष कुसरी । अभिनयो धरी कर्माचा ॥ गोवर्धन उद्धरण । अंगें दाखावें आपण । कां मांडूनियां दृढ ठाण । त्र्यंबक भाजन दावावें ॥ "—**नाथ.**

( २ ) " शुद्ध नये स्तोत्र पठन । करितां असंबद्ध गायन । पाठका दोष न लागे जाण । तेणें होय निर्दळण महादोष ॥ "—**नाथ.**

( ३ ) " अन्यथा शरणं नास्ति त्वमेव शरणं मम । तस्मात् कारुण्यभावेन रक्ष रक्ष परमेश्वर ॥ " **अर्थ**—हे परमेश्वरा, तुलाच मी शरण आलों आहें. कारण शरण जाण्यास दुसरी जागाच नाहीं, ह्मणून कृपा करून माझें रक्षण कर ॥

न्यास केला, तें तेज हृदयस्थ तेजाचे ठिकाणीं लीन झालें अशी भावना करावी. उद्धवा, प्रतिमा, स्थंडिल, अग्नि, सूर्य इत्यादि सर्व अधिष्ठानां-मध्यें माझी व्याप्ति सारखीच आहे. ह्यास्तव ह्यांपैकीं कोणत्याही अ-धिष्ठानाची पूजा केली, तरी फळ समानच मिळतें; कारण मी सर्वात्मा व सकल भूतांच्या ठिकाणीं राहिलेला आहें. असो. उद्धवा, मीं सांगि-तलेल्या ह्या विधीप्रमाणें जो पूजा करितो, त्यास ह्या लोकीं व परलोकीं अभीष्ट प्राप्ति होते.

( २१ ) **प्रतिमास्थापनः**--पूजनसंप्रदाय वृद्धिंगत होण्याक-रितां माझ्या मूर्तीची प्रतिमा स्थापन करावी. त्यासाठीं चांगलीं मजबूत मंदिरें बांधावीं; त्यांच्या सभोंवतीं रमणीय पुष्पवाटिका तयार करवाव्या; नित्यपूजेची व्यवस्था लावून ठेवावी; पर्वकाळीं यात्रा वगैरे भरवाव्या आणि उत्सवादिक करावे. पूजाविधि, यात्रा, उत्सव वगैरे संस्था अव्याहत चालण्याकरितां शेतें, बाजाराच्या जागा, नगरें व गांव इत्यादिकांचीं उत्पन्नें देवाकडे लावून द्यावीं. ह्या उत्पन्नाचा विनियोग महापर्वणीला आणि प्रतिदिनीं पूजा, उत्सव इत्यादिकांकडे व्हावा, अशी व्यवस्था जो कोणी करून ठेवितो, त्यास माझ्यासारखें ऐश्वर्य प्राप्त होतें. प्रतिमांची स्थापना केल्यानें सार्वभौम पद मिळतें; मंदिरें बांध-ल्यानें त्रैलोक्याचें राज्य प्राप्त होतें; पूजाक्रम अविच्छिन्न चालविण्याची व्यवस्था केली, तर ब्रह्मलोक प्राप्त होतो; आणि तिन्ही केलीं असतां तो पुरुष मजशीं साम्य पावतो. उद्धवा, इतका वेळपर्यंत जें पूजाविधान सांगितलें तें बहुतकरून सकाम भक्तांकरितां आहे; पण ह्या विधीनेंच अखेरीस निरपेक्षता उत्पन्न होते व शेवटीं त्या निरपेक्ष पूजेपासून ब्रह्मपदाची प्राप्ति होते.

( १ ) " जेवीं बाळकाचेनि मेळें। माता तदनुकूल खेळे । तेवीं प्रेमाचिये ली-ळें। म्याचि कल्लोळें क्रीडिजे ॥ "—**नाथ.**

(२२) **वृत्तीचा अपहार:**—जो पुरुष देवालयास किंवा ब्राह्मणास स्वतः दुसऱ्यानें दिलेल्या वृत्तीचा अपहार करितो, तो कृमिकीटकांच्या जन्मास येऊन कोट्यावधि वर्षेपर्यंत नरकांत विष्ठा भक्षण करीत राहतो. ह्याप्रमाणें वृत्तीचा अपहार करणाऱ्या पुरुषास जसें अनिष्ट फळ मिळतें, तसेंच फळ त्या अपहारक पुरुषाच्या साथीदारास, प्रवर्तकास किंवा प्रोत्साहकासही मिळतें; आणि त्याचें प्रमाण ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें न्यूनाधिक असतें. इति । २२.

# अध्याय २२ वा.

## उपासनावर्णन ( २-३. )

मूळ श्लोक:—

ब्रह्मवर्चसकामस्तु यजेत ब्रह्मणस्पतिम ॥
इंद्रमिंद्रियकामस्तु प्रजाकामः प्रजापतिम ॥ २ ॥

**श्री शुकाचार्य म्हणाले:**—परीक्षिति राजा, भिन्न भिन्न प्रकारचीं तुच्छ व नाशवंत अशीं फळें प्राप्त करून घेण्याकरितां निरनिराळ्या देवतांची उपासना करावी लागते; आतां त्यांचे प्रकार सांगतों:—ब्रह्मतेज आपल्यास प्राप्त व्हावें अशी ज्याची इच्छा असेल, त्यानें ब्रह्मदेवाची उपासना करावी. आपलीं इंद्रियें दृढ असावीं अशी ज्याची इच्छा असेल त्यानें इंद्राची आराधना करावी. ज्याला संतती पाहिजे असेल त्यानें दक्षादि प्रजापतींची; आपल्याला ऐश्वर्य मिळावें अशी इच्छा असेल त्यानें दुर्गादेवीची; तेजस्वी होण्याची इच्छा असेल तर अग्नीची; धनप्राप्तीची इच्छा असल्यास अष्ट वसूंची; पुरुषाला ' आपलें वजन लोकांवर पडावें व आपला पराक्रम लोकांत गाजावा ' अशी इच्छा अस-

ल्यास एकादश रुद्रांची उपासना करावी, ह्मणजे तो पराक्रमी होतो. भक्ष्य-भोज्य पदार्थांच्या प्राप्तीची इच्छा असेल तर अदितीची पूजा करावी. स्वर्गप्राप्तीची इच्छा असल्यास अदितीच्या द्वादश मुलांची ( आदित्यांची ) भक्तिपुरःसर पूजाअर्चा करावी. राज्यप्राप्तीची इच्छा असल्यास विश्वेदेवांची पूजा करावी. प्रजेची आपल्यावर मोठी प्रीति असावी, किंवा प्रजेला आपला मोठा धाक असावा असें एखाद्या राजास वाटल्यास त्यानें साध्यदेवांची उपासना करावी. आयुष्यवृद्धीची इच्छा असेल तर अश्विनीकुमार नांवाच्या देवांची. पुष्ट ( शरीरास आरोग्य ) होण्याची इच्छा असल्यास पृथ्वीची आराधना करावी. प्रतिष्ठा मिळवावयास पाहिजे असल्यास लोकमातांची ( आकाशाची व पृथ्वीची ); आपलें स्वरूप चांगलें असावें अशी इच्छा असेल तर गंधर्वांची पूजा करावी. सौंदर्य व स्त्रीप्राप्तीची इच्छा असल्यास उर्वशी अप्सरेची. सर्वेकाधिपत्याकरितां ब्रह्मदेवाची. यशप्राप्तीकरितां भगवान् श्रीविष्णूची. द्रव्यसंग्रहाकरितां वरुणाची. विद्याप्राप्तीकरितां शंकराची. उभयतां पतिपत्नींची प्रीति असावी अशी इच्छा असल्यास पार्वतीची. धर्माची इच्छा असल्यास पापनाशक श्रीविष्णूची उपासना करावी. वंश वाढावा असें वाटत असल्यास अग्निष्वात्तादि पितरांची उपासना करावी. भूतादिबाधा नष्ट होण्याकरितां यक्षांचें पूजन करावें. बलप्राप्तीकरितां मरुद्गणांची ( देवांची ). राजपदवीकरितां मनूची. शत्रुनाशाकरितां राक्षसांची व अनेक भोगांची इच्छा असेल तर त्यानें चंद्राची पूजा करावी. निरिच्छ असल्यास श्रीपरमेश्वराशिवाय कोणाचीही उपासना करावयास नको. राजा, बुद्धिमान् पुरुषानें—त्यास कांहीं अपेक्षा असो वा नसो—एकनिष्ठ भक्तियोगानें ब्रह्मरूपी परमेश्वराचेंच आराधन करावें. एतावता, संसाराच्या निवृत्तीकरितां मनुष्याला भगवद्भजनाशिवाय गत्यंतरच नाहीं. परमेश्वराच्या आराधनानें साधुसमागम घडतो, व त्यापासून भगवंतावर अच-

सभक्ति जडते. हाच परमेश्वराच्या उपासनेपासून प्राप्त होणारा पुरुषार्थ होय. इति । २२.

---

# अध्याय २३ वा.

## अभिमाननिवृत्तीचा उपाय (५-८.)

ऋषभ उवाच —

हंसे गुरौ मयि भक्त्याऽनुवृत्त्या वितृष्णया द्वंद्वतितिक्षया च ॥
सर्वत्र जंतोर्व्यसनावगत्या जिज्ञासया तपसेहानिवृत्त्या ॥ १० ॥

ऋषभदेव म्हणाले:—मुलांनो, अहंकाररूपक अभिमान सुटण्याचीं साधनें मुख्य पंधरा आहेत; तीं सांगतों:—" (१) हंसरूपी (परमेश्वररूपी) गुरु जो मी, त्या मजवर श्रद्धा ठेवावी. (२) माझ्या सेवेंत तत्पर रहावें. (३) भोगेच्छा सोडाव्या. (४)

(१) " श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः । ज्ञानं लब्ध्वा परां शांतिमचिरेणाधिगच्छति ॥ " **अर्थ**— श्रद्धा ज्यास आहे त्या पुरुषास ज्ञान प्राप्त होतें. त्याहूनही इंद्रियें स्वाधीन ठेवणारास लवकर प्राप्त होतें, आणि अशा तऱ्हेनें ज्ञान प्राप्त झाल्यावर त्याला उत्तम प्रकारची शांति मिळण्यास विलंब मुळींच लागत नाहीं. **गीता.**

(२) "अपिचेत्सुदुराचारो भजते मामनन्यभाक् । साधुरेव स मंतव्यः सम्यग्व्यवसितोहि सः ॥ " **अर्थ**—एकनिष्ठेनें मजला भजणारा मनुष्य कितीही दुराचारी असला तरी तो साधुच समजावा, कारण तो सरळ मार्गास लागलेला असतो.

(३) " ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते । संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ "**अर्थ**—विषयासंबंधानें विचार करीत राहिल्यानें मनुष्याची त्यावर आसक्ति जडते, आसक्तीपासून वासना उत्पन्न होते व ती पूर्ण न झाल्यानें राग येतो.—**गीता.**

द्वंद्वें सहन करावीं. (५) ह्या लोकीं व परलोकींही प्राण्यांला दुःखेंच भोगावीं लागतात असें मानावें. (६) ज्ञानाची इच्छा धरावी. (७) तपश्चर्या करावी. (८) काम्यकर्मे करणें सोडून द्यावें. (९) जीं कर्में

(१) " मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः । आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ " **अर्थ**—थंडी, ऊन्ह, सुखदुःख इत्यादि इंद्रियांना होणारे क्षणिक विकार होतात, जातात; भारता, ते सोसले पाहिजेत.— **गीता**.

(२) " तेतंभुक्त्वा स्वर्गलोकं विशालं । क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति ॥ एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते ॥ " **अर्थ**—विशाळ अशा स्वर्ग लोकाचा उपभोग घेऊन संचित पुण्य नाहीसें झालें म्हणजे फिरून मृत्युलोकाप्रत येतात. याप्रमाणें सकाम बुद्धीनें तिन्ही वेदांतील विधींना अनुसरणारे जन्ममरणाच्या चक्रांत सांपडतात.—**गीता**.

(३) " न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते । तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनात्मनि विंदति ॥ " **अर्थ**—ज्ञानासारखें पवित्र ह्या लोकीं दुसरें कांहींच नाहीं, व तें आत्मनिष्ठेनें योगयुक्त झालेल्या मनुष्यास निष्काम कर्म करतां करतां आपोआपच कालांतरानें आपल्या ठिकाणींच मिळतें.—**गीता**.

(४) " देवद्विज गुरु प्राज्ञ पूजनं शौचमार्जवम् । ब्रह्मचर्यमहिंसा च शारीरं तप उच्यते ॥ अनुद्वेगकरं वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् । स्वाध्यायाभ्यसनं चैव वाङ्मयं तप उच्यते ॥ मनःप्रसादः सौम्यत्वं मौनमात्मविनिग्रहः । भावसंशुद्धिरित्येतत्तपो मानसमुच्यते ॥ " **अर्थ**—देव, ब्राह्मण, गुरु व विद्वान यांचा सत्कार करणें, शुचिर्भूतता, सरळपणा, ब्रह्मचर्य, कोणाला पीडा न करणें, हें शारीर तप जाणावें. न क्षोभवणारें, खरें, गोड व हितकर भाषण करणें, हें वाचिक तप जाणावें. मनाची प्रसन्नता, सौम्यपणा, मौन, आत्मनिग्रह, अंतःकरण शुद्धि यांस मानसिक तप म्हणतात.

(५) " " दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय । बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ " **अर्थ**—आसक्त बुद्धीनें केलेलें कर्म फारच वाईट, म्हणून कर्म प्रवर्तक त्या समबुद्धीला शरण जा. (फळाचा हेतु धरून कर्में करणारे क्षुद्र होत.)-**गीता.**

करील तीं मला अर्पण करावींत. ( १० ) नित्य माझ्या कथा गाव्या. ( ११ ) माझ्या भक्तांचा सहवास करावा. ( १२ ) माझे गुण वर्णावे. ( १३ ) कोणाशींही वैर धरूं नये. ( १४ ) सर्वांभूतीं समदृष्टी ठेवावी. ( १५ ) शांति धारण करावी. ( १६ ) शरीर व गृह ह्यांच्यावरील आसक्ति सोडण्याची इच्छा बाळगावी. ( १७ ) अध्यात्म शास्त्राचा अभ्यास चालवावा. ( १८ ) एकांतवासाची आवड असावी.

( १ ) " यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् । यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम ॥ " **अर्थ** - हे अर्जुना, जें जें कर्म करतोस, खातोस, पितोस, हवन करतोस, दान करतोस व तप करतोस, तें सर्व मला अर्पण कर.—**गीता.**

( २ ) " सततं कीर्तयंतो मां यतंतश्च दृढव्रताः । नमस्यंतश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥ " **अर्थ** नेहमीं माझें कीर्तन करून व निश्चयानें झटून व भक्तीनें नमस्कार करून व आत्मनिष्ठ राहून माझी उपासना करितात.—**गीता.**

( ३ ) " संगत संतनकी करले । जनमका सार्थक कछु करले ॥ उत्तम नरतनु पाया प्रानी उसका हित कछु करले । सद्गुरु शरन जाके बाबा जननमरन दूर करले ॥ कहांसे आया, कहां जावेगा ये कछु मालुम करना । दो दिनकी जिनगानी बंदे हुशार होकर रहना ॥ " **कबीर.**

( ४ ) " इहैव तैर्जितः सर्गो येषां साम्ये स्थितं मनः । निर्दोषं हि समं ब्रह्म तस्माद्ब्रह्मणि ते स्थिताः ॥ " **अर्थ** भेदबुद्धि जाऊन ज्यांची दृष्टी सम झाली त्यांनीं ह्या लोकींच जन्ममरणाला जिंकिलें म्हणावयाचें; कारण ब्रह्म हें शुद्ध व भेदशून्य आहे म्हणून ते ब्रह्मामध्येंच लीन होतात. **गीता.**

( ५ ) " विहाय कामान यःसर्वान्पुमांश्चरति निस्पृहः । निर्ममो निरहंकारः स शांतिमधिगच्छति " **अर्थ**—जो मनुष्य सर्व प्रकारच्या वासना सोडून देऊन निस्पृह असा होऊन ममत्व व अहंकार टाकून ह्या जगामध्यें वावरतो त्याला शांति मिळते."**गीता.**

( ६ ) " असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु । नित्यं च समचित्तत्वमिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ " **अर्थ**—बायका, मुलें, घरदार यासंबंधानें निष्प्रेमभाव बरा वाटे कोणताही प्रसंग गुदरला तरी नेहमीं सारखी मनोवृत्ति ठेवावी.—**गीता.**

( १९ ) प्राण, इंद्रियें व मन हीं पूर्णपणें स्वाधीन ठेवावींत. ( २० ) गुरु व वेदांतवाक्यावर उत्तम प्रकारें विश्वास ठेवावा. ( २१ ) ब्रह्मचर्य पाळावें. ( २२ ) कर्तव्यकर्म करण्यास चुकूं नये. ( २३ ) मिथ्यावादी होऊं नये. ( २४ ) परमेश्वर सर्वत्र भरला आहे असा अनुभव येईपर्यंत ज्ञानाची पाठ सोडूं नये; आणि ( २५ ) समाधीचा अभ्यास करावा. पुत्रांनो ! जर तुम्ही ह्या गोष्टी साधाल तर तुमच्या अंगीं धैर्य धरण्याची, प्रयत्न करण्याची आणि मनन करण्याची शक्ति येईल, व तुम्ही अनायासानें अहंकाररूपी लिंगदेहाला मोडून देण्यास समर्थ व्हाल! मुलांनो ! ज्या गोष्टी साधन करा ह्मणून तुह्मांस सांगितलें, त्या ह्मणजे तुह्मीं अगदीं निरंतर साधन केल्या पाहिजेत असें नाहीं. ज्या अज्ञाना मुळें तुह्मी ह्या जन्ममरणाच्या फेऱ्यांत सांपडलां तें अज्ञान नष्ट झालें, व फिरून त्याचा संसर्ग होणार नाही अशी तुमच्या मनाच्या ठिकाणीं सावधगिरी उत्पन्न झाली, ह्मणजे तुह्मीं त्या सोडून दिल्या तरी चालतील. ज्या राजाच्या, पित्याच्या किंवा गुरूच्या मनांत माझी कृपा व्हावी, व माझ्या पदीं प्राप्त व्हावें अशी इच्छा असेल, त्यानें प्रजांना, पुत्रांना किंवा शिष्यांना असाच उपदेश करावा. शिकविलेली गोष्ट त्यांनीं साधन केली नाहीं, तरी क्रोधाविष्ट होऊं नये. त्यांना फिरून उपदेश करावा. जे अज्ञ लोक कर्ममार्गांत गढून गेले असतील, त्यांचा

---

( १ ) " तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः । वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ " **अर्थ**--सर्व इंद्रियें व मन यांजवर दाब ठेऊन मनुष्यानें एकाग्रतेनें मजकडेच लक्ष देऊन असावें. कारण इंद्रियें ज्याच्या स्वाधीन झालीं त्याचीच बुद्धि ठाम झाली ह्मणावयाची.—**गीता.**

(२) भक्तिप्रकरण अध्याय ३ रा पहावा. (३) वैराग्यप्रकरण अध्याय २१ पहा.

( ४ ) ज्ञानप्रकरण अध्याय १५।१६ वा पहा.

तो कल हळूहळू बदलण्याचा उपाय करावा; अर्थात् त्यांच्या हातून काम्यकर्में घडणार नाहींत असा प्रयत्न चालू ठेवावा. एखाद्याला कर्म-मार्गास लावणें ह्मणजे आंधळ्याला खड्ड्यांत ढकलण्यासारखें होय. ह्याकरितां कर्ममार्गास लावण्यासारखें अयोग्य कृत्य हातून होऊं देऊं नये.”

बाबांनो ! माझ्या सांगण्याचें तात्पर्य इतकेंच कीं, लोकांस आपला स्वार्थ कशांत आहे हें आपोआप समजत नाहीं. ते विषयोपभोगाच्या ठिकाणीं नेहमीं लुब्ध असतात. अल्प सुखाकरितां ते दुसऱ्यांचा द्रोह करितात. आपल्याला पुढें भयंकर दुःखें भोगावीं लागतात हें त्यांस अज्ञानामुळें मुळींच कळत नाहीं. ह्यास्तव ज्ञात्यानें लोकांचें अज्ञान दूर करण्याचा प्रयत्न करावा, व आंधळा वाट चुकला असतां त्यास जसें वाटेस लावावयाचें त्याप्रमाणेंच त्यानें कामासक्त पुरुषांस निवृत्तिमार्गास लावावें. संसाररूप मृत्यूच्या तावडींत सांपडलेल्या पुरुषाला जो सोडवीत नाहीं तो गुरु नव्हे. तो आप्त नव्हे. ती माता नव्हे. तें दैवत नव्हे, तो पति नव्हे, हें पक्कें ध्यानांत धरावें. पुत्रहो. माझें हें शरीर मीं स्वेच्छेनें धारण केलें आहे; ह्यामुळें हें तुमच्या तर्कशक्तीच्या पलीकडलें आहे. सत्त्वगुण हें माझें हृदय असून त्या माझ्या हृदयाच्या ठिकाणीं मूर्तिमंत धर्म वास करितो. अधर्माचा मीं पूर्णपणें त्याग केला आहे, व ह्यामुळेंच ज्ञाते लोक मला ऋषभ ह्मणतात. मुलांनो, तुह्मी माझ्या शुद्धसत्वात्मक हृदयापासून झालां आहां, ह्यास्तव स्वभावतः थोर आहां ! माझें तुह्मांस इतकेंच मागणें आहे कीं, तुह्मी आपला श्रेष्ठ बंधु भरत ह्याची निष्कामबुद्धीनें सेवा करा. तुह्मी भरताची आज्ञा मानली असतां माझी शुश्रुषा केल्याप्रमाणें होईल व प्रजेचेंही पालन होईल. इति। २३.

---

# अध्याय २४ वा.

## कामादिकांचा जयोपाय ( ७ १५. )

नारद उवाचः—

धर्मार्थमपि नेहेत यात्राऽर्थं वाऽधनो धनम् ॥
अनीहाऽनीहमानस्य महाहेरिव वृत्तिदा ॥ १५ ॥

**नारद म्हणाले:** –धर्मराजा, निर्धन मनुष्यानें धर्मासाठीं किंवा यात्रेकरितां द्रव्य मिळविण्याच्या भानगडींत पडूं नये. पहा–अजगर कांहीं उद्योग न करितां स्वस्थ पडून राहतो तरी देखील त्याचा निर्वाह चालतो. तसा निरिच्छ पुरुष कांहीं एक मिळविण्याची खटपट करीत नसला तरी त्याचा निर्वाह चालतो. नेहमीं निरिच्छ, संतुष्ट व स्वात्मसुखीं रममाण अशा पुरुषाला जें सुख मिळतें, तें उपभोगेच्छेनें नानाप्रकारच्या जीवापाड श्रम करणाऱ्याला देखील मिळत नाहीं. ज्याच्या पायांत जोडा असतो, त्याला कांट्यांत, गोट्यांत वगैरे ठिकाणीं गेला तरी सुखच वाटतें; त्याप्रमाणें ज्याचें मन सदा संतुष्ट असेल त्याला सगळ्या दिशा सुखमय दिसतात. राजा, शिश्नोदरपरायण लोक मैथुनसुखासाठीं व जिव्हेच्या रुचीकरितां दैन्य बाळगितात. ह्मणून त्यांस कुत्र्यासारखें दुसऱ्याची मर्जी संपादून पडून रहावें लागतें. अशा रीतीनें वागण्यापेक्षां उदक प्राशन करून निर्वाह करणें हें संतुष्ट पुरुषांना हितावह वाटतें. इंद्रियांच्या अधीन झालेल्या अशा असंतुष्ट ब्राह्मणाचें तेज, विद्या, तप व यश हे गुण लयास जातात; आणि त्याचें ज्ञान देखील लयास जातें. क्षुधा व तृषा यांची तृप्ति झाली कीं, ' काम ' नाहींसा होतो. ज्या कारणामुळें क्रोध निष्पन्न झाला असेल, तें कारण संपलें कीं, ' क्रोध ' नाहींसा होतो. परंतु मनुष्याचा ' लोभ ' दाही दिशा जिंक-

ल्या व सगळ्या पृथ्वीचें राज्योपभोग भोगिले तरी सुटत नाहीं ! मोठमोठाले बहुश्रुत व लोकांचे संशय दूर करणारे पंडित सभाध्यक्ष देखील असंतोषामुळें दुःख भोगून शेवटीं अधोगतीस जातात.

राजा, संकल्पविकल्पात्मक वृत्तींचा त्याग करावा, ह्मणजे काम जिंकला जातो. त्या कामाचा मोड झाला कीं, क्रोध नाहींसा होतो. आपल्याला जे जे विषय हितावह वाटतात. ते ते सगळे विषय अनर्थकारक आहेत अशी दृष्टि ठेवावी, ह्मणजे लोभ नाहींसा होतो. जे जे पदार्थ डोळ्यांला दिसून येतात ते ते आत्मरूप आहेत. असा तत्त्वविचार केला असतां भीति नाहींशी होते. आत्मानात्मविवेकाच्या विचारानें शोक आणि मोह नाहींसे होतात. सत्पुरुषांची सेवा करून दंभ घालवावा. मौनधारणेच्या योगानें योगाभ्यासाला येणारीं विघ्नें नष्ट होतात. शरीरादिकांविषयीं इच्छा सोडावी, ह्मणजे हिंसा घडेल कशाला ? दुसऱ्यानें अपकार केला असतां त्याजवर उपकारच करावेत, ह्मणजे तो आपल्याला पीडा देत नाहींसा होतो. समाधीच्या अभ्यासाच्या योगानें मनाचे ताप दूर करावे. शरीरजन्य दुःखें योगबलानें ह्मणजे आसनप्राणायामादिकांच्या योगें नष्ट करावींत. सात्विक आहार सेवन करावेत. ह्मणजे निद्रादोष दूर होतात; रज व तम हे सत्वगुणांच्या योगें शमवावे, मनोपशमाच्या योगेंकरून सत्वगुण जिंकावा. सा-

(१) "यद्यत्पश्यति चक्षुर्भ्यां तत्तदात्मेति भावयेत" **अर्थ**—जे जे पदार्थ डोळ्यांला दिसून येतात, ते ते आत्मरूप आहेत अशी भावना धारण करावी-**श्रुति.**

(२) योगप्रकरण १५ वा अध्याय पहा. (३) भक्तिप्रकरण १३।१४ वे अध्याय पहा. (४) योगप्रकरण २२ वा अध्याय पहा. (५) ज्ञानप्रकरण १०।११ वे अध्याय पहा. (६) योगप्रकरण २१ वा अध्याय पहा. (७) योगप्रकरण १०।११ वे अध्याय पहा. (८) भक्तिप्रकरण २६ वा अध्याय पहा. (९) योगप्रकरण २० वा अध्याय पहा.

धकाला हे सर्व शत्रु होत. गुरूवर भक्ति ठेविली असतां हे शत्रु अनायासें जिंकितां येतात, आपल्याला ज्ञानरूपी प्रकाश देणारा जो गुरु तो साक्षात् भगवान् होय. जो पुरुष गुरूला सामान्य मनुष्यासारखा समजेल, त्याचें सगळें अध्ययन हत्तीच्या स्नानाप्रमाणें निष्फळ होय. भगवान् श्रीकृष्णाला लोक मनुष्य असें समजतात, तें योग्य नव्हे. पहा—हा श्रीकृष्ण साक्षात् प्रकृतिपुरुषांचा नियामक भगवान् होय. मोठमोठे योगी ह्याच्या चरणदर्शनाची इच्छा करितात. सगळे धर्मशास्त्रांतील नियमविधि पाळण्याचें फळ एवढेंच कीं. सहा इंद्रियांचा समुदाय जिंकावयाचा. तें फळ मिळाल्यावरही जर ध्यान. धारणा व समाधि. हीं साध्य केलीं नाहींत, तर ते नियम पाळणें केवळ श्रमावहच होय. इति। २४.

# अध्याय २५ वा.

## गुणत्रयांचें निरूपण (११-२५.)

श्रीभगवानुवाच: -

गुणानामसंमिश्राणां पुमान्येन यथा भवेत् ॥
तन्मे पुरुषवर्येदमुपधारय शंसतः ॥ १ ॥

**भगवान् श्रीकृष्ण म्हणाले:**—हे उद्धवा, सत्व. रज व तम ह्या गुणांच्या भिन्न भिन्न वृत्ति अनेक आहेत; आणि त्यांपासून त्या त्या वृत्तींनीं युक्त असे मनुष्यांवर बहुविध परिणाम घडत असतात. ह्मणजे ह्या सत्वादि तीन गुणांपैकीं कोणत्या गुणानें मनुष्य कसा बनतो, हें मी तुला सांगतों; तें ऐक –

(१) भक्तिप्रकरण २।३ रे अध्याय पहा. (२) योगप्रकरण १३ वा अध्याय पहा. (३) योगप्रकरण १४ वा अध्याय पहा.

(१) त्रिगुणांच्या वृत्तिः—[१] सत्त्वगुणाच्या वृत्ति—शम ह्मणजे अंतरिंद्रियांचा निग्रह. दम ह्मणजे बाह्येंद्रियांचा निग्रह, तितिक्षा म्हणजे सहनशीलता. ईक्षा ह्मणजे विचार, तपश्चर्या म्हणजे धार्मिक वर्तन. सत्य. दया. स्मृति म्हणजे पूर्वापर अनुसंधान, (स्मरण) संतुष्ट ह्मणजे मिळेल तेवढ्यांत संतोष. दातृत्व. विषयांवर अप्रीति, श्रद्धा ह्मणजे गुरु. वेद इत्यादिकांवर विश्वास. अनुचित कर्माविषयीं लज्जा. दान. सरलता. नम्रता आणि आत्मचिंतनाची आवड, ह्या सत्वगुणाच्या वृत्ति होत. (२) रजोगुणाच्या वृत्तिः—अभिलाष ह्मणजे इच्छा. क्रिया ह्मणजे व्यवसाय. उन्माद ह्मणजे विद्येचा गर्व. तृष्णा ह्मणजे लाभ होऊनही असंतोष. गर्व. आशा ह्मणजे धनाशेनें देवादिकांची उपासना, भेदबुद्धि. सुखासक्ति. वीर्य ह्मणजे स्वतःच्या पराक्रमाचा आविर्भाव, स्वात्मसुखाची इच्छा. परनिंदेची आवड. पराक्रमाचा डौल, आणि फक्त स्वतःच्या बलिष्ठपणामुळें दुसऱ्यास पीडा करणें, ह्या रजोगुणाच्या वृत्ती होत. (३) तमोगुणाच्या वृत्ती—क्रोध, लोभ. असत्य भाषण, परपीडा. याचना. ढोंग, कष्ट करणें. कलह. शोक, मोह, दीनपणा, आळस. आशा. भय आणि निरुद्योगता ह्या तमोगुणाच्या वृत्ती होत. आतां या गुणांच्या मिश्रणापासून होणाऱ्या वृत्ती सांगतों.

(४) मिश्रगुणांच्या वृत्ती—आपणाविषयीं अहंता. स्त्रीपुत्रादिकांविषयीं ममता ह्मणजे मी आणि माझें. अशी बुद्धि ही सन्निपातात्मक ह्मणजे गुणत्रयाच्या मिश्रणापासून उत्पन्न झालेली वृत्ति होय. उदाहरण—मी शांत. मी कामी, मी क्रोधी इत्यादि सर्व वृत्ती अहंता व ममता यांनीं संबद्ध आहेत; ह्मणून त्रिगुण सन्निपातरूप आहेत. अर्थात्

(१) "कफ वात आणि पित्त। तिन्ही एकत्र जेथ होत। तेथ उपजे सन्निपात! तेवीं सन्निपात येथ त्रिगुणांचा॥"—**नाथ.**

तन्मूलक सर्व व्यवहारही गुणत्रयसन्निपाताचेंच कार्य होय. कारण, मन, शब्दादि विषय, इंद्रियें आणि प्राण यांच्या योगानें सर्व व्यवहार होतो; त्यांपैकीं मन सात्विक आहे; शब्दादि विषय तामस आहेत आणि प्राण व इंद्रियें हीं राजस होत. ह्मणून त्यापासून होणारा व्यवहार सर्व सन्निपातकार्य होय. ज्या वेळीं हा पुरुष धर्म, अर्थ व काम या तिहींचे ठायीं निष्ठावान् होतो, त्या वेळीं तिन्ही ठायीं निष्ठा ती सन्निपातकार्य होय; ह्मणजे मिश्रवृत्तीचेंच कार्य होय. कारण, धर्म हा सात्विक आहे; अर्थ हा तामस आहे; काम हा राजस आहे. यांपैकीं धर्मनिष्ठेपासून श्रद्धा उत्पन्न होते; अर्थनिष्ठेपासून धनप्राप्ति होते आणि कामनिष्ठेपासून रति उत्पन्न होते. ह्यास्तव श्रद्धा ही केवळ सात्विक, धनप्राप्ति ही केवळ तामस व रति ही केवळ राजस होय. तथापि धर्म, अर्थ, काम हे एकदम संपादन करावे ह्मणून प्रयत्न करणाऱ्या पुरुषाच्या ठिकाणीं श्रद्धा, धनप्राप्ति आणि रति ह्या वृत्ती अन्योन्याश्रयामुळें मर्यादित असतात; ह्मणून तें मिश्रगुणाचेंच कार्य होय. ह्यांत संदेह नाहीं. गृहस्थाश्रमी पुरुष कर्मानुसार नित्यनैमित्तिक कर्मनिष्ठ, विषयासक्ति व काम्य कर्में हीं त्रिगुणकार्यें आचरीत असतां त्याची वृत्ति सात्विकादि त्रिगुणरूप असते. अर्थात् तिन्हींचा समुच्चय हा सन्निपातकार्य होय.

( ३ ) **पुरुषलक्षणें**---पुरुषाच्या ठिकाणीं शमदमादिक वृत्ती आढळतील, तर तो सात्विक पुरुष समजावा. काम, क्रिया इत्यादि वृत्ती आढळतील, तर तो राजस पुरुष समजावा, आणि क्रोध, लोभ इत्यादिक आढळतील, तर तो तामस पुरुष समजावा. कोणीही पुरुष किंवा स्त्री प्रेमपूर्वक निष्कामनेनें धर्माचरण करून माझी आराधना करीत असल्यास तो पुरुष किंवा ती स्त्री सात्विक होय, भोगेच्छेनें धर्माचरण करून माझी आराधना करीत असल्यास राजस प्रकृतीचा समजावा,

आणि हिंसेच्या अभिलाषानें धर्माचरण करून माझी आराधना करीत असल्यास तामस स्वभावाचा होय.

(४) **ईश्वरनिर्गुणता**—आतां उद्धवा, तूं ह्मणशील कीं, "गुणांच्या योगानें कर्तृत्व जसें जीवाचे ठिकाणीं आलें, तसेंच तें तुझ्या ठायींही आहे; मग तुजमध्यें असे काय विशेष गुण आहेत कीं, त्या कारणानें तूं सेव्य व जीव सेवक हा नियम असावा? आणि कोणत्या विशेष कारणामुळें तूं वारंवार ह्मणतोस कीं, जीवांनीं माझें भजन करावें?" तर याविषयीं तुला सांगतों:—सत्व, रज, तम हे गुण जीवासच आहेत; मला (आत्म्याला) नाहींत. कारण, ते जीवांच्या उपाधी व अपंचिकृत भूतांचें कार्य जें चित्त त्याचे ठिकाणीं अभिव्यक्त होतात व त्यांच्या योगानें तो जीवच देहेंद्रियादिकांचे ठिकाणीं आसक्त होऊन बंधन पावतो. मी या भूतकार्यांचे ठिकाणीं सक्त नसल्यामुळें त्या गुणांच्या नियंतृत्वानें उत्पत्ति, स्थिति, लयकर्ता असूनही नित्यमुक्त आहें. हा मजमध्यें जीवापेक्षां मोठा विशेष भेद आहे. मी सदासर्वदा निर्गुणच असतों.

येथपर्यंत मिश्र व अमिश्र अशा गुणांचीं कार्यें तुला सांगितलीं. आतां पुढें एकेक गुणाच्या आधिक्यापासून होणारीं कार्यें सांगतों:—

(५) **त्रिगुणांचीं स्वरूपें व कार्यें**—[१] सत्वगुणाचें स्वरूप व कार्य:—सत्वगुणाचें स्वरूप प्रकाशमय, निर्मळ आणि शांत असतें. असा सत्वगुण जेव्हां रज तमास दाबतो, ह्मणजे इतर दोन गुणांपेक्षां त्याचें आधिक्य असतें; तेव्हां मनुष्यास सुख, धर्म, ज्ञान, शमदम इत्यादि वृत्ति प्राप्त होतात. [२] रजोगुणाचें स्वरूप व कार्य:—रजोगुणाचें स्वरूप भेददर्शक, भोगेच्छाजनक आणि प्रवृत्तिकारक असतें. असा रजोगुण जेव्हां सत्व, तम यांस दाबतो, ह्मणजे इतर दोन गुणांपेक्षां याचें आधिक्य असतें; तेव्हां मनुष्यास उद्योगबुद्धि, कीर्तीची हांव, धनाचा लोभ व दुःखसंभव ह्या वृत्ती प्राप्त होतात. [३] तमोगुणाचें

स्वरूप व कार्य:—तमोगुणाचें स्वरूप बुद्धिभ्रंशक, अज्ञानप्रवर्तक व आलस्योत्पादक असतें. असा तमोगुण जेव्हां सत्व रज यांस दाबतो; ह्मणजे इतर दोन गुणांपेक्षां याचें आधिक्य असतें तेव्हां मनुष्याच्या ठिकाणीं शोक, मोह, हिंसा, अज्ञान आणि आशा ह्या वृत्ती उद्भवतात.

( ६ ) **गुणाधिक्यांचीं लक्षणें**—[१] सत्वगुणाधिक्याचें लक्षण—जेव्हां चित्त प्रसन्न असतें, इंद्रियें तृप्त असतात, देहादिकांविषयीं चिंता वाटत नाहीं, आणि मन विषयांपासून पराङ्मुख होतें; तेव्हां सत्वगुणाचें आधिक्य झालें आहे असें समजावें. अशा पुरुषास माझी ( परमेश्वराची प्राप्ती सुकर असते. [२] रजोगुणाधिक्याचें लक्षण:—जेव्हां चित्त व्यवसायांत गुंतलेलें असतें, मनामध्यें विषयवासनेच्या लाटा चाललेल्या असतात, स्वकार्यसिद्धींची चिंता लागलेली असते, हस्तपादादिक अवयव कर्तव्यें करण्यास आतुर असतात आणि मनामध्यें चंचलता व भ्रांति वास करिते; तेव्हां रजोगुणाचें आधिक्य झालें आहे असें समजावें. [३] तमोगुणाधिक्याचें लक्षण:—जेव्हां चित्त व्याकुळ होतें, विवेकबुद्धि नष्ट होते, बऱ्यावाइटाचा विचार मुळींच उरत नाहीं आणि अज्ञान, ग्लानि व खेद हीं बळावतात; तेव्हां तमोगुणाचें आधिक्य झालें आहे असें समजावें.

( ७ ) **गुणवृद्धीचे परिणाम**—सत्वगुणाची वृद्धि झाली असतां मनुष्य देवाप्रमाणें शांततेनें वर्तन करितो, रजोगुणाची वृद्धि झाली असतां मनुष्य दैत्याप्रमाणें अनाचार माजवितो आणि तमोगुणाची वृद्धि झाली असतां मनुष्य राक्षसाप्रमाणें भयंकर कृत्यें करण्यास प्रवृत्त होतो. सत्वगुणापासून केवळ ज्ञान प्राप्त होतें; रजोगुणापासून ज्ञान व अज्ञान हीं दोन्ही उत्पन्न होतात आणि तमोगुणापासून केवळ अज्ञान मिळतें; आणि या तिन्ही गुणांच्या अभावापासून ब्रह्मसाक्षात्कार होतो.

(८) **गुणकर्मानुरूप गति**—सात्विक कर्मे करणारे वेदज्ञ पुरुष ऊर्ध्वलोकीं जातात; राजस कर्मे करणारे भोगेच्छु पुरुष मध्यलोकीं म्हणजे मनुष्यलोकीं जन्मास येतात आणि तामस कर्मे करणारीं मदांध मनुष्यें अधोलोकीं प्रयाण करितात. किंवा स्थावर योनींत प्रविष्ट होतात. या त्रिगुणकर्मांचा कर्तृत्वाभिमान नसल्यास मोक्ष प्राप्त होतो.

(९) **गुणानुरूप कर्म**—निष्कामबुद्धीनें केवळ माझ्या प्रीतीकरितां म्हणून केलेलें कर्म सात्विक. सकाम बुद्धीनें केलेलें कर्म राजस, आणि परपीडेच्या उद्देशानें. दांभिकपणानें अथवा दुष्ट हेतूनें केलेलें कर्म तामस होय.

(१०) **गुणानुरूप ज्ञान**— देहादिकांहून भिन्न अशा आत्मस्वरूपाचें ज्ञान तें सात्विक होय; देहात्मविषयक ज्ञानास (भेदज्ञानास) राजस म्हणावें; अज्ञ बालक किंवा बधिरादिक व्यंग पुरुष ह्यांच्यासारखें जें ज्ञान तें तामस होय आणि परमात्मविषयक ज्ञान तें निर्गुण समजावें.

(११) **गुणानुरूप वास्तव्य**—वनामध्यें वास करणें हें सात्विक, ग्रामवास हा राजस, द्यूतस्थानीं निवास तो तामस आणि माझ्या मंदिरांत राहणें निर्गुणवास होय.

(१२) **गुणानुरूप कर्ता**—कर्मफलांविषयीं अनासक्त राहून जो कर्मे करितो, तो सात्विक होय, कर्मफलाविषयीं अत्यंत आसक्ति बाळगून जो कर्मे करितो, तो राजस होय. अविचारानें कर्मे करणारा तामस. आणि मदेकनिष्ठ असून निरभिमानत्वानें कर्म करणारा पुरुष निर्गुण समजावा.

---

(१) "देवालयीं धवधवती। देखोनी माझी निजमूर्ती। साचार सुखावे चित्तवृत्ति। ते निर्गुण वस्ती उद्धवा॥"—**नाथ**

( १३ ) **गुणानुरूप श्रद्धा**—आत्मज्ञानाविषयीं जी श्रद्धा ती सात्विकी होय, कर्माविषयीं जी श्रद्धा ती राजसी होय. अधर्माविषयीं जी श्रद्धा ती तामसी होय आणि माझ्या सेवेविषयीं जी श्रद्धा ती निर्गुण होय.

( १४ ) **गुणानुरूप आहार**—शरीरास हितकारक व शुद्ध असून अनायासानें प्राप्त झालेल्या भक्ष्यभोज्यादिकांचा आहार सात्विक होय; जिव्हेला प्रियकर असा कटु, आम्ल, लवण इत्यादि आहार तो राजस होय आणि शरीरास अपायकारक असून अपवित्र असा जो आहार तो तामस होय आणि मला निवेदित केलेला आहार तो निर्गुण आहार समजावा.

( १५ ) **गुणानुरूप सुखें**—विषयवैराग्यानें प्राप्त झालेलें सुख सात्विक होय, विषयप्रीतीनें प्राप्त झालेलें, सुख राजस होय. मोह, दैन्य यांपासून होणारें सुख तें तामस आणि ब्रह्मचिंतनापासून होणारें सुख निर्गुण असें समजावें.

**उपसंहार**—हे पुरुषश्रेष्ठा उद्धवा! केवळ इतके पदार्थच त्रिगुणात्मक आहेत असें नाहीं; तर प्रकृति व पुरुष यांच्या आश्रयानें होणारे सर्व पदार्थ गुणमयच आहेत. जें कांहीं डोळ्यांनीं पाहिलें, कानांनीं ऐकिलें अथवा जें कांहीं मनानें चिंतिलें, तें सर्व त्रिगुणात्मक आहे. मनुष्यास गुणकर्मामुळें ह्या अनेक संसृति म्हणजे गती प्राप्त होतात. ज्या मनुष्यानें ह्या चित्ताचे ठिकाणीं व्यक्त होणाऱ्या संसृति अथवा गती जिंकल्या आहेत, तो मनुष्य भक्तियोगानें माझ्या ठिकाणीं निष्ठावान् होऊन मोक्षप्राप्तीचा अधिकारी बनतो! याकरितां विचारी मनुष्यास हेंच योग्य आहे कीं, ज्यामध्यें ज्ञान व विज्ञान प्राप्त होण्याचें साधन आहे असा हा मनुष्यदेह मिळाला असतां बुद्धिमान् पुरुषांनीं या गुणांची आसक्ति सोडून माझें भजन करावें. विद्वान् मनुष्यानें सावधगिरीनें सर्व इंद्रियें जिंकून व विषयासक्ति त्यजून माझेभजनांत निमग्न असावें. अ-

थवा सत्वगुणाभ्यासानें रज, तम या गुणांस जिंकावें, नंतर निरपेक्षत्वानें म्हणजे उपशमनात्मक शुद्ध सत्वगुणानें त्या सत्वगुणासही जिंकावें असें झालें असतां जीव हा गुणत्रयांपासून मुक्त होतसाना जीवत्वास कारणीभूत जो लिंगदेह त्याचा अनात्मत्वानें भंग करून मला (ब्रह्मरूपाला) प्राप्त होतो. याप्रमाणें तो जीव जीवभावापासून व मायिक गुणांपासून मुक्त होऊन ब्रह्मरूपी जो मी तेणेंकरून पूर्ण होतसाना बहिरंतर वृत्तीपासून निवृत्त होतो. अर्थात् त्यास माझी प्राप्ति होते; मग पुनः संसारगति प्राप्त होत नाहीं. इति २३.

---

# अध्याय २६ वा.

## गुणनिवृत्तीचा उपाय ( १-१३. )

श्रीभगवानुवाचः—

सत्वं रजस्तम इति गुणा बुद्धेर्न चाऽऽत्मनः ॥
सत्त्वेनान्यतमौ हन्यात्सत्त्वं सत्त्वेन चैव हि ॥ १ ॥

**भगवान श्रीकृष्ण म्हणाले:**—उद्धवा, तूं कदाचित् असें म्हणशील कीं, ' सत्व, रज, तम ह्या त्रिगुणांचें वास्तव्य असतांना ज्ञानखड्गानें लिंगदेहाचा भंग कसा करावा ! तर तसें करण्याचा प्रकार सांगतों तो ऐक:—सत्व, रज, तम हे गुण प्रकृतीचेच होत; साक्षात् आत्म्याचे नव्हेत. याकरितां या भासमान त्रिगुणांचा नाश करणें अशक्य नव्हे. पहा सत्वगुणवृद्धीनें रज, तम हे गुण नाश पावतात आणि मग सत्वा-

( १ ) " सत्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः । निबध्नंति महाबाहो देहे देहिनमव्ययम् ॥ " **अर्थ**—सत्व, रज व तम हे प्रकृतिपासून उत्पन्न झालेले गुण असून ते ह्या अविनाशी पुरुषाला जखडून टाकितात.—**गीता.**

नेंच सत्वाचा नाश करून टाकावा किंवा तिन्ही गुणांच्या वृत्ती परस्परांच्या मारक आहेत; ह्मणून प्रथम सत्वगुण वाढवावयाचा क्रम ठेवावा. मनुष्याचा सत्वगुण वाढला असतां त्याला माझ्या भक्तीविषयीं प्रबल इच्छा उत्पन्न होते आणि त्या भक्तीच्या योगानें रज व तम हे गुण आपोआप नाश पावतात. सत्वगुणाच्या वृद्धीनें रज, तम ह्या गुणांचा नाश झाला कीं, अधर्म प्रवृत्तीचे मार्गही लयास जातात; आणि नंतर फक्त सत्वगुण व त्या गुणाच्या सत्य, दया इत्यादि वृत्ति मात्र अवशिष्ट राहतात. उद्धवा, सत्वगुणाची वृद्धि करण्याचें सुलभ साधन ह्मणजे सात्विक पदार्थांचें सेवन करणें हें होय. ( ते सत्ववृद्धीचे कारणभूत पदार्थ दाखवून देण्यासाठीं प्रथम सामान्यतः तिन्ही गुणांची वृद्धि होण्याचीं कारणें समजणें अवश्य असल्यामुळें तीं सांगून देतों. ) उद्धवा, शास्त्र, जल, लोक, देश, काल, कर्म, जन्म, ध्यान, मंत्र आणि संस्कार ह्या दहा पदार्थांपासून तिन्ही गुण वाढतात. गुणदृष्टीनें ह्या देहांचे गुणसंख्ये इतके ह्मणजे आणखी तीन तीन उपभेद ह्यांचे आहेत. आतां त्यांचा प्रकार सांगतों:—

**त्रिगुणपदार्थांचीं सामान्य लक्षणें:**—शास्त्रज्ञ पुरुष ज्या पदार्थांची प्रशंसा करितात, तो सात्विक पदार्थ समजावा; ते ज्याविषयीं उदासीन राहतात, ह्मणजे निंदा किंवा स्तुति करीत नाहींत, तो राजस पदार्थ समजावा; आणि विद्वान् पुरुष ज्यास निंदितात, तो तामस पदार्थ समजावा.

**गुणपरत्वानें पदार्थांचे भेद—[ १ ] सात्विक पदार्थ**—निवृत्तिपर शास्त्रें, तीर्थें, विरक्त पुरुष, एकांत स्थलें, ब्राह्मकाल, निष्काम **कर्में, भागवतदीक्षा, भगवत्ध्यान, प्रणवमंत्र** ( ॐकार मंत्र ) आणि चि**त्तशुद्धि करणारे संस्कार हे होत. [ २ ] राजस पदार्थ**—प्रवृत्तिपर **शास्त्रें, सुगंधी जल, संसारी पुरुष, चवाट्याच्या जागा, प्रदोषकाल, स-**

काम कर्मे. सामान्य वर्तन. विषयांचें ध्यान. काम्यमंत्र आणि देहपुष्टी-संस्कार हे होत. [ ३ ] तामस पदार्थ—पाखंड शास्त्र. मद्यादिक द्रव्य. दुराचारी पुरुष. द्यूतस्थलें. मध्यरात्र. जारणमारणकर्म. शाक्त व क्षुद्र दीक्षा. शत्रुनाशाचें अथवा भोगसुखाचें ध्यान आणि गृहदारादि-कांची व्यवस्था करण्याचे संस्कार हे होत.

सत्त्वगुण वृद्धीचे परिणाम— उद्धवा, सत्त्वगुणाच्या वृद्धीसाठीं सात्विक पदार्थांचेंच सेवन करावें; त्यापासून धर्म वाढून त्यायोगें रज, तम हे गुण कमी होत जातात. पुढें त्यांचा नाश झाल्यावर भगवद्भक्ति करण्याची इच्छा सुदृढ होऊन भगवच्चिंतनांत चित्ताचा लय होतो; आणि नंतर स्थूल, सूक्ष्म देहांचें निरसन होऊन आत्मसाक्षात्कार होतो. स्थूल देह अथवा सूक्ष्म देह हा सत्वादि गुणांचें मिश्रण आहे; ह्यास्तव त्रिगुणांच्या नाशाबरोबर देहोपाधि आपोआप नष्ट होतात. उदाहरण, वेळूच्या परस्परांच्या घर्षणानें आपोआप अग्नि उत्पन्न होतो व तो आपणापासून उद्भवणाऱ्या ज्वाळांच्या योगें हळू हळू त्या वेळूंच्या वनाला जाळून शेवटीं आपण स्वतः नष्ट होतो; त्याचप्रमाणें सत्वगुणवृद्धीच्या योगानें रज व तम नष्ट होतात. नंतर सत्वगुणही ज्ञानाभ्यासानें स्वतः नष्ट होतो. अशा प्रकारें त्रिगुणांचा नाश झाला ह्मणजे सर्व स्थूल व सूक्ष्म उपाधींचा लय होऊन ब्रह्मप्राप्ति होते !

उद्धव ह्मणालाः—श्रीकृष्णा, सात्विक पदार्थांचें सेवन चालविलें असतां चित्त शुद्ध होऊन उत्तम पुरुषार्थ प्राप्त होतो; असें शास्त्रज्ञ लोकांचें म्हणणें आहे. परंतु मी तर असें म्हणतों कीं, ' विषय हें दुःखांचें वसतिस्थान होय ' ही गोष्ट बहुधा सर्वांसच ठाऊक असून सर्व लोक

कुत्रें, गाढव व बोकड ह्या पशूंसारखे कामांध होऊन निर्लज्जपणें विषयसुखांच्या पाठीस लागतात हें घडतें तरी कसें ?

**श्रीभगवान् ह्मणाले:**—उद्धवा, ज्या पुरुषानें तत्त्वविचार केला नाहीं, त्याच्या हृदयांत देहादिकांविषयीं " अहं ( मी ) " असा अभिमान पूर्णपणें उसळत असतो, व त्या अहंपणामुळें मन सत्वप्रधान असलें तरी त्याला घोर ( दुःखरूप ) रजोगुण व्यापून सोडितो. तेव्हां मन रजोगुणयुक्त झालें कीं, त्यामध्यें विषयोपभोग घडणें साहजीक आहे. ह्याचा अशा रीतीनें उपभोग घ्यावा; किंवा तो अमुक रीतीनें घेतला असतां प्रत्यवाय नाहीं. इत्यादि विचारांनीं मूढ पुरुष अनावर काम वासनेच्या पेंचांत सांपडतात ! विषयोपभोगांपासून परिणामीं आपला नाश होईल, ही गोष्ट ह्मणजे ते विसरले असतात असें नाहीं; परंतु भोगतृष्णेच्या आवेशापुढें त्या विचाराचें कांहींच चालत नाहीं. अशा प्रकारें बहुतेक पुरुष राजस व तामस विषयांत निमग्न होतात खरे; परंतु ही गोष्ट टाळतां येणार नाहीं असें मात्र त्यांनीं समजूं नये. विषय हे परिणामीं दुःख देणारे आहेत. असा दृढ निश्चय करून सावधपणानें वागल्यास त्यांस विषयांपासून अलिप्त राहतां येईल. कदाचित् मनाचा आवर मुळींच होत नसेल, तर त्यांनीं माझ्या ठिकाणीं चित्त लावून दिवसांतून तीन वेळां आसन, प्राणायामादि करून प्राणवायूचा निरोध करावा; व मनाचा जय झाला नाहीं तरी न कंटाळतां तोच क्रम नित्य ठेवावा; ह्मणजे कालवधीनें यश मिळेल. उद्धवा, सनकादिक माझ्या शिष्यांनीं विषयांपासून चित्ताची निवृत्ति करण्याचा मार्ग सर्व विषयांतून चित्त काढून तें माझ्या चिंतनांत निमग्न करणें हाच सांगितलेला आहे. इति । २६.

( १ ) " शुनि सक्रोधें वसवसी । तें गोड लागे श्वानासी । जीवित बांधिलें तिच्या पुच्छीं । ती मागमागेसी हिंडतु ॥ "—**नाथ.**

( २ ) योगप्रकरणाचे १०।११ वे अध्याय पहा.

# अध्याय २७ वा.

## ब्रह्मदेवाचे उद्गार ( ३-९. )

ब्रह्मोवाच:--

ज्ञातोऽसि मेऽद्य सुचिरान्ननु देहभाजां
न ज्ञायते भगवतो गतिरित्यवद्यम् ॥
नान्यत्त्वदस्ति भगवन्नपि तन्न शुद्धं
मायागुणव्यतिकराद्यदुरुर्विभासि ॥ १ ॥

**ब्रह्मदेव म्हणतातः**--ईश्वरा, पुष्कळ काळपर्यंत तुझी उपासना केली, तेव्हां मला आज तुझें ज्ञान झालें. अहो! प्राण्यांना तत्त्वज्ञान होत नाहीं हा त्यांचा दोष होय. ज्ञेय आणि तत्त्ववस्तु जी कांहीं आहे ती आपणच आहां, आपल्यावांचून दुसरी वस्तु नाहीं; व आपल्याहून निराळें जरी कांहीं असलें तथापि तें सत्य नव्हे. कारण, मायेच्या गुणांमध्यें न्यूनाधिक्य झाल्यामुळें आपलींच अनेक स्वरूपें भासतात; आणि आपणच त्यांत ओतप्रोत भरलेले आहांत. देवा, तुझ्या ठिकाणीं ज्ञानशक्ति सदैव जागृत असल्यामुळें तेथें अज्ञानाचा मुळींच रिघाव होत नाहीं. आपल्या भक्तांचीं दुःखें निवारण करण्याकरितां तूं जे जे अवतार घेतोस, त्यांचें मूळ स्वरूप हेंच होय. भगवंता! ज्याच्या नाभिकमलापासून मी उत्पन्न झालों आहें, तें ह्या स्वरूपाच्या पलीकडे प्रकट प्रकाशात्मक, भेदरहित, केवळ आनंदमय असें स्वरूप निराळें आहे असें वाटत नाहीं; पूर्वोक्त गुणविशिष्ट जें तुझें स्वरूप तें हेंच होय. म्हणून सर्वश्रेष्ठा ईश्वरा! तुझ्या ह्या अद्वितीय स्वरूपाचाच मी आश्रित असून त्याला शरण आलों आहें. हेंच तुझें स्वरूप सृष्टि करणारें होय; अर्थात् तें सृष्टीहून निराळें आहे. कारण, कार्य करणारा कार्याहून निराळाच असतो. हेंच स्वरूप भूतें, इंद्रियें हीं स्वरूपें धारण करतें. देवा! तूं

जगाचें कल्याण करणारा आहेस. आम्ही तुझे भक्त असल्यामुळें आमचें कल्याण करण्याकरितां तूं हें स्वरूप आह्मांला ध्यानामध्यें दाखविलेंस ! कित्येक दुष्ट नास्तिक लोक तुझा अनादर करून तुझ्या अस्तित्वाविषयीं कुतर्क काढून वाद करितात; पण त्यांचीं तीं मतें म्हणजे नरकाची वाट दाखविणाऱ्या मशालीच होत; परंतु तिकडे यत्किंचितही लक्ष न देतां, षड्गुणैश्वर्यसंपन्न अशा तुझ्या स्वरूपास आह्मी वंदन करितों ! प्रभो ! वेदरूप वायूनें वाहून आणिलेल्या तुझ्या चरणरूप कमलांच्या सुगंधानें अर्थात तुझ्या सुकीर्तिमान चरित्रांचें जे प्रेमपुरस्सर सेवन करितात म्हणजे ऐकतात. त्यांची तुझ्या चरणकमलांचे ठायीं दृढभक्ति जडल्यामुळें तूं त्यांच्या हृदयांत सदैव वास करितोस. हे ईश्वरा, जोंपर्यंत लोक निर्भय अशा तुझ्या चरणांचा आश्रय करीत नाहींत. तोंपर्यंत द्रव्य, घर. पुत्र. मित्र इत्यादिकांच्या संबधानें भय, दुःख. इच्छा, अनादर. अतिशय लोभ आणि " मी व माझा " असा खोटा अभिमान हीं त्यांच्या मनांत बळावतात; त्यामुळें त्यांस फार पीडा होते. एतावता, तुझा आश्रय करीपावेतों मनुष्याला अनेक कारणांनीं पीडा होतात. एकदां तुझा आश्रय केला कीं, त्यांचे भय, शोक, अगदीं नाहींसे होतात. कित्येक मंदबुद्धि लोक लोभानें ग्रस्त होऊन अल्प सुखाच्या इच्छेनें निरंतर काम्य कर्मे करितात. त्यांची बुद्धि दुर्दैवानें नष्ट झालेली असते; ह्मणून सर्व संकटांचा परिहार करणाऱ्या ज्या तुझ्या कथा त्यांपासून ते दूर रहातात. हे दीनवत्सला ! क्षुधा. तृषा. कफ. वात, पित्त; तसेंच थंडी, वारा, ऊन आणि पाऊस यांपासून मनुष्यास फार पीडा होते; शिवाय ज्याची कधींही तृप्ति होत नाहीं. तो कामरूप अग्नि त्यांस सदैव जाळीत असून क्रोध तर मूर्तिमंत पुढें उभा असतो. हे सर्व मनुष्याची अत्यंत दुर्दशा करितात, हें पाहून मला फार वाईट वाटतें. सत्त्व, रज, तम या मायेच्या गुणांपासून उत्पन्न झालेलीं जीं

इंद्रियें व विषय त्यांच्या योगानें हें जग भरलेलें आहे. असें हें जग तुझ्याहून भिन्न आहे असें जे मानितात, ते ह्या संसारांत गोते खात राहतात; त्यापासून त्यांची निवृत्ति होत नाहीं.

हे भगवंता, चांगले विचारी पुरुषही जर तुझ्या कथांच्या श्रवणकीर्तनादिकांपासून विन्मुख असतील तर त्यांस देखील हा दुःखमय संसार प्राप्त झाल्यावांचून राहणार नाहीं. कारण दिवसां ते द्रव्यसंपादन करण्यामध्यें गुंतलेले असल्यामुळें थकून रात्रीं स्वस्थ झोंपीं जातात. मनांत एकसारखे द्रव्यार्जनाचे विचार चालले असल्यामुळें नसल्याच प्रकारचीं त्यांस स्वप्नें दिसतात; त्यामुळें वरचेवर त्यांना निद्राभंग होतो. इतकें होऊनही त्यांचे मनोरथ म्हणजे तत्क्षणींच सफल होतात असें नाहीं; कारण दैव त्यांच्याजवळच उभें असतें. भगवंता, हीं सर्व दुःखें अभक्तांस होतात. तुझ्या भक्तांस मुळींच होत नाहींत; कारण, तुझ्या कथांच्या योगानें तुझ्या भक्तांचें अंतःकरण शुद्ध होऊन त्यांस तुझ्या प्राप्तीचा मार्ग दिसून येतो. व भक्तियोगानें अंतःकरण शुद्ध झालें म्हणजे तूं त्या ठिकाणीं वास करितोस आणि आपला भक्त ज्या ज्या प्रकारें ध्यान करील त्या त्या प्रकारचें स्वरूप भक्तांवर अनुग्रह करण्याकरितां प्रकट करितोस. हे परमेश्वरा, तूं एकच असून अनेक प्रकारच्या पदार्थांमध्यें भरलेला आहेस. सर्वांचा मित्र आणि आत्मा तूंच आहेस. दुर्जनांस तुझी प्राप्ति होणें कठीण आहे. कारण, त्यांच्या अंतःकरणांत भूतदयेचा लवलेशही नसतो. भूतदयेच्या योगानें तूं जितका लवकर प्रसन्न होतोस, तितका अंतःकरणांत कांहीं तरी कामना ठेवून देवादिकांनीं जरी अत्युत्तम उपचारांनीं तुझें पूजन केलें तरी त्यांस देखील तूं प्रसन्न होत नाहींस. तुझ्या सकाम भक्तांपेक्षां निष्काम भक्तांची महति तूं अधिक मानतोस; म्हणून मनुष्यानें यज्ञ वगैरे नानाप्रकारचीं कर्में, दानें, तीव्र तपश्चर्या, आणि व्रतें इत्यादि करून त्यांच्या योगानें

उत्तम फल मिळविणें म्हणजे भगवंता, तुझा संतोष करणें हेंच होय. ह्यावांचून दुसरें त्या क्रियांचें उत्तम फल कांहींच नाहीं. इतर कोणतेंही धर्माचरण केलें तरी तें कधींना कधीं नष्ट होणारच; परंतु तुझ्या ठिकाणीं केलेलें धर्माचरण मात्र कधींही नाश पावत नाहीं. हे भगवंता, आपण आपल्या शुद्ध चैतन्यरूप प्रकाशाच्या योगानेंच मनुष्याचा द्वैतभ्रम नाहींसा करण्याकरितां ज्ञानाचें आश्रयस्थान झालांत; म्हणून आपण सर्वश्रेष्ठ आहांत. आपणांस माझा नमस्कार असो आणि या त्रिगुणात्मक जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करणारी निमित्तमात्र जी माया, तिला आपलाच आश्रय असून तिच्या लीला ह्या आपल्याच क्रीडा होत. असे जे आपण मायाचालक त्या आपणांस मी अभिवंदन करितों. इति २७.

---

# अध्याय २८ वा.

## योगत्रयनिरूपण ( ११–२० ).

उद्धव उवाचः—

**गुणदोषभिदादृष्टिर्निगमात्ते नहि स्वतः ॥**
**निगमेनापवादश्च भिदाया इति ह भ्रमः ॥ ५ ॥**

**उद्धव ह्मणाला:**—हे भगवंता श्री कृष्णा! गुणदोषात्मक भेददृष्टि तुझ्या वेदवाणीवरूनच उद्भवलेली आहे, स्वतःसिद्ध उत्पन्न झालेली नव्हे आणि आतां तर ती भेददृष्टि सर्वथा त्याज्य आहे असेंही सांगतोस; त्यामुळें मला भ्रम उत्पन्न झाला आहे त्याची तूं निवृत्ति कर.

**भगवान् श्रीकृष्ण म्हणाले:**—उद्धवा, मनुष्यांचें शाश्वत कल्याण व्हावें ह्मणून कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग असे तीन उपाय सांगितले आहेत, यांहून अन्य मोक्षप्राप्तीचा उपाय कोठेंच उपलब्ध

या तीन उपायांस कर्मकांड, ज्ञानकांड व उपासनाकांड असेंही म्हणतात. आतां या तिन्ही उपायांचीं अधिकारानुरूप फळें सांगतोः—

**अधिकारानुरूप फळें:**— उद्धवा, कर्मांचीं फळें दुःखरूप आहेत असें वाटत नाहीं व सुखाभिलाषामुळें ज्या पुरुषांनीं कर्मावर आसक्ति ठेविली असेल, त्यांना कर्मयोग फलद्रूप होतो; कर्मांचीं फळें दुःखरूप आहेत असें वाटून त्याविषयीं वैराग्य झालें, अर्थात् ज्यांनीं कर्माचा त्याग केला असेल त्यांस ज्ञानयोग फलद्रूप होतो आणि ज्या पुरुषाच्या अंतरीं कांहीं भाग्यवशात् माझ्या कथा ऐकणें, गुण गाणें इत्यादिकांविषयीं श्रद्धा उत्पन्न होऊन जे कर्मफलाविषयीं आसक्तही फारसे नसतात अथवा अनासक्तही नसतात, अशा पुरुषांना भक्तियोग फलद्रूप होतो. याप्रमाणें परमार्थ साधनांचा विषय एक असतांही अधिकारीभेदानें त्रिविध झाला आहे. कर्मफलांविषयीं आसक्ति, कर्मफलाविषयीं अनासक्ति व कर्मफलाविषयीं उदासीनता ह्या तीन स्थितींस अनुसरून कर्मकांड, ज्ञानकांड व उपासनाकांड (भक्तियोग) हे उपाय आहेत. ह्यावरून हें उघड आहे कीं, कर्मफलांच्या ठिकाणीं असलेली आसक्ति कमी किंवा नष्ट होतांच कर्मयोगाची आवश्यकता कमी किंवा नष्ट होते; म्ह-

---

(१) " मी कर्मादि मध्य अंतीं । मी कर्मकर्ता क्रियाशक्ति । कर्मफळ दाता मी श्रीपती । हा इत्यर्थ निश्चिती कर्मकांडाचा ॥ मीच देवो मीच भक्तु । पूजोपचार मी समस्तू । मीचि मातें पूजितू । हे इत्थंभूतू उपासना ॥ ज्ञानकांड अलोलिक । वेद आपला द्योतक ( स्वरूप प्रकट करणारा ) । अवघा संसार काल्पनिक । तेथ वेद नियामक कोण अर्थे ॥ मूळ संसाराचि मायिक । तेथ वेद तोही तद्रूप देख । मृगजळीं नाहीं उदक । परी खोलीही देख असेना । जेथ मुळीं मुख्य अद्वैतता । तेथ कैंचा वक्ता कैंचा श्रोता । कैंचें कर्म कैंचा कर्ता । मग वेदवार्ता ते कैंची ॥ जळगारा जळीं विरे । तेवीं वेदू अद्वैतीं मुरे । हें ज्ञानकांड साचोकारें । ( सत्य ) तुज म्यां खरें सांगितलें ॥ "—**नाथ.**

णजे भक्तियोगाची किंवा ज्ञानयोगाची अवश्यकता उद्भवते; ह्यास्तव कर्मयोग किती दिवस चालवावा तें सांगतो::—

**कर्मयोगाची अवधिः**—जोंपर्यंत माझ्या कथांचें श्रवण करण्याविषयीं अंतरीं श्रद्धा उद्भवली नाहीं किंवा कर्मांचीं फळें परिणामीं दुःखकारक आहेत असें वाटून त्याविषयीं वैराग्य उत्पन्न झालें नाहीं. तोंपर्यंतच पुरुषानें नित्यनैमित्तिक कर्में आचरावीं.

( १ ) **कर्मयोग**:—उद्धवा. केवळ कर्मयोगाचें सामर्थ्यही सामान्य आहे असें मानूं नको. पहा. स्वधर्माचरणामध्यें दक्ष असा जो पुरुष फलप्राप्तीची इच्छा न करितां श्रुतीस अनुसरून यथाविधि यज्ञयागादिक क्रिया करितो आणि निषिद्ध व काम्यकर्में सोडून देतो. तो परिणामीं स्वर्गाला किंवा नरकाला न जातां परमात्म्याच्या सच्चिदानंद स्वरूपांत लीन होतो. कारण साधकाच्या अशा प्रकारच्या कर्मांमुळें त्यास सायुज्यव्यतिरिक्त अन्य स्थिति मिळणें संभवतच नाहीं! नरकप्राप्ति हें निषिद्ध कर्मांचें फल होय; ह्यास्तव निषिद्ध कर्मांचा त्याग केलेल्या पुरुषास नरकप्राप्ति कधींही होणार नाहीं. तसेंच स्वर्गप्राप्ति हें विहित अशा काम्यकर्मांचें फल होय; ह्यास्तव विहित अशीं काम्यकर्में त्याज्य केलेल्या पुरुषास स्वर्गप्राप्ति सुद्धां कधींही होणार नाहीं. आणि मग त्या पुरुषास ह्या दोन स्थितींशिवाय तिसरी स्थिति जिला निर्गुण निर्विकार ह्मणतात ती म्हणजे मोक्षच परिणामीं प्राप्त होईल! उद्धवा, निष्काम बुद्धीनें विहित कर्में करीत असतां, साधकास विद्यमान जन्मांतच ज्ञान किंवा भक्ति ह्यांपैकीं कोणतें तरी एक आपोआप साध्य होतें, आणि मग तो ज्ञानयोगांत किंवा भक्तियोगांत रममाण होत्साता कर्मयोगाचा त्याग करितो. एतावता, मुमुक्षु जन निष्काम कर्मयोग चालवीत असतांना कांहीं वासना राहून जर मृत्यु प्राप्त झाला, तर तो योग्यांच्या कुळांत जन्म घेतो आणि कर्मयोग सिद्ध झाल्यावर जर तो जिवंत राहिला, तर त्याची कर्मांवरील

आसक्ति कमी होऊन तो भक्तियोगाचा स्वीकार करितो, किंवा कर्मावरील आसक्ति अगदीं नष्ट होऊन तो ज्ञानयोग चालवितो, आणि त्या योगांतून अंतीं मोक्षपदास प्राप्त होतो.

( २ ) ज्ञानयोगः—उद्धवा, यज्ञयागादिक क्रियांचीं फलें दुःखरूपक आहेत असें समजून तीं करण्याविषयीं ज्या पुरुषास उत्तम वैराग्य उत्पन्न आलें असेल त्यानें काय करावें व काय सोडावें, तें सांगतों ऐकः—प्रथम त्यानें योगाभ्यासद्वारा इंद्रियांचा निग्रह करून आत्मविषयक वृत्ति राखण्याचा यत्न सतत चालवावा, आणि मनाची स्थिरता राहील असें करावें. ब्रह्मचिंतनांत स्थिर केलेलें मन लागलेंच चंचल होईल, तर कर्मेंही करून परिणामीं तें आकलन करावयाचें आहे, याकडे अवधान ठेवून त्यास कांहींसें स्वच्छंदानें वर्तू द्यावें; म्हणजे त्याच्या कलाप्रमाणें त्यास अनुकूल अशा कांहीं गोष्टी कराव्या, आणि मग तें हळू हळू स्वाधीन करून घ्यावें. मनाची धांव ज्यावर आहे तें कृत्य करूं नये. उद्धवा. मनाच्या कलानें वागून मनाला वेंसण घालणें हा उपाय श्रेष्ठ होय. उदाहरण–अश्वाचें (घोड्याचें) संयमन करणारे पुरुष अश्वाच्या गतीचें अवलोकन करून जसें त्याचें हृदय जाणतात, व परिणामीं त्यास पूर्णपणें स्वाधीन करून घेतात; तसेंच साधक पुरुषानें मनाचा कल जाणून प्राण जिंकावा व इंद्रियें स्वाधीन करून घ्यावीं, आणि सत्वगुणयुक्त बुद्धीच्या साह्यानें हळू हळू मनाला आपल्या अंकित करून घ्यावें. अशा प्रकारें मनाला त्याच्या कलानें वागून स्वाधीन करून घेणें हा योग (उपाय) उत्तम ह्मटला आहे. अशा रीतीनें मन किंचित् वश झालें असतां त्याला पुढें निश्चल कसें करावें तें सांगतों:—

**उपक्रमोपसंहारक्रमः**—उपक्रमानें ह्मणजे महत्तत्त्वापासून देहाप-

( १ ) ह्याचें विशेष स्पष्टीकरण योगप्रकरणाच्या १८ व्या अध्यायांत पहा.

र्यंत सर्व पदार्थांचीं अनुक्रमें, ( प्रकृतीपासून महत्तत्त्व, महत्तपासून अहंकार अशा रीतीनें ) उत्पत्ति; आणि उपसंहारक्रमानें ( पृथ्वी तत्त्वांत, जल अग्नितत्त्वांत असेंच महतत्त्वापर्यंत अशा उलट रीतीनें लयही होतात; असें उपक्रमोपसंहारक्रमानें मन निश्चल होईतोंपर्यंत चार करीत जावें. ह्यावर तूं ह्मणशील कीं, 'सहस्रावधि उपाय केले मन विषयाकारता सोडणार नाहीं; मग वारंवार उपदेश पाहिजे ला ? ' तर त्याविषयीं उत्तर सांगतों:—महत्तत्त्वापासून देहापर्यंत जे पदार्थ उत्पत्ति व नाश होणारे आहेत, त्या सर्वांचा आधार आत्मा होय; त्याच्या अविवेकामुळें हा संसार प्राप्त झाला आहे. ह्या संसारा विषयीं पुरुषाला उद्वेग वाटून वैराग्य झालें आणि गुरूनें केलेला उपदेश लक्षांत आणून तो त्याचें चिंतन व पुनः पुनः मनन करूं लागला आणि निदिध्यास चालविला कीं, जसें मीठ पाण्यांत पडतांच लय पावतें; तद्वत् त्याचें मन आत्मचिंतनांत रत झालें ह्मणजे आत्मरूप बनतें. तेव्हां देहादिकांविषयींचा " अहं व मम " हा भाव नाहींसा होतो. तसेंच, यमनियमादिक योगमार्ग, व "तत्" आणि " त्वं " ह्या पदार्थांचें शोधन ज्ञानमार्ग, किंवा माझें पूजन, ध्यानादिक भक्तिमार्ग ह्या उपायांनीं मन परमात्म्याला स्मरूं लागतें; इतर अनेक उपायांनींसुद्धां स्मरत नाहीं. ह्मणून तीं साधकानें करूं नयेत.

उद्धवा, ब्रह्मचिंतनांत किंवा माझ्या भक्तींत निमग्न असणाऱ्या योग्याच्या हातून चुकून जरी निषिद्ध किंवा निंद्य कर्म घडलें, तरी त्यापासून त्यास पातक लागत नाहीं. कारण, परमात्मचिंतनानें किंवा माझ्या भक्तीनेंच निंद्यकर्मापासून घडलेला दोष जळून जातो. मग त्यास

( १ ) " मघमघीत अमृतफळ । त्यावरी सर्पे घातली गरळ । तेवीं विषयमात्र सकळ । देखे केवळ महाबाधा ॥ "—नाथ.

अन्य कृच्छ्रादि प्रायश्चित्ताची अपेक्षा नाहीं. उद्धवा, ह्यावर पुनः तूं अशी शंका घेशील कीं, 'निषिद्ध कर्में करणें हा दोष होय, असें श्रुतीनें स्पष्ट सांगितलें आहे; व त्या दोषाच्या निवृत्तीकरितां कृच्छ्रादिक प्रायश्चित्तेंही श्रुतीनेंच ठरविलीं आहेत; तेव्हां ते प्रायश्चित्त केल्यावांचून नुसत्या ज्ञानाभ्यासरूप योगानेंच पापांचें निरसन करितां यावें कसें?' तर ह्यावर उत्तर असें कीं, कर्में करणें हाच मुळीं दोष आहे. विधिनिषेध वचनांनीं अमुक कर्में गुणरूप व अमुक कर्में दोषरूप असें विधान सांगण्याचा मूळ हेतु जीवांची स्वाभाविक प्रवृत्ति कर्में करण्याकडे असल्यामुळें त्यावर असलेली आसक्ति सोडावी हा होय, ह्यांत अधिकार भेदानें जीं कर्में करावीं ह्मणून सांगितलीं ते गुण होत; व जीं कर्में करूं नयेत ह्मणून सांगितलीं ते दोष होत. ह्या गुणदोषव्यवस्थेनें दोषरूप कर्मांपासून जीवांची सहजच निवृत्ति केल्यासारखी होते; आणि ज्ञानानें व भक्तीनें मुमुक्षु पुरुष माझ्या चित्स्वरूपाचा विचार करूं लागला ह्मणजे तो गुणरूप कर्मांपासूनही अनायासें निवृत्त होतो. अशा प्रकारें दोन्ही प्रकारच्या कर्मांपासून जीवाची निवृत्ति झाल्यावर त्यास मद्रूपताच प्राप्त होते. आणि मग त्यानें कोणतेंही कर्म केलें किंवा जरी न केलें तरी त्याबद्दल त्यास पातकही लागत नाहीं; अर्थात् प्रायश्चित्ताचीही अपेक्षा राहत नाहीं.

(२) भक्तियोगः—उद्धवा, माझ्या गुणकथांमध्यें श्रद्धा उत्पन्न झाली कीं, त्या श्रद्धालु पुरुषास इतर सकल कर्में करण्याचा कंटाळा वाटूं लागतो; परंतु त्याची अशी मध्यवर्ती स्थिति असते कीं, कर्में करण्यापासून दुःखप्राप्तिच आहे असें त्यास वाटत असूनही त्यांचा परित्याग करण्याला मात्र तो धजत नाहीं. ह्मणून तो भक्तीचा अधिकारी होय.

(१) हृदयीं नाहीं अनुतापवृत्ति । वरी वरी गा शास्त्रोक्ति । लावूं जातां शेण माती । पाप निश्चिति तेणें न जाय ॥ "—नाथ.

उद्धवा, अशी योग्यता प्राप्त झाल्यावर त्या श्रद्धाळू पुरुषानें भक्तीच्या योगानेंच सकल पुरुषार्थ साध्य होईल असा पूर्णपणें निश्चय करून प्रेमपुरस्सर माझी भक्ति चालवावी. त्यानें विषयोपभोग स्वीकारावे; परंतु त्या विषयांपासून परिणामीं खचीत दुःख होईल असें पूर्ण स्मरण ठेवून होतां होईल तों त्यांजकडचा ओढा कमी कमी करण्याच्या प्रयत्नांत असावें. उद्धवा, मीं पूर्वीं अनेकवार भक्तियोग सांगितला आहेच; त्याप्रमाणें जो पुरुष माझें नित्य भजन करितो, त्याच्या हृदयांत मी वास करूं लागतों, मग अर्थातच त्याच्या मनांतील समस्त विषयेच्छा नष्ट होतात, मी सर्वांचा अंतर्यामीं आहें. जो पुरुष माझ्या भक्तीत सदासर्वकाल रममाण होतो, त्याच्या हृदयांतील अहंकार नष्ट होतो, त्यास सर्वत्र माझें स्वरूपच दृग्गोचर होतें, व जगताच्या स्थितीविषयीं त्याचे सर्व भ्रम दूर होतात, आणि त्याचीं संसारमूलक संचित व क्रियामण कर्में क्षय पावतात. उद्धवा, कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग हीं तीन माझ्या प्राप्तीचीं साधनें आहेत, तरी ह्या तिन्ही साधनांमध्यें भक्ति हीच श्रेष्ठ आहे. कारण, भक्तीला कर्माची, ज्ञानाची किंवा वैराग्याची मुळींच अपेक्षा नसते; आणि कर्माचें व ज्ञानाचें तर भक्तीवांचून चालावयाचें नाहीं. एकंदरीनें सिद्धांत हा कीं, ज्यानें माझा भक्तियोग आरंभिला व मजकडे चित्त लाविलें, त्या भक्ताला ह्या लोकीं कल्याण प्राप्तीचें साधन ज्ञान नको आहे. किंवा वैराग्य नको, तर तो भक्तीनेंच कृतार्थ होतो. उद्धवा, कर्मानुष्ठानानें, तपश्चर्येनें, ज्ञानानें, वैराग्यानें, योगाभ्यासानें, दानधर्मानें, तीर्थाटनानें व इतर पुण्य क्रियांनीं जीं जीं फलें प्राप्त

(१) " त्यागावया नाहीं सामर्थ्यशक्ति । त्यासी विषययोग जेव्हां येती । ते भोगी ऐसिया रीतीं । जेवीं शृंगारिती सुळीं द्यावया ॥ "—**नाथ**.

(२) " धूई दाटली चहूंकडे । ते चंडवातें तत्काळ उडे ! तेवीं माझ्या प्रकाशापुढें । वासनेचें उपडे समूळ जळ ॥ "-**नाथ**.

होतात, तीं सर्व माझ्या भक्ताला माझ्या भक्तियोगें करूनच अनायासें प्राप्त होतात. फार तर काय? पण स्वर्ग, वैकुंठ किंवा मोक्ष हेही त्यानें इच्छिल्यास त्यास सहज प्राप्त होतात. हे पुण्यपुरुषा, माझे भक्त माझ्या ठिकाणीं इतके तल्लीन असतात कीं, त्यांस माझ्यावांचून दुसरी कोणतीही गोष्ट प्रिय वाटत नाहीं. मी आपण होऊन त्यास प्रत्यक्ष कैवल्य देऊं लागलों, तरी ते तें घेण्यास नाखुष असतात. उद्धवा, निरपेक्षता हेंच अत्यंत मोठें कल्याण होय. ह्याकरितां जे पुरुष निष्कामबुद्धीनें माझे गुणकीर्तन करितात, त्यांसच भक्तियोग सिद्ध होतो. एतावता, जे पुरुष माझी अनन्य भावानें भक्ति करितात, त्यांची सर्वत्र समबुद्धि होते; व मग ते माझ्या चिन्मय स्वरूपाप्रत पोहोंचून पुण्यपापांच्या फलांपासून निवृत्त होतात. तात्पर्य, कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग ह्या तिन्हींचें आचरण करणारे पुरुष परिणामीं सुखानें माझें स्थान मिळवून सद्गतीस पावतात. इति । २८.

---

# अध्याय २९ वा.

## शुद्ध्यशुद्धि व गुणदोषनिर्णय ( ११-२१ ).

श्रीभगवानुवाचः—

**शुद्ध्यशुद्धी विधीयेते समानेष्वपि वस्तुषु ॥**
**द्रव्यस्य विचिकित्सार्थं गुणदोषौ शुभाशुभौ ॥ ३ ॥**

**श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा जीवांची प्रवृत्ति स्वभावतः कर्माकडे असते. ह्यास्तव तिचा अंशतः तरी प्रतिबंध होण्याकरितां एकाच पदार्थाच्या ठिकाणीं शुद्धि-अशुद्धि, गुण-दोष, अर्थ-अनर्थ, स्थापन केले आहेत. ह्यांच्या आचरण्यानें कर्में करण्यापूर्वीं बऱ्यावाईटाचा विचार

पुढें येऊन मनुष्य एकदम त्या कर्मास प्रवृत्त होत नाहीं. त्यामध्यें शुद्धि आणि अशुद्धि धर्मासाठीं सांगितल्या आहेत; गुण आणि दोष व्यवहारासाठीं सांगितले आहेत; आणि अर्थ व अनर्थ हे शरीरनिर्वाहासाठीं सांगितले आहेत. धर्मरूप भार वाहणाऱ्या कर्मठ लोकांसाठीं मीं मन्वादि रूपांनीं असा हा आचार दाखवून दिला आहे. आतां मी तुला सकल पदार्थांची शुद्धि व अशुद्धि यांचें विस्तारानें विवेचन सांगतों:—

**शुद्ध्यशुद्धि निर्णयः—देशशुद्धि**—ज्या प्रदेशांत काळवीट, हरिण असून लोक ब्राह्मणांविषयीं पूज्यबुद्धि बाळगितात तो देश पवित्र होय, असा सामान्य नियम आहे; परंतु त्या देशांत काळवीट असूनही तेथें नीच बुद्धीचे संस्कारहीन लोक असतील. तर तो देश अपवित्र होय. तसेंच जेथें सडासंमार्जनादि संस्कार होत नसतील ( किंवा जेथें म्लेच्छांची वसति विपुल असेल ) तो देश व क्षारयुक्त मृत्तिकेचा प्रदेश हेही अपवित्र होत; आणि देशांत काळवीट नसूनही तेथें भगवद्भक्तांची वसति असेल, तर तो देश अत्यंत पवित्र समजावा.

**कालशुद्धिः**—सत्कर्म करण्यास अवश्यक सामुग्री ज्या कालांत प्राप्त होते, तो काल पवित्र समजावा; किंवा त्या कर्माला विहित काल असेल तोही पवित्रच होय; आणि ज्या कालीं सत्कर्म करण्यास अवश्यक सामुग्री मिळत नाहीं, किंवा राष्ट्रनाशादि कारणामुळें कर्म चालत नाहीं तो, तसेंच अशौचादि कारणामुळें कर्म करणें अयोग्य असतें तो काल अपवित्र होय.

**पदार्थशुद्धिः—पांच प्रकारांच्या योगें** म्हणजे—(१) पदार्थानें, (२)

---

( १ ) वैराग्यप्रकरण अध्याय १६ यांत निरूपण केलें आहे, तेथें पहा.

( २ ) " स वै पुण्यतमो देशः सत्पात्रं यत्र लभ्यते " **अर्थ**—जेथें सत्पात्र मिळतें तो देश अत्यंत पवित्र समजावा.—**स्मृति**.

वचनानें, ( ३ ) संस्कारानें, ( ४ ) कालानें, ( ५ ) न्यूनाधिक्यानें-होत असते. ( १ ) पदार्थानें शुद्धि किंवा अशुद्धि अशीः—तांदुळांची उदकानें होते. आणि मूत्रादि अपवित्र वस्तूंनीं अशुद्धि होते; (२) वचनानें शुद्धि किंवा अशुद्धि अशीः—एकाद्या पदार्थाबद्दल हा शुद्ध आहे किंवा अशुद्ध आहे असा संशय आला असतां ब्राह्मणाच्या अनुमोदनानें तो शुद्ध अथवा निषेधानें अशुद्ध समजावा. ( ३ ) संस्कारानें शुद्धि किंवा अशुद्धि अशीः—पुष्पादि पदार्थ प्रोक्षणानें शुद्ध होतात, व अवघ्राणानें ( हुंगण्यानें ) अशुद्ध होतात; ( ४ ) कालानें शुद्धि किंवा अशुद्धि अशीः—अन्न ताजें असतां शुद्ध असतें, व तेंच शिळें झाल्यावर अशुद्ध होतें; यथाकालीं किंवा अकालीं वृष्टि झाल्यास तें उदक तीन अथवा नऊ दिवस अशुद्ध असतें, नंतर शुद्ध होतें. ( ५ ) न्यूनाधिक्यानें शुद्धि किंवा अशुद्धि अशीः—मोठ्या जलाशयाचें ह्मणजे तलावादिकांचें उदक अतिशूद्रादिकांचा स्पर्श झाला तरी शुद्धच मानलें जातें, पण भांड्यांतलें पाणी थोडें असतें ह्मणून शूद्रस्पर्श होतांच अशुद्ध मानितात.

उद्धवा, शुद्ध गोष्टी पुण्योत्पादक व अशुद्ध गोष्टी पापोत्पादक आहेत, ही गोष्ट खरी; पण त्यांतही पुनः तारतम्य पाहून बेताबेतानें करितात, सर्वत्र सारख्या प्रमाणानें करीत नाहींत. कसें तें पहाः—निर्भय प्रदेश असून तेथें मनुष्य अशुद्ध पदार्थांचा उपयोग करील तर त्याला पाप लागेल; पण देश जर चोरांनीं व्यापलेला आणि भयपूर्ण आहे तर तेथें दोष नाहीं. तसेंच अंगांत रोग वगैरे नसून चांगलें तारुण्य आहे, अशा अवस्थेंत मनुष्याला अपवित्र पदार्थ उपयोगांत आणल्यानें दोष लागतो; बाल्य व रोग इत्यादि अवस्थेंत मात्र दोष लागत नाहींत.

**कर्मकर्त्याची शुद्धिः**—कर्में करणाऱ्या पुरुषानें स्नान, दान, तप, प्रकृतिमान, शक्ति, उपनयनादि संस्कार, संध्यावंदनादि कर्में, भगवच्चिं-

तन इत्यादिकांनीं आपल्या शरीराची व मनाची शुद्धि करून कर्में करावीं. व उपलक्षणांनीं चारी वर्णांपैकीं कोणत्याही मनुष्यानें कर्म आचरण करावें.

**मंत्राची शुद्धिः**—सद्गुरूच्या मुखानें त्याचें पूर्ण ज्ञान करून घेणें ही होय.

**कर्मशुद्धि;**—सकल कर्में मला ( ईश्वराला ) अर्पण करणें ही होय.

**गुणदोषनिर्णयः**—उद्धवा पूर्वोक्त देश, काल, पदार्थ, कर्ता, मंत्र व कर्म हीं सहा असलीं ह्मणजे त्यांच्या योगें धर्म घडतो. ह्यांत कांहीं विपरीत प्रकार असला कीं तो अधर्म समजावा. हा सांगितलेला गुण दोषनिर्णय तरी बरोबर आहे असें समजूं नकोस. कारण, कोठें गुण देखील दोष होतो. उदाहरण—आपत्तिकालीं प्रतिग्रह ह्मणजे दान घेतलें तर तो दोष होतो. तसेंच कोठें दोष देखील गुण होतो. उदाहरण—कुटुंबाचा त्याग हा दोष आहे; पण विरक्तानें कुटुंबत्याग केला तर तो दोष नव्हे, तर उलट गुण होय. उद्धवा गुणदोषांसाठीं जो शास्त्ररूप नियम तो त्या गुणदोषांच्या भेदाचाच बाधक आहे, अर्थात् हे गुणदोष

( १ ) " मागील अठाविसाव्या अध्यायाच्या शेवटपर्यंत गुणदोषांच्या व्यवस्थेसाठीं कर्म, ज्ञान व भक्ति हे तीन योग सांगितले. पैकीं जे पुरुष ज्ञानसिद्ध व भक्तिसिद्ध असतील त्यांना गुणदोष कांहींच नाहींत. साधकांपैकीं ज्यांनां नित्यनैमित्तिककर्मनिष्ठेला प्रारंभ केला आहे, त्यांनीं प्रथमतः शक्त्यनुसार नित्यनैमित्तिक कर्में करणें चांगलें. कारण, तीं चित्तशुद्धि करणारीं आहेत. जर त्यांनीं नित्यनैमित्तिक कर्में न केलीं किंवा निषिद्ध कर्में अचरलीं तर तो दोष होय. त्याच्या निवृत्तीसाठीं प्रायश्चित्त हा गुण समजावा. आतां ज्यांचीं अंतःकरणें शुद्ध झालीं व ज्यांनीं ज्ञाननिष्ठा आरंभिली, त्यांना ज्ञानाभ्यासच सिद्धिदायक अर्थात् गुण होय; त्याविरुद्ध वागणें ह्मणजे प्रायश्चित्तादि घेणें हा दोष समजावा. भक्तिनिष्ठांना तर श्रवण, कीर्तन इत्यादि करणें हाच गुण; त्याविरुद्ध वागणें ह्मणजे प्रायश्चित्त करणें दोष समजावा.

( २ ) " देशं कालं तथाऽऽत्मानं द्रव्यं द्रव्यप्रयोजनम् । उपपत्तिमवस्थां च ज्ञात्वा शौचं प्रकल्पयेत् ॥ " **अर्थ**—देश, काल, आत्मा, द्रव्य, द्रव्याचें प्रयोजन, उपपत्ति व अवस्था इतकें सगळें मनांत आणून शुद्ध्यशुद्धींचा निर्णय ठरवावा. **स्मृति.**

वास्तव नव्हत. एतावता, गुणदोषांचें नियमन करणारे जे विधी आहेत त्यांचें तात्पर्य प्रवृत्तीचा संकोच करून तद्वारा निवृत्ति करण्याकडेच असतें. पहा ज्या ज्या विषयापासून पुरुष निवृत्त होतो त्या त्या पासून तो मुक्त होतो. आणि हाच धर्म शोक, मोह व भय दूर करणारा अर्थात् मनुष्यांना कल्याणप्रद होय. इति । २९.

---

# अध्याय ३० वा.

## मार्कंडेय मुनींची कथा (१२-१०).

सूत उवाच:—

तमेवं निभृतात्मानं वृषेण दिवि पर्यटन् ॥
रुद्राण्या भगवान् रुद्रो ददर्श स्वगणैर्वृतः ॥ ३ ॥

**सूत म्हणाले:**—शौनकादिक हो, एके प्रसंगीं प्रमथगणांसमवेत शंकर आणि पार्वती नंदिकेश्वरावर बसून आकाशमार्गें पर्यटन करीत असतां त्यांची दृष्टि सहज मार्कंडेयांकडे गेली. तेव्हां पार्वतीनें मार्कंडेयाकडे पाहून शंकराला ह्मणाली:—" हे भगवन्, ह्या ब्राह्मणाची अवस्था पहा. ह्याचीं देह, इंद्रियें व मन हीं निश्चल होऊन राहिलीं आहेत. भगवन्, आपण योग्यांना नेहमीं सिद्धि देतां, त्याअर्थीं ह्यालाही तपाचें उत्तम फळ द्यावें." तेव्हां श्रीभगवान् शंकर म्हणाले:—"हे पार्वती, ज्याची व्यापक परब्रह्माच्या ठिकाणीं परम भक्ति जडली, तो ब्रह्मर्षि उपभोग मिळविण्याची, फार तर काय, मोक्षाची देखील कधींही इच्छा करीत नाहीं! त्यांतलाच हा पुरुष आहे. तथापि आपण ह्या साधूशीं संवाद करूं. मनुष्यांना साधूंचा समागम घडणें हा परम लाभ होय. " ऋषि हो, नंतर शंकर पार्वती हे गणांसहवर्तमान त्या मार्कंडेयाच्या आ-

श्रमास गेले. मार्कंडेयानें आपलें चित्त अंतरात्म्यामध्यें लीन केलें होतें. म्हणून त्याला ते जगाचे आत्मे साक्षात् शंकर व पार्वती आपल्याजवळ आले आहेत ही गोष्ट कळली नाहीं. कारण, त्या वेळीं त्याला देहाचें व विश्वाचेंही भान नव्हतें. भगवान् शंकरानें मार्कंडेयाची तदाकार वृत्ति जाणून त्याच्या हृदयगुहेंतील आकाशांत योगमायेंकरून प्रवेश केला. तेव्हां मार्कंडेय आपल्या अंतरीं भगवान् शंकर प्राप्त झालेले पाहून आश्चर्यानें थक्क झाला. शंकरांनीं विजेसारख्या चकाकणाऱ्या पिंगट जटा धारण केल्या होत्या; त्यांना तीन नेत्र व दहा भुजा होत्या; त्यांची मूर्ति उंच असून उगवणाऱ्या सूर्याप्रमाणें देदीप्यमान दिसे; त्यांनीं अंगावर व्याघ्रचर्मरूप वस्त्र पांघरलें असून त्रिशूल, खट्वांग, अक्षमाला, डमरू, कपाल, खड्ग व धनुष्य हीं आयुधें धारण केलीं होतीं. अशी आपली मूर्ति मार्कंडेयाच्या हृदयांत एकदम प्रगट केली. ती पाहून "हें काय, व कोठून आलें" असें ह्मणून त्या मुनीनें समाधि उतरविली व नेत्र उघडले तों, गणांसह पार्वती व शंकर त्याच्या दृष्टीस पडले. तेव्हां मुनीनें त्याला शिरसाष्टांग वंदन केलें; आणि गणांसह भवानीशंकराची स्वागत, आसन, पाद्य, अर्घ्य, गंध, माळा, धूप, दीप ह्या उपचारांनीं पूजा केली.

**मार्कंडेय शंकरास म्हणाला:**—हे विश्वव्यापका ईश्वरा, तूं ब्रह्मरूप असल्यामुळें तुझ्या सर्व इच्छा नित्य परिपूर्ण असतात. प्रभो, तुझ्या कृपेनेंच ह्या सगळ्या जगाला सुख प्राप्त होतें. ह्यासाठीं माझ्यासारख्या दीनाच्या हातून कोणतें कार्य घडेल बरें? ईश्वरा, तूं वस्तुतः शिव अर्थात् कल्याणरूप आहेस. देवा, सत्वादि त्रिगुण ह्यांच्या द्वारें तूं सृष्टीची उत्पत्ति, स्थिति व संहार हीं करितोस, त्या तुला माझा नमस्कार असो. सूत म्हणाले—ऋषे, भगवान् शंकर हे सत्पुरुषांचें प्राप्यस्थान होत. मार्कंडेयानें अशा प्रकारें स्तवन केलें असतां त्यांना संतोष वाटला व प्रसन्न अंतःकरणानें हांसत हांसत ते मार्कंडेयाला म्हणाले:—

**श्रीभगवान् शंकर बोलले:**--" मुने, आह्मांपासून आपेक्षित वर मागून घे. आह्मी तिघे ( ब्रह्मा, विष्णु, महेश ) वरदात्या लोकांचे अधिपति आहों. ज्यांचें दर्शन कधींही निरर्थक नसतें व ज्यांपासून मनुष्याला मोक्ष मिळतो, ते आह्मी आहों. मुने ! भगवद्भक्तांना वर देणें म्हणजे कांहीं अनुग्रह करणें असा अर्थ नव्हे. कारण, आपण वंद्य आहां ! पहा:—ब्राह्मण ह्मणजे साधु, नित्य संतुष्ट व संगरहित असून सर्व भूतांविषयीं दयाळू असतात; त्यांची आह्मांवर अचल भक्ति असते; ते कोणाशीं वैर करीत नाहींत. तर सर्वत्र समदृष्टि ठेवितात. लोकांसहित सगळे लोकपाल त्यांना वंदन करितात, पूजितात व त्यांची सेवा चालवितात ह्यांत नवल नाहीं; परंतु मी, ब्रह्मदेव आणि स्वतः सर्वेश्वर हरि असे आह्मी सगळे त्यांच्या सेवेंत सादर असतों ! मार्कंडेया, अशा भगवद्भक्त ब्राह्मणांच्या आधीन आह्मी होतों, ह्याचें कारण, त्यांची अद्वैत भावना असते हें होय. असे ब्राह्मण हे तीर्थापेक्षां किंवा मूर्तीपेक्षांही श्रेष्ठ आहेत असें आह्मी मानितों ! कारण, तीर्थें व मूर्ति ह्यांच्यापासून परमार्थ लाभ प्राप्त होण्यास फार विलंब लागतो; आणि ब्रह्मनिष्ठ ब्राह्मणांच्या केवळ दर्शनानेंच ती सिद्धि प्राप्त होते ! मार्कंडेया, वेदत्रयींत निरूपण केलेलें आमचें गूढ स्वरूप जे कोणी अध्ययनानें, तपोबलानें, धारणाध्यानसमाधि–त्रययुक्त संयमानें धारण करितात, त्या ब्राह्मणांला आह्मी वंदन करितों ! बाबा, तुझ्यासारख्या ब्राह्मणाचें केवळ दर्शन घडलें किंवा नांव कानीं पडलें तरी देखील महापातकीच नव्हेत तर चांडाल सुद्धां पावन होतात; मग तुझ्याशीं संभाषण, समागम इत्यादिकांच्या योगें पवित्रता प्राप्त होईल हें सांगावयास नकोच !"

ऋषिहो, भगवान् शंकरांचें धर्मरहस्य प्रतिपादन करणारें तें अमृततुल्य भाषण श्रवण करून, विष्णुमायेनें भ्रांत झालेल्या मार्कंडेयाच्या चित्तास शांति उत्पन्न झाली, तथापि त्याची तृप्ति झाली नाहीं. भगवं-

तापासून आणखीही चार शब्द ऐकावे अशी वासना त्यास उत्पन्न होऊन, तो ह्मणालाः–" हे लोकनायका ! भगवल्लीला ध्यानांत येणें मोठें दुर्घट आहे. कारण, माझ्यासारख्या क्षुद्र जीवाचे नियामक देवाधिदेवच आमची स्तुति करितात; तेव्हां ही लहानसहान गोष्ट आहे काय ? मला असें वाटतें कीं, धर्मरक्षक प्रभु धर्माचरण करणाऱ्या जीवाची प्रशंसा करितात, ह्याचें कारण धर्मरक्षण व्हावें हेंच होय. भगवंता, तुझ्या सारख्यांना वास्तविकपणें कोणतेंही धर्मबंधन असण्याचें कारण नाहीं. कारण, तुह्मी निर्गुण निर्विकार व सच्चिदानंद आहां ! तुह्मी स्वतः धर्मबंधन पाळणें ह्मणजे लोकांस तें पाळण्यास प्रवृत्त करणें आणि अंतीं त्यांस सायुज्य मिळणें हेंच होय ! देवा, तुह्मी आमच्या सारख्यांचा गौरव केल्यानें, अथवा आमच्यापेक्षां लघुत्व स्वीकारल्यानें आह्मांपेक्षां खरोखरीच मानानें कमी व्हाल ही समजूत भ्रांतिमूलक आहे. भगवंता, तूं त्रिगुणात्मक दिसतोस तरी जीवासारखा गुणांच्या योगें पराभव पावत नाहींस, तर त्या गुणांचा नियामक आहेस. तूं एक आहेस, तुजहून दुसरा कोणी नाहीं. तूंच गुरू व परब्रह्ममूर्ति आहेस. तुला नमस्कार असो. हे व्यापका ! तुझें दर्शन हा अत्युत्तम लाभ होय. तुझ्या दर्शनामुळें पुरुष परमानंदास पावतो, व त्याच्या सर्व इच्छा पूर्ण होतात; तेव्हां तुजपासून वेगळा वर तो कोणता बरें मागून घेऊं ? तथापि मी एक वर तुजपाशीं मागतों तो हा कीं माझी भगवंतावर, भगवद्भक्तांवर व तशीच तुजवर आढळ भक्ति जडावी. कारण, तूं स्वतः पूर्णकाम व भक्तांच्या कामना पूर्ण करणारा आहेस."

ऋषिहो, मार्कंडेयाचें मधुर भाषण ऐकून भगवान् शंकर प्रसन्न झाले व त्यांनीं पार्वतीच्या अनुमोदनानें त्यास वर दिला. भगवान् शंकर ह्मणालेः–" महर्षे, तुझी भगवत्पदीं अत्यंत निष्ठा असल्यामुळें तुझी ही इच्छा पूर्ण होईल, कल्पसमाप्तिपर्यंत तुझी पवित्र कीर्ति राहील, व तूं

अजरामर होशील. ब्रह्मन्, तुला त्रिकालज्ञान व परवैराग्यसह दृढ अपरोक्षज्ञान प्राप्त होईल. शिवाय तूं पुराणाचार्य होशील."

**सूत म्हणाले:**—ऋषे, तो त्रिनयन ईश्वर मार्कंडेय मुनीला असा वर देऊन त्यानें अनुभवलेलें भगवन्मायेचें वैभव उमेला सांगत सांगत तेथून निघून गेला. इकडे तो भृगुकुलदीपक मुनि मार्कंडेयही भगवद्भक्तीमध्यें रममाण होऊन पृथ्वीवर संचार करूं लागला, व तो आजवर आनंदानें फिरतच आहे. ऋषिहो! हें मार्कंडेय मुनीचें चरित्र जो स्वतः श्रवण करील किंवा दुसऱ्यास श्रवण करवील त्यास कर्मवासनामूलक संसार भोगावा लागणार नाहीं! इति। ३०.

---



**भक्तिप्रकरण समाप्तः**

॥ ॐ नमो नागनार्याय ॥



# योगप्रकरण प्रारंभः

## अध्याय १ ला.

### ब्रह्मदेवाची उत्पत्ति ( ३-८. )

मैत्रेय उवाचः—

उदाप्लुतं विश्वमिदं तदासीद्यन्निद्रया ऽमीलितदृङ्न्यमीलयत ॥
अहींद्रतल्पे ऽधिशयान एकः कृतक्षणः स्वात्मरतौ निरीहः ॥ १० ॥
सोऽन्तःशरीरे ऽर्पितभूतसूक्ष्मः कालात्मिकां शक्तिमुदीरयाणः ॥
उवास तस्मिन्सलिले पदे स्वे यथा ऽनलो दारुणि रुद्धवीर्यः ॥ ११ ॥

**मैत्रेय म्हणतातः**–हे विदुरा ! जेव्हां ईश्वरानें आपल्या निजानन्दरूपी आत्मस्वरूपांत रममाण होण्याकरितां निरीक्षण करून शेषरूपी शय्येवर पडून योगनिद्रेनें डोळे मिटले; तथापि त्याची चैतन्यशक्ति चिद्रूप अस-

त्यामुळें ती जागृत होती. तेव्हां हें विश्व प्रलयकालाच्या उदकांत लय पावलें होतें. तरी जसा अग्नि लांकडामध्यें गुप्तरूपानें आपली शक्ति ठेवितो, तसें ईश्वरानें आपल्या शरीरामध्यें सर्व सूक्ष्मभूतें लीन करून ठेविलीं होतीं. तरी पुन्हां सृष्टि निर्माण करण्याची योग्य वेळ आली म्हणजे आपल्याला जागृत करण्याकरितां काल नामक शक्तीला प्रेरणा देऊन ठेविली होती. अशी व्यवस्था करून तो अखंडानंदरूपी आपल्या स्वरूपांत स्वस्थ राहिला होता. अशा स्थितींत एक हजार चौकड्यांचा काल निघून गेला. पुढें त्याच्या कालरूप शक्तीनें त्यास सृष्टि करावयास जागृत केलें असतां. सर्व लोक आपल्या देहामध्यें बीजरूपानें लीन आहेत, असें ईश्वराच्या दृष्टीस पडलें. त्या वेळेस सृष्टि उत्पन्न करावी अशी ईश्वराची इच्छा झाली; म्हणून त्यानें आपल्या देहांतील सूक्ष्मभूतांकडे नजर फिरविली. सृष्टीला अनुकूल असा काल, व त्याला अनुकूल असणारा सृष्टिकर्ता रजोगुण ह्या दोघांनीं सूक्ष्मभूतांमध्यें क्षोभ उत्पन्न केला. तेव्हां तीं भूतें ईश्वराच्या देहांतून बाहेर पडूं लागलीं; व त्याच्या नाभिप्रदेशांतून वर आलीं. कर्मफल देण्याचा काल आला, तेव्हां तो ईश्वराच्या देहांतून बाहेर पडलेला सूक्ष्म भूतांचा समुदायच कमलरूपानें एकाएकीं उदकावर प्रगट झाला. बाहेर आल्याबरोबर, जसा सूर्य आपल्या तेजानें सर्व जग प्रकाशित करितो; त्याप्रमाणें ह्या कमलानेंही त्या अफाट उदकावर आपला प्रकाश पसरिला. हें कमल जीवांना त्यांचे भोग्य पदार्थ निर्माण करून देणारें होय. त्या सर्व लोकस्वरूपी कमलामध्यें अंतर्यामिरूपानें तोच विष्णु प्रकट झाला. नंतर त्या कमलांतून वेदस्वरूप असा ब्रह्मदेव, ज्यास लोक स्वयंभू म्हणतात, तो उत्पन्न झाला. तो कमलाच्या कर्णिकेंत बसला असतां त्याला चोहोंकडे पाहतां येईना; तेव्हां त्याला चार दिशांस चार मुखें उद्भवलीं. त्या वेळीं प्रलयकालाच्या प्रचंड वाऱ्यानें तें उदक उचंबळत होतें; व

त्यावर हजारों लाटा उसळत होत्या. अशा पाण्यामध्यें तें कमळ उगवलें होतें. आदिदेव ब्रह्मा त्या कमळावर असूनही तें कमळ काय आहे हें त्याच्या लक्षांत येईना ! तसेंच लोकतत्त्व काय आहे व आपण कोण आहों, हेंही त्याला पुरें समजेना ! तेव्हां तो मनांत म्हणूं लागला कीं, ' जो हा मी ह्या कमळपृष्ठावर आहें तो कोण ? ह्या पाण्यांत दुसरें कांहीं नसतां हें एवढेंच कमळ कोठून आलें ? हें सर्व कांहीं ज्यावर राहिलें आहे, त्यास आश्रयभूत असें कांहीं तरी खालीं असलेंच पाहिजे.' असा विचार करून त्यानें त्या कमळाच्या देठांतील छिद्रांतून पाण्यांत प्रवेश केला, व त्या देठाला आधार काय आहे, हें शोधण्याकरितां बराच फिरला; पण त्या वेळीं त्यास त्याचा मुळींच शोध लागला नाहीं. विदुरा, अशा अपरंपार मोहांत पडून ब्रह्मदेव " आपला स्रष्टा ( उत्पन्न करणारा ) कोण ? " ह्याचा शोध करीत असतां अति मोठा काल निघून गेला. काल हें एक ईश्वराचें चक्रच होय. त्याच्या योगानें जीवास भय उत्पन्न होतें, व आयुष्याचा नाश होतो. अशा रीतीनें कमलनालांत शंभर वर्षें शोध केला, तथापि ब्रह्मदेवाचा मनोरथ पूर्ण झाला नाहीं. मग तो तेथून परतून पुनः आपल्या मूळ स्थानावर (कमळावर) येऊन बसला; व हळूहळू प्राणायामाचा अभ्यास करूं लागला; त्यायोगेंकरून त्याचें अंतःकरण स्थिर झालें; मग समाधियोगाचा अभ्यास करीत ब्रह्मदेव स्वस्थ राहिला ! अशा ध्यानस्थितींत आणखी शंभर वर्षें निघून गेलीं. त्या अवकाशांत तो योग पूर्ण दशेस येऊन ब्रह्मदेवाला ज्ञान प्राप्त झालें. व पूर्वीं शोध करीत असतांही जें सांपडलें नाहीं, तें ईश्वरस्वरूप त्याला आपल्या हृदयांतरीं आपोआप दिसून आलें ! इति १.

———

# अध्याय २ रा.

## विराट् पुरुषाची उत्पत्ति ( ३–६ )

मैत्रेय उवाच—

कालसंज्ञां तदा देवीं बिभ्रच्छक्तिमुरुक्रमः ॥
त्रयोविंशति तत्त्वानां गणं युगपदाविशत् ॥ २ ॥

**मैत्रेय म्हणाले:**—विदुरा, ईश्वरानें कार्यांना क्षोभविणारी आपली प्रकृति नामक शक्ति ( क्रियाशक्ति ) घेऊन तेवीस तत्त्वांच्या समुदायामध्यें एकदम अंतर्यामीं प्रवेश केला. त्या भगवानानें त्या तत्त्वगणांमध्यें प्रवेश केल्याबरोबर त्यानें पूर्व कल्पांतील प्राण्यांचें कर्म जागृत केलें. व त्या क्रियाशक्तीचा उपयोग करून एकमेकांपासून दूर राहणाऱ्या त्या तेवीस तत्त्वांच्या गणाला एके ठिकाणीं केलें, तेव्हां त्यास सृष्टिरचना करण्याचें सामर्थ्य आलें. त्या तेवीस तत्त्वांमध्यें ईश्वराच्या प्रेरणेंकरून त्यांची क्रियाशक्ति जागृत झाल्याबरोबर त्या तत्त्वसमूहानें आपल्या अंशांच्या योगानें विराट्पुरुष उत्पन्न केला. ह्या पुरुषामध्यें स्थावरजंगमरूपी सर्व लोक आहेत तो हिरण्मय विराट्पुरुष ब्रह्मांडांतील उदकामध्यें हजारों वर्षें राहिला. त्या पुरुषाच्या स्वरूपांतच मागील कल्पांतील प्रलय झाल्यावर लीन झालेले जीव असतात. हा विराट्पुरुष सर्व जीवांचा आत्मा आणि परमात्म्याचा पहिला अंश होय. विश्व उत्पन्न करणाऱ्या तत्त्वसमुदायाचें अपत्य जो विराट् पुरुष त्यामध्यें ज्ञानशक्ति, क्रियाशक्ति आणि भोक्तृशक्ति ह्या तीन प्रकारच्या शक्ति होत्या. त्या तीन शक्तींच्या योगानें विराट्पुरुषानें स्वतःचे पुढें सांगितल्याप्रमाणें भाग केले:—

**विराट्पुरुषाच्या तीन भागांचे प्रकार:**—पहिल्या ज्ञानशक्ती-

च्या योगानें एक हृदय (चैतन्य) दुसऱ्या क्रियाशक्तीच्या योगानें दहा प्राण; आणि तिसऱ्या भोक्तृशक्तीच्या योगानें अध्यात्म, अधिदैव, अधिभूत, हे तीन भाग केले. त्या भागांची संज्ञा अशीः--१ भाग, त्यास हृदय हेंच नांव आहे; २ दहा प्राण*, त्यांचीं नांवें:-प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पांच मुख्य प्राण; व नाग, कूर्म, कृकल, देवदत्त व धनंजय हे पांच उपप्राण होत; आणि अध्यात्म, अधिदैवत व अधिभूत हे जे तीन भाग सांगितले. त्यांची त्रिपुटी अनुक्रमें इंद्रियें, देवता व विषय ही होय. सर्व तत्त्वांचा जो नियामक प्रभु त्याला मागें तत्त्वदेवतांनीं केलेली स्तुति आठवली; आणि त्यांच्या मागणीप्रमाणें ईश्वरानें आपल्या चिच्छक्तीच्या योगानें विराट्पुरुषाचें "अमुक करावयाचें" असा निश्चय ठरविला. विदुरा, आतां त्या विराट्पुरुषाच्या देहावर देवांना राहण्यास योग्य अशीं कोणतीं स्थानें निर्माण झालीं, तीं तुला सांगतों, ऐकः—

**विराटाच्या देहावरील स्थानें शक्तीसहित अधिष्ठात्री देवता व घडणाऱ्या क्रियाः**—विदुरा, प्रथम विराट् पुरुषाच्या शरीरावर

---

(*) दहा प्राणांचीं स्थानें व त्यांच्या क्रियाः--[१] **प्राणः**—शरीराचा मुख्य चालक हाच होय; हृदय हें ह्याचें राहण्याचें स्थान, हा नासिकापुटद्वारें आंत जाणें बाहेर येणें इत्यादि क्रिया करितो. [२] **अपानः**—निवासस्थान गुद, मलोत्सर्ग क्रिया; [३] **व्यानः**—सर्व शरीरांत वास, हस्तपादादिक अकुंचनप्रसारण क्रिया; [४] **उदानः**— कंठस्थान, मृत्युक्रिया; [५] **समानः**—नाभिस्थान, याची क्रिया खाल्लेले अन्नाचा रस सर्व नाड्यांना वांटून देणें. हे पांच मुख्य प्राण होत. आणि [६] **नागः**—वांती, उचकी [७] **कूर्मः**—उघडणें; [८] **कृकलः**—सुकविणें. [९] **देवदत्तः**—जांभई आणि [१०] **धनंजयः**—हा सर्व शरीरव्यापी असून मृत देहाला देखील सोडीत नाहीं. हे पांच उपप्राण होत. ह्यांचीं विशिष्ट स्थानें नाहींत; पण क्रिया मात्र आहेत.

मुख निर्माण झालें; त्या स्थानामध्यें लोकपाल अग्नीनें आपल्या वाणीरूप शक्तीसह प्रवेश केला. त्या योगानें जीवाला बोलतां येतें. मग ह्याला तालुस्थान निर्माण झालें; त्यामध्यें लोकपाल वरुण आपल्या जिव्हा नामक शक्तीसह शिरला; ह्या जिव्हेच्या योगानें जीवाला रस चाखतां येतात व रुची समजते. ह्या विष्णुरूपी विराट्पुरुषाला नासिका उत्पन्न झाली; त्या स्थानामध्यें अश्विनीकुमार आपल्या घ्राणनामक शक्तीसह शिरले. ह्याच्या योगानेंच जीवाला वास घेतां येतो. मग ह्याला नेत्रगोलक उत्पन्न झाले; आदित्य आपल्या चक्षुनामक शक्तीसह त्या गोलकामध्यें शिरला; ह्याच्या योगानें जीवाला रूपाचा प्रत्यय येतो. ह्या ईश्वराला त्वचा ( चर्म ) निर्माण झाली; त्यामध्यें वायु आपल्या त्वचा शक्तीसह प्रवेश करिता झाला; ह्याच्या योगानें जीवाला स्पर्शाचा अनुभव मिळतो. नंतर ह्याला कान उत्पन्न झाले; त्यामध्यें दिशांनीं आपल्या कर्णेंद्रिय नामक शक्तीसह प्रवेश केला. ह्याच्या योगानें शब्दाचा अनुभव जाणतां येतो. ह्या पुरुषाच्या त्वचेंत औषधांनीं आपल्या अंशरूपी रोमांसह प्रवेश केला, ह्याच्या योगानेंच जीवाला कंड सुटलेली समजते. ह्याला शिश्न उत्पन्न झालें; त्या जागीं प्रजापति रेतांशासह येऊन राहिला; ह्यापासूनच जीवाला–संतान प्राप्तीचा–आनंद प्राप्त होतो. तसेंच ह्या पुरुषाला गुदद्वार उत्पन्न झालें; त्या स्थानीं लोकपाल मित्र गुदेंद्रियरूपी आपल्या अंशासह शिरला; ह्याच्या योगानें जीवाला मलत्याग करितां येतो. नंतर ह्याला हात उत्पन्न झाले; त्यांमध्यें स्वर्गाचा अधिपति जो इंद्र त्यानें आपल्या क्रयविक्रय ( देणें घेणें ) करण्याच्या शक्तीसह प्रवेश केला; ह्या शक्तीच्या योगानें जीवाचा निर्वाह चालतो. मग ह्यास पाय उत्पन्न झाले; त्यांमध्यें गतिरूप शक्तीसह लोकांचा स्वामी जो विष्णु तो प्रविष्ट झाला; ह्या शक्तीमुळें मनुष्याला जेथें जावयाचें असेल तेथें जातां येतें. पुढें ह्याला हृदय उत्पन्न झालें;

त्या स्थानीं चंद्रमा मनरूपी आपल्या अंशासह येऊन राहिला; ह्या मनाच्या योगानें पुरुषाला संकल्पविकल्प करितां येतात. ह्या ईश्वराला अहंकार उत्पन्न झाला; ह्याची देवता जो रुद्र तो ह्या स्थानीं अहं क्रियेसह येऊन राहिला. ह्या शक्तीच्या योगानेंच पुरुषाला आपलें कर्तव्य करितां येतें. नंतर ह्या पुरुषाला बुद्धि आणि चित्त हीं उत्पन्न झालीं; त्या स्थानीं ब्रह्मदेव चेतना शक्तीसह येऊन राहिला; ह्यांच्या योगानें जीवाला ज्ञान प्राप्त झालें.

**गुणपरत्वें अधिकार प्राप्तिः**—विदुरा, ह्या विराट् पुरुषाच्या मस्तकापासून स्वर्गलोक, पायांपासून पृथ्वी ( भूलोक ) आणि नाभीपापासून आकाश ( अंतरिक्षलोक ) हीं तीन उत्पन्न झालीं. ह्या तीन लोकांमध्यें सत्व, रज, तम, ह्या तीन गुणांपासून झालेले देव, मनुष्यें, भूतें ( रुद्र पार्षदगण ) वगैरे दिसून येतात. देव शुद्ध सत्वगुणाच्या योगानें स्वर्गलोकास प्राप्त झाले; रजोगुणाच्या आधिक्यामुळें मनुष्यें व त्यांस अनुसरून असणारे गाई वगैरे प्राणी पृथ्वीवर राहूं लागले. आणि तिसऱ्या तमोगुणाच्या प्रभावानें, रुद्राचे पार्षदगण व भूतें वगैरे भगवंताच्या नाभिस्थानीं राहणाऱ्या स्वर्ग व पृथ्वी यांच्यामध्यें असणाऱ्या आकाश लोकाचा ( अंतरिक्ष लोकाचा ) आश्रय धरून राहिले.

**विराटापासून उत्पन्न झालेल्या वृत्तिः**—हे कुरुकुलश्रेष्ठा, विराट्पुरुषाच्या मुखापासून वेद आणि ब्राह्मण उत्पन्न झाले. हा ब्राह्मणवर्ण ईश्वराच्या मुखापासून उत्पन्न झाल्यामुळें इतर सर्व वर्णांमध्यें श्रेष्ठ असून सर्वांचा गुरु होय. ह्याच्या बाहूंपासून पालन करणें ही वृत्ति व तिच्या अनुरोधानें क्षत्रिय हे निर्माण झाले. हा क्षत्रिय सर्व वर्णांचें चोर वगैरे उपद्रवांपासून रक्षण करितो. क्षत्रिय हे विष्णूचे अंशधारी आहेत; कारण पालन करणें हा धर्म विष्णूचा आहे. ईश्वराच्या मांड्यांपासून लोकांच्या निर्वाहाला साधन असे शेतकी वगैरे धंदे आणि त्यापासूनच

वैश्य उत्पन्न झाले; हा वैश्य वर्ग सर्व लोकांच्या जीविकेचें साधन वगैरे उत्पन्न करितो. धर्ममार्ग सिद्ध व्हावे, एवढ्यासाठीं भगवंताच्या पायांपासून सेवाधर्म आणि त्या सेवेनिमित्त शूद्र वर्ण झाला. ह्या सेवाधर्माच्या योगानें ईश्वर संतुष्ट होतो. हे चारी वर्ण व त्यांच्याबरोबरच त्यांच्या उपजीविकेचीं साधनें हीं उत्पन्न झालीं. म्हणून ते सर्व लोक श्रद्धापूर्वक शुद्धतेकरितां आपापल्या स्वधर्माच्या योगानें परमेश्वराची आराधना करितात.

**ईश्वराचा महिमा**—विदुरा, काल, कर्म, आणि स्वभाव ह्या शक्तींनीं युक्त जो परमेश्वर त्याच्या योगमायेच्या प्रभावानें वृद्धिंगत झालेल्या ह्या विराट् स्वरूपाचें वर्णन पूर्णपणें करण्यास कोण समर्थ होईल? तथापि विदुरा, इतर विषयादिकांच्या चर्चेमुळें बिघडून गेलेली स्वतःची वाणी शुद्ध करण्याकरितां ईश्वराची कीर्ति मी जशी गुरुमुखांतून श्रवण केली आहे, त्याप्रमाणें यथामति तुला सांगतोंः—सज्जनांनीं असें निश्चयात्मक वाक्य बोलून ठेविलें आहे कीं, " परमेश्वराचे गुणानुवाद गाणें हाच मनुष्याच्या वाणीचा खरा खरा फायदा होय; तसेंच विद्वान् लोकांनीं सांगितलेलें ईश्वराचें कथामृत प्राशन करणाच्या कामीं मग्न असणें हाच कर्मेंद्रियांचा खरा लाभ होय " विदुरा, ब्रह्मदेवानें हजारों वर्षें समाधि लावून ईश्वरचिंतनानें बुद्धि परिपक्व झाल्यानंतर ईश्वराचा महिमा वर्णन केला; पण तो त्यास पूर्णपणें वर्णितां आला नाहीं. कारण, ईश्वर त्याच्याही ज्ञानास अगम्य असा आहे. विदुरा, परमात्म्याची योगमाया ही मोठमोठ्या लोकांस देखील मोहांत पाडते यांत नवल तें काय? साक्षात् सर्व लोकांचा अधिपति जो ईश्वर त्यास देखील आपल्या मायेची शक्ति किती आहे हें तिच्या अनंतत्वामुळें समजत नाहीं; मग इतरांची काय कथा!! ह्मणून ईश्वराची माया मायावी लोकांला मोह घालणारी व भुरळ पाडणारी आहे. मन, वाणी, अहंकाराची देवता रुद्र व हे

इंद्रियांचे अधिपति इतर देव हे देखील ज्याची प्राप्ति न होतां त्यापासून परतले अशा षड्गुणैश्वर्यसंपन्न ईश्वराला नमस्कार असो. इति । २.

---

# अध्याय ३ रा.

---

## विराट् स्वरूपाचें वर्णन

श्रीशुक उवाचः—

विशेषस्तस्य देहोऽयं स्थविष्ठश्च स्थवीयसाम ॥
यत्रेदं दृश्यते विश्वं भूतं भव्यं भवच्च सत् ॥ २४ ॥

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**— राजा, भगवंताचा विराट्देह सर्व मोठ्या वस्तूंपेक्षां मोठा होय. त्या स्वरूपाच्या ठिकाणीं पूर्वी झालेली, हल्ली चालू असलेली व पुढें होणारी सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टि दिसत येते. पाताळलोक ह्या विराट् पुषारुच्या पायांचे तळवे होत; रसातल त्याच्या पायांची खोंट आणि चवडे होत; तसेंच महातल हें त्या विश्वाची उत्पत्ति करणाऱ्या ईश्वराचे घोंटे असून तलातल त्याच्या पोटऱ्या होत; सुतल हें त्या परमात्म्याचे दोन गुडघे असून अतल व वितल हे दोन लोक त्याच्या मांड्या होत; महीतल लोक ह्या विराट् पुरुषाच्या कंबरेचा भाग असून आकाश हें त्याची नाभि होय; स्वर्गलोक त्या आदिपुरुषाचें वक्षस्थळ होय; तसेंच महर्लोक त्याची मान, जनलोक हें मुख, तपोलोक हें कपाळ आणि सत्यलोक त्या अनंतमुखी पुरुषाचीं मस्तकें होत. तेजोरूप इंद्रादिक देव त्या विराट् पुरुषाचे बाहु असून दिशा हे त्याचे कान होत; व शब्द हें श्रोत्रेंद्रिय होय. तसेंच अश्विनीकुमार त्याची नासिका असून गंध हें घ्राणेंद्रिय होय. प्रज्वलित अग्नि हेंच त्या पुरुषाचें मुख होय. अंतरिक्षलोक हा त्याचे नेत्रगोलक आहे; आणि सूर्य

हें चक्षुरिंद्रिय होय. रात्र आणि दिवस ह्या त्या विष्णूच्या नेत्रांच्या पापण्या आहेत. त्याच्या भोंवयांचा विस्तार ब्रह्मपद आहे. उदक त्या ईश्वराची टाळू असून सर्व रस हे त्याच्या जिव्हेच्या ठिकाणीं कल्पिले आहेत. सर्व वेद हे त्या अनंताचें मस्तक आहे. यम हा त्याची दाढा व पुत्रादिकांच्या ठिकाणीं जी प्रीति ते त्याचे दांत होत. लोकांना मोह उत्पन्न करणारी जी माया हेंच त्या भगवंताचें हास्य होय. व अनंत सृष्टि त्याचे नेत्रकटाक्ष होत. ( त्याच्या नेत्रकटाक्षांपासून अनंत ब्रह्मांडें उत्पन्न होतात; ) असें ह्मणतात. लज्जा हीच त्याचा वरचा ओंठ असून लोभ हा अधरोष्ठ होय. धर्म हे त्याचे स्तन व अधर्माचरण ही त्याची पाठ असें मानितात. तसेंच, दक्षप्रजापति हा त्याचें उपस्थेंद्रिय; व सूर्य आणि वरुण त्याचे वृषण होत. सर्व समुद्र त्याच्या कुशी व सर्व पर्वत हे त्याच्या अस्थींचे समुदाय आहेत. हे राजेंद्रा, सर्व नद्या ह्या विश्वरूप परमात्म्याच्या शरीरांतील नाड्या होत. तसेंच, वृक्ष हे त्याच्या शरीरावरील रोम होत. अनंतशक्तिमान् असा जो वायु हा त्याचा श्वासोच्छ्वास असून काल ही त्याची गति होय. सत्व, रज व तम ह्या तीन गुणांपासून उत्पन्न होणारें कार्य, त्या परमेश्वराची क्रीडा आहे असें ह्मणतात. हे कुरुवंशांतील श्रेष्ठ राजा ! मेघ हे त्या सर्वव्यापी परमेश्वराच्या मस्तकावरील केश आहेत; व दोन संधिकाल हें त्याचें वस्त्र आहे. माया हें त्याचें हृदय व चंद्र हें मन आहे असें कल्पितात. हें मन नाना प्रकारच्या विकारांचें भांडारच होय. महत्तत्त्व हें सर्वांतर्यामी पुरुषाचें चित्त कल्पिलें आहे, व श्रीरुद्र हेंच त्याचें अंतःकरण मानिलें आहे. घोडा, खेंचर, हत्ती वगैरे हे त्याच्या नखांच्या स्थानीं, व हरिण इत्यादि सर्व पशु हे त्याच्या कमरेच्या स्थानीं कल्पिले आहेत. सर्व पक्षी हें त्याचे उत्तम शिल्पकौशल्य होय. मनु ही त्याची बुद्धि असून पुरुष हें त्याचे राहण्याचें स्थान होय. गंधर्व,

विद्याधर, चारण आणि अप्सरा ह्या त्याचा मधुर स्वर कल्पिल्या आहेत. दैत्यांच्या समुदायांतील श्रेष्ठ जो प्रल्हाद ही त्या भगवंताची स्मरणशक्ति होय. ब्राह्मण हेंच त्या ईश्वराचें मुख आहे. क्षत्रिय हेच त्याचे बाहु, वैश्य हे त्या महात्म्याच्या मांड्या व शूद्र हे त्याचे चरण होत. यज्ञादि अनुष्ठान हें त्याचें कर्म होय

हे राजा ! ही जी विराट्रूपी परमेश्वराची शरीरावयवरचना मी तुला सांगितली, त्या मोठ्या विराट् रचनेच्या ठिकाणीं बुद्धीच्या बळें करून मनाची धारणा करावी. कारण, त्या स्वरूपावांचून जगांत कोणत्याही वस्तूला सत्ता नाहीं. पुण्य पुरुषा. जसा जीव एकच असून स्वप्नांत अनेक पुरुषांस उत्पन्न करून त्याच्या इंद्रियांनीं सर्व पाहतो; त्याप्रमाणें ईश्वर सर्वांच्या बुद्धिवृत्तिद्वारा सर्व अनुभव घेतो. तो ईश्वर सत्य म्हणजे तिन्ही काळीं निर्विकार राहणारा व आनंदाचें मुख्य स्थान होय. त्याच्या ठिकाणीं दृढ भक्ति ठेवावी; तद्व्यतिरिक्त दुसऱ्या वस्तूंवर कधींही प्रेम ठेवूं नये. कारण, इतर वस्तूंच्या प्रेमानें जीव ह्या जन्ममरणरूपी संसारांत पडतो. इति । २.

---

# अध्याय ४ था.

---

## कालाचें स्वरूप. ( ३–२०. )

कपिल उवाच:—

एतद्भगवतो रूपं ब्रह्मणः परमात्मनः ॥
परं प्रधानं पुरुषं दैवं कर्मविचेष्टितम् ॥ ३६ ॥
रूपभेदास्पदं दिव्यं काल इत्यभिधीयते ॥
भूतानां महदादीनां यतो भिन्नदृशां भयम् ॥ ३७ ॥

( १ ) योगप्रकरण अध्याय १३।१४।१५ वे पहा.

**कपिल महामुनि ह्मणाले:**—माते देवहूति! परिपूर्ण षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वर, प्रकृति व पुरुष ह्या रूपांनीं सर्वांचें नियमन करितो. त्याच्या ह्या नियामक स्वरूपाला दैव अशी संज्ञा आहे. व त्या दैवाच्या प्रेरणेनेंच जीवांना कर्मदशा प्राप्त होते. आणि त्यापासूनच कर्माला नाना प्रकारच्या गती मिळतात. परमेश्वराच्या ह्याच स्वरूपाला काल अशी संज्ञा आहे. ह्या कालाचा प्रभाव फारच अद्भुत आहे. सर्व पदार्थांना निरनिराळीं रूपें प्राप्त होण्याला आधार हाच काल होय. महत्तत्त्व आदिकरून तत्त्वांना व त्यांच्या अभिमानानें भेददृष्टि ठेवणाऱ्या जीवांना ह्या कालापासूनच भय प्राप्त होतें. ह्या कालाचा सर्वांस आश्रय असल्यामुळें हाच सर्व भूतांच्या अंतरीं प्रवेश करितो; आणि भूतांच्या योगानें भूतांचा संहार करितो. ह्याचें सामर्थ्य इतकें आहे कीं, ब्रह्मदेव आदिकरून सृष्टिकर्त्या देवांवर याचें वर्चस्व चालतें. यज्ञाचें फल देणारा विष्णु हें त्याचेंच नांव होय. त्याला कोणी मित्र नाहीं; कोणी शत्रु नाहीं; तसेंच त्याला बांधवही कोणी नाहीं, यास सर्वच सारखे. हा नेहमीं सावध राहतो, आणि जे लोक बेसावध असतील त्यांचे अंतरीं प्रवेश करून त्यांचा संहार करितो. ह्याच्या भयानेंच सर्व जगाचा जीवनाश्रयभूत जो वायु तो वहात असतो; सूर्य ह्याच्या भीतीनें प्रकाशतो; इंद्र ह्याच्या भयानें वृष्टि करितो; नक्षत्रांच्या समुदायाला तरी ह्याचीच भीति आहे, ह्मणून तीं उदय पावतात; वनस्पति, औषधी आणि वल्ली ह्यांना ह्याची भीति असल्यामुळें त्या आपापल्या ऋतुकालीं पुष्पें आणि फलें प्रसवतात; ह्याच्या भीतीनें नद्या वाहतात; व समुद्र आपली मर्यादा सोडून जाण्यास समर्थ होत नाहीं; ह्याच्या भयामुळेंच अग्नि प्रदीप्त होतो; व पर्वतांसह पृथ्वी बुडत नाहीं; आणि आकाश प्राण्यांना राहण्यासाठीं अवकाश ह्मणजे स्थल देतें. ह्याच्या आज्ञेवरूनच जगाचा मूळ अंकुर जें महत्तत्त्व तें आपल्या शरीरापासून भू, भुवः, स्वः, महः, जनः,

तपः, सत्यं ह्या सात लोकांनीं वेष्टित अशा ह्या लोकांस ब्रह्मांडरूपानें विस्तृत करितें; ही स्थावरजंगमात्मक सृष्टि ज्यांच्या आधीन आहे त्या त्रिगुणांचे अभिमानी ब्रह्मादि देव प्रत्येक युगांत जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करण्याला प्रवृत्त होतात; ह्याला कारण तरी त्यांना ह्या कालाची भीति आहे हेंच. एवढें ज्याचें महात्म्य त्याच कालाला भगवान् ह्मणतात. तो जगाचा अंत करितो, पण त्याच्या स्वतःला अंत नाहीं; तो जगाची उत्पत्ति करितो, पण त्याला उत्पत्ति नाहीं; व त्याच्या स्वरूपाला कोणताही विकार नाहीं; तोच लोकांच्या योगानें लोकांना उत्पन्न करितो व मृत्युरूपानें अंतकाचा देखील संहार करितो. माते, असा हा काल सर्व जगाचा संहारक आहे. इति । ४.

---

# अध्याय ५ वा.

## ईश्वरसृष्टि वर्णन ( २–५. )

नारद उवाचः—

**यद्रूपं यदधिष्ठानं यतः सृष्टमिदं प्रभो ॥**
**यत्संस्थं यत्परं यच्च तत्तत्त्वं वद तत्त्वतः ॥ २ ॥**

**नारद ह्मणालाः**—हे ब्रह्मदेवा ! जें मी विचारणार त्याचीं उत्तरें देण्याचें सामर्थ्य तुमच्या आंगीं आहे. हें जग महत्तत्वादि अस्पष्ट रूपानें उत्पन्न केलें कोणी ? ह्या विश्वाचा प्रकाशक कोण ? ह्याला आधार कोण ? ह्याचा लय कशामध्यें होतो ? ह्याचा स्वामी कोण ? व ह्याचें वास्तविक स्वरूप काय ? ह्या गोष्टी यथार्थ रीतीनें मला कृपा करून सांगा.

**ब्रह्मदेव म्हणालेः**—नारदा, ईश्वर ह्या विश्वाची उत्पत्ति करणारा होय; त्यानेंच मला उत्पन्न केलें, व त्याच्याच कृपाकटाक्षेंकरून मा-

ह्या अंतःकरणांत सृष्टिरचना करण्याची प्रेरणा झाली; त्यामुळें मीही हें जग निर्माण करून त्याची आज्ञा मान्य करितों. परमात्मा ब्रह्मांडाचा साक्षी व सर्वांस आदिकारण असून त्याला कोणताही विकार नाहीं. तो प्राणिमात्रांचा आत्मा होय. तोच ईश्वर मायेचा चालक आहे. त्या मायाचालक प्रभूला आपण आपल्या मायेच्या योगानें बहुरूप व्हावें, अशी जेव्हां इच्छा उत्पन्न झाली; तेव्हां काल, कर्म आणि स्वभाव हीं सहजगत्या आत्मस्वरूपीं प्राप्त झालीं असतां त्यांचा ईश्वरानें स्वीकार केला. त्या तिहींचा अंगीकार केल्याबरोबर त्या तिहींपासून तीन कार्यें उत्पन्न झालीं पहा.- (१) कालापासून सत्व, रज व तम ह्या तीन गुणांत न्यूनाधिक्य होऊं लागलें; ( २ ) स्वभावापासून निरनिराळ्या अवस्था होऊं लागल्या व त्यांचीं रूपांतरें झालीं; आणि ( ३ ) पुरुष ज्याचा स्वामी अशा कर्मापासून महत्तत्त्व उत्पन्न झालें. हें महत्तत्त्व त्रिगुणात्मक खरें; परंतु त्यांत सत्वगुण व रजोगुण यांचेंच प्राचुर्य (अधिकपणा) आहे. त्यापासून ज्यामध्यें तमोगुण जास्त अंशानें आहे असा अहंकार उत्पन्न झाला. पंचमहाभूतें, देवता आणि मनासह एकादशेंद्रियें हीं त्याचीं कार्यें आहेत. त्या अहंकाराचेही पुढें सात्विक, राजस आणि तामस असे तीन भेद झाले; त्यांत सात्विक अहंकारामध्यें देवता, राजस अहंकारामध्यें इंद्रियें व तामस अहंकारामध्यें पंचमहाभूतें उत्पन्न करण्याची शक्ति आहे.

( १ ) **तामस अहंकारापासून झालेली कारणसृष्टिः**--(पंचभूतांची उत्पत्ति )-नारदा, काल, कर्म व स्वभाव यांच्या योगानें तामस अहंकारांत विकार होऊन त्यापासून आकाश उत्पन्न झालें. शब्द हें आकाशाचें सूक्ष्मरूप व गुण होय ( तामस अहंकारापासून प्रथम शब्द तन्मात्र ह्मणजे सूक्ष्म आकाश झालें; व त्यापासून पुढें महाकाश झालें. याप्रमाणेंच पंचमहाभूतांची उत्पत्ति समजावी ). पूर्ववत् तें आकाशही

विकार पावूं लागलें असतां त्यापासून वायु उत्पन्न झाला. स्पर्श हें वायूचें सूक्ष्मरूप आणि गुण होय. आकाश हें त्या वायूचें कारण असून त्याचा वायूमध्यें संबंध असल्यामुळें आकाशाचा गुण जो शब्द तो यांतही आहेच. काल-कर्म-स्वभावेंकरून तो वायूही विकार पावला. व त्यापासून तेज उत्पन्न झालें; रूप हें तेजाचें सूक्ष्मरूप आणि गुण होय. आकाश आणि वायु यांचा तेजांत संबंध असल्यामुळें शब्द व स्पर्श हे गुणही त्यामध्यें आहेत. तसेंच तेजही विकार पावून त्यापासून उदक उत्पन्न झालें, रस हें उदकाचें सूक्ष्मरूप व गुण होय; आकाश. वायु आणि तेज यांचा त्या उदकांत अन्वय असल्यामुळें शब्द, स्पर्श व रूप हे गुणही त्यांत आले. तसेंच, त्या उदकांतही विकार होऊन त्यापासून पृथ्वी उत्पन्न झाली, पृथ्वीचा स्वतःचा गुण गंध हें हिचें सूक्ष्मरूप होय. आकाश, वायु, तेज व उदक यांचा तींत संबंध असल्यामुळें शब्द, स्पर्श, रूप व रस हेही गुण त्या पृथ्वींत आहेत. याप्रमाणें तामस अहंकापासून झालेली सृष्टि सांगितली. आतां सात्विक अहंकारापासून झालेली सृष्टि सांगतोंः—

**( २ ) सात्विक अहंकारापासून झालेली कारण— सृष्टिः-** (देवतांची उत्पत्ति)--नारदा, सात्विक अहंकारापासून प्रथम मन उत्पन्न झालें, या मनाची देवता चंद्र होय; तोही याच वेळीं उत्पन्न झाला. ह्याप्रमाणेंच जीं जीं कार्यें उत्पन्न झालीं, त्यांच्याबरोबर त्यांच्या देवताही उत्पन्न झाल्या. तें सर्व तुला सांगतोंः-पांच ज्ञानेंद्रियें व त्यांच्या देवता:-श्रोत्र ( कान ) आणि त्यांची देवता दिशा, त्वचा व तिची देवता वायु, चक्षु ( डोळा ) व त्याची देवता सूर्य, जिव्हा ( जीभ ) व तिची देवता वरुण, व घ्राण ( नाक ) आणि त्याची देवता अश्विनीकुमार. कर्मेंद्रियें व त्यांच्या देवता:-वाक् ( वाचा ) व त्याची देवता अग्नि पाणि ( हात ) व याची देवता इंद्र, पाद ( पाय ) व याची देवता उ-

पेंद्र ( विष्णु ), गुदाची देवता यम आणि शिश्नाची देवता प्रजापति ह्या पांच झाल्या. ह्याप्रमाणें त्या त्या इंद्रियांच्या देवता उत्पन्न झाल्या. आतां राजस अहंकारापासून झालेली सृष्टि सांगतों:—

( ३ ) **राजस अहंकारापासून झालेली कारण-सृष्टिः**—( इंद्रियांची उत्पत्ति )—नारदा, ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति अनुक्रमें बुद्धि आणि प्राण हीं तैजस ( राजस ) अहंकाराचीं कार्यें आहेत. ह्मणून श्रोत्र. त्वचा, चक्षु, जिव्हा आणि घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें; आणि वाणी, हात, पाद, शिश्न व गुद हीं पांच कर्मेंद्रियें, मिळून एकंदर दहा इंद्रियें तैजस अहंकारापासून उत्पन्न झालीं. हे नारदा ह्याप्रमाणें तुला कारण-सृष्टि ( पिंड व ब्रह्मांडें उत्पन्न करण्याचीं साधनें ) सांगितलीं. आतां कार्यसृष्टि सांगतों:—

( ४ ) **कार्य-सृष्टिः**–( लोकोत्पत्ति )—हे नारदा, पंचमहाभूतें, इंद्रियें, मन आणि सत्वादि तीन गुण हे पदार्थ जेव्हां परस्परांशीं मिळाले नव्हते; तेव्हां सुखादिक भोग भोगण्याचें साधन हें शरीर उत्पन्न करण्याचें सामर्थ्य त्यांच्या अंगीं नव्हतें. नंतर ईश्वराच्या शक्तीनें ज्या काळीं त्यांस प्रेरणा केली, त्या काळीं ते परस्परांशी मिळाले. नंतर कांहीं तत्त्वांचा जास्त व कांहींचा थोडा भाग ग्रहण करून समष्टि (समुदाय ) व व्यष्टि ( अवयव ) असे दोन प्रकारचें हें ( पिंडब्रह्मांडात्मक ) शरीर त्यांनीं उत्पन्न केलें. तें पिंडब्रह्मांडात्मक शरीर हजारों वर्षेंपर्यंत उदकांत अचेतन म्हणजे निर्जीवच राहिलें होतें. पुढें काल-कर्म-स्वभाव यांस अनुसरून परमात्मा त्या अचेतन शरीरास सचेतन करिता झाला. नंतर ज्याला अनंत मांड्या, अनंत पाय, अगणित बाहु, तसेंच अगणित नेत्र, अनंत मुखें आणि अगणित मस्तकें आहेत, असा तो परमात्मा त्या अंडाचा भेद करून त्यांतून पुरूषरुपानें बाहेर आला. विद्वान् लोक ह्या परमेश्वराच्या अवयवांच्या ठिकाणीं ब्रह्मांडांतील चौ-

दाही लोकांची रचना आहे असें समजतात. म्हणजे ईश्वराच्या कमरे खालीं अतल, वितल, सुतल, महातल, तलातल, रसातल व पाताल हे सात लोक आहेत असें मानतात; व कमरेपासून वर भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे सात लोक आहेत अशी कल्पना करितात. ही लोकांची उत्पत्ति सांगितली. आतां चार वर्णांची उत्पत्ति सांगतों:—

[१] **चतुर्विध वर्णांची उत्पत्तिः**—ह्या विराट् पुरुषाच्या मुखापासून ब्राह्मण, बाहूंपासून क्षत्रिय, मांड्यांपासून वैश्य आणि पायांपासून शूद्र असें चार वर्ण उत्पन्न झाले. आतां उपासनेकरितां ईश्वराच्या त्या विराट् स्वरूपाचे ठिकाणीं चौदा भुवनांची कशी कल्पना केली आहे, तो प्रकार सांगतों:—

[ २ ] **उपासनेसाठीं चवदा भुवनांची कल्पनाः**—ह्या विराट्रूपी ईश्वराच्या पायांपासून भूलोक, बेंबीपासून भुवर्लोक, हृदयापासून स्वर्गलोक, वक्षस्थलापासून ( उरापासून ) महर्लोक, कंठापासून जनलोक, ओष्ठापासून तपोलोक व मस्तकापासून सत्यलोक उत्पन्न झाले असे कल्पिले आहेत. आतां ब्रह्मलोक म्हणजे वैकुंठलोक जो आहे तो मात्र यांपैकीं नव्हे; तर तो ह्या चौदा भुवनांहून निराळा व नित्य आहे त्या ईश्वराच्या कमरेच्या ठिकाणीं अतल मांड्याच्या स्थानीं वितल, गुडघ्याच्या भागावर सुतल, पोटऱ्यांच्या ठायीं रसातल व पावलांच्या तळव्यांच्या स्थानीं पाताल लोक असे सर्व लोक कल्पिले आहेत. या-

( १ ) ब्राह्मणोऽस्य मुखमासीत् । बाहूराजन्यः कृतः । ऊरूतदस्य यद्वैश्यः पद्भ्याग्ं शूद्रो अजायत ॥ **अर्थ**—ब्राह्मण हे मुखापासून, क्षत्रीय बाहूंपासून, उरापासून वैश्य आणि पायांपासून शूद्र हे अनुक्रमें उत्पन्न झालेले आहेत.

( २ ) येथें ब्रह्म शब्दाचा अर्थ ‘ सच्चिदानंदरूपी आत्मा ’ व लोक ह्मणजे त्याचा ‘ पद ’ असा अर्थ करावा.

प्रमाणें तो पुरुष विश्वरूप आहे. आतां उपासनेकरितां विराट् पुरुषाच्या ठिकाणीं फक्त तीनच लोकांची कल्पना करितात, तेंही सांगतों:—

[ ३ ] **उपासनेकरितां त्रिभुवनांची कल्पनाः**—त्या विराट् पुरुषाच्या पायांच्या ठिकाणीं भूलोक, नाभीच्या ठिकाणीं भुवर्लोक व मस्तकाच्या ठिकाणीं सत्यलोक आहे असे तीनच लोक कल्पिले आहेत, असें समजावें. इति । ५.

---

# अध्याय ६ वा.

## ब्रह्मसृष्टि वर्णन ( १–१०. )

विदुर उवाचः—

अंतर्हिते भगवति ब्रह्मा लोकपितामहः ॥
प्रजाः ससर्ज कतिधा दैहिकीर्मानसीर्विभुः ॥ १ ॥
ये च मे भगवन्पृष्टास्त्वय्यर्था बहुवित्तम ॥
तान्वदस्वानुपूर्व्येण छिन्धि नः सर्वसंशयान् ॥ २ ॥

**विदुर विचारतोः**—मैत्रेया, भगवंतानीं आपलें स्वरूप गुप्त केल्यावर सर्व लोकांचा आदिस्रष्टा जो ब्रह्मदेव, त्यानें मानसिक व शारीरिक सृष्टि कोणत्या व किती प्रकारच्या उत्पन्न केल्या? भगवन्, आपण उत्तम ज्ञानसंपन्न आहां. मीं ज्या गोष्टी आपल्याला विचारिल्या आहेत, त्या सर्व अनुक्रमानें मला सांगून माझा संशय दूर करा.

**मैत्रेय ह्मणालेः**—विदुरा, षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वरानें सांगितल्याप्रमाणें ब्रह्मदेवानेंही श्रीनारायणस्वरूपीं आपलें मन लावून देवांचीं शंभर वर्षेंपर्यंत तपश्चर्या केली. ब्रह्मदेवाला पुढें असें दिसून आलें कीं, प्रळयकाळच्या आरंभामुळें वायूमध्यें जोर उत्पन्न होऊन त्या वायूच्या

योगानें, आपण ज्यावर बसलों आहों तें कमळ, आणि ज्या उदकांत तें कमळ होतें तें उदक कांपूं लागलें आहे. ही स्थिति ब्रह्मदेवाच्या लक्षांत आली तेव्हां त्यानें वाढलेल्या तपसामर्थ्यानें तें उदक व प्रबल झालेला वायु दोन्ही निःशेष पिऊन टाकलीं. यामुळें तो ज्यावर बसला होता, तें कमळ मोकळें झालें. त्या मोकळ्या झालेल्या कमळाकडे पाहिल्याबरोबर ब्रह्मदेवाला वाटलें कीं, पूर्वीं लय पावलेले लोक ह्या कमळाच्या योगानें निर्माण करीन. सृष्टिरूपी कर्तव्य करण्याविषयीं ब्रह्मदेवाच्या मनांत परमेश्वरानें पूर्वींच प्रेरणा करून ठेविली होती. ह्मणून ब्रह्मदेवानें कमळाच्या कळ्यामध्यें प्रवेश केला, आणि त्यानें त्या कळ्याचे ( भूः भुवः स्वः ) हे तीन विभाग केले. विदुरा. ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवशीं ज्यांची घडामोड होते, ते हे तीनच लोक शास्त्रांत सांगितले आहेत. हे तीन जीवांचे उपभोगलोक होत. स्वर्लोकाच्याही वर आणखी महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक हे आहेत. ते निष्काम कर्म करणारांस प्राप्त होणारे आहेत. ते ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवसाच्या प्रलयांत नष्ट होत नाहींत. ते ब्रह्मदेवाच्या दोन परार्ध वर्षेंपर्यंत टिकणारे आहेत. त्रैलोक्य हें काम्यकर्माचें फळ असल्यामुळें तें प्रत्येक कल्पांत नष्ट होतें. विदुरा आतां या सृष्टीचे प्रकार व प्रलय सांगतों.

( १ ) **सृष्टीचे प्रकार व प्रलय** – विदुरा, ह्या जगाचें निमित्त–कारण–जो काल, त्याचें स्वरूप जसें हल्लीं दिसत आहे, तसें पूर्वींही होतेंच व पुढें असेंच असणार. अशा कालामुळें प्रकृतीपासून सहा व विकृतीपासून तीन मिळून नऊ प्रकारची सृष्टि होते; आणि प्राकृत व वैकृत ह्या दोन्ही प्रकारांत मोडणारी सनत्कुमारांची दहाव्या प्रकारची सृष्टि होते. तोच भगवान् काल सृष्टीच्या तिन्ही प्रकारच्या प्रलयाला निमित्त होय. ह्या जगाचा प्रलय एक नित्य, दुसरा नैमित्तिक, तिसरा प्राकृतिक अशा तीन प्रकारचा आहे. नित्य प्रलय कालाच्या योगानें

होतो, नैमित्तिक प्रलय शेषाच्या मुखांतील अग्नि किंवा प्रलयकाळचे मेघ वगैरे यांच्या योगानें होतो, आणि प्राकृतिक प्रलय गुणांच्या योगानें होतो. विदुरा, तुला मागें या सष्टीचे दहा प्रकार सांगितले, त्यांचें सविस्तर वर्णन सांगतों—त्यांपैकीं प्रथम प्राकृत सृष्टीचे सहा प्रकार सांगतों:—

( २ ) **प्राकृत सृष्टीचे सहा प्रकार**—विदुरा ! पहिल्या प्रकारांत महत्तत्त्वाची उत्पत्ति होते. महत्तत्त्व म्हणजे ईश्वरापासून सत्व, रज व तम ह्या तीन गुणांमध्यें झालेलें न्यूनाधिक्य होय. दुसऱ्या प्रकारांत अहंकाराची उत्पत्ति होते. त्यापासून भूतें, इंद्रियें, देवता व मन हीं उत्पन्न होतात. ( त्याचा विस्तार पुढील तिसऱ्यापासून पांचव्या प्रकारापर्यंत दिला आहे ) पहाः—तिसऱ्या प्रकारांत तामस अहंकारापासून शब्दस्पर्शादि सूक्ष्मभूतें व त्यांपासून आकाश, वायु इत्यादि महाभूतें उत्पन्न होतात. चवथ्या प्रकारांत राजस अहंकारापासून पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें उत्पन्न होतात. पांचव्या प्रकारांत सात्विक अहंकारापासून इंद्रियांच्या अभिमानी देवता झाल्या, व ह्यापासून संकल्पविकल्पात्मक मन उत्पन्न झालें. सहाव्या प्रकारांत अविद्या, अस्मिता, राग, द्वेश व अभिनिवेश ह्या पांच वृत्ति उत्पन्न झाल्या. त्यामुळें मोह व स्वस्वरूपाज्ञान उद्भवतें. विदुरा, ही सहा प्रकारची सृष्टि झाली. हिला प्राकृत ( प्रकृतीपासून साक्षात् उत्पन्न झालेली ) सृष्टि म्हणतात. आतां वैकृतीपासून झालेली तीन प्रकारची सृष्टि तीं सांगतों:—

( ३ ) **वैकृत सृष्टीचे तीन प्रकार**—विदुरा, या तीन प्रकारांपैकीं पहिल्यांत स्थावरांची सहा प्रकारची सृष्टि उत्पन्न झाली, त्या स्थावरांचा प्रकार सातवा होय. आतां त्यांचे भेद सांगतों. [१] स्थावरांचे सहा भेदः— (१) वनस्पती म्हणजे ज्यांना पुष्पांवाचून फळें येतात ते, उंबर, वड, पिंपळ, वगैरे; (२) औषधि म्हणजे एकवार फळें येऊन तीं पिकलीं कीं ज्यांचा नाश होतो त्या, केळी धान्य वगैरे; ( ३ ) ज्यांना वृक्षाच्या किंवा इतर

कशाच्या तरी आधाराची जरूर लागते त्या, पान, वेली वगैरे; ( ४ ) त्वक्-सार म्हणजे ज्यांची साल कठीण असून त्या सालीचाच विशेषें-करून उपयोग होतो ते, वेळू वगैरे; ( ५ ) विरूत म्हणजे वेलींच्याच जाती, पण ज्यांना आधाराची गरज लागत नाहीं त्या. वेत वगैरे; ( ६ ) द्रुम म्हणजे ज्यांना पहिल्यानें फुलें येऊन नंतर फळें येतात ते, आम्रवृक्ष वगैरे. ह्या सहाही प्रकारच्या सृष्टीची गति व आहार ऊर्ध्व असतात. त्यांच्यांतील चैतन्यशक्ति स्पष्ट नसते. सगळ्यांना अंतर्यामीं स्पर्शज्ञान असतें; व प्रत्येकाचे कांहीं तरी विशेष धर्म असतात. आतां दुसऱ्यांत तिर्यक्जातींची अठ्ठावीस प्रकारची सृष्टि उत्पन्न झाली. त्या तिर्यक्जातींचा प्रकार आठवा होय. तिर्यक्जातींचीं सामान्य लक्षणें अशीं आहेत कीं, यांना उद्यां काय होणार त्याचें धोरण नसतें; व पुष्कळ गोष्टींचें अज्ञान असतें. ( अहार विश्रांति, भय, मैथुन वगैरे कांहीं नियमित गोष्टींचें मात्र ज्ञान असतें. ) यांना घ्राणेंद्रियाच्या योगानें वस्तु ओळखितां येतात. त्यांच्या मनांत सुखाचे किंवा दुःखाचे परिणाम फार वेळ टिकत नाहींत. आतां या तिर्यक् जातींचे अठ्ठाविस भेद आहेत तें सांगतोंः—

[२] **तिर्यक जातींचे अठ्ठावीस भेदः**—बैल, बकरा, रेडा, डुक्कर, हरिण, गवा, रुरू, मेंढा व उंट ह्या दोन खूर असणाऱ्या जनावरांच्या नऊ जाती आहेत; घोडा, खेंचर, गाढव, गौर, शरभ व वनगाय ह्या एक खुरी पशूंच्या सहा जाती आहेत; कोल्हा, कुत्रा, लांडगा, वाघ, मांजर, ससा, साळ, सिंह, वानर, हत्ती, कांसव व घोरपड ह्या पांच नखांच्या बारा जाती आहेत; तसेंच मगर वगैरे जलचर; आणि कंक, गिधाड, वट, ससाणा, भास, भल्लूक, मोर, हंस, सारस, चक्रवाक, कावळा, घुबड वगैरे पक्षी मिळून हा एक भेद; एतावता स्थलचर प्राण्यांचे भेद सत्तावीस, व जलचर आणि पक्षी मिळून भेद एक; एकंदर

तिर्यक् जातींचे अठ्ठावीस भेद आहेत. विदुरा, तिसऱ्यांत मनुष्य जात येते. ह्या मनुष्य जातीचा प्रकार नववा होय. आतां तें सांगतों:—

[३] **मनुष्यजातः**—मनुष्य जातीचे आहारविहार पृथ्वीवर असतात. व दुःखरूपी संसारांतच सुख मानून राहतात. विदुरा, हे तिन्ही प्रकार वैकृत ( विकारापासून म्हणजे पहिल्या सहा प्रकारांपासून झालेले ) होत. येथपर्यंत नऊ प्रकार झाले. सनत्कुमारांची ही दहाव्या प्रकारची होय. आतां तेंही सांगतों:—

( ४ ) **प्राकृत-वैकृत मिश्रसृष्टिः**—दहावी सनत्कुमारांची सृष्टि प्राकृत आणि वैकृत ह्या दोन्ही प्रकारची होय. कारण, ते देवलोक आणि मनुष्य लोक ह्या दोहोंमध्यें आहेतच. ह्या दहाव्या प्रकारच्या सृष्टींत ( १ ) देव, ( २ ) पितर, ( ३ ) दैत्य, ( ४ ) गंधर्व व अप्सरा, ( ५ ) यक्ष, राक्षस. ( ६ ) भूत, प्रेत व पिशाच्च, ( ७ ) सिद्ध, चारण व विद्याधर. ( ८ ) किन्नर, किंपुरुष वगैरे असे देवांच्या सृष्टीचे आठ भेद आहेत. विदुरा, याप्रमाणें ब्रह्मदेवानें केलेली दहा प्रकारची सृष्टि तुला सांगितली. आतां पुढें वंश आणि मन्वंतरें ह्यांचें वर्णन करितों. ईश्वरच रजोगुणानें युक्त होत्साता ब्रह्मदेवाचें रूप घेऊन कल्पादिकांमध्यें अशी सृष्टि उत्पन्न करितो. त्याचा संकल्प कधींही व्यर्थ होत नाहीं. तो परमात्मा स्वतः आपल्याच योगानें हें जग आत्मस्वरूपीं निर्माण करितो. इति । ६.

---

# अध्याय ७ वा.

## विराट् पुरुषाच्या अवयवांपासून उत्पन्न झालेली सृष्टि. (१-६)

ब्रह्मोवाच—

वाचां वन्हेर्मुखं क्षेत्रं छंदसां सप्त धातवः ॥
हव्यकव्यामृतान्नानां जिव्हा सर्वरसस्य च ॥ १ ॥

**ब्रह्मदेव म्हणालेः**—नारदा! ईश्वररूपी विराट् पुरुषाच्या मुखापासून वाणी व तिची देवता अग्नि हे उत्पन्न झाले. त्याच्या त्वचादि(१) सप्त धातूंपासून गायत्र्यादि(२) सात छंद उत्पन्न झाले. जिव्हेपासून हव्य,(३) कव्य(४) व अमृत(५) हीं अन्नें; गोड, आंबट, खारट, तिखट, कडु व तुरट हे सहा रस. ह्या षड्रसानुभवी रसनेंद्रिय आणि त्याची देवता वरुण हीं उत्पन्न झालीं. त्या विराट् पुरुषाच्या दोन नाकपुड्यांपासून सर्वांचे प्राण व त्याची अधिष्ठत्री देवता वायु हे उत्पन्न झाले. तसेंच त्याचे घ्राणेंद्रियापासून अश्विनीकुमार, औषधि व सामान्य आणि विशेष सर्व प्रकारचा गंध उत्पन्न झाला. त्या पुरुषाच्या नेत्रेंद्रियापासून ( डोळ्यांतील बाहुलीवर असणाऱ्या सूक्ष्म बिंदूपासून ) रूप आणि तेज हीं उत्पन्न झालीं. त्या इंद्रियाचे गोलक म्हणजे बुबुळें यांपासून सूर्य व स्वर्ग यांची उत्पत्ति झाली. त्याच्या कर्णगोलकांपासून दिशा व सर्व तीर्थें उत्पन्न झालीं; आणि श्रोत्रेंद्रियापासून आकाश व शब्द हे उत्पन्न झाले. त्या पुरुषाच्या शरीरापासून सर्व वस्तूंतील तत्त्वें व सर्व शोभा ह्या उत्पन्न झाल्या. त्याच्या त्वचेपासून स्पर्श, वायु व सर्व यज्ञ उत्पन्न झाले. त्या

( १ ) त्वचा, अस्थि, स्नायु, मेद, मज्जा, रुधिर व मांस. ( २ ) गायत्री, उष्णिक, अनुष्टुप्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप् व जगती हे सात छंद होत. ( ३ ) देवांना अर्पण केलेलें अन्न. ( ४ ) पितरांना अर्पण केलेलें अन्न. ( ५ ) देवांना व पितरांना अर्पण करून अवशिष्ट राहिलेलें किंवा यज्ञशेष अन्न.

वैराज पुरुषाच्या आंगावरील रोमांपासून सर्व वृक्षांची अथवा केवळ यज्ञास उपयोगी पडणाऱ्या वृक्षांची उत्पत्ति झाली. तसेंच, त्याच्या मस्तकावरील केंसांपासून मेघ, मुखावरील श्मश्रूपासून ( केसापासून ) विद्युल्लता व नखांपासून पाषाण, लोखंड वगैरे उत्पन्न झालीं. त्या ईश्वराच्या बाहूंपासून इंद्रादि आठ लोकपाल व इतर लोकांचे पुष्कळ अंशीं पालनकर्ते राजे उत्पन्न झाले. त्याच्या पावलांच्या ठेवणीपासून भूलोक, अंतरिक्ष लोक व स्वर्गलोक, हे उत्पन्न झाले; आणि त्यापासूनच क्षेम ( प्राप्य वस्तूंचें रक्षण ) व शरण ( भयापासून रक्षण ) हीं झालीं. तसेंच हरीचे चरण हें संपूर्ण इच्छा पूर्ण होण्याचें साधनरूपी स्थान होय. ईश्वररूपी विराटाच्या उपस्थाधिष्ठानापासून उदक, रेत, पर्जन्य आणि त्या इंद्रियाची देवता प्रजापति हीं उत्पन्न झालीं; आणि उपस्थेंद्रियापासून संतानार्थ संभोग सुखानुभव उत्पन्न झाला. त्याच्या गुदेंद्रियापासून यम व मित्र हे उत्पन्न झाले, व गुदाधिष्ठानापासून मलत्याग, हिंसा, प्राणिपीडा, दारिद्य, मृत्यू व नरक हे उत्पन्न झाले. त्या ईश्वराच्या पृष्ठभागापासून पराभव, अधर्म पाप व अज्ञान हीं उत्पन्न झालीं. विराट्स्वरूपांतील नाड्यांपासून शोणभद्रादि नद व नर्मदा, गोमती वगैरे नद्या उत्पन्न झाल्या. त्या पुरुषाच्या अस्थिसमूहापासून पर्वत उत्पन्न झाले. त्याच्या उदारापासून प्रधान ( माया ), अन्नादिकांचें सार ( रस ) आणि समुद्र व सर्व भूतांचा प्रलय हीं उत्पन्न झालीं. तसेंच, हृदयापासून सर्वांचें मन उत्पन्न झालें. चित्तापासून धर्म, मी ( ब्रह्मदेव ) तूं ( नारद ) सनत्कुमार, शंकर, विज्ञान, उत्तम सत्व उत्पन्न झाले. याप्रमाणें सर्व सृष्टि हीं ईश्वराचेंच स्वरूप आहे. ज्याप्रमाणें एखाद्या दगडावर कांहीं पुरुषांचीं व स्त्रियांचीं चित्रें आणि तसेंच त्यांचीं वाहनें हत्ती, घोडे, वस्त्रें, अलंकार इत्यादि सर्व खोदलेले असतात, परंतु त्या सर्व दगडाहून निराळे नसतात. त्या

चित्राच्या कोणत्याही भागावर हस्तस्पर्श केला तरी दगडाशिवाय दुसरें कांहींच लागत नाहीं; त्याप्रमाणें ब्रह्मांडांतील सर्व पदार्थ ईश्वराच्या स्वरूपाहून भिन्न नाहींत. हे नारदा, तो भगवान् ह्या सर्व विश्वाला व्यापूनही अधिक उरला आहे. जसा सूर्य आपल्या मंडलाला प्रकाश करून सर्व जगालाही प्रकाश पाडतो; तसा भगवान् आपल्या विराट्शरीरास व्यापून ब्रह्मांडालाही आंतून बाहेरून प्रकाशित करितो. आतां ईश्वराचें नित्यमुक्तत्व व त्याचा महिमा सांगतोः—

**ईश्वराचें नित्यमुक्तत्व व त्याचा महिमा**—मोक्षस्थिति अशी आहे कीं, तिच्यामध्यें कोणत्याही प्रकारचें भय व जन्ममरणरूपी हा संसार नाहीं. ती स्थिति देण्यास समर्थ तोच ईश्वर होय. कारण तो स्वतः नाश पावणाऱ्या कर्मफलापासून अलिप्त असतो; ह्मणून त्याला मोक्ष देण्याची शक्ति आहे. नारदा, ईश्वर प्रपंचामध्यें सर्व प्रकारें असूनही त्यामध्यें गुंतून राहत नाहीं, ह्मणून त्याचा हा महिमा अगदीं अघटित आहे.

नारदा, भूलोकादिक लोक हे त्या विराट् पुरुषाचे अवयवरूप आहेत; ह्मणून त्या त्या लोकांच्या आश्रयाला राहणाऱ्या सर्व प्राणिमात्रांची स्थिति त्या त्या लोकाला अनुसरून असते असें विद्वानांचें मत आहे. भूलोक ( पृथ्वी ), भुवर्लोक ( आकाश ) आणि स्वर्लोक ( स्वर्ग ) हेंच त्रैलोक्य. महर्लोक ह्या त्रैलोक्याचें मस्तक होय. त्या महर्लोकाच्याही वरील तीन लोकांत ह्मणजे जनलोक, तपोलोक व सत्यलोक ह्यांत ईश्वरानें अनुक्रमें अमृत, क्षेम आणि अभय हीं तीन ठेविलीं आहेत; आणि

( १ ) "दशांगुलें उरला" ह्या श्रुतीचें तात्पर्य–त्या भगवंताचें स्वरूप संख्यातिरिक्त आहे. असें स्पष्ट समजावें, म्हणून ' दश ' ह्मणजे मूळ नऊ अंकांच्या पलीकडील संख्या योजिली आहे. यावरून त्या भगवंताचें अनंतत्व सिद्ध होतें.

जे त्रैलोक्याबाहेरील तीन लोक ( जन, तप, सत्य ) सांगितले तीं ब्रह्मचारी. वानप्रस्थ व संन्यासी ह्यांचीं आश्रयस्थानें होत. तें लोक ह्या तिघांना मात्र प्राप्त होतात. चवथा जो गृहस्थाश्रम त्याची योग्यता त्यांच्यापेक्षां कमी आहे कारण. ब्रह्मचर्यासारखीं खडतर अनुष्ठानें त्याचे ठायीं नसतात. ह्मणून त्यास त्रैलोक्याच्या आंतच रहावें लागतें. ही निरनिराळी गति एकाच जीवाला त्याच्या निरनिराळ्या आचरणामुळें प्राप्त होते. कारण, त्या जीवाला. आचरण्याचे मार्ग दोन आहेत. पहिला दक्षिणमार्ग व दुसरा उत्तरमार्ग. तो जीव कर्मफलभोगाच्या इच्छेमुळें दक्षिणमार्ग स्वीकारितो, व भोगेच्छारहित जीव उत्तरमार्गाचा अंगीकार करितो. पहिला मार्ग अविद्यारूपी होय. आणि दुसरा मार्ग ज्ञानसाधनरूपी होय. याप्रमाणें या विराट्स्वरूपामध्यें सर्व स्थावरजंगमात्मक सृष्टि भरली आहे. इति । ७.

---

# अध्याय ८ वा.

—:*:—

## अष्टांगयोगाचीं सामान्य लक्षणें ( ३–२८. )

श्रीभगवान् उवाच—

**योगस्य लक्षणं वक्ष्ये सबीजस्य नृपात्मजे ॥**
**मनो येनैव विधिना प्रसन्नं याति सत्पथम् ॥ १ ॥**

**भगवान् कपिलमहामुनि म्हणाले:**--माते देवहूति ! योग[1] हा सबीज आणि निर्बीज असा दोन प्रकारचा आहे. ईश्वराच्या स्वरूपाचें ध्यान करीत युक्तीनें मन विषयादिकांपासून वळवावयाचें, यास सबीज योग म्हणतात. आणि सर्व विषयांपासून मनाचे आकलन करून तें आ-

(१) "योगश्चित्तवृत्तिनिरोधः ।" **अर्थ**—चित्तामध्यें ज्या अनेक वृत्ती उद्भवतात त्यांचा प्रतिबंध करणें यांस योग ह्मणतात.

त्मस्वरूपीं लावावयाचें, यास निर्बीज योग म्हणतात. आतां प्रथम ज्या विधीप्रमाणें आचरण केलें असतां मन प्रसन्न होऊन उत्तम मोक्षमार्गाकडे निःसंशय लागतें, त्या सबीज योगाचें लक्षण मी तुला सांगतों:—

**सबीज योगाचें लक्षणः**—योगाभ्यास करूं इच्छिणारानें प्रथम उत्तम रीतीनें आपल्या शक्त्यनुसार स्वधर्माचें आचरण करीत असावें. अधर्म किंवा परधर्म स्वीकारूं नये. दैवयोगानें जें मिळेल तेवढ्यांतच संतोष मानावा; आत्मज्ञानी पुरुषांच्या चरणांची सेवा किंवा आराधना करावी. धर्म, अर्थ व काम ह्या त्रिविध पुरुषार्थांच्या धर्माकडे प्रवृत्त होऊं नये, तर चतुर्थ जो मोक्ष ह्यावर प्रीति बाळगावी; नियमित प्रमाणानें सात्विक अन्न सेवन करावें; निरंतर कोणापासून कोणताही उपद्रव घडणार नाहीं. अशा एकांत स्थळीं वास करावा. याप्रमाणें प्रथम साधकाचें आचरण असावें. आतां त्या योगाचीं अंगें आठ आहेत, तीं तुला क्रमानें सांगतों:—

---

( १ ) " द्वौ भागौ पूरयेदन्नैस्तोयेनैकं प्रपूरयेत् । मारुतस्य प्रचारार्थं चतुर्थमवशेषयेत् " **अर्थ**—उदराचे दोन भाग अन्नानें भरावे, एक भाग पाण्यानें भरावा व वायूच्या संचारासाठीं एक भाग रिकामा ठेवावा. व " नात्यश्नतस्तु योगोऽस्ति नचैकान्तमनश्नतः । न चाति स्वप्नशीलस्य जाग्रतो नैव चार्जुन ॥ युक्ताहार विहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु । युक्तः स्वप्नावबोधस्य योगो भवति दुःखहा ॥ " **अर्थ**—फार खाणारा अथवा मुळीं न खाणारा; मुळींच झोंप न घेणारा किंवा फार स्वप्नें पडतात अशी झोंप घेणारा यांस योग साध्य होणार नाहीं; परंतु जो मिताहारी, योग्य कालीं योग्य कर्में करणारा, व वेळच्या वेळेस झोंप घेऊन जागा होणारा अशा पुरुषाचा योग दुःख दूर करणारा होतो.—**गीता**.

( २ ) **योगसूत्रः**— " यमनियमासनप्राणायामप्रत्याहारधारणाध्यानसमाधयोऽष्टावंगानि " **अर्थ**—[ १ ] **यमः**—शरीरानें, वाणीनें किंवा मनानें कोणत्याही प्राण्याला पीडा न करणें, खरें बोलणें, चोरी ( न कळत किंवा बळजोरीनें दुसऱ्याचें

**योगाचीं आठ अंगें**—पहिला यम आणि दुसरा नियमः–कायावाचामनानें कोणत्याही प्राण्याचा द्रोह करूं नये, सत्य भाषण करावें, दुसऱ्याचें द्रव्य हरण करूं नये, शरीराच्या निर्वाहाला अवश्य तेवढ्या वस्तूंचा मात्र संग्रह करणें इत्यादि, ब्रह्मचर्य बाळगावें, कृच्छ्र चांद्रायण वगैरे तपश्चर्या करावी, शरीर व मन हीं दोन्हीं नेहमीं शुद्ध ठेवावीं, वेदाध्ययन करावें, ईश्वराची पूजा करावी, आणि निरर्थक भाषण करूं नये. तिसरें आसन–चौऱ्यांशी आसनांपैकीं एकादें उत्तम रीतीनें आसन साध्य करून शरीर स्थिर ठेवण्याचा अभ्यास करावा. चौथें प्राणायामांग–रेचकपूरकादि प्राणायामाच्या योगानें हळूहळू प्राणवायु

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

द्रव्य हरण ) न करणें, ब्रह्मचर्य व अवश्यकतेपेक्षां अधिक वस्तूंचा संग्रह न करणें. [ २ ] **नियमः**—अंतर्बाह्य शुद्धता, संतोष, कृच्छ्रचांद्रायणादि तपश्चर्या, प्रणवादि जप, आणि बरें वाईट जें जें कर्म आपण करितों तें तें सर्व ईश्वराला अर्पण करणें. [ ३ ] **आसनः**—निश्चल असून सुख देणारें असें सिद्धासन, पद्मासन, स्वस्तिकासन वगैरे. [ ४ ] **प्राणायामः**—श्वासोच्छ्वासाच्या गतीचा निरोध करणें. [ ५ ] **प्रत्याहारः**—एकांतवास करून श्रोत्रादि इंद्रियांस शब्दादि विषयांकडे जाऊं न देतां आंवरून धरणें, व तसेंच ईश्वराकडे लावणें. [ ६ ] **धारणाः**—आधार, स्वाधिष्ठान, मणिपुर, अनाहत, विशुद्ध आणि आज्ञेय ह्या अंतर्गत षट्चक्रांमध्यें किंवा भ्रूमध्य नासिकाग्र वगैरे बाह्य प्रदेशामध्यें चित्त स्थिर करणें. [ ७ ] **ध्यानः**—धारणेच्या आश्रयभूत स्थानावर यत्नावांचून चित्त धारणेच्या कालापेक्षां बारापट वेळ अधिक स्थिर व एकतान ठेवणें. [ ८ ] **समाधिः**—ध्यानाचा विषय सुटून केवळ शुद्ध चित्स्वरूपाचा मात्र प्रत्यय होतो ती स्थिति. ह्याचा काल ध्यानकालापेक्षां बारापट अधिक मानला आहे.

( १ ) हकारः कीर्तितः सूर्यष्ठकारश्चंद्रउच्यते । सूर्यचंद्रमसोर्योगात हठयोगोनिगद्यते ॥ **अर्थ**—" ह " काराला सूर्य ह्मणतात, व " ठ " कार ह्मणजे चंद्र, या सूर्य चंद्राचें जें एकीकरण त्यास हठयोग ही संज्ञा आहे.—**गोरक्षसंहिता.**

स्वाधीन करून ध्यावा. पांचवें प्रत्याहार अंग–प्रथम मनाच्या योगानें इंद्रियें विषयापासून सोडवून नंतर तें निर्विषय मन हृदयस्थानीं लावावें; ह्मणजे अंतर्मुख करावें; सहावें धारणा अंग–शरीरामध्यें मूलाधारादि सहा चक्रें जीं आत्म्याचीं स्थानें आहेत, त्यांपैकीं कोणत्या तरी एक ठिकाणीं मनासहवर्तमान प्राणवायु स्थिर करावा. सातवें ध्यानांग भगवंताच्या लीलांचें चिंतन करावें, आणि परमात्मस्वरूपीं चित्त एकाग्र करावें. आठवें समाधि अंग–आत्मस्वरूपीं चित्त लीन करावें. याप्रमाणें हीं अष्टांगयोगाचीं साधारण लक्षणें होत. मात्र. मन अतिशय चंचल आहे. कारण. तें नेहमीं विषयवासनेनें दूषित झालेलें असतें; ह्मणून विषयरूप आडमार्गाकडे धांव घेतें. यास्तव साधक पुरुषानें प्राण आणि इंद्रियें स्वाधीन करून घेऊन, आळस न करितां वर सांगितलेल्या उपायांनीं आणि व्रतें, दानें आदिकरून आणखी दुसऱ्याही साधनांनी त्या मनाला बुद्धीच्या योगानें हळूहळू परमात्मस्वरूपीं लावावें. इति । ८

---

# अध्याय ९ वा.

## यमनियमादिकांचीं लक्षणें. ( ११–१९. )

उद्धवोवाच—

**यमः कतिविधः प्रोक्तो नियमो वा ऽरिकर्षण ॥**

( १ ) यमैश्चनियमैश्चैव ह्यासनैश्चसुसंयुतः । नाडीशुद्धिंच कृत्वादौप्राणायामं समाचरेत् ॥ सर्वचिंतांपरित्यज्यसावधानेन चेतसा । निर्विकल्पः प्रसन्नात्मा प्राणायामं समाचरेत् ॥ मरुदभ्यासनं सर्वं मनोयुक्तं समभ्यसेत् । इतरत्र न कर्तव्या मनोवृत्तिर्मनीषिणा ॥ **अर्थ**—यमनियम, आसन, इत्यादिकांनीं प्रथम नाडीची शुद्धि करून नंतर सर्व चिंता व विकल्प दूर करून आत्मा प्रसन्न ठेऊन सावध चित्तानें प्राणायाम करावा. हा वायूधारणेचा अभ्यास करतांना मनाची वृत्ति इतर कोठेंही जाऊं न देतां एकाग्र मनानें करावा.—**श्रुति.**

कः शमः को दमः कृष्ण का तितिक्षा धृतिः प्रभो ॥ २८ ॥
किं दानं किं तपः शौर्यं किं सत्यमृतमुच्यते ॥
कस्त्यागः किं धनं चेष्टं को यज्ञः का च दक्षिणा ॥ २९ ॥
पुंसः किं स्विद्बलं श्रीमन् भगो लाभश्च केशव ॥
का विद्या ह्रीः परा का श्रीः किं सुखं दुःखमेव च ॥ ३० ॥
कः पंडितः कश्च मूर्खः कः पंथा उत्पथश्च कः ॥
कः स्वर्गो नरकः कः स्वित्को बंधुरुत किं गृहम् ॥ ३१ ॥
कः आढ्यः को दरिद्रो वा कृपणः कः क ईश्वरः ॥
एतान्प्रश्नान्मम ब्रूहि विपरीतांश्च सत्पते ॥ ३२ ॥

**उद्धव म्हणाला**---हे प्रभो श्रीकृष्णा ! आतां माझीं कांहीं प्रश्नें आहेत; त्यांचीं सविस्तर उत्तरें कृपा करून मला सांग.

**प्रश्न**.---यम व नियम कोणते आणि ते किती प्रकारचे आहेत ?

**उत्तर**.---अहिंसा ( प्राणिमात्रांचा छल न करणें ), सत्य, आस्तेय ( मनानेंही परद्रव्याचा अपहार न करणें ), असंग ( विषयादिकांविषयीं अनासक्ति ), लज्जा, संचय न करणें, आस्तिक्य (धर्मावर विश्वास), ब्रह्मचर्य, मौन, स्थिरता, क्षमा आणि अभय असे यमाचे बारा भेद आहेत. तसेंच अंतःशुद्धि ( मनाची शुद्धि ); बहिःशुद्धि ( हस्तपादादि बहिरिंद्रियांची शुद्धि ), जप, तप, होम, श्रद्धा, अतिथींचा सत्कार, ईश्वरपूजन, तीर्थाटन, परहितबुद्धि, संतोष व गुरुसेवा असे नियमाचे बारा भेद आहेत. उद्धवा, हे आचरिले असतां सकाम पुरुषाला वैभव प्राप्त होतें, व निष्काम पुरुषाला मोक्ष प्राप्त होतो.

( १ ) " मरणं बिंदुपातेन जीवनं बिंदुधारणात् । **अर्थ**—रेतबिंदु पतन पावला असतां तेंच मरण होय, व त्याचें संरक्षण करणें हें जीवित होय.--**पातंजल**.

( २ ) " नातपस्विनो योगः सिध्यति " । **अर्थ**—तपावांचून योग साध्य होणार नाहीं.--**योगसूत्र**.

**प्रश्न.**—शम व दम कोणते? तितिक्षेचें स्वरूप काय? धृति क-शाला म्हणावें?

**उत्तर.**—शम म्हणजे बुद्धीची परमात्मपदीं निष्ठा होय. नुसती शांति धरणें हा शम नव्हे, दम म्हणजे इंद्रियांचें आकलन करणें, चोरादिकांना दमविणें नव्हे. तितिक्षा म्हणजे तपश्चर्यादि कर्माचें आचरण करितांना प्राप्त होणारे क्लेश सहन करणें. भार वगैरे सोसणें ही तितिक्षा नव्हे; आणि धृति म्हणजे जिव्हा व उपस्थ ह्यांचे वेग आंवरून धरणें. आपत्ति आली असतां तींतून केवळ पार पाडण्याचा उद्योग चालवणें ही धृति नव्हे.

**प्रश्न**—दान तें काय? तप कोणतें? शौर्य कशाला म्हणावें? सत्य व ऋत कशाला म्हणतात? शुद्धि म्हणजे काय? त्याग कोणता? इष्ट धन कोणतें? यज्ञ कोणता? दक्षिणा कोणती?

**उत्तर.**—प्राणिमात्रांचा द्रोह करण्याचा सोडून देणें हें उत्तम दान होय, नुसतें द्रव्य देणें दान नव्हे; उपभोगांविषयीं उदासीन असणें हेंच तप होय, कृच्छ्र चांद्रायणादिकांना खरें तप म्हणतां येत नाहीं; वासनांचा प्रतिबंध करणें हेंच खरें शौर्य, लढाया जिंकणें हा शूरपणा नव्हे; ब्रह्मविचार हेंच सत्य होय; नुसतें खरें बोलणें सत्य नव्हें; प्रिय व यथार्थ भाषण करणें हेंच ऋत होय; कर्मावर आसक्ति न ठेवणें ह्यासच शुद्धि म्हणतात; त्याग म्हणजे कर्माचा संन्यास ( कर्मे सोडून देणें ) होय; धर्माचरण करणें ह्यासच हितकर द्रव्य म्हणतात, लोकप्रसिद्ध पैशाला

( १ ) " बुद्धि परमात्मीं मिळे जाण । जेवीं सागरासी लवण "—**नाथ.**

( २ ) " गोफणाचा सुवर्ण पाषाण । लागतां दुःख होय परम । तोचि ओळखिलिया सुवर्ण । दुःख जाऊनीं सुख होये " —**नाथ.** ( ३ ) " जेवीं कृष्णसर्प धरिजे हातीं । हे दोन्हीं ( जिव्हा आणि शिश्न ) धरिजे तैशिया रीतीं । अळुमाळ ढिलावतां धृति । परतोनि खाती धरी त्यासी.—**नाथ.**

धन म्हणतां येत नाहीं; परमेश्वराचें ध्यान करणें ह्यासच यज्ञ म्हणतात; यज्ञाकरितां दक्षिणा म्हणजे ज्ञानोपदेश ही समजावी, सुवर्णादि देणें ही दक्षणा नव्हे ( ज्ञानोपदेशरूप दक्षणेच्या योगें यज्ञरूप विष्णूची प्राप्ति होते ).

**प्रश्न.**—हे केशवा, पुरुषाचें बळ कोणतें ? भाग्य कोणतें ? लाभ कोणता ? उत्तम विद्या कोणती ? उत्तम लज्जा व उत्तम शोभा कोणती ? सुख कशास म्हणावें ? दुःख तें काय ?

**उत्तर.**—प्राणायाम हेंच पुरुषाचें श्रेष्ठ बळ होय. कारण, दुर्जय जें मन तें प्राणायामाच्या योगें जिंकितां येतें. ऐश्वर्य, धर्म, कीर्ति, संपत्ति, ज्ञान व वैराग्य हें माझें षड्गुणैश्वर्य, ह्यालाच भाग्य अशी संज्ञा आहे. भगवद्भक्ति हाच उत्कृष्ट लाभ होय. कारण, त्या योगें सायुज्य मिळतें; पुत्रप्राप्ति हा लाभ नव्हे. अत्म्याचे ठायीं अध्यासरूप अविद्या, तिचा नाश करणारीच विद्या होय; इतर अनेक प्रकारच्या ज्ञानाला विद्या म्हणतां येत नाहीं; अयोग्य कर्मे करण्याविषयीं पराङ्मुख असणें हीच उत्तम लज्जा समजावी; केवळ लोकप्रसिद्ध लाजेला लज्जा म्हणतां येत नाहीं. निरपेक्षता इत्यादि गुण धारण करणें हेंच भूषण होय; किरीटकुंडलें हीं भूषणें नव्हत. सुखदुःखाचा आरोप आपले ठायीं आरोपित न करून घेणें हेंच सुख होय; विषयभोग सुख नव्हे. विषयभोगाची इच्छा धरणें हेंच दुःख समजावें; रोगादिकांनीं पीडित होणें हीं दुःखें नव्हत.

**प्रश्न.**— पंडित कोणाला ह्मणावें ? मूर्ख तो कोण ? सन्मार्ग कोणता ? कुमार्ग कोणता ? स्वर्ग कोणता ? नरक कोणता ? बंधु कोण ? व गृह कोणतें ?

---

( १ ) " सकळ साम्राज्य वैभवेंसीं । चतुर्दश भुवन विलासेसीं । अंगीं लक्ष्मी आलिया जयापाशीं । परी थुंकोनी तिसी पुसेना ॥—**नाथ.**

उत्तर—जो पुरुष बंधमोक्षाचें बीज जाणितो ह्मणजे संसारबंधांतून सुटण्याचा विचार करतो तोच पंडित होय; पढीक ते पंडित नव्हत. जो पुरुष देहादिकांवर अहंता व ममता ठेवितो तो मूर्ख समजावा; लौकिक वेडेचार करणारा मूर्ख नव्हे. माझ्या पदास प्राप्त होण्याचा उपाय ( निवृत्ति मार्ग ) हाच सन्मार्ग होय. चित्ताला चंचल करणारा प्रवृत्ति मार्ग हा कुमार्ग होय; लुटारूंच्या रस्त्यालाच कुमार्ग म्हणतां येत नाहीं. सत्वगुणाची विपुल वृद्धि हाच स्वर्ग होय; इंद्रलोक स्वर्ग नव्हे. तमोगुणाची वृद्धि तो नरक समजावा; कुंभिपाकादिक नरक नव्हत. जीवाला मोक्ष मिळवून देणारा जो पुरुष तोच बंधु होय; सहोदर भ्राता हे बंधु नव्हत. आणि त्याला गुरु ह्मणजे प्रत्यक्ष परमात्मा समजावा. मनुष्याचें शरीर हेंच गृह होय. कारण, त्यांत सकल साधनें भरलेलीं आहेत व तेंच भोगस्थान होय; मोठमोठे वाडे, इमारती हीं घरें नव्हत.

प्रश्न.—संपन्न कोणाला ह्मणावें ? दरिद्री कोण ? कृपण कोण व पूज्य कोण ?

उत्तर.—ज्याच्यापाशीं विपुल गुण वसत असतील तोच संपन्न व धनी होय; पुष्कळ पैसेवान् श्रीमंत नव्हे. ज्याचें चित्त संतुष्ट नसतें तोच दरिद्री समजावा; जवळ पैसा नसेल तो दरिद्री नव्हे. ज्यानें आपलीं इंद्रियें जिंकलीं नाहींत, तो दुर्बल होय. ज्यास आपलीं इंद्रियें जिंकितां येतात ह्मणजे विषयांवर ज्याची बुद्धि आसक्त नसते तो स्वतंत्र समजावा; राजा इत्यादि मोठे लोक स्वतंत्र नव्हत. उद्धवा, तूं विचारिले-

( १ ) एक एव परो बंधुर्विषमे समुपस्थिते । गुरुः सकलधर्मात्मा यत्रकिंचनगो हरिः " **अर्थ**—संकट उत्पन्न झालें असतां पार पाडणारा आप्त ह्मणजे एक सकल धर्ममूर्ति गुरु हाच होय. कारण, सर्वसंगपरित्यागी साधूंनीं गाइलेला हरि त्या गुरुमूर्तीचे ठिकाणीं वास करितो—स्मृति.

ल्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें मोक्षप्राप्तीला उपयोगीं पडतील अशीं उत्तम प्रकारें सांगितलीं. विरुद्ध असलेल्या गोष्टींचें स्वरूप आतां सांगितलेल्या स्वरूपाच्या उलट असतें; ह्यास्तव तें तुझें तुला ठरवितां येईलच. इति। ९.

# अध्याय १० वा.

## आसनादिकांचे नियम ( ३–२८. )

श्रीभगवानुवाचः—

शुचौ देशे प्रतिष्ठाप्य विजितासन आसनम्॥
तस्मिन्स्वस्ति समासीन ऋजुकायः समभ्यसेत्॥ ८॥

**भगवान् कपिलमहामुनि ह्मणाले:**—माते देवहूति! योगाभ्यास करणाऱ्या पुरुषानें आपलें आसन पवित्र व एकांतस्थलीं मांडावें. तें फार उंच किंवा सखल असूं नये. प्रथम दर्भासन, त्यावर मृगचर्म आणि त्यावर वस्त्र अशी त्या आसनाची रचना असावी. व त्या मांडलेल्या आसनावर पुष्कळ वेळपर्यंत सुखानें एका स्थानीं बसतां येईल असें चौऱ्यांशीं आसनांपैकीं ज्या आसनापासून आपणास त्रास होणार नाहीं. तें आसन घालून बसण्याचा अभ्यास ठेवावा. ह्या चौऱ्यांशीं आसनांमध्यें सुद्धां श्रेष्ठ अशीं जीं सिद्धासन, पद्मासन, सिंहासन व भद्रासन चार आसनें आहेत. त्यांचीं पृथक् पृथक् लक्षणें सांगतोः—

( १ ) **सिद्धासन**—डाव्या पायाची टांच गुद व लिंग यांच्या मध्यप्रदेशीं ( अंडाच्या मुळाशीं ) असलेले सीवनीस्थानीं स्थापन क-

( १ ) "मणिभ्राजत्फणासहस्रविधृत विश्वराणमंडलायानंताय नागराजाय नमः ॥" **अर्थ**—आसनावर बसून ह्या मंत्राचा जप करण्यानें आसनसिद्धि सत्वर होते. परंतु याचा जप करण्याची रीति श्रीगुरुमुखानें समजून घेऊन मग त्याचा जप करावा.—**हठयोग.**

रावी. आणि उजव्या पायाची टांच उपस्थस्थानीं ( लिंगाच्या वरच्या भागीं) स्थापन करावी. नंतर मान खालीं वांकवून, हनुवटी हृदयासमीप ( हृदयापासून चार बोटें ऊर्ध्वभागीं ) लावून, व इंद्रियें वश करून अगदीं समकायानें ( ताठ ) बसावें. मग दृष्टि भृकुटीस्थानीं ( भिंवयांच्या मध्यभागीं ) स्थिर करून नेत्र अर्धे उघडे ठेवावे. व नाभीजवळ डाव्या हाताच्या पंजावर उजव्या हाताचा पंजा सहजगतीनें ठेवावा. याला मोक्षद्वार कपाट फोडून टाकणारें सिद्धासन ह्मणतात.

( २ ) **पद्मासन**—उजवा पाय डाव्या मांडीवर व डावा पाय उजव्या मांडीवर स्थापन करावा. दोन्ही हात शरीराच्या पश्चिम भागानें ( पाठी मागून ) वळवून घेऊन मग उजव्या हातानें (आंगठा व तर्जनी यांनीं ) उजव्या पायाचा आंगठा धरावा. याप्रमाणेंच डाव्या हातानें डाव्या पायाचा आंगठा धरावा. आणि नंतर मान खालीं वांकवून हनुवटी हृदयाजवळ ( हृदयापासून चार बोटें ऊर्ध्वभागीं ) ठेवावी, आणि दृष्टीनासाग्रीं ठेवून सरळ व निश्चळ बसावें. याला सर्व व्याधींचा नाश करणारें किंवा बद्धपद्मासन ह्मणतात.

( ३ ) **सिंहासन**—वृषणाच्या खालीं सीवनीच्या उजव्या भागीं डाव्या पायाची टांच स्थापन करावी. आणि डाव्या भागीं उजव्या पायाची टांच स्थापन करावी. नंतर बोटें पसरट करून दोन्ही हातांचे पंजे दोन्ही मांड्यांवर उपडे ठेवावें. शरीर ताणून छाती पुढें काढावी. तोंड उघडून जीभ लांब बाहेर काढावी. व दृष्टिनासाग्रीं ठेवून स्थिर होऊन बसावें. याला पूजित सिंहासन ह्मणतात.

( ४ ) **भद्रासन** ( गोरक्षासन )—वृषणाच्या खालीं सीवनीच्या डाव्या भागास डाव्या पायाची टांच व उजव्या भागास उजव्या पायाची टांच उलटवून स्थापन करावी, आणि दोन्ही पायांचे तळवे उताणे एकमेकांशीं भिडवून त्यांवर सर्व शरीराचा भार घालून बसावें.

नंतर जालंधर बंधपूर्वक नासाग्रीं दृष्टि ठेवून स्थिर बसावें. याला आरोग्य देणारें भद्रासन ह्मणतात.

या चारी आसनांपैकीं आपणास ज्यापासून विशेष सुख व स्थिरता वाटत असेल त्याच आसनाचा अभ्यास करून आसनजय करावा. योगाभ्यासाला सिद्धासन व पद्मासन हींच आसनें अधिक उपयोगी आहेत. यांमध्यें सिद्धासनच सर्वांत श्रेष्ठ मानिलें आहे.

## आसनफलवर्णन.

( १ ) **सिद्धासन**---या आसनाच्या जयानें श्वासोच्छ्वासाची गति मंद व सरळ होऊन मन स्थिर होतें. व प्राणवाहक नाड्यांतील सर्व मल दूर होऊन उन्मनी कला उद्भवतात. आणि कामशक्तीचा क्षय होऊन मोक्षप्रतिबंधक संस्कारही निवृत्त होतात.

( २ ) **पद्मासन**---या आसनाच्या जयानें श्वासोच्छ्वासाची गति मंद होऊन वृत्ति स्थिर होऊं लागते. रुधिराभिसरण योग्य रीतीनें होत असल्यामुळें शरीर निरोगी होतें. तसेंच आळस नाहींसा होऊन पूर्व व्याधींचेंही शमन होतें.

( ३ ) **सिंहासन**---या आसनाच्या जयानें मूलबंध[२], उड्डीयानबंध[३] व

( १ ) " मुख्यं सर्वासनेष्वेकं सिद्धाः सिद्धासनं विदुः । चतुरशीतिपीठेषु सिद्धमेव सदाभ्यसेत् ॥" **अर्थ**--योगी लोक सर्व आसनांमध्यें सिद्धासनच मुख्य मानतात; ह्मणून साधकानें या आसनाचाच अभ्यास विशेषकरून करावा. तात्पर्य--हठयोगामध्यें सिद्धासनाचेंच प्राधान्य आहे. व राजयोगामध्यें पद्मासन मुख्य आहे.

( २ ) पार्ष्णिभागेतुसंपीड्य योनिमाकुंचयेद्गुदं । अपानमूर्ध्वमाकृष्य मूलबंधाभिधीयते ॥ **अर्थ**--सिद्धासन करून डाव्या पायाच्या टांचेनें शिवणी दाबावी आणि अपान वायूस ऊर्ध्व गति द्यावी यास मूलबंध ह्मणतात.--**हठयोगप्रदीपिका.**

( ३ ) उदरे पश्चिमतानं नाभेरुर्ध्वंच कारयेत् । उड्डीयानोह्यसौबंधो मृत्युमातंगकेसरी ॥ **अर्थ**--पोट पाठीकडे ओढून वायु आकर्षण करावा, आणि नाभी ( बेंबी ) पुढें करावी. यास उड्डीयानबंध ह्मणतात. मृत्युरूपी हत्तीचा हा सिंहच होय.--**ह०**

जालंधरबंध सिद्ध होतात. आणि जठराग्नी प्रदीप्त राहून बलवृद्धि होते.

( ४ ) **भद्रासन**—या आसनाच्या जयानें स्वप्नावस्थेंत मुळींच वीर्य पतन होणार नाहीं. याच्या प्रभावानें अनेक रोगांचा नाश होऊन परिश्रमही दूर होतात. हें आसन रात्रीं निजावयाचे पूर्वीं तीन घटिकांपर्यंत हें आसन घालून बसण्याचा अभ्यास ठेवावा.

साधक पुरुषानें वर सांगितलेलीं आसनें व फळें यांकडे अवधान ठेवून आसन सिद्ध करण्याच्या कामीं तत्पर होऊन नित्य नेमानें एक अथवा दोन मुहूर्तांपर्यंत आसनावर बसण्याचा अभ्यास करीत असावा. असें साधन ठेवण्यानें अल्प काळांतच आसनसिद्धि होते. आसनसिद्धि झाल्यानें आळस निद्रा इत्यादि तामस गुणांचे विकार क्षय पवतात. आणि प्राणायाम व मुद्रा इत्यादि योग सिद्ध करण्याची शक्ति येते. इति १०।

---

# अध्याय ११ वा.

## प्राणायामाचे प्रकार ( ११–१४ ).

श्रीभगवानुवाच

**सम आसन आसीनः समकायो यथासुखम् ॥**
**हस्तावुत्संग आधाय स्वनासाऽग्रकृतेक्षणः ॥ ३२ ॥**
**प्राणस्य शोधयेन्मार्गं पूरकुंभकरेचकैः ॥**
**विपर्ययेणापि शनैरभ्यसेन्निर्जितेंद्रियः ॥ ३३ ॥**

**भगवान् श्रीकृष्ण म्हणाले**—उद्धवा, प्राणायामाचा अभ्यास करण्या-

---

( १ ) कंठमाकुंच्यहृदयेस्थापयेच्चुबुकं दृढं । बंधोजालंधराख्योऽयंजरामृत्युविनाशकः ॥ **अर्थ**—कंठाचे आकुंचन करून हनुवटी हृदयास लावावी यास जालंधरबंध ह्मणतात. हा जरा आणि मृत्यु यांचा नाश करणारा होय.—**हठ०प्रदीपिका.**

साठीं साधकानें ज्या आसनावर बसावयाचें तें आसन अति उंच नसावें व फार सखलही नसावें; ह्मणजे मध्यम प्रमाणाचें असावें. अशा आसनावर शरीर सरळ ठेवून पाठीस पोंक येऊं न देतां, किंवा त्रास होईल इतका ताणही न देतां सुख वाटेल अशा रीतीनें पद्मासन किंवा सिद्धासन घालून बसावें; आणि हात मांडीवर ठेवून चित्ताची एकाग्रता होण्याकरितां नासाग्रीं दृष्टि लावावी. नंतर प्राणायामास प्रारंभ करावा. त्या प्राणायामाचे सगर्भ व अगर्भ असे दोन भेद आहेत. यांपैकीं प्रथम अगर्भ प्राणायाम करण्याचा प्रकार सांगतों:--

( १ ) **अगर्भ प्राणायाम**:--इंद्रियें विषयांपासून सोडवून इडेनें पूरक, मग कुंभक, नंतर पिंगलेनें रेचक आणि उलट पिंगलेनें पूरक,

---

( १ ) शुचौ देशेप्रतिष्ठाप्यस्थिरमासनमात्मनः ।नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरं ॥ समं कायशिरोग्रीवं धारयन्नचलं स्थिरः । संप्रेक्ष्य नासिकाग्रं स्विदंशश्चानवलोकयन् ॥**अर्थ**—शुद्ध व पवित्र अशा जागेवर दर्भासन त्यावर कृष्णाजीन व त्यावर धूत वस्त्र घालून अति उंच नाहीं व अति सखल नाहीं अशा आसनावर मान व शरीर सरळ करून स्थिर होऊन आजुबाजूला लक्ष न देतां केवळ नासाग्रीं दृष्टी लावून बसावें.--**गीता**.

( २ ) अतसीपुष्पसंकाशं नाभिस्थाने प्रतिष्ठितं । चतुर्भुजं महावीरं पूरकेण विचिंतयेत् ॥**अर्थ**—पूरक प्राणायाम करतेवेळीं नाभी देशामध्यें आळशीचे फुलाप्रमाणें नील वर्ण व चार भुजांनीं युक्त तसेंच शंखचक्रादि आयुधांनीं विभूषित व लक्ष्मीसमन्वित जो भगवान विष्णु त्याचें स्मरण केलें पाहिजे.—**अथर्वणवेदांतर्गत बिंदुउपनिषत्**.

( ३ ) नोच्छ्वासने निश्वसेच्च नैव गात्राणि चालयेत् । एवं तावन्नियुंजीतकुंभकस्येतिलक्षणं ॥ रेचकं पूरकंत्यक्त्वासुखं यद्वायुधारणं । प्राणायमः स कथितः स वै केवल कुंभकः ॥ **अर्थ**—प्रथम रेचक अथवा पूरकानें वायूचा निरोध करून निश्चल रहावें. यास सहित कुंभक ह्मणतात. आणि रेचक अथवा पूरक न करितां नासापुटीं स्थित असलेला वायू निश्चल करणें यास केवल कुंभक ह्मणतात. केवल कुंभक

नंतर कुंभक, त्यानंतर इडेनें रेचक, ह्या दोन प्रकारांपैकीं एखाद्या प्रकारानें हळू हळू प्राणायामाचा अभ्यास चालवून प्राणाचा मार्ग शुद्ध करावा. आतां ह्या अगर्भ प्राणायामाचा विस्तार सांगतों--इडेनें ह्मणजे डाव्या नाकपुडीनें बाह्यदेश वायु सोळा मात्रांपर्यंत कमळनाळांतील पाण्याप्रमाणें हळू हळू आंत ओढून घेणें. तो पूरक केलेला वायु शरीरामध्यें चौसष्ट मात्रांपर्यंत थांबविणें; आणि निरोध केलेला वायु पिंगला ह्मणजे उजव्या नाकपुडीनें बत्तीस मात्रांपर्यंत हळू हळू सोडणें. ह्या नियमाप्रमाणें प्रातःकाळीं, मध्यान्हीं, सायंकाळीं व अर्धरात्रीं असे चार वेळा, प्रत्येक वेळीं ऐशीं ऐशीं कुंभक केले असतां सहा महिन्यांत नाड्या शुद्ध होतात. याप्रमाणें अगर्भ प्राणायामाचा प्रकार सांगितला.

---

( मागील पृष्ठावरून पुढें चालू ).

साध्य होईपर्यंत सहित कुंभकाचा अभ्यास करावा.—**योगतत्त्वामृत.** कुंभकेन हृदिस्थाने चिंतयेत् कमलासनम् । ब्रह्माणं रक्तगौरांगं चतुर्वक्त्रं पितामहम् ॥ **अर्थ**—प्राणांचें स्तंभन करण्याचे वेळीं हृदयस्थानांत चतुर्मुखानीं युक्त व रक्तवर्णाप्रमाणे लाल आहे आसन ज्याचें असा जो सर्वांचा पितामह ब्रह्मा त्याचें स्मरण करावें.—**बिंदूपनिषत्.**

( ४ ) रेचकेन तु विद्यात्त ललाटस्थं त्रिलोचनम् । शुद्धस्फटिकसंकाशं निष्कलं पापनाशनम् ॥ **अर्थ**—प्राण बाहेर सोडण्याचे वेळीं ललाट प्रदेशीं शुद्ध स्फटिकमण्याप्रमाणें गौर वर्णयुक्त व सर्व पापांचा नाश करणारा व सर्व कालातीत असा जो त्रिलोचन (महादेव) त्याचें ध्यान करावें.—**अथर्वण वेदांतर्गतबिंदूपनिषत्.**

( ५ ) जानुप्रदक्षिणां कुर्यान्न द्रुतं न विलंबितं । प्रपद्यात् त्रुटिकां यावत्तावन्मात्रेतिगीयते ॥ **अर्थ**—फार लवकर नाहीं व फार उशिरा नाहीं अशा प्रकारें हातानें गुडघ्याभोंवतीं प्रदक्षिणा करून एक चुटकी वाजवावी ह्यास मात्रा काल ह्मणतात.—**स्कंदपुराण.** व "एकश्वाससमा मात्रा ऊर्ध्वाधोगमनं तथा ॥" **अर्थ**—अथवा एक श्वास वर व खालीं जाईपर्यंतचा काल, किंवा प्रणवाचा ( ॐ या अक्षराचा ) साग्र उच्चार करण्यास जो काल लागतो तो मात्राकाल समजावा.—**गोरक्षशतक.**

सगर्भ ( प्रणवगर्भ ) प्राणायाम हा श्रेष्ठ आहे. ह्या सगर्भ प्राणायमालाच ॐकारगर्भ प्राणायाम म्हणतात. आतां त्याचा प्रकार सांगतोंः-

( २ ) **सगर्भ प्राणायामः**--मूलाधारचक्रापासून मस्तकांतील ब्रह्मरंध्रापर्यंत मेरुदंडास ह्मणजे पाठीच्या कण्यास लागून असलेली सुषुम्ना नामक मुख्य नाडींतून जो वायूचा मार्ग आहे तो मार्ग, मूलादि बंधयत्रयांच्या, पश्चमतान असनादिकांच्या व स्पित्र ताडनांच्या योगानें सरळ झल्यावर त्या मार्गानें सतत चालणाऱ्या घंटानादासारखा ॐकाररूप प्रणवन्नादासह हृदयांतील प्राणवायूला कमळनाळांतील पाण्याप्रमाणें हळू हळू वर आकर्षण करून युक्ति युक्तीनें ब्रह्मरंध्रापर्यंत घेऊन जावें, आणि मग तो वायु ब्रह्मरंध्राच्या स्थानी योग्यकालपर्यंत स्थित करून नादानुसंधान करावें. अशा रीतीनें प्रणवयुक्त प्राणायाम करण्याचाच प्रतिदिनीं त्रिकाळीं ( प्रातःकाळीं, मध्यान्हीं व सायंकाळीं ) अभ्यास करीत असावा, ह्मणजे अल्पकाळांतच त्या पुरुषाला प्राणवायु वश होतो. याप्रकारें प्राणायमाच्या अभ्यासानें प्राणाचा जय करणाऱ्या योगी पुरुषाचें मन लवकरच निर्मल होतें.

दोषनिवृत्ति साधनोपाय--योगी पुरुषानें प्राणायामाच्या योगानें पापें भस्म करून टाकावींत; प्रत्याहाराच्या योगानें विषयांचे संबंध तोडून टाकावे; धारणेच्या योगानें प्रमाद नाहींसे करावे; ध्यानाच्या योगानें रागद्वेषादि सामान्य गुण दूर करावे. या प्रकारें योगसाधनानें मन निर्मल व स्थिर झालें कीं, योग्यानें आपल्या नासिकेच्या अग्रभागीं दृष्टि ठेवून भगवद्ध्यान करावें. इति । ११.

---

# अध्याय १२ वा.

## ध्यानविधि ( २-२ ).

श्रीशुकउवाचः—

**एवं स्वचित्ते स्वत एव सिद्ध आत्मा प्रियोऽर्थो भगवाननंतः ॥**
**तं निर्वृतो नियतार्थो भजेत संसारहेतूपरमश्च यत्र ॥ ६ ॥**

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**—राजा! जन्ममरणरूप संसार प्राप्त होण्याला कारण मनुष्याचें अज्ञान हें होय. त्याची निवृत्ति होण्याकरितां साधक पुरुषानें परमेश्वराविषयीं निश्चलबुद्धि धारणा करावी; आणि आपल्या सर्वांच्या अंतःकरणांत एक स्वतःसिद्ध असणारा आपणाला जो प्रिय आत्मा, त्याचें प्रसन्न अंतःकरणानें भजन करावें. कारण, त्याचें भजन केलें असतां संसारजनक जें अज्ञान तें नाशास पावतें. आतां त्या भगवत्स्वरूपाचें ध्यान कसें करावें तें सांगतों:—

राजा, साधक पुरुषानें आपल्या हृदयाकाशांत टीचभर उंचीची भगवन्मूर्ति आहे, अशी मनाची धारणा करावी. ती मूर्ति चतुर्भुज असून तिच्या प्रत्येक हातामध्यें अनुक्रमानें शंख, चक्र, गदा व पद्म हीं आयुधें आहेत; तिचें मुख सदा प्रसन्न आहे; डोळे कमलाप्रमाणें प्रफुल्लित असून आकर्ण विशाल आहेत; त्या मूर्तीच्या कमरेला उत्तम पीतांबर, मस्तकावर रत्नखचित देदीप्यमान किरीट, कानांत मकराकार कुंडलें, बाहूंवर रत्नांनीं खचलेलीं अतिशय तेजस्वी बाहुभूषणें, कंठांत कौस्तुभमणि, तसेंच गळ्यांत एकसारखी टवटवीत अशी वनमाला, कमरेला मेखला ( कमरपट्टा ) आहे; हाताच्या बोटांत बहुमोल आंगठ्या, पायांत नूपुरें व हातांत कडीं असून त्या मूर्तीच्या वक्षःस्थलावर लक्ष्मीचें चिन्ह आहे; तिची मुद्रा हास्ययुक्त व आनंदित असल्यामुळें ती फारच

सुंदर दिसत आहे; अशा हास्यमुद्रेनें ती श्याममूर्ति आपल्यावर अनुग्रह करण्याकरितां आपल्याकडे पाहत आहे. ह्याप्रमाणें त्या परमेश्वराची मूर्ति ध्यानांत आणावी, व आपलें मन धारणेच्या योगानें त्या स्वरूपावर स्थिर राहीतोंपर्यंत तसेंच क्रम चालू द्यावें. मग साधकानें आपल्या बुद्धीनें प्रथम पायांपासून त्या भगवन्मूर्तीच्या प्रत्येक अवयवाच्या ध्यानास प्रारंभ करावा, ज्या अवयवाचें आपण ध्यान करीत असूं तो अवयव आपल्या अंतःकरणांत स्थिर होऊं लागला ह्मणजे त्याला सोडून त्याच्या वरील भागाच्या अवयवाचें ध्यान करूं लागावें. जसें--प्रथम आपण पायांचें ध्यान करूं लागलों असतां ते पाय अंतःकरणांत स्थिर होऊं लागले, ह्मणजे आपण त्या पायांचें ध्यान सोडून देऊन त्यांच्या वरील अवयवांचें ह्मणजे पोटऱ्या व घोंटे यांचें ध्यान करावें. अशा रीतीनें त्या परमेश्वरमूर्तीच्या प्रत्येक अवयवाच्या ठिकाणीं बुद्धि स्थिर करीत करीत हास्ययुक्त मुखापर्यंत ध्यान करावें. राजा, याप्रमाणें त्याचे ठिकाणीं भक्ति स्थिर होईपर्यंत प्रतिदिनीं आपलीं नित्यनैमित्तिक कर्में[1] आटपल्यावर नियमानें त्या परमेश्वराच्या स्वरूपाचें ध्यान करावें.

बाबा ! मनुष्यदेहाला मरण हें केव्हां तरी येणारच, हें निश्चित जाणून त्यानें ह्या क्षणभंगुर देहाला संसारांतील अत्यल्प सुखाची प्राप्ति करून घेण्याकरितां व्यर्थ यातायात करूं नये. हे पुण्यवंता, मुमुक्षु पुरुषाला मोक्षसाधन करून घ्यावयाचें असल्यास त्यासंबंधींच्या विचारापासून तो अगदीं न ढळतां मरणकालपर्यंत अभ्यास करण्याचा निश्चय करून नित्य त्याच्या ध्यानांत मग्न असावें. इति । १२.

---

१ " सिद्धावस्थेस पोहोंचल्यावर मग स्नानसंध्यादि कर्में करण्याच्या भानगडींत पडण्याची गरज नाहीं; पण तोंपर्यंत नित्यनैमित्तिक कर्में निरभिमानानें केलींच पाहिजेत.—**नाथांचा अभिप्राय.**

# अध्याय १३ वा.

## ध्यानाचा प्रकार ( ३-२८ ).

श्रीभगवानुवाच:—

**प्रसन्नवदनांभोजं पद्मगर्भारुणेक्षणम् ॥**
**नीलोत्पलदलश्यामं शंखचक्रगदाधरम् ॥ १३ ॥**

**भगवान् कपिलमहामुनि म्हणाले:**—मात ! ज्याच्या योगानें मनुष्याला उत्तम गति प्राप्त होते, त्या भगवंताच्या मूर्तीचें ध्यान कसें करावें; आणि ज्याचें ध्यान करावयाचें तो भगवान् कसा आहे; तो सर्व प्रकार मी तुला सांगतों, ऐक:—माते, भगवंताचें मुखकमल अत्यंत प्रसन्न आहे; नेत्र कमलाच्या गाभ्याप्रमाणें किंचित् तांबूस आहेत; त्याचा वर्ण निळ्या कमळाच्या पानाप्रमाणें श्यामल असून त्यानें हातांत शंख, चक्र व गदा हीं आयुधें धारण केलीं आहेत; त्यानें प्रफुल्लित कमलकेसरांप्रमाणें पिंवळें सुंदर रेशमी वस्त्र परिधान केलें आहे; त्याच्या वक्षःस्थलावर श्रीवत्स चिन्ह असून कंठामध्यें तेजःपुंज कौस्तुभमणि झळकत आहे; त्याच्या गळ्यांत वनमाळा असून तिच्या सभोंवतीं मधु पिऊन मत्त झालेले भ्रमर गुंजारव करीत आहेत; त्याच्या देहावरील मुकुट, बाहुभूषणें व नूपुर इत्यादि अलंकार फार सुंदर असून अतिशय मूल्यवान् आहेत; कमरेस वेष्टिलेल्या कमरपट्ट्यानें त्याचा कटिभाग फारच शोभा देत आहे; भक्तांच्या हृदयकमलामध्यें त्याचें आसन असून तो अत्यंत दर्शनीय, गंभीर व मनाला आणि नेत्रांला आनंद देणारा असा आहे; तो आपल्या भक्तांकडे फारच मनोहर दृष्टीनें पहात आहे; त्याला सर्व लोक नमस्कार करितात; तो अगदीं तरुण वयस्क असून भक्तांवर कृपा करण्याच्या कामीं अगदीं गुंतलेला आहे

असें ध्यान करण्याचा अभ्यास ठेवावा. कारण, त्याची कीर्ति अवर्णनीय व पुण्यकारक आहे. धर्मराज, बलि आदिकरून पुण्यश्लोक पुरुषांची कीर्ति त्यानें वाढविली. माते देवहूति, योग्यानें अशा प्रकारच्या परमेश्वराच्या संपूर्ण मूर्तीचें ध्यान, जोंपर्यंत आपलें मन तिजवरून ढळणार नाहीं तोंपर्यंत करावें. माते, केवळ हृदयकमलांत असलेल्या भगवन्मूर्तीचेंच ध्यान केलें पाहिजे असें नाहीं. आपल्याला जी मूर्ति प्रिय असेल तिचें ध्यान करावें. तें ध्यान सुद्धां आपल्या आवडीप्रमाणें उभा राहिलेल्या, श्रेष्ठ आसनावर बसलेल्या, शेषादि शय्यांवर शयन करणाऱ्या किंवा आपल्याला ज्या स्वरूपाची जशी रमणीयता वाटेल त्या मूर्तीचें अथवा सर्वांतर्यामित्वानें हृदयगुहेंत वास करणाऱ्या चिन्मय स्वरूपाचें शुद्ध भक्तियुक्त अंतःकरणानें ध्यान करावें. त्या स्वरूपावर लक्ष स्थिर राहूं लागलें व त्याचे सर्व अवयव मनांत एकदम दृढ होऊं लागले म्हणजे, योग्यानें आपलें मन तेथून सोडवून त्या भगवंताच्या निरनिराळ्या अवयवांचे ठिकाणीं लावावें. आतां त्या निरनिराळ्या अवयवांच्या ठिकाणीं मन कसें लावावें त्याचा प्रकार सांगतों:—

( ? ) **अवयव ध्यानाचा प्रकार**—योगी पुरुषानें प्रथम भगवंताच्या चरणकमलांचें ध्यान उत्तम रीतीनें करावें. त्या चरणकमलांवर वज्र, अंकुश, ध्वज आणि कमल हीं चिन्हें आहेत; त्यावर असलेल्या उंच, लाल व सुशोभित अशा नखपंक्तीच्या किरणांनीं योग्यांच्या हृदयांतील अज्ञानरूपी अंधकार अगदीं नाहींसा होत आहे; त्याच चरणकमलांचें प्रक्षालन केलें असतां त्यापासून श्रेष्ठ गंगा उत्पन्न झाली; भगवंताचें चरणकमल म्हणणे पुरुषांच्या अंतःकरणांतील पापरूपी पर्वताचा नाश करणारें वज्रच होय. अशा त्या भगवंताच्या चरणकमलांचें पुष्कळ वेळपर्यंत हृदयांत ध्यान करावें. नंतर त्या परमेश्वराच्या जंघाद्वयाचें ( दोन्ही पोटऱ्यांचें ) ध्यान करावें. ते जंघाद्वय सर्व जग

निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाची माता होय. व सर्व देवही जिला वंदन करितात ती कमलनयना लक्ष्मी सुद्धां भगवंताच्या पोटऱ्या आपल्या मांडीवर घेऊन नूतन पल्लवाप्रमाणें कोमल अशा आपल्या हातानें सेवन करीत असते ! असंसारी व सर्वव्यापी असा जो भगवान् तो गरुडारूढ असतां गरुडाच्या स्कंधावर शोभायमान होणाऱ्या त्याच्या मांड्यांचें ध्यान करावें; त्या मांड्या बलाला आधार असून जवसाच्या फुलासारख्या शामल कांतीनें शोभत आहेत; नंतर भगवंताच्या कटिप्रदेशाचें ध्यान करावें; त्या कटिप्रदेशीं उंची पिंवळा पीतांबर असून तो घोट्यांपर्यंत लोंबत आहे व त्यावर कमरपट्याचें वेष्टन आहे; भगवंताचें उदर हें सर्व भुवनांच्या समुदायांचें वसतिस्थान होय. त्या उदराच्या मध्यभागीं असलेल्या नाभिविवराचें ध्यान करावें; त्या नाभीपासूनच स्वयंभू ब्रह्मदेवाचें उत्पत्तिस्थान जें सर्व लोकरूपी कमल तें उत्पन्न झालें. नंतर त्या भगवंताच्या उत्तम पाचेच्या मण्यांसारख्या स्तनद्वयाचें ध्यान करावें; नंतर योग्यानें भगवंताच्या वक्षःस्थलाचें ध्यान करावें; तें वक्षःस्थल महालक्ष्मीचें वसतिस्थान असून भक्तलोकांला आनंद देणारें आहे. पुढें भगवंताच्या कंठाचें ध्यान करावें; त्या कंठाचे ठिकाणीं भगवंतानें कौस्तुभमणि धारण केला आहे, व भगवंताच्या कंठानें कौस्तुभमण्याला शोभा आली आहे. नंतर परमेश्वराच्या बाहूंचें ध्यान करावें; ते बाहू ह्मणजे सर्व लोकपालांचें आश्रयस्थान होय; व बाहुभूषणें फार उज्ज्वल आहेत. नंतर ज्याचें अपार तेज शत्रूंस असह्य आहे व ज्याला हजार पाकळ्या आहेत अशा भगवंताच्या सहस्रकर चक्राचें ध्यान करावें; पुढें त्याच्या करकमलावर राजहंसाप्रमाणें शोभणाऱ्या पांचजन्य शंखाचें ध्यान करावें; तदनंतर शूरशत्रूंच्या रक्तानें भरलेल्या भगवंताच्या कौमोदकी गदेचें ध्यान करावें; नंतर भ्रमरसमूहाच्या गुंजारवानें घुमत असलेल्या गळ्यांतील वनमालेचें ध्यान करावें, व भगवंताच्या कंठामध्यें जी-

याचें निर्मल तत्व जो कौस्तुभमणी आहे त्याचें चिंतन करावें. भगवंताला आपल्या भक्तांबद्दल दया उत्पन्न झाल्यामुळें तो ह्या जगांत अवतार धारण करितो. आतां त्याचें मुखकमल चिंतन करण्याचा प्रकार सांगतोंः–

भगवंताच्या कानांतील हलत असलेल्या चकचकीत मकराकार कुंडलांची प्रभा त्याच्या निर्मल गालांवर पडल्यामुळें गालांला अधिक कांति आलेली आहे; त्याची नासिका सुंदर आहे; त्याच्या नेत्रांचीं बुबुळें भ्रमरासारखीं काळींभोर व तेजस्वी असून नेत्र मत्स्याकृति आहेत; व त्यांच्यावर कुरळ केसांचे झुबके असल्यामुळें लक्ष्मीचें निवासस्थान जें कमल त्याचाही ते तिरस्कार करीत आहेत किं काय असा भास होतो. अशा त्या मुखकमलाचें योग्यानें निरालसपणें एकाग्र मनानें ध्यान करावें. नंतर भगवंताला आपल्याविषयीं अधिक प्रीति असल्यामुळें अध्यात्मिकादि त्रिविध तापांच्या शांतीकरितां त्यानें आपल्याकडे प्रेमळ व हास्ययुक्त मुखानें अतिशय प्रसादानें व सप्रेम दृष्टीनें अवलोकन करीत आहे, अशी विपुल भावना करून त्या अवलोकनाचें अंतःकरणामध्यें पुष्कळ वेळपर्यंत ध्यान करावें. नंतर सकल दुःखें हरण करणाऱ्या त्या भगवंताच्या हास्याचें ध्यान करावें. त्या हास्याच्या योगानें भगवद्भक्तांचें दुःख, शोक वगैरे सर्व नाहीसे होऊन त्यांस सुख होतें. हें झाल्यावर, भगवंताच्या अत्युत्कृष्ट भ्रुकुटिमंडलाचें ध्यान करावें. मदनानें भक्तांना पीडा देऊं नये, ह्मणून त्या मदनाला मोहित करण्याच्या उद्देशानें भगवंतानें हें भ्रुकुटिमंडल आपल्या मायेपासून निर्माण केलें आहे. नंतर आपल्या शरीरांतील हृदयगुंफेमध्यें दिसत असलेली ती वि-

(१) " आत्मानमस्य जगतो निर्लेपमगुणामलम् ॥ विभर्ति कौस्तुभमणिं स्वरूपं भगवान् हरिः " **अर्थ**--भगवंतानें आपल्या कंठामध्यें कौस्तुभमणि धारण केला आहे. तो मणि ह्या जगाचा आत्मरूप होय. त्यावर कोणतेही लेप, गुण आणि मळ नाहींत.—**वैष्णवतंत्र.**

ष्णुमूर्ति मोठ्यानें हांसत आहे, हांसतांना अधरोष्ठाची पुष्कळ कांति दं-तांवर पडल्यामुळें कुंदाच्या कळ्यासारखी सूक्ष्म दंतपंक्ति तांबूस दिसत आहे, अशी कल्पना करून त्या हास्याचें ध्यान करावें. हें हास्य सुंदर असल्यामुळें यत्नावांचून ध्यानांत येईल. याप्रमाणें प्रेमरसानें भरलेलें अंतःकरण तेथेंच जडून राहिलें असतां योग्यानें दुसरीकडे पाहण्याची इच्छा ठेवूं नये, व मन तेथून हलवूं नये.

ह्या प्रकारच्या ध्यानयोगानें परमेश्वराच्या ठिकाणीं प्रीति उत्पन्न झाली, म्हणजे भक्तीमुळें त्या योग्याचें अंतःकरण द्रवून जाईल, आनंदानें आंगावर रोमांच उभे राहतील, प्रेमातिशयानें आनंदाश्रूंचे पूर वाहूं लागतील, असें झालें असतां त्या भगवन्मूर्तीवरून त्याचें चित्त हळू हळू सुटत जाईल व परमानंदांत मग्न होईल. परमानंदसुखाचा अनुभव मिळाल्यामुळें शब्दस्पर्शादिविषयांचा मनाला कंटाळा येतो. नंतर ध्यानाचा विषय नाहींसा झाला कीं, मनाचा आश्रय सुटतो; त्यायोगानें मनाचा मननभाव नाहींसा झाला कीं गुणांचे प्रवाहरूप देहोपाधि वगैरे नष्ट होतात. व मग जसा अग्नि, काष्ठें संपलीं म्हणजे तो आपल्या अग्निस्वरूपाला मिळतो; त्याप्रमाणें आश्रयरहित झालेलें तें मन ब्रह्मरूपीं लय पावतें ! अशा अवस्थेंत ध्याता, ध्यान व धेय ही त्रिपुटि नाहींशी होऊन योगी पुरुषाला सर्वत्र आत्मरूप दिसतें. याप्रमाणें आत्मतत्त्वाचा साक्षात्कार झाला कीं, त्या पुरुषाला सुखदुःखाचें भान मुळींच उरत नाहीं, व पूर्वीं आपणास होत असलेलीं सुखदुःखें अविद्यात्मक अहंकारामुळें होत होतीं, असें त्याला भासूं लागतें. आतां पूर्ण स्थितीस पोंचलेल्या सिद्ध पुरुषांची स्थिति कशी असते, तें सांगतोंः—

( १ ) **जीवन्मुक्ताची स्थिति**—पूर्णावस्थेस पोंचलेल्या पुरुषाची स्थिति अशी होते कीं, जसा एकादा मनुष्य मद्याच्या मदानें धुंद झाला असला म्हणजे त्याला आपल्या कमरेला वस्त्र आहे किंवा नाहीं याचें

देखील भान नसतें; त्याप्रमाणेंच आत्मसाक्षात्कार झालेल्या योग्याला, देह बसला आहे कीं उठून उभा राहिला आहे, दैवयोगानें एका स्थानापासून पुन्हां दुसऱ्या स्थानावर गेला आहे किंवा त्याच ठिकाणीं आहे वगैरे कोणत्याही गोष्टींचें भान नसतें! तो स्वस्वरूपाप्रत प्राप्त झालेला असतो, अशी जीवन्मुक्ताची स्थिति असते. इति । १३.

---

# अध्याय १४ वा.

## ध्यानधारणा वर्णन ( ११-१४ ).

उद्धव उवाच:—

यथा त्वामरविंदाक्ष यादृशं वा यदात्मकम् ॥
ध्यायेन्मुमुक्षुरेतन्मे ध्यानं त्वं वक्तुमर्हसि॥ ३१ ॥

**उद्धव ह्मणाला:**— हे कमलनयना, मुमुक्षु पुरुषानें तुझ्या कोणत्या स्वरूपाचें ध्यान करावें, त्या ध्यानाचीं अंगें कोणतीं व ध्येय स्वरूपाचें वर्णन काय ? तें मला सविस्तर कथन कर.

**श्रीभगवान् म्हणाले:**—उद्धवा ! ह्या शरीरामध्यें ( वामस्तनाच्या अधोभागीं ) एक हृदयकमल आहे, त्याचें नाळ वर असून मुख खालीं लोंबत आहे ( केळफूल जसें लोंबत असतें, तशी हृदयकमलाची रचना आहे.) त्याचें उलट ध्यान करावें. ह्मणजे सरोवरांतील कमळाप्र-

---

( १ ) हृदिस्थाने स्थितं पद्मं तच्च पद्ममधोमुखम् । ऊर्ध्वे नालमधो बिंदुस्तस्य मध्ये स्थितं मनः ॥ **अर्थ**—आपल्या हृदयामध्यें (डाव्या स्तनाच्या खालीं) आठ पाकळ्यांचें कमल वर देंठ आणि खालीं पाकळया असें आहे. हेंच मनाचें रहाण्याचें ठिकाण आहे, याचें ध्यान केलें असतां चित्त स्थिर होऊन आत्मसाक्षात्कार होतो— **अथर्ववेद योगशिक्षा.**

माणें देंठ खालीं असून त्याचें मुख वर आहे. तसेंच तें हृदयकमल प्रफुल्लीत असून त्याला आठ पांकळ्या आहेत, व त्याच्यामध्यें कर्णिका ( गाभा ) आहे, असें ध्यानांत आणून चिंतन करावें. पुढें त्या कर्णिकेमध्यें एकावर एक अनुक्रमानें सूर्य, चंद्र व अग्नि ह्यांची कल्पना करावी; आणि त्या अग्नीचे ठायीं माझ्या रूपाचें ध्यान चालवावें. हें रूप ध्यानाचा मंगलकारक विषय होय. आतां अग्नीच्या ठिकाणीं मी--परमेश्वर- कोणत्या मंगलरूपानें आहें तें सांगतों:—

**अग्नीच्या ठिकाणचें भगवत्स्वरूप**—माझी चतुर्भुज मूर्ति असून माझे अवयव सप्रमाण आहेत; आकृति अत्यंत शांत असून मुख सुंदर आहे; गाल मनोहर असून हास्याची शुभ्र प्रभा गालांवर झळकत आहे; दोन्ही कान समान असून त्यांमध्यें घातलेलीं मकराकार कुंडलें चमकत आहेत; बाहू दीर्घ असून ग्रीवा अत्यंत रमणीय आहे; शरीराची कांति मेघासारखी श्यामवर्ण असून आंगावर भरजरी वस्त्र आहे; वक्षःस्थलावर अनुक्रमें उजव्या व डाव्या बाजूंस श्रीवत्स आणि लक्ष्मी हीं चिन्हें वसत आहेत; हातांमध्यें शंख, चक्र, गदा व पद्म आणि गळ्यांत वनमाला हीं विराजत आहेत; वक्षःस्थलावर कौस्तुभ मण्याची प्रभा पसरली असून पायांमध्यें नूपुरांची कांति झळकत आहे; मस्तकावर तेजःपुंज असा किरीट असून कडीं, कटिसूत्र, व बाहुभूषणें ह्या अलंकारांनीं चहूंकडून शोभा आणिली आहे; मूर्ति सर्व अवयवांनीं सुंदर व हृदयंगम आहे; नेत्रकटाक्षांनीं व प्रसन्न मुद्रेनें मुख अत्यंत दीप्तिमान दिसत आहे ! अशा माझ्या सुकुमार ( अति कोमल ) मूर्तीचें सर्व अवयवांवर दृष्टि लावून ध्यान करावें. मुमुक्षु पुरुषाचें मुख्य कर्तव्य हें आहे कीं, ' त्यानें विवेकाच्या योगें सर्व इंद्रियें त्यांच्या उपभोग्य अशा बाह्य विषयांपासून आकर्षून घ्यावींत; व मन बुद्धीच्या साह्यानें सर्वावयवयुक्त अशा माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं लीन करावें. ' उ-

द्धवा, सामान्य रीतीनें ध्येयमूर्तीचें ध्यान कसें करावें तें सांगितलें; पण कालावधीनें ह्या मूर्तीच्या ठिकाणीं चित्ताची एकाग्रता झाल्यावर सगळ्या मूर्तीला व्यापणारें तें चित्त काढून केवळ एका मुखाच्या ठिकाणींच लावावें. पुन्हां दुसऱ्या अंगांचें ध्यान न करितां सुहास्ययुक्त अशा कोमल मुखाचेंच तेवढें ध्यान करावें. सुहास्य वदनावर चित्ताची पूर्ण स्थिरता झाल्यावर, तें चित्त तेथून काढून सर्व कारणरूप आकाशाच्या ठिकाणीं धारणा करावें; नंतर त्याचाही त्याग करून केवळ मत्स्वरूपीं ( ब्रह्मस्वरूपीं ) आरूढ व्हावें, व मग कसलेंही ह्मणजे ध्याता आणि ध्येय हीं निरनिराळीं आहेत हेंही चिंतन करूं नये. अशा रीतीनें चित्ताची एकाग्रता झाली असतां जसें तेज तेजांत मिळून जातें; त्याप्रमाणें तो मुमुक्षु पुरुष माझ्या स्वरूपांत ऐक्य पावतो. जो मुमुक्षु अशा अत्यंत तीव्र ध्यानाच्या योगें माझ्या ठिकाणीं रममाण होतो, त्याचा द्रष्टा, दृश्य व दर्शन हा त्रिपुटिजन्य भ्रम लवकरच पूर्णपणें शमन पावतो. इति। १४.

---

# अध्याय १५ वा.

## शब्दब्रह्मस्वरूप निरूपण ( ११–२१ ).

श्रीभगवानुवाचः—

शब्दब्रह्म सुदुर्बोधं प्राणेंद्रियमनोमयं ॥
अनंतपारं गंभीरं दुर्विगाह्यं समुद्रवत् ॥ ३६ ॥

**भगवान् श्रीकृष्ण ह्मणालेः—उद्धवा ! वेदाचें किंवा वेदार्थाचें तत्त्वतः ज्ञान मजवांचून दुसऱ्या कोणालाही नाहीं. कारण, शब्दब्रह्म हें स्वरूपतः व अर्थतः अशा दोन्ही प्रकारांनीं समजण्यास अत्यंत कठीण**

आहे. ह्या शब्दब्रह्माचीं स्थूल आणि सूक्ष्म अशीं दोन स्वरूपें आहेत. ह्या दोन स्वरूपांपैकीं सूक्ष्म स्वरूपाचे तीन प्रकार आहेत तें असेः--पहिला प्राणमय--ज्याला 'परावाणी असें ह्मणतात तो.--दुसरा मनोमय--ज्याला 'पश्यंती' वाणी असें ह्मणतात तो.--आणि तिसरा इंद्रियमय--ज्याला 'मध्यमा' वाणी ह्मणतात तो. हीं तिन्ही स्वरूपें देहाच्या आंत असल्यामुळें समजण्यास दुर्घट आहेत. त्या शब्दब्रह्माच्या स्थूल स्वरूपाचा प्रकार एक आहे--ज्याला 'वैखरी' वाणी ह्मणतात तो. व तेंही यथार्थ रीतीनें समजणें अशक्य आहे. उद्धवा, तें शब्दब्रह्म समष्टिरूप असल्यामुळें देशकालातीत आहे; म्हणून त्याचा ठाव लागणें समुद्राच्या प्रमाणें अशक्य होय. आतां अंतर्दृष्टि पुरुषांनाच कळण्याजोगें शब्दब्रह्माचें सूक्ष्म स्वरूप सांगतोंः---

**शब्दब्रह्माचें सूक्ष्म स्वरूपः**---उद्धवा, सर्व प्राण्यांच्या अंतरीं नादसंज्ञक सूक्ष्मरूपानें जें सर्वदा वसत असतें, तें शब्दब्रह्माचें सूक्ष्म स्वरूप होय. कमळाच्या नाळामध्यें असलेला बारीक ऊर्णातंतू जसा सूक्ष्म दृष्टीच्या मनुष्यावांचून अन्यांना दिसत नाहीं; तसें हें नादब्रह्म अंतर्दृष्टि योगी पुरुषावांचून अन्यांना दिसत नाहीं. हें माझेंच गूढ रूप होय; हें माझ्यामुळेंच उत्पन्न झालें आहे; आणि ह्याचें तेज माझ्याप्रमाणेंच अंतर्यामीं रूपानें सर्वव्यापक आहे. आतां शब्दब्रह्माचें स्थूल स्वरूप जी वैखरी वाणी, ती कशी उत्पन्न होतें तें सांगतोंः---

**शब्दब्रह्माचें स्थूल स्वरूपः**---उद्धवा, ज्याप्रमाणें ऊर्णनाभि (कोळी नामक किडा) आपल्या हृदयापासून मुखावाटें तंतु बाहेर काढितो; त्याप्रमाणें समष्टि प्राणमय जो हिरण्यगर्भरूप भगवान्, वेदरूप अमृतमय नाद हें उपादान कारण घेऊन, हृदयाकाशापासून मन ह्या निमित्त कारणानें वैखरी (वाणी) उत्पन्न करितो. हे ध्वनी सहस्रावधि आहेत; तरी ॐकार हा मुख्य आहे. त्यापासुन पुढें ऊर, कंठ इ-

त्यादि स्थानांच्या संबंधानें स्पर्शावरून स्पष्ट होणारे ह्या ध्वनीस स्वर ( अ, आ इत्यादि सोळा ), पांच वर्ग ( क वर्ग, च वर्ग, ट वर्ग, त- वर्ग व पवर्ग हे पंचवीस ), उष्मे ( श, ष, स, ह ), आणि अंत- स्थ ( य, र, ल, व ) हे वर्ण त्या वाणीला भूषवितात. पुढें तीच वाणी वैदिक व लौकिक अशा विचित्र भाषांनीं विस्तारिली जाते. नंतर ती- मध्यें एकापेक्षां एक चार चार अक्षरांनीं मोठाले असे छंद ( वृत्तें ) हो- तात. अशा रीतीनें ती अनंत व अपार होते. शेवटीं कोळी जसा स्वतः पसरलेलें जाळें आपणच आटोपून घेतो; तसा तो भगवान् हिरण्यगर्भ ह्या वाणीचा उपसंहार आपण स्वतःच करितो! आतां त्यांपैकीं थोड्या- शा छंदांचीं ( वृत्तांचीं ) नांवें येथें सांगतों:--

**छंदांचीं नांवें**—उद्धवा, गायत्री, उष्णिक्, अनुष्टुप्, बृहती, पंक्ति, त्रिष्टुप्, जगती, अतिजगती, अष्टि, अत्यष्टि, विराट् आणि अतिवि- राट् हीं श्रुतींतील छंदांचीं नांवें होत. ह्यांपैकीं गायत्रीचीं अक्षरें चोवीस, उष्णिकाचीं अठ्ठावीस अशीं अनुक्रमें प्रत्येक छंदाचीं चार चार अक्षरें अधिक आहेत. एतावता वैखरी वाणीचें सुद्धां स्वरूप सर्वथा कळणें अशक्य होय हें उघड आहे. उद्धवा, ही वेदवाणी कर्मकांडामध्यें वि- धान कसलें करिते, उपासनाकांडांत काय प्रकाश करिते, आणि ज्ञान- कांडांत कशाचा अनुवाद करिते इत्यादिकांचें हृद्गत मजवांचून ह्या लोकांमध्यें कोणीही जाणत नाहींत. पुण्यपुरुषा ! ती वेदवाणी कर्मकां- डामध्यें यज्ञरूपी माझेंच विधान करिते; उपासनाकांडामध्यें सर्व देवता- रूपानें माझेंच वर्णन करिते; आणि ज्ञानकांडामध्यें यच्चयावत् स्थिरचर जगत् परब्रह्मरूपीं ह्मणजे माझ्याच ठिकाणीं आहे असें प्रतिपादन क- रते. पहाः—अंकुरांत जो रस असतो तो, त्या वृक्षाच्या विस्तरामध्यें

पसरलेला असतो; तद्वत् प्रणवाचा ( ॐकाराचा ) अर्थ जो परमेश्वर तोच सगळ्या वेदाच्या कांडांचा व शाखांचाही अर्थ असणें महाजीकच होय. सारांश-ह्या वेदवाणीचा आशय असा आहे कीं, ' हें सर्व स्थूल सूक्ष्म ब्रह्मांड मायामय असल्यामुळें मिथ्या आहे. व ह्यास आश्रयभूत जें परब्रह्म, तेंच सत्य होय ! ' इति । १५.

# अध्याय १६ वा.

## नादब्रह्म निरूपण ( १२-६ ).

सूत उवाच—

समाहितात्मनो ब्रह्मन्ब्रह्मणः परमेष्ठिनः ॥
हृद्याकाशादभून्नादो वृत्तिरोधाद्विभाव्यते ॥ ३७ ॥

**सूत ह्मणालेः**—ऋषि हो, परमेष्ठि ब्रह्मदेव एकाग्र चित्तानें ध्यानस्थ बसला असतां त्याच्या हृदयाकाशांत नाद उत्पन्न झाला. तो नाद प्राणनिरोधानें व्यक्त होतो ! पहा-जसें कोणीही मनुष्य आपल्या हातानें कर्णद्वार दाबून बंद करून बसलें असतां हृदयांतून नवविध नादांपैकीं कांहीं नाद ऐकूं येतात ( हा अनुभव प्रत्येकाला आहेच ); तद्वत् षण्मुखी इत्यादि मुद्रांच्या साधनानें साधकाच्या हृदयांत दशम जो प्रणवनाद तो उत्पन्न होतो. जे योगी ह्या नादब्रह्माची उपासना करि-

( १ ) अदृष्टविग्रहो देवो भावाद्ग्राह्यो मनोमयः । तस्योंकारः स्मृतो नाम तेनाहूतः प्रसीदति । **अर्थ**-अदृष्टविग्रह मनोमय । भावें करितां जो का ग्राह्य ॥ सर्वशक्ति मानसीं पाहे । ॐकार नामा । जैसें घेऊन नामविशेषण । कोणी पुरुषा बोलावितां आपण ॥ तो येतसे चालून । आपणाजवळी.—**याज्ञवल्क्यसंहिता.**

( २ ) एतद्वै सत्यकामं परं चापरं च ब्रह्म यदोंकारस्तस्माद्विद्वानेतेनैवायतनेनैतरमन्वेति ॥ **अर्थ**—ईश्वररूप जो ॐकार त्याची उपासना परापर व निष्काम

तात, ते ह्या द्वारें मल, विक्षेप व कषाय संज्ञक त्रिविध दोष धुऊन टाकून मोक्षाप्रत पावतात. ह्या नादब्रह्मापासून " अ, उ, म् " हा त्रिमातृक " ॐ " कार उत्पन्न झाला. हा कंठ, ओष्ठ इत्यादि स्थानीं उच्चारिल्या जाणाऱ्या वर्णमालेसारखा नव्हे. कारण, ह्याचें उगमस्थान अव्यक्त ( स्पष्ट न कळणारें ) आहे. हा स्वतःसिद्ध असल्यामुळें हृदयाकाशांत नादरूपानें स्वतःच प्रकट होतो. भगवान् परब्रह्म परमात्म्याचें अस्तित्व ह्याच्यावरून ध्यानांत येतें. हा प्रणवनाद जो श्रवण करतो तो परमात्मा होय. तुह्मी ह्मणाल कीं, ' नाद ऐकणारा जीवच.' तर तसें नव्हे. कारण, नादाचें ज्ञान इंद्रियाधीन असतें, व श्रवण करण्याचें इंद्रिय बंद केल्यावरही नाद ऐकू येतो. ह्यास्तव नाद ऐकणारा जीव नव्हे, तर तो परमात्माच होय. परमात्म्याचें ज्ञान जीवाप्रमाणें इंद्रियांच्या आधीन नाहीं, व त्याच्या स्वरूपीं इंद्रियेंच नाहींत ! त्या ॐ कारापासून पुढें वाणी व्यक्त होते, व त्याची व्यक्ति हृदयाकाशांत आत्म्यापासून आहे. अशा त्या ॐ काराचें स्वरूप सांगतोः—

( १ ) **ॐकार स्वरूप**---ॐकार आपल्या स्वतःचा आश्रयभूत वाच्य जो साक्षात् परब्रह्म परमात्मा तो त्याचा वाचक असून हा सर्व मंत्रांचें, उपनिषदांचें व वेदाचें बीज ह्मणजे मुख्य कारण होय. इतकें असून ह्याचें स्वरूप सर्वदा एकसारखें ( विकाररहित ) आहे. ऋषीनी, त्या ॐकारामध्यें " अ, उ, म् " अशा तीन वर्णमात्रा आहेत व

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

किंवा सकाम बुद्धीनें केली असतां परब्रह्माचा अनुभव येतो. जो याची निष्काम उपासना करितो त्यास ज्ञानयोगानें येथेंच मोक्षप्राप्ति होते. परंतु जो सकाम उपासना करितो त्याला ब्रह्मदेवाचा कल्प होईपर्यंत ब्रह्मदेवाबरोबर वास राहवा लागतो, आणि कल्प संपतांच ब्रह्मदेवाबरोबरच मोक्षप्राप्ति होते.—**अथर्ववेद प्रश्नोपनिषद्** .

त्या " ॐ " कारच्या त्रिवर्ण मातृकांवरून तीनच धर्म निर्माण झाले आहेत; ते धर्म पुढें सांगितल्याप्रमाणें समजावे:—प्रथम सत्व, रज व तम हे तीन गुण; ऋक्, यजु:, साम हे तीन वेद; भू:, भुव:, स्व हे तीन लोक आणि जाग्रत्, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीन अवस्था हे होत. त्या ॐकारापासून ब्रह्मदेवानें वर्णसमूह निर्मिला; त्या वर्णसमूहाची, स्वर ( अ, इ, उ इत्यादि ), स्पर्श ( क पासून म पर्यंत ), अंतस्थ ( य, र, ल, व ), ऊष्मे ( श, ष, स, ह ) आणि जिव्हामूलीय, उपध्मानीय, ऱ्हस्व, दीर्घ इत्यादि लक्षणें होत. आतां ह्या वर्णसमूहाच्या योगें वेदांची उत्पत्ति कशी होते, तें सांगतों:—

( २ ) **वेदांची उत्पत्तिः**—त्या वर्णसमूहाच्या योगानें महान् समर्थ ब्रह्मदेवानें आपल्या चार मुखांतून चातुर्होत्र कर्माच्या ( चार ऋत्विजांनी चालविलेले यज्ञकर्माच्या ) सिद्धीकरितां भू:, भुव:, स्व:, मह:, जन:, तप:, सत्यं ह्या सप्त व्याहृतींसह ॐकारासुद्धां चार वेद निर्माण केले. नंतर त्यानें ते वेद आपल्या मरीचीप्रभृति पुत्रांना पढविले. हे ब्रह्मर्षि ( ब्रह्मदेवाचे पुत्र ) वेदाचा उच्चार वगैरे करण्यांत निष्णात होते. पुढें त्या धर्मोपदेशक मुनींनीं ते आपल्या पुत्रांना शिकविले. अशा परंपरेनें ते वेद त्यांच्या त्यांच्या शिष्यांनी यथाशास्त्र व्रताचरण पाळीत गुरुशिष्य परंपरेनें चतुर्युगांत आणिले; व द्वापारयुगाच्या शेवटीं महर्षींनीं त्यांचे अनेक विभाग केले. ते असे:—

( ३ ) **वेदांचे विभागः**—पुढें कालगतीनें हळू हळू प्राण्यांची आयुर्मर्यादा कमी होत चालली, सत्व क्षीण झालें व बुद्धिही मंद झाली, हें पाहून ब्रह्मर्षींनीं वेदांचे द्वापारयुगाच्या शेवटीं अनेक विभाग केले. ते विभाग अंतर्यामीं वास करणाऱ्या परमेश्वराच्या प्रेरणेनेंच पाडिले; अर्थात् ईश्वरानेंच केले, हें सिद्ध आहे. हे ब्रह्मन् ! ह्या वैवस्वत मन्वंतरामध्येंही ब्रह्मदेव, शंकर, इंद्र इत्यादि लोकपालांनीं प्रार्थना केल्या-

रून जगन्नियंता भगवान् धर्मांचें संरक्षण करण्यासाठीं पराशरापासून सत्यवतीच्या उदरीं मायेच्या सत्वगुणाच्या अंशानें व्यासरूपानें अवतार घेता झाला आणि ब्रह्मदेवापासून उत्पन्न झालेल्या चार वेदांचें प्रकरणरूपानें पृथक्करण करून ऋक्, यजुः, साम व अथर्व अशा चार संहिता सिद्ध केल्या. पुढें भगवान् व्यासानें आपल्या शिष्यांपैकीं चौघांस बोलावून त्यांपैकीं एकेकास एकेक संहिता दिली "बह्वृच" (ऋग्वेद) नांवाची आद्यसंहिता पैलाला सांगितली; "निगद" नामक यजुर्वेदसंहिता वैशंपायनाला पढविली; "छांदोग्य" नामक सामवेदसंहिता जैमिनीला शिकविली; व "आंगीरसी" नामक अथर्वसंहिता सुमंतु शिष्याला सांगितली इति । १६.

# अध्याय १७ वा.

—:※:—

## प्रकृति निवृत्त्युपाय ( ३–२७ ).

देवहूति उवाचः—

पुरुषं प्रकृतिर्ब्रह्मन्न विमुंचति कर्हिचित् ॥
अन्योऽन्यापाश्रयत्वाच्च नित्यत्वादनयोः प्रभो ॥ १७ ॥
यथा गंधस्य भूमेश्च न भावो व्यतिरेकतः ॥
अपां रसस्य च यथा तथा बुद्धेः परस्य च ॥ १८ ॥
अकर्तुः कर्मबंधोऽयं पुरुषस्य यदाश्रयः ॥
गुणेषु सत्सु प्रकृतेः कैवल्यं तेष्वतः कथम् ॥ १९ ॥
क्वचित्तत्त्वावमर्शेन निवृत्तं भयमुल्बणम् ॥
अनिवृत्तनिमित्तत्वात्पुनः प्रत्यवतिष्ठते ॥ २० ॥

**देवहूति म्हणाली:**—हे ब्रह्मज्ञ प्रभो कपिला, माझी एक शंका अशी आहे कीं, पुरुषाशिवाय तत्त्वसमुदायरूप प्रकृतीचें स्वरूप सम-

जत नाहीं; आणि प्रकृतीवांचून पुरुषाचें स्वरूप व्यक्त होत नाहीं; एकं-दरींत ह्या दोघांचा अन्योन्याश्रय असून दोघेही नित्य आहेत. तेव्हां प्रकृति पुरुषाला कधींही सोडूं शकणार नाहीं. यांस दृष्टांत–गंध आणि भूमि किंवा रस आणि उदक ह्या द्वंद्व पदार्थांचा अन्योन्याश्रय असल्यामुळें ते एकमेकांपासून जसे निरनिराळे राहूं शकत नाहींत; त्याप्रमाणेंच प्रकृति आणि पुरुष हे दोघे एकमेकांस सोडून कधींच असत नाहींत; अर्थात् प्रकृति आहे तोंपर्यंत तिचे गुण असणारच हें निर्विवाद आहे. वस्तुतः पुरुष कर्तृत्वरहित असूनही ज्या गुणांच्या आश्रयामुळें कर्मांपासून त्याला संसारबंध प्राप्त होतो. ते प्रकृतीचे गुण विद्यमान असतां त्या पुरुषाला कैवल्यमोक्ष मिळणार कसा? सर्वज्ञ कपिला, तत्त्वज्ञानाच्या विचारानें संसाररूपी प्रचंड भय बहुतेक निवृत्त झालें, तरी त्याचें निमित्त कारण जे गुण ते नष्ट झाले नसतात. ह्मणजे ते विद्यमान असल्यामुळें संसाररूपी प्रचंड भय पुन्हां प्राप्त होण्याचा संभव असतो! तेव्हां तें भय सर्वथा नाहींसें होण्याला उपाय काय? तें मला सांग.

**भगवान कपिल महामुनि म्हणालेः**—माते देवहूति! प्रकृतीचा केवळ संबंध असल्यामुळें पुरुषाला बंधन प्राप्त होतें असें नाहीं; तर तिच्या ठिकाणीं चांगुलपणा मानून तिजवर आसक्ति ठेविली कीं, तो संसारपाशांत पडतो. आणि ती आसक्ति सुटली कीं पुरुष मुक्त होतो. 'कित्येक लोक बहुतकरून बंधापासून मुक्त झाले असूनही पुन्हां संसार पाशांत पडतात.' कदाचित् तूं असें ह्मणशील, तर तसें होण्याला कारण, त्यांच्या साधनांमधील व्यंग हें होय. म्हणून साधनांत व्यंग न पडूं देण्याची साधकानें पूर्ण व्यवस्था ठेवावी. तीं साधनें अशीं:–प्रथम कोणत्याही प्रकारच्या फलाची इच्छा न धरितां ह्मणजे केवळ ईश्वरार्पणबुद्धीनें निष्काम स्वधर्माचरण करावें; अंतःकरण निर्मल ठेवावें ह्मणजे राग–द्वेष हे विकार उत्पन्न होऊं देऊं नयेत; परमेश्वराच्या ठि-

काणीं दृढभक्ति ठेवून चिरकाल त्याच्या कथा श्रवण कराव्या, ह्मणजे ती उत्तरोत्तर वृद्धिंगत होत जाते; प्रकृति व पुरुष ह्यांच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून घ्यावें; कोणत्याही विषयांच्या वासनेनें ढळणार नाहीं असें तीव्र वैराग्य धारण करावें; शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें मित भोजन आदिकरून तपश्चर्या करावी; आणि तसेंच अष्टांग योगानें साधन करून निश्चलपणें आत्मस्वरूपाचें ध्यान करण्याचा अभ्यास चालवावा. ह्याप्रमाणें नित्य क्रम चालू ठेविला असतां पुरुषाच्या प्रकृतीचा हळू हळू क्षय होऊं लागतो. दृष्टांत—जसें अरणीपासून अग्नि उत्पन्न होतो व त्याच्याच योगानें ती जळून नाहींशी होते; त्याप्रमाणें प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या तत्त्वसमुदायाच्या साह्यानें प्राप्त करून घेतलेल्या ज्ञानाच्या योगानें ह्या पुरुषाच्या ठिकाणीं असणारी प्रकृति अगदीं नाहींशी होईल. प्रकृतीचे भोग भोगीत असतां तिच्या ठिकाणीं संसारदुःखाला कारणीभूत असे अनेक दोष आहेत असें नित्य नित्य दिसून येत गेलें कीं, पुरुषाला तिचा वीट येऊं लागतो. मग तिच्यावरील आसक्ति मोडून देऊन तो आपल्या अतिश्रेष्ठ परमानंदस्वरूपास प्राप्त होतो. अशा रीतीनें प्रकृति नाहींशी झाली ह्मणजे ती पुन्हां उत्पन्न होत नाहीं; व म्हणून प्रकृतीपासून त्याचें कांहीं सुद्धां अकल्याण होऊं शकत नाहीं. उदाहरणः—मनुष्याला स्वप्नामध्यें कितीही भय, शोक किंवा दुःख प्राप्त झालें असतांही व जागृतकालीं तें सर्व आठवत असूनही जसा त्याला मोह पडत नाहीं; तद्वतच तत्त्वज्ञानाच्या योगानें आत्मस्वरूपीं रममाण असणाऱ्या पुरुषाला प्रकृति कधींही अपाय करीत नाहीं. माते, ह्या सांगितलेल्या रितीप्रमाणें अनेक जन्मपर्यंत साधनांचें अनुष्ठान करावें; तेव्हां साधकाची आत्मस्वरूपीं प्रीति जडते व त्याला विवेक उत्पन्न होतो. पुढें ब्रह्मलोकांसह सर्व लोकांविषयीं वैराग्य उत्पन्न होऊन त्याची परमेश्वरावर भक्ति जडते; त्या भक्तीच्या द्वारानें त्याला

आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान प्राप्त होतें; आणि त्या आत्मज्ञानाच्या योगानें त्याचे असंभावनादि सर्व संशय दूर होतात व तो गंभीर पुरुष ईश्वरानुग्रहामुळें परमेश्वराच्या आश्रयानें असलेल्या परमानंदरूप मोक्षपदास सहज प्राप्त होतो. त्या ठिकाणीं देह, इंद्रियें कांहींच नाहीत, व तेथें प्राप्त झाल्यावर लिंग देहाचा भंग होतो. म्हणून योग्याला पुन्हां या संसारांत यावें लागत नाहीं.

माते देवहूति, अशा प्रकारचें आचरण करीत असतांना मोक्षप्राप्तीला अणिमादि सिद्धींचें मोठें विघ्न असतें; म्हणून साधकानें त्या सिद्धीच्या फंदांत पडूं नये. कारण, योगाभ्यासाच्या योगानें त्या पूर्णपणें प्राप्त होतात; त्यांच्या प्राप्तीला योगाशिवाय दुसरें साधन नाहीं; व साधक पुरुषाच्या मनाला तेव्हांच मोहांत पाडितात. तेथें योग्याचें अंतःकरण गुंतलें नाहीं ह्मणजे मग त्याला परमेश्वराची उत्तम व नाशरहित गति प्राप्त होते. ह्या गतीच्या ठिकाणीं मृत्यूचा गर्व मुळींच चालत नाहीं; पण सिद्धीमध्यें ह्याचें मन गुंतलें तर मात्र त्याला मृत्यु व संसार प्राप्त होतात. मग मृत्यूलाही गर्व वाटूं लागतो कीं, " मोठमोठ्या सिद्धांला देखील मीं आपल्या स्वाधीन करून घेतलें ! " ह्मणून अणिमादि सिद्धींच्या मोहजालांत न सांपडण्याविषयीं साधकानें फार दक्षता बाळगावी. इति । १७.

---

# अध्याय १८ वा.

## सृष्टीचा उपक्रमोपसंहार ( ११–२४ ).

श्रीभगवानुवाचः—

अथ ते संप्रवक्ष्यामि सांख्यं पूर्वैर्विनिश्चितम् ॥
यद्विज्ञाय पुमान्सद्यो जह्याद्वैकल्पिकं भ्रमम् ॥ १ ॥

श्रीकृष्ण ह्मणाले:—उद्धवा, मनुष्याची सुखदुःखात्मक भेदभ्रांति नाहींशी होण्याकरितां कपिलादिकं पूर्वाचार्यांनीं निश्चित केलेलें सांख्य शास्त्र मी तुला सांगतों तें श्रवण कर. ह्या शास्त्राच्या ज्ञानानें सृष्टीचा उपक्रम व उपसंहार कसा होतो हें तुला कळेल मग त्यायोगानें परब्रह्माशिवाय सर्व कांहीं मिथ्या आहे अशी तुझी खात्री होईल.

(१) सृष्टीचा उपक्रम:—पूर्वी प्रलयकालीं हें स्थावरजंगमात्मक सर्व विश्व परमात्म्यामध्येंच लीन झालेलें होतें, त्यावेळीं द्रष्टा व दृश्य हा भेद मुळींच नसून सर्व ब्रह्मांड केवळ एक ज्ञानमय होतें. जशी ही स्थिति प्रलयकालीं होती; त्याचप्रमाणें कृतयुगांत व अन्य युगांतही जेव्हां जेव्हां विचारनिपुण असे जन उत्पन्न होतात तेव्हां ती असते. कारण त्या जनांस किंचित् मात्रही ज्ञानस्वरूपाचे ठायीं भेदाचें भान कधींच असत नाहीं. असें निर्विकल्प ज्ञानरूप जें ब्रह्म तेंच मायेच्या व तिच्यामुळें उत्पन्न झालेल्या प्रतिबिंबाच्या रूपानें द्विधा भासूं लागतें; अशा रीतीनें तें दोन प्रकारचें होऊन वाणी व मन यांस गोचर (विषयभूत) असें झालें. या दोन प्रकारांमध्यें एक पदार्थ कार्यकारणरूप प्रकृति होय; आणि दुसरा पदार्थ ज्ञानमय होय. यासच पुरुष असें म्हणतात. उद्धवा, नंतर मीं पुरुषाच्या द्वारें प्रकृतीचा क्षोभ केला, तेव्हां तिच्यापासून सत्व, रज व तम हे तीन गुण प्रगट झाले. ह्या त्रिगुणांपासून क्रियाशक्तिमान् "सूत्रात्मा" नांवाचा प्रथम विकार झाला. त्यापासून ज्ञानशक्तिरूप महत्तत्त्व हें निर्माण झालें. त्या महत्तत्त्वास विकार होऊन त्यापासून जीवास मोह उद्भवणारा अहंकार उत्पन्न झाला. ह्या अहंकाराचे सात्विक, राजस व तामस असे तीन प्रकार आहेत. तो तप्तलोहपिंडवत् चिज्जडग्रंथिरूप असून शब्दस्पर्शादि पंचविषय, पंचज्ञानेंद्रियें, पंचकर्मेंद्रियें, मन व देवता यांच्या उत्पत्तीस

(१) योगप्रकरण ५ वा अध्याय पहा.

कारण होतो ह्या त्रिविध अहंकारांपैकीं सात्विक अहंकारापासून मन व इंद्रियांच्या देवता उत्पन्न झाल्या;[१] राजस अहंकारापासून पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें झालीं; आणि तामस अहंकारापासून आकाशादिक पंचमहाभूतें उद्भास आलीं. माझ्या प्रेरणेनें हे सर्व सृष्ट पदार्थ एकमेकांच्या साह्यानें कार्य करणारे झाले. तें असें–उद्धवा! तीं पंचमहाभूतें अपंचीकृत ( एकमेकांत मिश्रण न पावलेलीं ) असतांना त्यांपासून समष्ट्यात्मक सूक्ष्मशरीर उत्पन्न होतें; आणि तींच पंचीकृत ( एकमेकांत मिश्रण पावलेल्या ) भूतांपासून हें स्थूल ब्रह्मांड उत्पन्न होतें. हे उद्धवा. ह्या चराचर विश्वामध्यें लहान, मोठा, कृश व स्थूल इत्यादि जो जो पदार्थ आहे, तो तो सर्व प्रकृति व पुरुष ह्या उभयतांनीं युक्त आहे. ह्या सर्व पदार्थांचें सत्यरूप कोणतें हें सुवर्ण किंवा मृत्तिका ह्या दृष्टांतावरून लक्षांत येईल तें असें:–कार्याच्या[२] आदि व अंतीं एक असणारा जो पदार्थ तोच सत्य होय. जसें सुवर्ण किंवा मृत्तिका. केवळ मध्येंच भासणारा आणि आदि अंतीं नसणारा तो पदार्थ मिथ्या होय. जसा अलंकार किंवा घट. आतां पहिला सुवर्ण दृष्टांत–सुवर्णाचा अलंकार घेऊन त्याचें आद्यंत काय आहे, ह्याचा विचार केला म्हणजे तो अलंकार बनण्याच्या आधीं सुवर्ण होतें. तो मोडल्या अंतीं सुवर्णच राहणार, तर मध्य हा सुवर्णच आहे तेव्हां त्या अलंकारामध्यें सुवर्णच सत्य असून अलंकार मिथ्या होय; तद्वत ह्या ब्रह्मांडांतील स्थूलसूक्ष्म पदार्थ हे केवळ व्यवहाराकरितां असून ह्यांच्या ठिकाणीं सत्यत्व असें मुळींच नाहीं, तर मग ह्या सर्व पदार्थांचें आदि ब्रह्म व अंतीं ब्रह्म असल्यामुळें मध्य ब्रह्मच आहे. म्हणून सर्व ब्रह्ममय होय. आतां दुसरा मृत्तिका दृष्टांत–मृत्तिकेच्या संबंधानें जरी कार्यरूप घट सत्य मानिला तरी त्या मृन्मय घटाचा मृत्तिकादृष्टीनें विचार केला असतां तो कार्य-

( १ ) योगप्रकरण ५ वा अध्याय पहा. ( २ ) ज्ञानप्रकरण ४ था अध्याय पहा.

रूप असल्यामुळें मिथ्या होय. आणि तो घट केवळ मृन्मय असल्यामुळें " मृत्तिकेत्येव सत्यं " या श्रुति वचनाप्रमाणें कारणरूप मृत्तिकाच सत्य होय. तद्वत जगदृष्टच्या महत्तत्त्वादिकांस सत्य मानिलें तरी ब्रह्मदृष्टच्या तीं कार्येंच असल्यामुळें त्यांस सत्यता नाहीं, तर कारणरूपी ब्रह्मच परम सत्य होय. उद्धवा! तूं आतां कदाचित् असें म्हणशील कीं, 'प्रकृति, पुरुष आणि काल हें स्वतः कार्यभूत नसून जगद्रूप कार्याचें निमित्त कारण आहेत; तर मग जगत्कारण परमात्म्यास अद्वितीयत्व कसें येतें?' तर याविषयीं सांगतों—ह्या जगताचें निमित्त कारण जी प्रकृति ती, आणि तिचा आधार जो पुरुष तो, आणि गुणांचा क्षोभ करून जगत्कार्यास व्यक्त करणारा जो काल तो, याप्रमाणें हीं तिन्ही माझींच रूपें होत. मजहून भिन्न कांहींच नाहीं. कारण, प्रकृति तर माझी शक्तीच आहे व पुरुष आणि काळ ह्या माझ्या अवस्था होत. उद्धवा, नानाप्रकारच्या देहांत जन्म पावणाऱ्या जीवाला विविध भोग मिळवून देण्यासाठीं केलेली ही सृष्टि पिता, पुत्र व पौत्र इत्यादि रूपानें अविच्छिन्न असून फार मोठी आहे. सारांश—प्रथम आत्म्यापासून आकाश उत्पन्न झालें, आकाशापासून वायु, वायुपासून अग्नि, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथ्वी, पृथ्वीपासून औषधी, औषधीपासून अन्न आणि अन्नापासून पुरुष अशा क्रमानें सृष्टीची उत्पत्ति आहे. आतां त्या सृष्टिक्रमाच्या उलट जगल्लयाचा प्रकार सांगतोः—

(२) **सृष्टीचा उपसंहार**—उद्धवा! ज्यापासून हें शरीर पुष्ट होतें, तें अन्न प्रळयकालसमयीं शंभर वर्षें अनावृष्टि होऊन नष्ट झालें असतां तें शरीर त्या अन्नांत लीन होतें; मग तें अन्न बीजामध्यें लय

(१) " जेवीं तंतूपासाव कोटी पट। कोटी पटीं तंतू एकवट। पहातां आदिमध्य शेवट। द्वैताचें बोट रिघेना॥ " किंवा " तरंगा आदिमध्यअवसानीं। जेवीं पाणीपणें असे पाणी। तेवीं उत्पत्ति स्थिति निधानीं। वस्तु वस्तुपणीं अनश्वर"—**नाथ.**

पावतें, ह्मणजे बीजें मात्र शेष राहतात. तीं बीजें पृथ्वीचे ठायीं लय पावतात, ह्मणजे तीं पुन्हां पृथ्वींतून उगवत नाहींत. पृथ्वी गंधांत लीन होते, ह्मणजे प्रलय काळींच्या सूर्यतापानें शुष्क होऊन व शेषाच्या मुखांतल्या अग्नीनें दग्ध होऊन गंधरूपानें मात्र अवशिष्ट राहते. तो गंध शंभर वर्षेपर्यंत अतिवृष्टि होत असल्यामुळें कुजून जाऊन उदकांत लीन होतो. नंतर तें उदक तेजानें शुष्क होऊन रसांत लीन होतें. ह्मणजे रसरूपानें मात्र शेष राहतें. पुढें तो रस तेजांत लय पावतो. तेज वायूनें पराभूत होऊन रूपमात्रानें अवशिष्ट राहतें. मग तें वायूंत लीन होऊन जातें. पुढें तो वायु आकाशांत अंतर्हित होऊन स्पर्शरूपानें उरतो. नंतर तो स्पर्श आकाशांत लीन होतो. मग तें आकाश महाभूतांस कारण जो तामस अहंकार त्याजकडून ग्रस्त होऊन शब्दतन्मात्रा ( सूक्ष्म शब्द ) अवशिष्ट राहतो. नंतर तो सूक्ष्मशब्द त्या तामस अहंकारांत लय पावतो. पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें हीं आपला कारण जो राजस अहंकार त्याचे ठायीं लीन होतात. असा शास्त्राचा अभिप्राय आहे. तथापि इंद्रियांची प्रवृत्ति देवताधीन असल्यामुळें त्यांचा लय देवतांचे ठिकाणीं आहे. ह्मणून इंद्रियें आपापल्या अधिष्ठात्री देवतामध्यें लय पावतात. व त्या देवता सर्वेंद्रियांचें प्रवर्तक जें मन त्याचे ठायीं लीन होतात. आणि तें मन सर्व देवतांसह सात्विक अहंकाराचे ठिकाणीं लीन होतें. जगन्मोहक असा जो त्रिविध ( सात्विक, राजस व तामस ) अहंकार तो महत्तत्त्वाचे ठिकाणीं लय पावतो, ह्मणजे जडांशाचा त्याग करून केवळ ज्ञानक्रियाशक्तिरूप उरतो. तें महत्तत्त्व ज्ञान व क्रिया या शक्तींनीं युक्त असल्यामुळें अत्यंत गुणसंपन्न असून तें आपणास कारण जे सत्व, रज व तम ह्या तीन गुणांत लय पावतें. नंतर ते सत्वादि त्रिगुण अव्यक्तामध्यें लीन होतात, म्हणजे प्रकृतिसाम्यावस्थेस प्राप्त होतात; आणि तें अव्यक्त कालाधीन असल्यामुळें त्या कालाचे ठि-

काणीं लीन होतें. म्हणजे त्या कालाशीं ऐक्य होऊन राहतें. पुढें तो काल मायाप्रवर्तक असा जो महापुरुष त्याचे ठायीं लीन होतो; आणि तो ( जीव ) जन्ममरणरहित जो सर्वात्मा मी त्या माझे ठायीं लय पावतो, म्हणजे जीव हा आपल्या स्वरूपांत लीन झाल्यानंतर त्यास द्वैताचा अभाव होत असल्यामुळें तो परिपूर्ण अशा सद्रूपानें स्थिर होतो. आतां तो आत्मा ( मी ) मात्र आपलेच ठिकाणीं स्थित असल्यामुळें त्याचा लय अन्यत्र कोठेंही होऊं शकत नाहीं. कारण तो निरुपाधि असून सर्व जगताच्या उत्पत्ति, स्थिति व प्रलयास अधिष्ठान आहे. उद्धवा, अशा उपक्रमोपसंहाराच्या रीतीनें सृष्टीची उत्पत्ति व लय ह्यांचा विचार करणाऱ्या साधुवराच्या मनाचा भ्रम, जसा सूर्य उगवतांच अंधकाराचा नाश होतो. तसा नाश पावतो. ह्मणून मी हा संशयग्रंथीचा भेद करणारा सांख्यशास्त्राचा विचार तुला सांगितला. इति । १८.

---

# अध्याय १९ वा.

## चतुर्व्यूहोपासना ( ३—२६ ).

श्रीभगवानुवाचः—

यत्तत्सत्वगुणं स्वच्छं शांतं भगवतः पदम्॥
यदाहुर्वासुदेवाख्यं चित्तं तन्महदात्मकम्॥ २१॥

**भगवान् कपिल महामुनि म्हणालेः**—माते ! [१] सर्व वेदां-

---

( १ ) " उत्पत्ति स्थिति प्रळयांत । ब्रह्म अखंड निज नित्य । हेंची सांख्ययोगें प्राप्त । जाण निश्चित साधक ॥ लिंग देह सैंधव गिरिवर । सांख्य अत्यंत प्रलयसागर । खवळला विरवूनी करी नीर । एकाकार निजात्मता ॥ सकल संशयाचें च्छेदन । लिंगदेहाचें भेदन । करी तें सांख्ययोगज्ञान । उद्धवा जाण निश्चित "–**नाथ.**

मध्यें प्रसिद्ध असलेलें निर्मल व रागद्वेषादिरहित असें जें भगवत्प्राप्तीचें स्थान व ज्याला वासुदेव नामक चिद्रूपी पद असें ह्मणतात, तेंच " महत्तत्त्व " होय. हा चतुर्व्यूह उपासनेंतील पहिला व्यूह समजावा. ह्या महत्तत्त्वाला अधिभूतरूपानें महत्तत्त्व ही संज्ञा आहे, अध्यात्मरूपानें चित्त ही संज्ञा आहे, अधिदैवरूपानें वासुदेव ही संज्ञा आहे, आणि त्याचा अधिष्ठाता क्षेत्रज्ञ होय. जेव्हां उदकाला पृथ्वीचा संपर्क झालेला नसतो, व त्यावर फेस, लाटा वगैरे नसतात; तेव्हां उदकाचें खरें स्वरूप मधुर, स्वच्छ व शांत असतें. आणि नंतर तें उदक पृथ्वी, वायु वगैरेंच्या संसर्गानें जसें फेस, गढूळ वगैरे विकार पावतें; त्याप्रमाणें चित्ताची स्थिति आहे. पहा—चित्तामध्यें वृत्ति उत्पन्न होण्यापूर्वी चित्ताचें लक्षण स्वच्छत्व ( बिंब ग्रहण करण्यास योग्य ), निर्विकार ( रागद्वेषादि विकार नसणें ) व शांत ( अंतर्मुख ) असें असतें; आणि त्या चित्ताला विषयसंसर्ग झाला कीं, तें विकार पावतें.

[२] भगवंताच्या चिच्छक्तीपासून उत्पन्न झालेलें तें महत्तत्त्व कालगतीनें विकार पावूं लागलें तेव्हां त्यापासून सात्विक, राजस, व तामस अशा तीन प्रकारांचा अहंकार उत्पन्न झाला. त्या अहंकारामध्यें निरनिराळ्या क्रिया करण्याची शक्ति होती, म्हणून सात्विकापासून मन, राजसापासून इंद्रियें व तामसापासून महाभूतें हीं उत्पन्न झालीं. ह्या अहंकारालाच प्रत्यक्ष सहस्रमुखी, अनंत, भूतें, इंद्रियें व मन ह्या स्वरूपाचा " संकर्षण " नामक पुरुष असें ह्मणतात. हा चतुर्व्यूह उपासनेंतील दुसरा व्यूह आहे. अधिभूतरूपानें ह्याला भूतें, इंद्रियें व मन ह्यांचा समुदाय ही संज्ञा, अध्यात्मरूपानें अहंकार ही संज्ञा, अधिदैवरूपानें उपास्य देव संकर्षण आणि अधिष्ठाता रुद्र होय. देवतारूपानें कर्तृत्व, इंद्रियांच्या रूपानें कारणत्व व भूतांच्या रूपानें कार्यत्व हीं,

अथवा सत्व, रज व तम ह्या निरनिराळ्या गुणांप्रमाणें अनुक्रमें शांत, भयंकर व अतिमूढ हीं, त्या अहंकारांचीं लक्षणें होत.

[३] सात्विक अहंकाराला विकार उत्पन्न होऊन त्यापासून संकल्पविकल्पात्मक मनरूपी तत्त्व उत्पन्न झालें. ह्या मनालाच "अनिरुद्ध" नामक सर्व इंद्रियांचा अधिपति असें म्हणतात. त्याचा वर्ण शरदृतूंतील निळ्या कमलाप्रमाणें श्याम आहे. योगी लोक त्याची स्वस्थ चित्तानें आराधना करून त्याला वश करीत असतात. चतुर्व्यूह उपासनेंतील हा तिसरा व्यूह होय. ह्याला अधिभूतरूपानें व अध्यात्मरूपानें मन ही संज्ञा, अधिदैवरूपानें उपास्य देवता अनिरुद्ध आणि अधिष्ठाता चंद्र होय.

[४] हे महापतिव्रते ! राजस अहंकार विकार पावला, तेव्हां त्यापासून निश्चयात्मक बुद्धितत्त्व उत्पन्न झालें; ह्यालाच " प्रद्युम्न " म्हणतात. वृत्तींच्या भेदानें ह्या बुद्धितत्त्वाचीं निरनिराळीं लक्षणें झालीं आहेत: —पदार्थाचें स्वरूप समजण्याचें विशिष्ट ज्ञान, ते ते विषय मिळवून देण्याचा इंद्रियावर अनुग्रह करणें, संशय, विपरीत ज्ञान, प्रमाणज्ञान आणि निद्रा हीं लक्षणें होत. चतुर्व्यूह उपासनेंतील हा चवथा व्यूह आहे. ह्याला अधिभूत व अध्यात्म या रूपानें बुद्धि ही संज्ञा, उपास्य देवता प्रद्युम्न आणि अधिष्ठाता ब्रह्म. कर्म आणि ज्ञान ह्या दोन्ही प्रकारांचीं इंद्रियें राजस अहंकाराचीं कार्यें आहेत. कारण, कर्म ही शक्ति प्राणाची आहे व तो प्राण तैजस अहंकाराचें कार्य आहे, म्हणून कर्म करणारीं इंद्रियें तैजस ( राजस ) होत. तशीच विज्ञान ही शक्ति बुद्धीची आहे, बुद्धि राजस अहंकाराचें कार्य आहे, तेव्हां ज्ञानेंद्रियें तैजसच असलीं पाहिजेत.

**भूतांची उत्पत्ति व त्यांचीं कार्यें आणि लक्षणें:**—भगवंताच्या चिच्छक्तीकडून प्रेरणा झाल्यावर तामस अहंकार विकार पावूं लागला, तेव्हां त्यापासून शब्द हें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें. त्या शब्दा

पासून आकाश हें महाभूत झालें, त्या शब्दाचें ग्रहण करणारें इंद्रिय श्रोत्र होय. अर्थाचा आधार असणें; पाहाणागला बोधक चिन्ह होणें ( भिंतीच्या आड एखादा मनुष्य बोलत असेल तर आवाजावरून त्याचा बोध होणें ), व आकाशाच्या सूक्ष्म रूपानें असणें, हें विद्वान् लोक शब्दाचें लक्षण समजतात. तसेंच प्राणिमात्राला गतीसाठीं अवकाश देणें; आंतील व बाहेरचे व्यवहार होण्याला साधनभूत असणें; आणि प्राण, इंद्रियें व मन ह्यांस आश्रय असणें. हीं आकाशाचीं कार्यें व लक्षणें होत. शब्द हा आकाशाचा विशेष गुण आहे. तें आकाश कालगतीनें विकार पावूं लागलें, तेव्हां त्यापासून स्पर्श हें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें. त्या स्पर्शापासून वायु हें महाभूत उत्पन्न झालें. स्पर्श विषयाचा अनुभव घेणारें इंद्रिय त्वचा होय. मृदुत्व, कठिणत्व, शीतलत्व, उष्णत्व आणि वायूचें सूक्ष्मरूप असणें, हीं स्पर्शाचीं लक्षणें होत. झाडें, फांद्या वगैरे हालविणें, सुगंध्यादि वास नाकाशीं नेणें, शीत, उष्णादि त्वचेशीं संयोग करणें वगैरे, व सगळ्या इंद्रियांना ज्याचें त्याचें काम करण्यांत पटुत्व राखणें, हीं वायूचीं कार्यें व त्या कार्यांच्या द्वारानें लक्षणें होतात; स्पर्श हा वायूचा विशेष गुण होय. तो वायु कालगतीनें विकार पावला. तेव्हां त्यापासून रूप नांवाचें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें; त्या रूपापासून तेज झालें; रूप विषय ग्रहण करणारें इंद्रिय नेत्र होय. हें पतिव्रते, पदार्थमात्राला आकार प्राप्त करून देणें, पदार्थांच्या आकारानें प्रतीतिला येणें, पदार्थांच्या मानाप्रमाणें रचना असणें, आणि तेजाचा विशेष गुण होऊन राहणें, हीं रूपनामक सूक्ष्मभूताचीं लक्षणें होत. प्रकाश देणें, पचन करणें, थंडी नाहींशी करणें, क्षुधा व तृषा उत्पन्न करणें, व खाल्लेलें प्यालेलें नाहींसें करणें, हीं तेजाचीं कार्यें आणि लक्षणें होत; रूप हा तेजाचा विशेष गुण आहे. तें तेज कालगतीनें विकार पावलें; तेव्हां त्यापासून रस हें सूक्ष्मभूत उत्पन्न झालें; व त्यापासून उदक हें

महाभूत झालें. रस हा विषय ग्रहण करणारें इंद्रिय जिव्हा होय. रसाचें मूळ स्वरूप एक मधुर हेंच खरें; पण त्याला पदार्थांच्या संसर्गामुळें विकार होऊन त्याचे तुरट, कडू, तिखट आंबट, खारट असे अनेक भेद होतात. जीवन देणें, तहान भागविणें, विहिरींतून बाहेर काढिलें तरी पुन्हां वाढणें. हीं उदकाचीं कार्यें व लक्षणें होत; रस हा उदकाचा विशेष गुण होय. पुढें त्या रसगुणात्मक उदकांत विकार उत्पन्न होऊन त्यापासून गंध हें सूक्ष्मभूत झालें. व त्यापासून पृथ्वी हें महाभूत झालें. गंध विषय ग्रहण करणारें इंद्रिय घ्राण ( नासिका ) होय. तो गंध मूळचा एक असून संबंधी पदार्थांच्या मिश्रणामुळें विकार होऊन दुर्गंध, सुगंध इत्यादि भेद पावतो. प्रतिमादिरूपानें ब्रह्मवस्तूला साकारता आणणें, आश्रयाची अपेक्षा न धरितां राहणें, जलादिकांना धारण करणें, आकाशादिकांना भेद ( घटाकाश, कमंडलुगत आकाश ) उत्पन्न होणें आणि निरनिराळ्या परिणामांवरून सर्व प्राण्यांचे पुरुषत्व, स्त्रीत्व वगैरे धर्म व्यक्त करणें. हीं पृथ्वीचीं कार्यें व लक्षणें होत. आकाशाचा विशेष गुण जो शब्द तो ज्याचा विषय ( ज्याला समजतें ) तें श्रोत्रेंद्रिय म्हणजे "कान" होय; वायूचा विशेष गुण ज्याला समजतो, त्या इंद्रियाला "त्वचा" असें मानितात. तेजाचा विशेष गुण रूप ज्याला समजतें. त्या इंद्रियाला "चक्षु" म्हणतात. उदकाचा विशेष गुण रस तो ज्याला समजतो, तें इंद्रिय "जिव्हा" असें समजतात. आणि पृथ्वीचा विशेष गुण गंध, तो ज्याला कळतो त्या इंद्रियाला "घ्राण" ह्मणतात. ज्या अर्थी कारणाचा कार्यामध्यें संबंध असल्यामुळें कारणाचे धर्म कार्यामध्यें दिसून येतात. त्या अर्थी आकाशादि सर्व पदार्थांचे विशेष गुण पृथ्वीमध्यें आढळतात. उदाहरण—आकाशाचा गुण एक शब्द मात्र आहे, आकाशाचा संबंध त्याच्या कार्यांत ह्मणजे वायूंत असल्यामुळें शब्द हा आकाशाचा गुण वायूंत आला, व वायूचा विशेष गुण स्पर्श, हा

आहे, म्हणून वायूमध्यें शब्द आणि स्पर्श असे दोन गुण झाले; तसेंच वायूच्या कार्यांत ह्मणजे तेजांत शब्द, स्पर्श, रूप असे तीन गुण. उदकांत गुण चारः— शब्द, स्पर्श, रूप, रस; आणि पृथ्वींत गुण पांचः—शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध. ह्याप्रमाणें कारणांतले गुण कार्यांत असल्यामुळें क्रमानें वाढत गेले आहेत. ज्यावेळीं महत्तत्व, अहंकार आणि पंचमहाभूतें हीं सात तत्त्वें एकमेकांत संयोग पावलेलीं नव्हतीं, त्यावेळीं हीं अशींच निरनिराळीं राहिलीं तर सृष्टि बनणार नाहीं म्हणून परमेश्वरानें तत्त्वांना क्षोभविणारा " काल " " कर्म : पूर्वकल्पांतील प्राण्यांचें कर्म " आणि सत्वादि " गुण " ह्यासह त्या तत्त्वामध्यें प्रवेश केला. त्यामुळें तत्त्वांत क्षोभ उत्पन्न होऊन तीं एकत्र झालीं, व त्यांच्यापासून एक जड अंड उत्पन्न झालें. त्या अंडापासूनच विराट् पुरुषाची उत्पत्ति झाली. ह्या अंडाला ' विशेष " अशी संज्ञा आहे; व ह्यामध्येंच हा सर्व लोकांचा पसारा भरला आहे. ह्याच्या सभोंवतीं पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, अहंकार आणि महत्तत्त्व ह्यांचीं क्रमानें एकापेक्षां एक दसपट मोठालीं आवरणें असून त्या सर्वांच्या सभोंवतीं प्रकृतीचें वेष्टण आहे. हें षड्गुणैश्वर्यसंपन्न परमेश्वराचेंच स्वरूप होय. तें तेजोमय ब्रह्मांड उदकामध्यें राहिलें होतें. नंतर सर्व शक्तिमान् भगवंतानें रचना करण्यास प्रारंभ केली ती अशीः—

**विराट् पुरुषाची रचना**— प्रथम विराट् पुरुषाला मुख निर्माण झालें, त्या ठिकाणीं वाणी हें इंद्रिय व त्या इंद्रियाची अधिष्ठात्री देवता अग्नि तेथें प्रवेश करता झाला. नंतर त्याला नासिका तयार झाली, तेथें घ्राणेंद्रियासह प्राण जाऊन राहिला आणि प्राणाच्या मागून त्याची अधिष्ठात्री देवता जो वायु त्यानें त्या ठिकाणीं प्रवेश केला; मग नेत्रांचीं स्थलें उत्पन्न झालीं, त्यांत चक्षुरिंद्रियासह त्याची देवता जो सूर्य त्यानें तेथें प्रवेश केला; पुढें त्याला कानांचीं विवरें फुटलीं, तेथें श्रोत्रें-

द्रिय व त्याची अधिष्टात्री देवता दिशा ही जाऊन राहिली; त्या विराटाला त्वचा उत्पन्न झाली. तिच्यावर केश, दाढी, मिशा वगैरे उत्पन्न झाल्या; तेथें त्यांची अधिष्टात्री देवता जी औषधि ती आली; पुढें त्याला शिश्न उत्पन्न झालें तेथें रेत व त्याची देवता जें उदक तें येऊन राहिलें; तसेंच त्याला गुदद्वार आलें, त्या ठिकाणीं अपान इंद्रिय व त्याची देवता मृत्यु ही येऊन राहिली; नंतर त्याला हात उत्पन्न झाले. तेथें बळ हें इंद्रिय व त्याची देवता जो इंद्र तो येऊन राहिला; त्याला पाय निर्माण झाले. तेथें गति ह्या इंद्रियासह त्याची देवता जो विष्णु तो त्या ठिकाणीं स्थिर झाला. मग त्याला नाड्या उत्पन्न झाल्या, त्यांत इंद्रियरूप रक्त भरलें, व त्याच्यापासून नद्या उत्पन्न झाल्या; पुढें त्याला उदर उत्पन्न झालें. त्यामुळें क्षुधा व तृषा उत्पन्न झाल्या. त्याच्या ठिकाणीं समुद्रनामक देवता उत्पन्न झाली, नंतर त्याला हृदय उत्पन्न झालें, त्या हृदयापासून मन झालें, त्याची अधिष्ठात्री देवता जो चंद्र तो उत्पन्न झाला; त्याच हृदयांत दुसरी बुद्धि उत्पन्न झाली, तिची अधिष्ठात्री देवता ब्रह्मदेव होय. तसेंच तिसरा अहंकार उत्पन्न झाला. त्याची देवता रुद्र होय; पुन्हां त्याच ठिकाणीं चवथें चित्त उत्पन्न झालें, त्याची अधिष्ठात्री देवता क्षेत्रज्ञ होय. माते देवहुति. यांतील मुख्य देवता क्षेत्रज्ञ होय. म्हणून त्याचेंच ज्ञान झालें पाहिजे.

माते! ह्या सर्व देवतांनीं विराट् पुरुषाला उठविण्याची खटपट चालविली होती, पण त्यांच्यानें त्याला उठवितां येईना. म्हणून पुन्हां त्यांनीं त्याला उठविण्यासाठीं क्रमानें आपापल्या स्थळीं प्रवेश केला:— दिशा, श्रोत्रेंद्रियासह कर्णविवरीं शिरल्या; अग्नि वाणीसह मुखामध्यें प्राप्त झाला; वायु घ्राणेंद्रियासह नासिकामध्यें शिरला, सूर्य चक्षुरिंद्रियासह नेत्रस्थानीं राहिला; औषधि केशरोमांसह त्वचेवर बसल्या; उदक रेतासह

शिश्नस्थानीं आलें; मृत्यु अपानेंद्रियासह गुदद्वारीं येऊन राहिला; इंद्र बलासह हातांवर प्राप्त झाला; विष्णु गतीसह पायांवर येऊन राहिला; नद्या रक्तासह नाड्यांत प्राप्त झाल्या; समुद्र क्षुधा आणि तृषा ह्यांसह उदरांत राहिला; चंद्र मनासह हृदयांत शिरला; ब्रह्मदेव बुद्धीसह हृदयांत प्राप्त झाला; रुद्रानें अहंकारासह हृदयांत प्रवेश केला; पण इतकें झालें तरी तो विराट् पुरुष जागा झाला नाहीं ! शेवटीं ज्यावेळीं चित्ताची अधिष्ठात्री देवता " क्षेत्रज्ञ " चित्तासहवर्तमान हृदयांत शिरला, त्यावेळीं लागलाच विराट् पुरुष उदकांतून उठला. एखादा मनुष्य निजला असला म्हणजे जसें त्याला उठविण्यासाठीं प्राण, इंद्रियें, मन, बुद्धि इत्यादिकांनीं आपलें सामर्थ्य खर्च केलें तरी क्षेत्रज्ञाच्या ( जीवाच्या ) साह्यावांचून त्याला उठवितां येत नाहीं; तद्वत् क्षेत्रज्ञाच्या साहाय्याशिवाय सूर्यादि देवतांनीं त्या विराट् पुरुषाला उठवितां आलें नाहीं. माते, देवहूति ! मनुष्यानें प्रथम ईश्वराची भक्ति करावी. तिच्या योगानें त्याला वैराग्य उत्पन्न होऊन त्याची बुद्धि योगाभ्यासाकडे प्रवृत्त होईल. योगाभ्यास करण्याच्या योगानें त्याला ज्ञान प्राप्त होईल. मग त्या ज्ञानाच्या साह्यानें मनुष्यानें ह्या कार्यकारणात्मक तत्त्वांच्या समुदायांतून क्षेत्रज्ञाचें स्वरूप पृथक् ओळखून त्यानें चिंतन करावें. इति । १९.

---

## अध्याय २० वा.

---

### लयचिंतन प्रकार ( १-१५. ).

नारद उवाच:

इंद्रियाणि मनस्यूर्मौ वाचि वैकारिकं मनः ॥
वाचं वर्णसमाम्नाये तमोङ्कारे स्वरे न्यसेत् ॥
ओङ्कारं बिन्दौ नादे तं तं तु प्राणे महत्यमुम् ॥ १३ ॥

**नारद ह्मणाले:**—धर्मराजा ! मनुष्य ज्या मार्गानें गेला असतां मोह पावत नाहीं, तो लय चिंतन रूप योग मार्ग अत्यंत श्रेष्ठ आहे; आणि ह्या मार्गानें जाणाऱ्या पुरुषाला संसार प्राप्त होत नाहीं ! तो प्रकार असाः——प्रथम कर्मेंद्रिय व्यापारांचा ज्ञानेंद्रियाच्या ठिकाणीं लय करावा; ह्मणजे व्यापारमय कर्मेंद्रियें ज्ञानेंद्रियरूप आहेत अशी भावना करावी. अशाच प्रकारें ज्ञानेंद्रिय व्यापारांचा संकल्प विकल्पात्मक मनाच्या ठिकाणीं लय करावा ह्मणजे ज्ञानेंद्रियें मनोरूप मानावीं ( पुढें ठिकठिकाणीं लयाचा अर्थ असाच समजावा ). विकारी अशा मनाचा वाणीमध्यें, वाणीचा वर्ण समूहांत, वर्ण समूहाचा अकार—उकार—मकारात्मक ॐकाराच्या ठिकाणीं, ॐकाराचा बिंदूच्या ठिकाणीं बिंदूचा नादांत, नादाचा सूत्रसंज्ञक प्राणाच्या ठिकाणी व प्राणाचा ब्रह्मरूपीं लय करावा. असा लययोगी पुरुष अग्नि; सूर्य, दिवस, प्रातःकाल, शुक्लपक्ष, पूर्णचंद्रयुक्त पौर्णिमा, उत्तरायण, ह्यांच्या देवतास्थानांस अनुक्रमानें पावून शेवटीं ब्रह्मलोकीं जातो. तेथील भोग भोगल्यावर तो योगी स्थूलोपाधीमुळें विश्वरूप पावतो; ती स्थूलोपाधि सूक्ष्मोपाधीच्या ठिकाणीं लय करून तैजस बनते; सूक्ष्मोपाधि कारणोपाधीच्या ठिकाणीं लय करून प्राज्ञ होऊन शेवटीं त्या प्राज्ञ नामक कारणोपाधि साक्षीरूप आत्म्याचे ठिकाणीं लय करून तूर्यावस्था पावतो; व नंतर शुद्धात्मस्वरूप होऊन तो पुरुष मुक्त होतो. किंवा विश्व तैजसांत लीन होतो, तैजस प्राज्ञांत लय पावतो, व प्राज्ञाचा तूर्यांत लय होतो. ह्या क्रमानें सर्व दृश्य वस्तूंचा लय होऊन तो पुरुष शुद्ध आत्मस्वरूप होतो. ह्याला देवमार्ग म्हणतात. दुसऱ्या मार्गानें जाणारा जसा पुनः पुनः परत येतो; तसा ह्या मार्गानें जाणारा, आत्म्याची आराधना करणारा, शांत मनाचा व आत्मनिष्ट पुरुष परत संसारांत येत नाहीं. जो मनुष्य ह्या वेदप्रणीत मार्गाचें तत्त्व जाणतो. तो लोकाचारांत वागत असला तरी मोह पावत

नाहीं. कारण, देहाच्या प्रारंभीं कारणरूपानें व अंतीं कालरूपानें बाह्यतः भोगरूपानें व अंतरीं योगरूपानें तसेंच उच्च व नीच, ज्ञान व ज्ञेय ( ज्ञानाचा विषय ) वचन व वाच्य, तम व प्रकाश, ह्या सर्व रूपानें जें कांहीं आहे. तेंच हा ज्ञानी पुरुष स्वतः होय; अर्थात् स्वतःच सर्व असल्या कारणानें ज्याला आत्म्यावांचून दुसरें कांहीं आहे असें भासतच नाहीं. अशा पुरुषाला मोह कोठून पडेल ? इति । २०.

---

# अध्याय २१ वा.

## ब्रह्मचिंतन निरूपण ( १०-८७ ).

श्रुतय उवाचः--

उदरमुपासते य ऋषिवर्त्मसु कूर्पदृशः
परिसरपद्धतिं हृदयमारुणयो दहरम् ॥
तत उदगादनंत तव धाम शिरः परमं
पुनरिह यत्समेत्य न पतंति कृतांतमुखे ॥ १८ ॥

**वेद ह्मणालेः**—भगवंता ! ऋषिसांप्रदायमार्गामध्यें अधिकार भेदानें ब्रह्मचिंतनाची स्थूल व सुक्ष्म अशीं दोन स्थानें कल्पिलीं आहेत. ऊदरामध्यें मणिपुरचक्राच्या खालीं असलेले स्थूलस्थान होय; आणि हृ-

( १ ) मणिपुरचक्र हें नाभीच्या मूळांत नीलवर्ण पूर्ण मेघासमान असून याचीं " ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, फ हीं दश दलें आहेत. ह्या चक्राच्या अधोभागीं ( नाभीच्या दोन अंगुलें खालीं ) असलेल्या कुंडलिनीच्या स्थानाला ' स्थूलस्थान ' असें योगीजन ह्मणतात.

दयामध्यें आज्ञाचक्राचेंवर असलेलें सूक्ष्मस्थान होय. तें ऋषिजन आपापल्या सांप्रदायाप्रमाणें उदरस्थ व हृदयस्थ राहिलेल्या ब्रह्मतत्त्वाची उपासना करीत असतात. त्यांपैकीं रजोगुणानें युक्त असे स्थूल दृष्टि (संकल्पविकल्पांनीं युक्त) पुरुष उदरस्थ मणिपुरस्थानीं राहणाऱ्या कारण ब्रह्माची उपासना चालवितात; आणि अरुणवंशज पुरुष ज्या आधारापासून सर्व नाड्या चहूंकडे पसरल्या आहेत, त्या हृदयस्थ सुषुम्नास्थानीं राहणाऱ्या उदरहरसंज्ञक तेजोमय ब्रह्माची उपासना करितात. ती तेजोमय सुषुम्ना नाडी मूलाधारापासून निघून वर मस्तकांतील मू-

(१) आज्ञाचक्र हें भ्रूमध्य अर्थात् दोन्ही भिवयांच्या मध्यभागीं ललाट स्थानीं चंद्रासारखें प्रकाशमान असून त्याचीं "हं सं" हीं दोन दलें आहेत. ह्या चक्राचेंही वर मस्तकांतील सहस्रारदल कमलांत असलेल्या परमात्म्याच्या स्थानासच 'सूक्ष्मस्थान' असें म्हटलें आहे.—**योगसंमत.**

(२) "उदरं ब्रह्मेति शार्कराक्षा उपासते" **अर्थ**—शार्कराक्षाचे वंशज ऋषि उदरस्थ ब्रह्मरूप वैश्वानराचें चिंतन करितात.—**श्रुति.**

(३) "हृदयं ब्रह्मेत्यारुणयः" **अर्थ**—अरुण वंशज ऋषि हृदयकमलांत राहणाऱ्या दहराकाश संज्ञक ब्रह्मतत्त्वाची उपासना चालवितात.--**श्रुति.**

(४) उन्निद्र हृदयांभोज सोममंडल मध्यमे। स्वात्मानं मंडलाकारं भोक्तृरूपिणमक्षरं ॥ सुधारस विमुंचद्भिःशशिरश्मिभिरावृतं । सहस्रच्छदसंयुक्तिच्छिरः पद्मादधोमुखात ॥ निर्गतामृतधाराभिः सहस्राभिः समंततः । प्लावितं पुरुषंतत्र चिंतयेत्तु समाहितः ॥ तेनामृतरसेनैव सांगोपांगकलेवरं । अहमेव परब्रह्म सच्चिदानंदलक्षणं ॥ एवं ध्यानामृतं कुर्वन् षण्मासान्मृत्युजिद्भवेत् । वत्सरान्मुक्तएवस्याज्जीवन्नपि न संशयः ॥ **अर्थ**—उमललेल्या हृत्कमलाचे ठायीं चंद्रमंडलाचे मध्यभागीं हजार पाकळ्यांचें एक कमळ अधोमुख आहे. चंद्राप्रमाणें तेज असणाऱ्या व सतत अमृत स्रवणाऱ्या त्या कमळाची एकाग्र मनानें ध्यान केलें असतां सहा महिन्यांत मृत्युला जिंकतां येतें. एक वर्षभर ध्यान केलें असतां तो जीवन्मुक्तच होतो.—**याज्ञव०**

र्ध्निस्थानापर्यंत गेली आहे. व हिच्या अग्रभागीं ब्रह्मरंध्र नामक सूक्ष्म-स्थान आहे. ह्या ब्रह्मरंध्रस्थानीं निर्दिष्ट असलेलें तेजोमय ब्रह्मतत्त्वाची जे कोणी उपासना करितात; त्यांना पूर्णपणें समाधि प्राप्त होऊन ते पुनः मृत्युमुखीं पडत नाहींत. अर्थात जन्ममरणाच्या फेऱ्यांतून मुक्त होतात! "ब्रह्म हे वै ता" ह्या श्रुति वचनाप्रमाणें उदरस्थ व हृद-यस्थ हीं दोन्ही ब्रह्मरूपेंच होत.

(१) शंका:—जर ईश्वर जीवाप्रमाणें उदरस्थ व हृदयस्थ आहे तर त्याला हीं उदरादि उपाधींचा संबंध झालाना! मग उदर व हृदय ह्यांचा संबंध असला कीं, त्याच्या बरोबर उदरस्थ ईश्वर कमी योग्यतेचा व हृदयस्थ ईश्वर उच्च प्रतीचा असा न्यूनाधिक भाव उद्भवतोच! मग ईश्वराला उपास्य देवता म्हणावें काय म्हणून?

**समाधान**—"एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा" आणि "कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च" इत्यादि श्रुतिवचनप्रमाणांवरून तूं एक देव सर्व वस्तुमात्राचे ठायीं व्याप्त असून सर्वांचें हृदयरूप बनून राहिला आहेस. आणि जगतांतील सर्व वस्तूंचा तूंच आश्रय असल्यामुळें सर्व कृत्यें वास्तविक तूंच करीत असून पुन्हां त्यांपासून अलिप्त ह्मणजे केवळ साक्षित्वानें वास करितोस, म्हणून तुला त्यांच्या गुणादिकांचा लेशमात्र संबंध नाहीं. ईश्वरा, तूं स्वतःच निर्मिलेल्या नाना प्रकारच्या देव, मनु-

(१) शतं चैकाच हृदयस्थनाड्यस्तासां। मूर्धानमभिनिःसृतैका॥ तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति। विष्वगन्या उत्क्रमणे भवन्ति॥ **अर्थ**—हृदय गोलकापासून एकशे एक नाड्या निघाल्या आहेत, त्यांपैकीं एक सुषुम्ना नामक नाडी मस्तकाकडे वर गेली आहे त्या सुषुम्ना मार्गानें वर जाणारा योगी अमृतत्व पावतो ह्मणजे मुक्त होतो. बाकीच्या आडव्या तिडव्या पसरलेल्या नाड्यांतून प्राण गेला असतां प्राण्याला परत संसारांत यावें लागतें.—**श्रुति.**

ष्य, पशु, पक्षी इत्यादि उच्च, नीच योनींमध्यें उपादान कारणत्वानें प्रविष्ट झाल्यासारखा भासत असून आपणच उत्पन्न केलेल्या त्या योनींला अनुरूप असें वर्तन ठेवितोस; व उच्च नीच प्रकारवत् भासत असतोस. ह्याला दृष्टांत -अग्नीचें मूळ स्वरूप पाहिलें ह्मणजे त्याच्या ठिकाणीं लांबी, रुंदी आकार वगैरे उपलब्ध होत नाहीं, पण तोच अग्नि ज्या स्वरूपाच्या काष्ठावर प्रविष्ट झाला असेल त्याच्या आकाराप्रमाणें लांब, रुंद, लहान, मोठा असा भासतो; तद्वत्. परमेश्वर वस्तुतः उच्चनीचत्वादि धर्मांनीं रहित असा असतांही स्वकृत देवतिर्यगादि योनींत प्रविष्ट होऊन त्यांचें अ करण करीत असतां उच्च किंवा नीच प्रतीचा भासतो. म्हणून ज्यांनीं ऐहिक व आमुष्मिक कर्मफलांच्या इच्छेचा त्याग केला, ते शुद्धचित्त विद्वान् पुरुष आपले ठायीं भासणारे अध्यासरूप जगताला मिथ्या मानून उपाधिरहित जें नित्य, निर्विकार व केवळ चैतन्यरूप असें तुझें स्वरूप जाणितात. एतावता, तुझ्या सत्य स्वरूपाला कोणतीही उपाधि नाहीं, ह्मणून त्याला न्यूनाधिक भाव नाहीं. व त्याचें ऐश्वर्य कधींही खंडित होत नाहीं. ह्याकरितां विद्वान् लोक तुला उपास्य देवता समजतात.

( २ ) **शंका** - जगतांतील सर्व वस्तुमात्रांचा नियंता परमेश्वर आहे, तर मग जीवाला नानायोनि प्राप्त होण्याचें कारण काय ?

**समाधान**—जीव विषयांच्या संसर्गानें वासनाबद्ध झाल्यामुळें त्याला नानायोनि प्राप्त होतात. जीव जर वासनारहित होईल तर परमात्म्याच्या सदानंदमय अशा नित्यस्थानाप्रत पावेल; पण तो जर वासनासहित असेल तर त्यास आपल्याच कर्मानें संसारचक्रांत पडावें लागेल. परमेश्वरा ! जीवानें अनेक देहांत प्रविष्ट होऊन त्या त्या देहांना अनुसरून युक्तायुक्त कर्में केलीं, तरी वास्तविक पहातां तीं कर्में करविणारा तूंच असल्यामुळें त्या त्या देहांतील देहोपाधि जो जीवात्मा तो तूंच

आहेस. पहा—जीवात्मा हा तुझा एक कल्पित अंश होय. कारण, घटाकाश व महाकाश ह्या दृष्टांतावरून ब्रह्मतत्त्वाचा सूक्ष्म विचार करणाऱ्या पुरुषांना जीवात्मा व ब्रह्म ह्यांत भेद आढळून येत नाहीं. मग अल्पज्ञत्व व सर्वज्ञत्व ह्या धर्मामध्यें जरी भेद दिसून येत आहे तरी सर्व शरीरांत असणारें जीवचैतन्य व ब्रह्मांडांत ओतप्रोत भरलेलें तेजोनिधिरूप ईशचैतन्य, ह्यांत भेद नाहीं. याप्रमाणें विद्वान् पुरुष जीवेश्वरांचें हें यथार्थ स्वरूप शोधून तुझ्या चरणाची सेवा चालवितात. त्यांना पूर्ण विश्वास आलेला असतो कीं, जीवेश्वरांची समता आहे म्हणून जीं जीं श्रुतिप्रणीत कृत्यें जीव करील, तीं तीं त्यानें तुला अर्पण करावीं: असें केलें असतां हा जीव पुनः संसारचक्रांत पडणार नाहीं ! वास्तव साधकानें तुझ्या चरणकमलांची एकनिष्ठेनें सेवा करावी, हेंच मनुष्यलोकांतील पुरुषांचें उत्तम कर्तव्य होय. इति । २१.

---

# अध्याय २२ वा.

## योगविघ्न निवृत्त्युपाय ( ११–२८ ).

श्रीभगवानुवाच:—

योगिनोऽपक्वयोगस्य युंजतः काय उत्थितैः ॥
उपसर्गैर्विहन्येत तत्रायं विहितो विधिः ॥ २८ ॥

**श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा ! योगाभ्यास परिपूर्ण झाला नाहीं, योगसाधन तर चाललें आहे, अशा स्थितीमध्यें जर योगसाधनास विघ्नें

---

( १ ) " स यश्चायं पुरुषे यश्चासावादित्ये स एकः " **अर्थ**—जो ह्या शरीरांत प्रत्यगात्मा आहे आणि जो ह्या सूर्यमंडळांत उपास्य ह्मणून सांगितला, तो एकच होय.—**श्रुति.**

उत्पन्न झाली. अर्थात् योग्याच्या देहाला रोगादि उत्पन्न होऊन पीडा होऊं लागली, तर तिच्या निरसनाचा प्रकार असा:-कित्येक रोग योगसाधनानें जाळावे. जसें-संताप होत असेल तर सोमाची धारणा करावी. शीतबाधा होऊं लागेल तर सूर्याची धारणा करावी, वातादिक बहुतेक रोगांना आसन व प्राणायाम ह्यांच्या योगानें नष्ट करावें; पापग्रह, सर्प इत्यादिकांकडून बाधा होत असतील तर त्यांचें तपश्चर्या, मंत्र व औषधें ह्यांच्यायोगें निरसन करावें; कामादि षड्रिपु बळावतील तर माझें निरंतर ध्यान व नामसंकीर्तन इत्यादि उपायांनीं त्यांस जिंकावें; आणि दंभ, मान इत्यादि अमंगलदायक विकारांचा संहार सद्गुरूच्या सेवेनें करावा. कित्येक धैर्यसंपन्न योगी पुरुष नाना प्रकारच्या उपायांनीं आपलें शरीर सुदृढ व तरुणपणांत नित्य स्थिर राहील असें करून घेतात; आणि मग दूरदृष्टि, दूरश्रवण व कालवंचन इत्यादि सिद्धींच्या प्राप्तीसाठीं त्या त्या योगधारणांकडे लागतात; परंतु ज्ञाननिष्ठारूप योग साधीत नाहींत! उद्धवा, ही गोष्ट समंजस योगी पुरुषांना सर्वथा त्याज्य होय. कारण, वनस्पतीच्या फलाप्रमाणें हें शरीर नाशवंत आहे, म्हणून शरीरसुदृढ राखण्यासाठीं व सिद्धि मिळविण्यासाठीं केलेले प्रयत्न निरर्थक होतात. समाधिसाध्य करण्यासाठीं प्राणायामादिक योगांचें अनुष्ठान करूं लागलें म्हणजे शरीर तर सुदृढ होतेंच, पण तसें झालें तरी मजकडे चित्त लावणाऱ्या बुद्धिमान् योगी पुरुषानें त्यावर विश्राम न ठेवितां, म्हणजे शरीरस्वस्थतेकडे लक्ष न देतां, उत्तमपणें योगाभ्यास करावा. जो पुरुष केवळ माझा आश्रय धरून अशा प्रकारें योगाचें आचरण करील तर त्याला आत्मसुखाचा अनुभव मिळेल, व त्याच्या समस्त इच्छा नाहींशा होतील, अर्थात् त्याला विघ्नांकडून कधींही अडथळा व्हावयाचा नाहीं. कारण, विघ्नें इच्छेमुळें उद्भवतात. ज्यानें

माझी उपासना चालविली त्याच्या समस्त इच्छा सुटतात ! मग विघ्नें उद्भवण्यास जागाच नाहींशी होते ! इति । २२.

---

# अध्याय २३ वा.

## अंतकाळ समीप आला असतां काय करावें (१–१०, श्लो ७ १).

राजोवाचः —

> अतः पृच्छामि संसिद्धिं योगिनां परमं गुरुम् ॥
> पुरुषस्येह यत्कार्यं म्रियमाणस्य सर्वथा ॥ ३७ ॥

**राजा परीक्षिति ह्मणालाः** – भगवंता ! तुह्मी सर्व योग्यांचे गुरु आहांत. तुम्हांकडून माझ्या शंकेची निवृत्ति होईल. म्हणून मी तुम्हांला विचारितों; तुह्मी निश्चयेंकरून सांगालच. मनुष्य मरणोन्मुख झाला असतां त्यानें मोक्षप्राप्तीसाठीं काय काय केलें पाहिजे तें मला सांगावें.

**श्री शुकाचार्य ह्मणाले:** —राजा ! तुझें आयुष्य थोडें राहिलें आहे. या अल्प काळांत मोक्षसाधन कसें होईल ही शंका सुद्धां मनांत आणूं नको. हें पहा—अज्ञानी पुरुषाला आपल्या आयुष्याचा उपयोग कसा करावा हें जर समजत नसेल, तर त्याला पुष्कळ काळपर्यंतच्या आयुष्याचा उपयोग काय ? त्यापेक्षां आयुष्याचा खरा उपयोग जाणणाऱ्या पुरुषाचें मुहूर्त मात्र आयुष्य देखील मोक्षसिद्धीस पुरें आहे. याविषयीं तुला एक उदाहरण सांगतों:—पूर्वी खट्वांग नामक एक राजा होऊन गेला. त्याला आपलें आयुष्य अवघें एक मुहूर्त मात्र उरलें आहे हें कळतांच त्यानें तत्क्षणीं सर्वसंगपरित्याग केला, व स्वस्वरूपांत लीन होऊन येवढ्या अल्प अवधींतही तत्पदास प्राप्त झाला ! हे कुरुकुलो-

त्यक्ता राजा. तुला तर अजून सात दिवसांची अवधि आहे, म्हणून तेवढ्या अवकाशांत तूं उत्तम लोकप्राप्तीचें साधन करून घे.

राजा परीक्षिते, अंतकाळ समीप आला असतां पुरुषानें मृत्यूच्या भयानें अगदीं डगमगूं नये; नंतर देह व तत्संबंधीं स्त्री पुत्रादिकांवर असलेली ममता तीव्र वैराग्यरूपी शस्त्रानें तोडून टाकावी, व ती माया पुन्हां उद्भवूं नये म्हणून गृहादिकांचाही परित्याग करून ब्रह्मचर्यादि व्रतें धारण करावीं; यमनियमादिक आचरण करीत पुण्यतीर्थाचीं स्नानें करावीं; एकांत स्थळ पाहून तेथें धर्मशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें शुद्ध आसन घालून त्यावर बसावें; ईश्वररूप जो 'अकार, उकार, मकार' ह्या त्रिमात्रांनीं युक्त असा जो 'प्रणव ( ओंकार )' मंत्र त्याचा जप करावा. ॐकार हा ब्रह्मप्राप्तीला मुख्य कारण आहे. ह्मणून त्याचा विसर पडूं न देतां प्राणायाम करून मन एकाग्र, शांत व स्थिर करावें. नंतर निश्चयात्मक बुद्धीच्या साह्यानें मनाचें आकलन करून सर्व इंद्रियें विषयांपासून सोडवून अंतर्मुख करावीत. आणि चित्त भगवत्स्वरूपीं लावावें; नंतर ध्यानांत आणिलेल्या समग्र ईश्वरमूर्तीवरून आपलें चित्त यत्किंचितही ढळूं न देतां त्या मुर्तीच्या प्रत्येक अवयवांचें विशेष लक्ष्य लावून ध्यान करावें; त्यावेळीं इतर कोणत्याही पदार्थाचें स्मरण होऊं देऊं नये; अंतःकरणांतून सर्व विषय नाहींसे झाले ह्मणजे स्थिर झालेल्या त्या मनाला ईश्वररूप करावें; अशा स्थितीमध्यें मन प्रसन्न होतें व तेंच विष्णूचें उत्कृष्ट स्थान होय. जर कदाचित् रजोगुणाच्या योगानें मन पुन्हां विषयांकडे वळेल किंवा तमोगुणाच्या योगानें अज्ञानांत शिरेल तर त्याला उत्कृष्ट धारणेच्या योगानें पुनः भगवत्स्वरूपीं लावावें. कारण त्या धारणेच्या योगानें रज व तम या गुणांपासून उद्भवलेले मनांतील सर्व दोष नाहींसे होतात. वर सांगितल्याप्रमाणें धारणा केली असतां त्या योग्याला असें दिसून येतें कीं, आपण ज्याची धारणा करीत आहों तो परमेश्वर

पूर्ण सुखाचें स्थान होय, व त्यामुळें लवकरच त्या स्वरूपाच्या ठिकाणीं त्याची प्रीति अधिकाधिक दृढ होत जाते ! इति । २३.

---

# अध्याय २४ वा.

## देहत्याग समयीं काय करावें ( १–२ ).

श्रीशुक उवाच—

**स्थिरं सुखं चासनमाश्रितो यतिर्यदा जिहासुरिममंग लोकम् ॥**
**काले च देशे च मनो न सज्जयेत् प्राणं नियच्छेन्मनसा जितासुः ॥१॥**

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**—राजा परीक्षिते! पूर्वीं सांगितलेली गोष्ट मरणोन्मुख योग्याची झाली. आतां देहत्यागसमयीं काय काय करावें तो प्रकार सांगतों:— देह त्याग करण्याला उत्तम काल म्हणजे उत्तरायणच पाहिजे किंवा पवित्र देश म्हणजे ( काश्यादि ) पुण्यक्षेत्र पाहिजे असली शंका योग्यानें मनांत देखील आणूं नये. कारण, सिद्धदशेस प्राप्त होण्याला देश किंवा काल याची अपेक्षा नाहीं. तर त्यास योगाभ्यास करणें हेंच मुख्य कर्तव्य होय. असा त्यानें दृढ निश्चय करून मनानें इंद्रियांचा निरोध करावा; आणि सुखकारक व स्थिर अशा असणावर बसून प्राणायाम करावा. नंतर निर्मल बुद्धीच्यायोगानें संकल्पविकल्पात्मक मनाचें आकलन करावें म्हणजे मनाचा निश्चयात्मक बुद्धीच्या ठिकाणीं लय करावा; त्या बुद्धीचा क्षेत्रज्ञ “ त्वंपदलक्ष्य ” जो साक्षी

---

( १ ) “ अंतकालेच मामेव स्मरन्मुक्त्वा कलेवरं । यः प्रयाति स मद्भावं याति नास्त्यत्र संशयः ॥ ” **अर्थ**—मरणकाळीं याप्रमाणें माझी आठवण ठेवून देह सोडितो, तो माझ्या सारूप्याला निःसंदेह जाऊन मिळतो.—**गीता.**

आत्मा त्याच्या ठिकाणीं लय करावा; नंतर त्या अंतर्यामीनें " तत्पद-लक्ष्य " जें ब्रह्म त्याशीं ऐक्य करून " मींच ब्रह्मरूप आहे " असा निश्चय करून तेथेंच सुखरूप व्हावें. तीच खरी शांति व तेंच खरें सुख. त्याच्या योगानेंच सुखी होऊन विधिनिषेधरूप सर्व कर्मे सोडून द्यावीं. कारण, विरक्त पुरुषाला त्याहून दुसरें कांहीं देखील प्राप्त करून घ्याव-याचें उरत नाहीं. तें आत्मस्वरूपच सर्व पदार्थांपेक्षां श्रेष्ठ होय. आपण इतर सर्वांपेक्षां देवांना श्रेष्ठ मानितों; पण त्या देवांवर देखील कालग-तीची फेरी आहेच. तेव्हां कालाला देवांपेक्षांही श्रेष्ठ ह्मणणें भाग आहे; परंतु त्या कालाचीही गति परमात्मरूपीं कुंठित होते. कारण जेथें गुण किंवा अहंकार वगैरे असतील तेथेंच त्याचा प्रभाव चालणार; आत्मरूपीं तर सत्वादि गुण व अहंकार वगैरे मुळींच नाहींत. आत्मा निर्गुण, निरहंकार आणि उपाधिरहित असा आहे.. ह्या आत्मस्वरूपाला केवळ आह्मींच श्रेष्ठ म्हणतों असें नाहीं. महान् महान् योगी देखील श्रेष्ठ असें मानितात. आणि स्वशरीरावरील अहंता व स्त्रीपुत्रादिकांवरील ममता ह्यांचा त्याग करून भगवंतालाच अनन्यभावानें शरण जातात. याप्रकारें ब्रह्मरूप झालेल्या निरिच्छ योग्यानें सर्व कर्मांचा त्याग करून आपल्या देहाचें विसर्जन करावें. इति । २४.

---

( 1 ) सर्वद्वाराणि संयम्य मनो हृदि निरुध्यच। मूर्ध्न्याधायात्मनः प्राणमास्थितो योगधारणाम ॥ ओमित्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन्मामनुस्मरन । यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिं ॥ " अर्थ—बाह्य विषयांचें ज्ञान करून देणारीं सर्व इंद्रियें आवरून मनाला हृदयामध्यें कोंडून ठेवून प्राणवायु मूर्ध्नीस्थानीं ( मस्तकांतील ब्रह्मरंध्र स्थानीं ) ठेवून योगसमाधि लावून बसलेला जो योगी पुरुष ॐ या एकाक्षरी ब्रह्मा-चा उच्चार करीत माझी आठवण ठेवून देह सोडितो, त्याला उत्तम गति मिळते.

# अध्याय २५ वा.

## देहत्याग कसा करावा ( २-२ ).

श्रीशुकउवाच:—

**इत्थं मुनिस्तूपरमेद्यवस्थितो विज्ञानदृग्वीर्यसुरंधिताशयः ॥**
**स्वपार्ष्णिनापीड्य गुदं ततोऽनिलं स्थानेषु षट्सून्नमयेज्जितक्लमः॥१९.**

**श्रीशुकाचार्य म्हणाले:**——राजा परीक्षिते, पूर्वी सांगितल्याप्रमाणें पूर्ण स्थिती झाली आहे व ज्ञानोत्पादक शास्त्रानें उत्पन्न झालेल्या ज्ञानाच्या बळानें ज्याची विषयवासना नाहींशी झाली आहे, अशा योग्यानें पुढें सांगितल्याप्रमाणें देहत्याग करावा. पुष्कळ दिवस प्राणायामाचा अभ्यास करून प्राणवायु स्वाधीन ठेवलेल्या योगी पुरुषानें शास्त्रोक्तरीतीप्रमाणें आसन मांडून त्यावर बसावें व आपल्या डाव्या पायाच्या टांचेनें गुदाद्वाराला दाबून तें बंद करावें. आणि तेथून तो वायु पुढें सांगितल्याप्रमाणें मुलाधारादि सहा चक्रावर चढवित चढवित वर न्यावा. त्याचा प्रकार असा:—प्रथम पायाच्या अंगुष्ठापासून वायूला वर आकर्षण करून गुदास्थानीं असलेल्या "मुलाधार" नामक चक्रावर चढवावें; तेथून लिंगस्थानीं असलेल्या "स्वाधिष्ठान" नामक चक्रावर चढवावें; नंतर नाभिस्थानीं असलेल्या "मणिपूर" नामक चक्रावर हळूहळू तेथून हृदयांतील "अनाहत" नांवाच्या चक्रावर चढवावें; नंतर तेथून कंठांत असणाऱ्या उदान वायूच्या गतीतें त्याला कंठाच्या खालच्या भागीं ह्मणजे त्याच्या मुळाशीं असलेल्या "विशुद्धि" नांवाच्या चक्रावर चढवावें; त्या चक्राचें अग्र टाळूच्या मुळाशीं असल्यामुळें त्याच्यावर वायूला युक्तीनें चढवावें कारण, विशुद्ध चक्रांतून वर नेतें-वेळेस वायु बहुत मार्गानीं बाहेर पडण्याचा संभव असतो; म्हणून मोठ्या सावध-

गिरीनें हळू हळू त्या वायूला विशुद्ध चक्राच्या अग्रावर चढवावें. तेव्हां दोन कान, दोन डोळे, दोन नाकपुड्या व एक तोंड ह्या सात द्वारांतून वायू बाहेर जाऊं नये, म्हणून तीं बंद करावीं लागतात; व मग त्या वायूला विशुद्धचक्रावरून भुंवयांच्या मध्यभागीं “ आज्ञाचक्र ” आहे त्यावर न्यावें; तेथेंच अर्धा मुहूर्तपर्यंत स्थिर करावें. नंतर जर तो योगी निष्काम असेल तर त्यानें ब्रह्मस्वरूपीं अकुंठित ज्ञानदृष्टीनें लक्ष्य ठेवून ब्रह्मरंध्रांतून ( टाळूचा भेद करून ) ह्या शरीराचा व मनासह सर्वेंद्रियांचा त्याग करावा. हे राजा, ज्या योग्याच्या मनांत स्वर्गादि उपभोगाची इच्छा नसेल तर त्यानें मागें सांगितल्याप्रमाणें देहत्याग करावा, व त्याच्या मनांत जर ब्रह्मलोकास किंवा ज्या ठिकाणीं अणिमादि अष्ट-

( १ ) अथास्य मूर्द्धानमस्य देहं एषा मार्गेण गमनं ये प्राप्य परमां गतिं भूयस्ते न निवर्तन्ते परात्परमवस्थानात् ॥ ” **अर्थ** - भ्रुवां स्थाना उपरी । ब्रह्मरंध्रीं दशमीं द्वारीं ॥ यथामार्गें प्राणोत्क्रमण करी । तो स्वयं ब्रह्मरूप ॥--**संन्यास उपनिषत्.**

( २ ) योगप्रकरणाच्या चौदाव्या अध्यायांत सांगितलेल्या देहत्यागाच्या प्रकारास सद्योमुक्ति म्हणतात. त्याच्या पुढें पंधराव्या अध्यायांत क्रममुक्तीचा प्रकार सांगितला आहे.

( ३ ) “ अणिमा महिमा चैव गरिमा लघिमा तथा । प्राप्तिः प्राकाम्यमीशित्वं वशित्वं चाष्ट सिद्धयः ॥ ” **अर्थ** - [१] अणिमा-लहानपणा ( आकारानें ); [२] महिमा-मोठेपणा ( आकारानें ), [३] गरिमा-जडपणा ( दिसण्यांत लहान असून वजनांत जड ); [४] लघिमा-हलकेपणा ( दिसण्यांत मोठें असून वजनांत हलकें ); [५] प्राप्ति-सान्निध्य ( दूरच्या वस्तूंचें देखील सान्निध्य, पृथ्वीवर असून चंद्राला वगैरे स्पर्श करूं शकणें ); [६] प्राकाम्य-इच्छेप्रमाणें करूं शकणें ( पाण्यांत जसें आपण बुडी मारून बाहेर निघूं शकतों, त्याप्रमाणें एका स्थलीं गुप्त होऊन दुसऱ्या स्थलीं प्रकट होणें ); [ ७ ] ईशित्व-उत्पत्ति, स्थिति लय करण्याचें सामर्थ्य ); [ ८ ] वशित्व-जड पदार्थांला देखील आज्ञा करणें, व त्यांनीं ती मानणें.

सिद्धि आहेत. अशा सिद्धांच्या क्रीडास्थानीं आपली इच्छा असेल तर, किंबहुना ब्रह्मांडांत पाहिजे तिकडे फिरण्याची इच्छा असेल, तर वर सांगितल्याप्रमाणें देहत्याग करतांना, मनाचा व इंद्रियांचा त्याग न करितां, त्यांना म्हणजे लिंगदेहाला बरोबर घेऊन इच्छित स्थळीं गमन करावें.

परीक्षिति राजा ! त्रैलोक्य ह्मणजे स्वर्ग, मृत्यु, पाताळ हे तीन लोक (भूः भुवः स्वः) शिवाय महः, जनः, तपः, सत्य हे चार लोक त्रैलोक्याच्या बाहेरचे होत. योगी पुरुषाला त्रैलोक्याच्या आंत व बाहेर ह्मणजे ह्या सात लोकांच्या बाहेर देखील जातां येतें. कारण, त्याचें लिंगशरीर वायुरूपीच झालेलें असतें; त्यामुळें जेथपर्यंत वायूची गति आहे, तेथपर्यंत त्याला फिरतां येतें. हें सामर्थ्य यज्ञयागादि कर्मांच्या योगानें प्राप्त होत नाहीं. अशा सामर्थ्याचे अधिकारी फक्त हिरण्यगर्भादि उपासक लोक, भगवदुपासक ह्मणजे सर्वांभूतीं आत्मा आहे असें पाहाणारे लोक, अष्टांगयोग व समाधि योग करणारे योगी पुरुष मात्र होत. राजा, योगी पुरुष तेजोमय अशी जी सुषुम्ना नांवाची नाडी त्या द्वारें आकाश मार्गानें ब्रह्मलोकाकडे जात असतां, वाटेंत प्रथम वैश्वानर नांवाच्या अग्निलोकास जातो; तेथून तो अग्निलोकाच्या वरच्या भागीं, श्रीहरीच्या शिशुमार नामक ( ध्रुव ) चक्राच्या आश्रयानें राहणाऱ्या ज्योतिश्चक्रावर जातो; म्हणजे सूर्यापासून ध्रुवपदापर्यंत सर्व लोकांस जातो. त्या शिशुमार चक्राला "विष्णूचें चक्र" असें म्हणतात. तें सूर्यासुद्धां सर्व ब्रह्मांडाला आश्रय आहे. योगी जेव्हां त्याचें उल्लंघन करून जातो, तेव्हां तो एकटाच असतो! कारण, त्या चक्रापलीकडे स्वर्गांतील लोकांची सुद्धां गति नाहीं. नंतर तो एकटा पुरुष महाकल्पपर्यंत राहाणारे ब्रह्मज्ञानी भृग्वादि ऋषि, जेथें ब्रह्मानंदांत रममाण असतात, अशा महर्लो-

कीं जातो. त्या स्थानाला स्वर्गांतील व त्याच्या खालच्या लोकांत राहणारे सर्व लोक वंद्य मानितात. अवांतर प्रलय म्हणजे ब्रह्मदेवाच्या प्रत्येक दिवसाच्या शेवटीं स्वर्ग, मृत्यु, पाताल ह्या तीन लोकांचा मात्र लय होतो; ह्यालाच नित्यप्रलय म्हणतात. त्या प्रलयाच्या वेळीं शेषाच्या मुखांतून उत्पन्न आलेल्या अग्नीच्या योगानें जेव्हां हें त्रैलोक्य दग्ध होऊं लागतें; तेव्हां त्या ज्वालांचा उष्मा महर्लोकास जाऊं लागतो. त्यामुळें तेथील सर्व योगी ब्रह्मदेवाच्या निवासस्थानाला म्हणजे सत्यलोकाला निघून जातात. तें स्थान दोन परार्ध वर्षेपर्यंत टिकणारें आहे. त्या ठिकाणीं सिद्ध पुरुषांचीं उत्तमोत्तम अनेक विमानें आहेत. तेथें वास करणाऱ्यांना शोक, जरा, मरण हीं मुळींच नसतात. ज्या लोकांना भगवंताच्या ध्यानाचा मार्ग माहित नाहीं, व त्यामुळें वारंवार जन्मास येऊन त्यांना अनंत दुःखें भोगावीं लागतात, त्याबद्दल मात्र त्यांना खेद वाटतें; तेवढीच कायती त्यांना चिंता असते. ह्याशिवाय इतर कोणत्याही प्रकारचा विचार त्या लोकीं नाहीं.

राजा, ब्रह्मलोकांत गेलेल्या लोकांना तीन प्रकारच्या गती प्राप्त होतात, त्या अशाः—( १ ) पुष्कळ पुण्यकर्मांच्या योगानें जे ब्रह्मलोकास जातात; ते आपापल्या पुण्याप्रमाणें दुसऱ्या कल्पामध्यें मोठमोठे अधिकारी बनतात. ( २ ) हिरण्यगर्भादिकांच्या उपासनेच्या बलानें जे सत्यलोकीं जातात, ते ब्रह्मदेवाबरोबर मुक्त होतात. ( ३ ) आणि जे भगवदुपासक आहेत, ते तर आपल्या इच्छेस येईल तेव्हां ब्रह्मांडाचा भेद करून विष्णुपदाला (मुक्तीच्या मुख्य स्थानाला) जातात. इति। २९.

---

# अध्याय २६ वा.

## ब्रह्मांडभेद प्रकार. ( [illegible] )

श्रीशुक उवाच—

**ततो विशेषं प्रतिपद्य निर्भयस्तेनात्मनाऽपोऽनलमूर्तिरत्वरन् ॥**
**ज्योतिर्मयो वायुमुपेत्य काले वाय्वात्मना खं बृहदात्मलिंगम् ॥२८॥**

**श्रीशुकाचार्य म्हणाले:**—परीक्षिति राजा ! योगी पुरुष ब्रह्मांडाचा भेद करून जातो. तो भेद करण्याचा प्रकार असा :- सत्यलोकी म्हणजे ब्रह्मलोकी असणारा योगी पुरुष तो आपल्या सूक्ष्म देहाच्या योगानें पृथ्वीरूप आवरणाला मिळतो. तो पृथ्वीरूपानें त्याजवळच असलेल्या उदकावरणांत मिळतो. व तो कोणत्याही आवरणांतून निघून जाण्याची घाई करीत नाही. कारण, उदकांत तो उदकरूपानेंच जाऊन मिळतो, आणि अग्नीमध्यें अग्निरूपानेंच मिळतो. अर्थात् शीत किंवा उष्ण यांच्या दुःखाची भीति त्याला मुळींच नसते. म्हणून तो प्रत्येक ठिकाणचा अनुभव घेत पुढें जात असतो. उदकरूपांतून तेजरूपाला मिळतो. तेथून वायुरूपाशीं ऐक्य पावून आकाशस्वरूपाला जातो. (आकाश हीच परमात्म्याची मूर्ति समजून त्याची उपासना करण्यासाठीं उपनिषदांत वगैरे पुष्कळ ठिकाणीं सांगितलें आहे.) नंतर तो योगी त्या आकाशस्वरूपांतून इंद्रियांचे विषय जीं सूक्ष्म भूतें, त्यांचें उल्लंघन करितो. तें असें:–तो योगी नासिकेंद्रियाच्या योगानें गंधाला मिळतो; जिव्हेच्या योगानें रसाला मिळतो; नेत्रांच्या योगानें रूपाला मिळतो; त्वचेच्या योगानें स्पर्शाला मिळतो; श्रोत्रेंद्रियाच्या योगानें शब्दाला मिळतो; आणि वाक्, पाणि, पाद, पायु, उपस्थ या कर्मेंद्रियांच्या योगानें योगी त्या त्या इंद्रियांच्या क्रियांस मिळतो. अशा रीतीनें

सूक्ष्मभूतें व महाभूतें यांचें उल्लंघन करून गेल्यावर तो योगी अहंकार तत्त्वाला जाऊन मिळतो. तो अहंकार सात्विक, राजस व तामस अशा तीन प्रकारचा आहे. त्यांतील तामस अहंकारामध्यें पंचमहाभूतें यांचा लय होतो; राजस अहंकारामध्यें दहा इंद्रियें मिळून जातात. आणि सात्विक अहंकारामध्यें मनाचा व इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवतांचा लय होतो. इतकें झाल्यावर तो योगी तमाच पुढें त्याच गतीनें अहंकारासह महत्तत्त्वाला मिळतो. व तेथून प्रकृतिरूप आवरणांत जातो. तेथें सर्व गुणांचा लय होऊन शेवटीं त्या प्रकृतिरूपानें योगी पुरुष आनंदरूपी परमपदास प्राप्त होतो. राजा, जो योगी ह्या पदास प्राप्त होतो, तो पुन्हां ह्या जन्ममरणरूप संसारप्रवाहांत येत नाहीं. इति । २६.

# अध्याय २७ वा.

## जन्ममृत्युविचार (११-२२).

उद्धव उवाच:—

त्वत्तः परावृत्तधियः स्वकृतैः कर्मभिः प्रभो ॥
उच्चावचान्यथा देहान् गृह्णंति विसृजंति च ॥ ३४ ॥

(१) निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः ॥ द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छंत्यमूढाः पदमव्ययंतत् । नतद्भासयते सूर्यो न शशांको न पावकः । यद्गत्वान निवर्तंते तद्धाम परमंमम ॥ १ ॥ " अर्थ—मान आणि मोह जिंकून आसक्तिरूपी दोष काढून टाकून शीत उष्णादि द्वंद्वांपासून मुक्त होऊन केवळ अध्यात्मज्ञानाकडे नित्य लक्ष देणारे योगी लोक त्या माझ्या परम पदाला पावतात कीं ज्याला सूर्य, चंद्र, किंवा अग्नि यांचेपासून प्रकाश घेण्याचें मुळींच कारण नाहीं; सारांश तें माझें परम पद स्वयंप्रकाश असोन त्या ठिकाणीं जाऊन पोंचलेले योगी पुन्हां जन्ममृत्युरूपी संसारांत येत नाहींत.—**गीता.**

**उद्धव ह्मणाला:**—हे भगवंता ! ज्या मनुष्यांची बुद्धि स्वतः केलेल्या कर्मांमुळें तुझ्या स्वरूपापासून पराङ्मुख झाली आहे, ते उच्च नीच योनींत देह कसे धारण करितात, व कसे सोडितात, अर्थात् आत्मा अचल निर्विकार असून त्याला जन्ममृत्यु कसे घडतात ? तें कृपा करून सांग; ह्मणजे त्यायोगें माझ्या संशयाची निवृत्ति होईल.

**श्रीकृष्ण म्हणाले:**— उद्धवा, पंचज्ञानेंद्रियांशीं सहवर्तमान ह्मणजे लिंगदेह हा कर्मांच्या आधीन असल्यामुळें तो वासनेच्या योगानें एका देहांतून दुसऱ्या देहांत भ्रमण करितो. व मग सच्चिदानंदरूपी जीव, केवळ त्या लिंगदेहाच्या अभिमानामुळें त्याच्या मागून जातोसा दिसतो ! जसें:—आकाश अचल परिपूर्ण ह्मणजे अंतर्बाह्य व्यापक असूनही घटाच्या जाण्यायेण्यानें घटांतील आकाशही त्या घटाबरोबर जातें, येतें, असें दिसतें, वस्तुतः तें अचल असल्यामुळें हालतच नाहीं; तद्वत् लिंगदेहाच्या अध्यासानें जीवाला जन्ममृत्यु आहे असें मानितो; पण वस्तुतः तसें मुळींच नाहीं. लिंगदेह हा कर्मांच्या आधीन असतो, ह्मणून अंतकाळीं त्याच्या बऱ्या वाईट कर्मांप्रमाणें पदार्थांचें चिंतन करीत असतां तदाकार बनून, त्यापुढें प्राप्त झालेल्या देहांत प्रवेश करितो; व मग त्यास पूर्वजन्माचें स्मरण नाहींसें होतें. उद्धवा, प्राण्याला अंतकाळीं वासना-

(१) येथें लिंगदेह, मुख्य पांच इंद्रियें व एक मन मिळून सहा तत्त्वांचा सांगितला आहे. त्यांत इतर इंद्रियांचा व प्राणांचा अंतर्भाव असल्यामुळें दहा इंद्रियें, पांच प्राण, मन आणि बुद्धि मिळून सतरा तत्त्वांचा लिंगदेह समजावा. (२) " घट जेथ जेथ हिंडो बैसे । आकाश त्यासवें जात दिसे । परि ढळलें नाहीं आकाशें । आत्म्याचें तैसें गमन येथ ॥ घट फुटोनी जेथ नाशे । तेथ आकाश आकाशीं सहज असे । नवा घट जेथ उपजों बैसे । तों तेथ आकाशें व्यापिजे ॥ " (३) " तैंचि विस्मरण कैसें । निज बालत्वें प्रौढ वयसें । निःशेष नाठवे मानसें । पूर्व देह तैसें विसरोनी जाय "—**नाथ.**

रूप प्राप्त झालेल्या शरीराशीं प्रेमातिशयामुळें तादात्म्य ह्मणजे त्या शरीराचा आकार प्राप्त होतो. ह्यालाच पुनर्जन्म असें म्हणतात. ह्यास दृष्टांत—भरताला मृगाच्या प्रेमातिशयामुळें पुढील जन्म मृगाचा आला. किंवा, यातना देहाच्या भयशोकामुळें तादात्म्य होतें. ह्या तादात्म्यामुळेंच त्याला पूर्वशरीराचें अगदीं विस्मरण होऊन त्याचा अभिमान सुटतो. जीवाच्या अशा विस्मृतीलाच त्याचा मृत्यु असें म्हणतात. भयशोकामुळें तदाकारता कशी होते, यास कीटभृंगन्यायाचा दृष्टांत—कीटकाला वारंवार येऊन टोंचणाऱ्या भृंगाचें अति भयशोकामुळें ध्यान लागून ती भृंगकीट बनून उडून जाते, तशीच योग्याची गती होते. उद्धवा, ही जन्ममरणस्थिति बरोबर लक्ष्यांत येण्यास स्वप्नाचें किंवा मनोराज्याचें उदाहरण फार सोइचें आहे. पहा—स्वप्नांत किंवा मनोराज्यांत असलेल्या मनुष्याला स्वप्न पाडण्याच्या, किंवा मनोराज्य चालविण्याच्या पूर्वीच्या स्थितीचें जसें विस्मरण पडून केवळ स्वप्नाचें किंवा मनोराज्याचें मात्र ज्ञान असतें; तद्वत् लिंगदेहाला तादात्म्यामुळें मागील जन्माचें विस्मरण पडतें, व नंतरच्या नूतन ज-

(१) " भजर गाउळानें घृत नेतां । तो तुरंगीं चढे मनोरथा । मन नाचूं लागे उल्हासता । स्वकल्पित कल्पना ॥ सबळ वारुचें उड्डाण । ह्मणोनि उडूं जातां आपण। पडतां घृतकुंभ होय भग्न । पुसतां जन काय झालें ॥ बळें उडाला माझा घोडा । परि स्मरेना तो फुटला घडा । बंदीं पडला रोकडा । नेणे बापुडा मनोरथें । येथवरी तीव्र जें विस्मरण । त्या नांव देहाचें मरण । अति उद्यत तें मनाचें ध्यान । तेंचि जन्म प्राण्यांसी "—ज्ञाने.

(२) क्रियांतराशक्तिमपास्य कीटको ध्यायन्नलित्वं ह्यलिभावमृच्छति । तथैव **योगी** परमात्मतत्त्वं ध्यात्वा समायाति तदेकनिष्ठताम् ॥ **अर्थ**—ध्यानीं धरितां भ्रमर । कीटक तद्रूप होय साचार । होऊनिया पक्षधर । जाय उडोनी ॥ तैसा योगिया जाण । परमात्मरूपाचें करितां ध्यान । स्वयेंच तत्स्वरूप होऊन । रहातसे ॥—**विवेकचूडामणि.**

न्माचें ज्ञान राहतें ! आतां सूक्ष्मरूपानें देहाला नित्य जन्ममृत्यु कसे आहेत, तें सांगतों:—

( १ ) **क्षणोक्षणीं जन्ममृत्यु**— उद्धवा. कालच्या योगानें प्राण्याच्या शरीरांना क्षणोक्षणीं जन्ममृत्यु होतात; परंतु त्या कालाची गति अत्यंत सूक्ष्म असल्यामुळें. ते सामान्य मनुष्यांच्या लक्ष्यांत येत नाहीत. पहा—दिव्याची ज्योत एकसारखी जळत असते; उदकाचा प्रवाह एकसारखा चालू असतो; किंवा एखादें फळ एकसारखें वाढत जातें; परंतु प्रत्येक क्षणीं त्यांचीं स्वरूपें बदलत असल्यानें त्यांस वारंवार भिन्न अवस्था प्राप्त होत असते. याच अनुमानानें सर्व प्राण्यांच्या शरीरांना कालाच्या अदृष्ट गतीमुळें क्षणोक्षणी बाल्य. यौवन. तेज. बळ इत्यादि प्रकारांनीं त्यांच्या पूर्व अवस्थेचा नाश होऊन दुसरी अवस्था प्राप्त होत असते. दिव्याच्या ज्योती जरी क्षणोक्षणीं बदलत असतात. तरी त्यांच्या सारखेपणामुळें पूर्वींची जी ज्योत, तीच ही असें वाटतें. नदीच्या एकसारख्या प्रवाहामुळें पूर्वींचें जें उदक तेंच हें असें भासतें: तसें प्रतिक्षणीं देहाची अवस्था बदलत असून पूर्वींचा जो तोच हा पुरुष असा अविवेकी जनांचा भलताच समज असतो. आतां ह्या शरीराच्या अवस्था कोणत्या त्या सांगतों:—

( २ ) **देहाच्या अवस्था**—[ १ ] निषेक ( पित्याच्या देहांतील रेतरूप गर्भाचा मातेच्या उदरांत प्रवेश ) [ २ ] गर्भवृद्धि. [ ३ ] जन्म. [ ४ ] बाल्यावस्था ( पांच वर्षेपर्यंतचा काल ) [ ५ ] कुमार अवस्था ( सोळा वर्षेपर्यंतचा काल. ), [ ६ ] तारुण्य ( पंचेचाळीस वर्षेपर्यंतचा काल ) [ ७ ] मध्यम वय ( साठ वर्षेपर्यंतचा काल ), [ ८ ] जरा आणि [ ९ ] मृत्यु, अशा देहाच्या नऊ अवस्था आहेत. ह्या सर्व लहान मोठ्या अवस्था देहाच्या आहेत. ह्यांचा जीवाशीं कांहीं एक संबंध नसल्यामुळें त्या आत्म्याच्या नव्हत. ह्या अवस्था प्राप्त होण्याचें कारण

मनाच्या म्हणजे लिंगदेहाच्या वासना हें होय. अज्ञानामुळें जीव त्या अवस्था आपल्या आहेत असें मानितो. कदाचित् ईश्वराच्या कृपेनें एखाद्या पुरुषाच्या विवेकाच्या बळानें तत्त्वज्ञान झालें तर आत्मा देहाचा द्रष्टा असल्यामुळें त्याला ह्या अवस्थांचा मुळींच संग नाहीं. असें जाणून त्यांचा त्याग करितो. म्हणजे देहात्मबुद्धि टाकून अलिप्त राहतो. इति । २७.

# अध्याय २८ वा.

## परीक्षिति राजाचें मृत्युभय निवारण ( २–५ )

श्रीशुक उवाच –

त्वं तु राजन्मरिष्येति पशुबुद्धिमिमां जहि ॥
न जातः प्रागभूतोऽद्य देहवत्त्वं न नंक्ष्यसि ॥ २ ॥

**श्रीशुकाचार्य म्हणाले:**--परीक्षिति राजा! तुला "मी मरणार" अशी जी भीति उत्पन्न झाली आहे, ती बुद्धि तू आतां सोडून दे. कारण, तू देहाप्रमाणें पूर्वी नव्हतास, सांप्रत जन्म पावला नाहींस, व पुढें नाशही पावणार नाहींस. अर्थात् तूं अजन्मा आहेस म्हणजे जन्म-मरण हीं तुझ्या ठायीं नाहींत. ह्यावर तुला शंका येईल कीं, 'बीजांकुर-न्यायवत् "पिता पुत्रेण पितृमान्योनियोनौ" इत्यादि श्रुतिवचनावरून पिता हा पुत्रपौत्रादि रूपानें जन्मास येतो, व नाश पावतो; तर मग जीवास जन्म व नाश नाहींत हें कसें संभवतें?' या शंकेचें समाधान असें कीं: पिता हा पुत्रादिकांच्या रूपानें जन्म व नाश पावतो, म्हणजे पित्याचा देह हा पुत्रादिकांच्या देहरूपानें जन्ममृत्यु पावतो असा अर्थ समजावा. बीजांकुर हा न्याय जड देहाला लागू आहे; चैतन्यरूपी आत्म्याला नाहीं. कारण, देहापासून देह उद्भवतो; तसा आत्मा उत्पन्न होत

नाहीं. राजा, अग्नि हा जसा काष्ठाहून वेगळा असतो; [illegible] (त्वंपद-लक्ष्य आत्मा) देहादिकांहून भिन्न आहेस. जन्म मृत्यु हे [illegible] धर्म होत. ही गोष्ट यथासांग लक्ष्यांत येण्यास स्वप्नस्थितीचा विचार [illegible]—मनुष्य स्वप्नामध्यें स्वतः आपलें मस्तक तुटलें, आपल्याला [illegible] त झाला असें पाहतो. ज्या अर्थी "माझें शीर उडालें. व मी [illegible] असें पाहतो; त्या अर्थी ह्या अनुभवाला जाणणारा एक कोणी [illegible] निराळाच असावा असें ठरतें, अर्थात् हा आत्मा घटद्रष्टावत् त्या [illegible] साक्षी आहे असें सिद्ध झालें. जन्ममृत्यु हे केवळ देहाचेच [illegible] त्म्याचे ठायीं रज्जुसर्पन्यायवत् ते केवळ भ्रमामुळें भासतात. [illegible] घटांतील आकाश त्या घटाच्या नाशानंतर जसें महदाकाशांत मि[illegible] तद्व-त् जीवात्मा देहोपाधीच्या नाशानंतर ब्रह्मरूपाशीं ऐक्य [illegible].

( १ ) **बंध विचार.**—राजा, देहोपाधीची निवृत्ति [illegible]ल्यानंतर जीवात्मा ब्रह्मरूप बनतो असें तुला सांगितलें. ह्यावर [illegible] घेशील कीं, ' जीवात्म्यानें एका देहोपाधीची निवृत्ति झाल्या[illegible] दुसऱ्या उ-पाधीचें ग्रहण केलें, तर तो ब्रह्मरूप कसा बनेल ? ' [illegible]धान—राजा, केवळ जडदेहाचा नाशच उपाधीची निवृत्ति [illegible] र्थ नव्हे. तर ह्या अनात्म देहाच्या ठिकाणीं आत्मभावना करून [illegible] शीं अ-भिमान धारण करणें, हेंच आत्म्याचें बंधन होय. ह्या बं[illegible] उपाधी-ची जी निवृत्ति, त्यालाच जीवाचा मोक्ष असें म्हणतात. [illegible] त्या-चा एकदां कायमचा नाश झाल्यानंतर दुसरी उपाधि [illegible] स जा-गाच उरत नाहीं. संचित कर्माप्रमाणें मनच जीवाला दे[illegible] व कर्में निर्माण करून देतें, म्हणून ही उपाधि उद्भवते; मग त्या [illegible]धीच्या संबंधामुळें जीवाला संसार भोगावा लागतो. वस्तुतः त्याच[illegible] ठिकाणीं संसार मुळींच नाहीं. पहा—तेल, पात्र, वात व अग्नि ह्या [illegible] जोंप-र्यंत एकीकरण असतें, तोंपर्यंत दिवा असतो; तद्वत् मन, [illegible], देह व

चैतन्य ह्या वस्तु जेथपावेतों एकत्र असतात, तेथपावेतों जीवात्म्यास संसार असतो. हा संसार सत्व, रज व तम ह्या गुणांच्या वृत्तींमुळें उद्भवतो. व त्यांच्या नाशानंतर हा नाश पावतो. हा विकारी संसार जडदेहाला लागू आहे. चेतन आत्म्याला नाहीं. कारण, उपाधिरहित जीव (साक्षीभूत आत्मा) हा देहातीत असून आकाशाप्रमाणें अखंड व निर्विकार आहे.

( १ ) मुक्त विचार—बा समर्था ! तूं आपल्या बुद्धीच्यायोगें वासुदेवाचें चिंतन चालविण्यासाठीं देहादिकांमध्यें साक्षित्वानें वास करणाऱ्या आत्म्याचा अन्वय व्यतिरेक रीतीनें विचार कर; म्हणजे ब्राह्मणाच्या शापानें प्रेरिलेला तक्षक तुला चावणार नाहीं. कारण, मृत्यूचाही मृत्यु जो ईश्वर त्याला मृत्यु पीडा देत नाहीं. पूर्वोक्त विचार असा कीं, "जो मी तो परब्रह्म आहे, जें परमपद तेंच मी होय." असा तूं निश्चय जाण. आणि मनाचा उपाधिरहित अशा ब्रह्मस्वरूपीं लय कर. म्हणजे तुला दंश करणारा सर्प, स्वतःचें शरीर व सगळें विश्व आत्म्याहून वेगळें दिसणार नाहीं. इति । २८.

# अध्याय २९ वा.

## सिद्धींचा व धारणेचा प्रकार ( ११-१५ ).

उद्धव उवाचः—

कया धारणया कास्वित्कथंस्वित्सिद्धिरच्युत ॥
कति वा सिद्धयो ब्रूहि योगिनां सिद्धिदो भवान् ॥ २ ॥

( १ ) ज्ञानप्रकरण १४ वा अध्याय पहा.

( २ ) "झालिया सूर्यकिरण प्राप्त । जेवीं अग्नि स्रवे सूर्यकांत । तेणें याग कां दाह होत । त्या कर्मातीत सूर्य जैसा "—नाथ.

**उद्धव म्हणालाः**—अच्युता. योगी पुरुषांना ज्या सिद्धि प्राप्त होतात, त्या तुलाच ठाऊक असावयाच्या. कारण, योग्यांना सिद्धि देणारा तूंच आहेस; ह्यास्तव कोणती धारणा केली असतां कोणत्या नांवाची व कशा प्रकारची सिद्धि प्राप्त होते ? आणि त्या धारणा व त्या सिद्धि किती आहेत ? तें मला सांग.

**श्रीकृष्ण ह्मणालेः**—उद्धवा ! योगी पुरुषांनी सिद्धि अठरा प्रकारच्या सांगितल्या आहेत व त्यांच्या धारणाही तितक्याच आहेत. त्यांपैकीं अणिमादि अष्टसिद्धि माझ्याच आश्रयानें रहतात; आणि बाकीच्या दहा सत्वगुणाच्या उत्कर्षानें प्राप्त होतात. ह्या शिवाय पांच प्रकारच्या क्षुद्रसिद्धि आहेत. ह्या एकंदर तेवीस प्रकारच्या सिद्धींचे तीन भेद आहेत. ते असेः—

**[१] स्वाभाविक सिद्धि; [२] गुणमूलक सिद्धि; व [३] क्षुद्र सिद्धि.**

[ १ ] **स्वाभाविक सिद्धि.**—( १ ) अणिमा, ( २ ) महिमा. ( ३ ) लघिमा. ( ४ ) प्राप्ति. ( ५ ) प्राकाश्य. ( ६ ) ईशिता. ( ७ ) वशिता, ( ८ ) प्राकाम्य. ह्या आठ प्रकारच्या सिद्धि स्वाभाविक आणि निरतिशय मानिलेल्या आहेत.

[ २ ] **गुणमूलक सिद्धि.**—( १ ) अनुर्मिमत्व, ( २ ) दूरश्रवण, ( ३ ) दूरदर्शन. ( ४ ) मनोजव. ( ५ ) कामरूप. ( ६ ) परकायाप्रवेश, ( ७ ) स्वेच्छामृत्यु. ( ८ ) सुरक्रीडादर्शन. ( ९ ) संकल्पसिद्धि, ( १० ) अकुंठित आज्ञा ह्या दहा सिद्धि गुणोत्कर्षक होत.

[ ३ ] **क्षुद्रसिद्धि.**—( १ ) त्रिकालज्ञान. ( २ ) अद्वंद्व. ( ३ ) परचित्तज्ञान, ( ४ ) भूतप्रतिकार आणि ( ५ ) अपराजय ह्या पांच क्षुद्र सिद्धि होत.

आतां ह्या सर्व सिद्धींचीं लक्षणें व त्यांच्या धारणा सांगतों:—

## [ १ ] स्वाभाविक सिद्धि व धारणा.

( १ ) अणिमा—ह्या सिद्धीच्या योगानें स्थूल शरीरानें सूक्ष्म शरीर बनवितां येतें. ( धारणा )-शब्दादितन्मात्रांच्या सूक्ष्मरूपांमध्यें परमात्म्याची व्याप्ति आहे. अशा निश्चयात्मक बुद्धीनें त्या सूक्ष्म रूपांच्या ठिकाणीं जो पुरुष चित्ताचा लय करितो. त्यास अणिमा सिद्धि प्राप्त होते.

( २ ) महिमा ह्या सिद्धीच्या योगानें स्थूल शरीरानें सूक्ष्म शरीर बनवितां येतें. (धारणा)-ब्रह्मांडरूपी विराट स्वरूपाच्या ठिकाणीं आणि आकाशादि पंचमहाभूतांच्या निरनिराळ्या ठिकाणीं परमात्म्याची व्याप्ति आहे; अशा निश्चयात्मक बुद्धीनें त्या स्थूल रूपांमध्यें जो पुरुष चित्ताचा लय करितो. त्यास महिमा सिद्धि प्राप्त होते.

( ३ ) लघिमा--ह्या सिद्धीच्या योगानें कालाच्या परिमाणू इतकें शरीर हलकें होतें. (धारणा)-कालरूप परिमाणूस जसा जडपणा नसतो; तसाच पंचमहाभूतांच्या सूक्ष्म रूपांस म्हणजे शब्दादि तन्मात्रांस जडपणा नसतो. म्हणून त्या पंच-तन्मात्रक सूक्ष्म रूपांच्या ठिकाणीं परमात्म्याची व्याप्ति आहे; अशा निश्चयात्मक बुद्धीनें त्या रूपांमध्यें जो पुरुष चित्त लीन करितो, त्यास लघिमा सिद्धि प्राप्त होते.

( ४ ) प्राप्तिः---ह्या सिद्धीच्या योगानें कोणत्याही प्राण्याच्या इंद्रियांशीं त्या त्या इंद्रियांच्या अधिष्ठात्री देवतांच्या रूपानें संबंध घडतो. ( धारणा )-सात्विक अहंकार ज्याच्या उपाधि अशा परमात्म्याच्या ठिकाणी निश्चयात्मक बुद्धीनें, जो पुरुष चित्त लीन करितो, तो प्राप्तिनामक सिद्धीस पावतो.

( ५ ) प्राकाश्यः—ह्या सिद्धीच्या योगानें आपल्याला जीं ऐकून ठाऊक आहेत, त्या स्वर्गादि पारलौकिक स्थानीं व जीं प्रत्यक्ष दिष्ट-

ण्याजोगी आहेत, त्या इहलोकींच्या स्थानीं कोण कशा प्रकारें विषयोपभोग भोगितो, हें पाहण्याचें सामर्थ्य येतें. ( धारणा )–क्रियाशक्तिप्रधान व ज्याला सूत्र ह्मणतात, त्या महत्तत्त्वाच्या ठिकाणीं परमात्म्याची व्याप्ति आहे; अशा निश्चयात्मक बुद्धीनें त्या सूत्रात्म्यामध्यें जो पुरुष चित्ताचा लय करितो, त्याला ही प्राकाश्य नामक सिद्धि प्राप्त होते.

(६) **ईशिता**—ह्या सिद्धीच्या योगानें, जीवांना व त्यांच्या उपाधिभूत देहेंद्रियांना प्रेरणा देण्याचें सामर्थ्य येतें. ( धारणा )–त्रिगुणात्मक मायेचा नियंता व उत्पत्ति, स्थिति व लय करण्याविषयीं कालरूपी ( महाविष्णु परमात्मा ) ( सर्वशक्तिमान ) आहे; अशा निश्चयात्मक बुद्धीनें त्या सर्वांतर्याम्याचे ठिकाणीं जो पुरुष चित्त लीन करितो, त्याला ही ईशिता सिद्धि प्राप्त होते.

(७) **वशिता**—ह्या सिद्धीच्या योगानें विषयोपभोग भोगीत असतांही त्यांत आसक्त न होतां त्यांपासून अलिप्त राहतां येतें. ( धारणा )–अवस्थात्रयातीत जो तुरीय, ह्मणजे विराट्, हिरण्यगर्भ व अव्याकृत आणि जागृति, स्वप्न व सुषुप्ती ह्या तिन्ही उपाधींनीं रहित असा जो भगवान् आहे, त्या सच्चिदानंद स्वरूपाच्या ठिकाणीं जो पुरुष चित्त लीन करितो, त्याला ही वशिता सिद्धि प्राप्त होते.

(८) **प्राकाम्य**—ह्या सिद्धीच्या योगानें ज्या ज्या सुखाची इच्छा करावी, तें सुख अमर्याद प्राप्त होतें. ( धारणा )–परमात्म्याचें परमानंदरूप आहे; अशा निश्चयात्मक बुद्धीनें त्या निर्गुण ब्रह्मरूपाच्या ठिकाणीं जो पुरुष चित्ताचा लय करितो, तो परमानंद पावतो. हा परमानंद प्राप्त झाला असतां सकल इच्छा समाप्त होतात. हीच प्राकाम्य नामक सिद्धि होय.

### [२] गुणमूलक सिद्धि व धारणा.

(१) **अनूर्मिमत्व**—ह्या सिद्धीच्या योगानें क्षुधा, तृषा, शोक,

मोह, [illegible] मृत्यु ह्या सहा ऊर्मि ( लहरी ) बाधा करीत नाहींत. ( धारणा [illegible] गाचा अधिपति, धर्मप्रवर्तक व शुद्धसत्वात्मक जो मी अनि[illegible] त्या माझे ठायीं चित्त धारण करणाराचें स्वरूप शुद्ध होतें, व त्या [illegible] षड्मींपासून बाधा होत नाहीं.

( २ ) [illegible]ण — ह्या सिद्धीच्या योगानें दूर प्रदेशांतून बोललेलें ऐकूं येतें. ( [illegible]रणा )- आकाशवत् व समस्त भूतांचा समष्टि प्राण जो मी त्या [illegible] ठायीं मनाच्या योगें नादानें जो चिंतन ( नादानुसंधान ) करितो, [illegible] जीव त्या आकाशांत स्पष्ट ऐकूं येणाऱ्या दूरदूरच्या वाणी श्रवण करितो.

( ३ ) [illegible]र्शन — ह्या सिद्धीच्या योगानें कितीही दूरचे पदार्थ दृष्टिगोचर होतात. ( धारणा )—नेत्रेंद्रियाचा सूर्याचे ठायीं आणि सूर्याचा नेत्रेंद्रियाचे ठायीं संयोग करून, त्या संधीमध्यें जो कोणी माझें ( परमात्म्याचें ) चिंतन करितो, त्याची दृष्टि सूक्ष्म होते, व तो समस्त विश्व पाहूं शकतो.

( ४ ) [illegible]जवः — ह्या सिद्धीच्या योगानें जेथें मन जाईल तेथें देहही जाऊन पोहोंचतो. ( धारणा )- मन, देह व प्राणवायु ह्या सहवर्तमान परमात्म्याच्या ठिकाणीं निक्षेप केला असतां ही सिद्धि प्राप्त होते.

( ५ ) [illegible]मरूपः — ह्या सिद्धीच्या योगानें ज्या वेळीं जें स्वरूप घेऊं इच्छितो, त्या वेळीं तें स्वरूप घेऊं शकतो. ( धारणा )—अचिंत्यशक्ति व नानारूपधारी जो परमात्मा त्याच्या ठिकाणीं जो पुरुष मनाची धारणा करितो, तो योगी जें जें देवादिकांचें रूप घेऊं इच्छितो, तें तें घेऊं शकतो.

( ६ ) **परकायाप्रवेशः**—ह्या सिद्धीच्या योगानें दुसऱ्याच्या शरीरांत प्रवेश करूं शकतो. ( धारणा )—आपल्या आत्म्याचा लय दुसऱ्याच्या देहांत करणारा योगी, जसा भ्रमर एका पुष्पावरून दुसऱ्या

पुष्पावर सहज उडून जातो; नंतर आपला स्थूल देह सोडून प्राणांसहित सूक्ष्मदेहानें (लिंगदेहानें) बाह्य वायूमध्यें प्रविष्ट होऊन त्या योगें दुसऱ्याच्या देहांत अनायासें प्रवेश करतो.

(७) स्वच्छंदमृत्यु:—ह्या सिद्धीच्या योगानें आपल्या इच्छेप्रमाणें शरीराचा त्याग करितां येतो. (धारणा)-योगी पुरुषानें आपल्या पायाच्या खोटेनें (गुदद्वार) बंद करून प्राणरूपी आत्म्याला नाभी, हृदय, कंठ व मस्तक ह्या स्थानीं चढवावें, आणि ब्रह्मरंध्रमार्गानें ब्रह्मरूपी मिळून मग शरीराचा त्याग करावा.

(८) सुरक्रीडादर्शन:—ह्या सिद्धीच्या योगानें अप्सरांबरोबर देव ज्या क्रीडा करतात, त्या पाहतां येतात. (धारणा) जो योगी शुद्धसत्वमय माझ्या (परमात्म्याच्या) रूपाचें चिंतन चालवितो, त्यास सत्वांशापासून उद्भवलेल्या देवांगना (अप्सरा) विमानाच्या योगें तेथेंच प्राप्त होतात.

(९) संकल्पसिद्धि:—ह्या सिद्धीच्या योगानें योगी पुरुषास कोणत्याही वेळीं, कसाही प्रकारचा इच्छित मनोरथ परिपूर्ण करून घेतां येतो. (धारणा)-ईशसंकल्प सर्वदा सत्य असतात; अशा त्या सत्यसंकल्प परमात्म्याचे ठायीं मन लावणारा व त्याच्या उपासनेमध्यें तत्पर असणारा जो योगी इष्टार्थ प्राप्त करून घेण्यास समर्थ असतो.

(१०) अप्रतिहत आज्ञा:—ह्या सिद्धीच्या योगानें योगी पुरुष जी आज्ञा करील, ती जणू काय परमेश्वरानेंच केली आहे; असें वाटून तिचें कोणीही उल्लंघन करीत नाहीं. (धारणा)—परमात्मा सर्वांचा नियामक व स्वतंत्र आहे. जो योगी अशी दृढ भावना करून माझ्या स्वभावास प्राप्त झाला त्याची आज्ञा सर्वमान्य होते.

---

(१) योगप्रकरण अध्याय २५ वा पहा.

[ ३ ] क्षुद्रसिद्धि व धारणा.

( १ ) त्रिकालज्ञानः—ह्या सिद्धीच्या योगानें योगी पुरुषाला भूत, भविष्य व वर्तमान ह्या तिन्हीं काळींच्या वस्तूंविषयींचें व स्वतःच्या जन्ममृत्यूचें आणि दुसऱ्याच्या मनांतील अभिप्रायाचें वगैरे ज्ञान करून घेतां येतें. ( धारणा ) भक्तीच्या योगें ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे, व त्रिकालज्ञ ईश्वराच्या धारणेमध्यें जो निष्णात आहे, त्या योग्याला तीन काळांचें ज्ञान प्राप्त होतें.

( २ ) अद्वंद्व—ह्या सिद्धीच्या योगानें अग्नि. उदक इत्यादिकांपासून पीडा होत नाहीं. ( धारणा )—अग्नि, उदक इत्यादिकांची ज्याला बाधा होत नाहीं. अशा भगवत्स्वरूपाच्या ध्यानयोगांत तत्पर असणाऱ्या योगी पुरुषाला ही सिद्धि प्राप्त होते. उदाहरण—जलचर प्राण्यांना उदकापासून कधींच पीडा होऊं शकत नाहीं; तशीच, योग्याच्या त्या योगमय शरीराला शीतोष्णादिकांची बाधा होत नाहीं ह्मणजे शीत, उष्ण, सुख. दुःख. इत्यादि द्वंद्वें सहन करण्याची शक्ति ह्या धारणेनें प्राप्त होते.

( ३ ) परचित्तज्ञानः—ह्या सिद्धीचें लक्षण व धारणेचा विधि त्रिकालज्ञानाप्रमाणेंच समजावा.

( ४ ) भूतप्रतिकारः—ह्या सिद्धीचें लक्षण व धारणेचा विधि अद्वंद्व सिद्धीप्रमाणेंच समजावा.

( ५ ) अपराजित—ह्या सिद्धीच्या योगानें कोठेंही पराजय होत नाहीं. ( धारणा )—श्रीवत्सादि चिन्हें व सुदर्शनादि आयुधें यांनीं सुशोभित आणि ध्वज, छत्र, चामर इत्यादिकांनीं युक्त अशा माझ्या अवतारांचें जो योगी ध्यान करितो, त्यास ही सिद्धि प्राप्त होते.

साधकाला योगसिद्धि मिळत नाहीं. कारण, त्या सगळ्याच सिद्धींवर स्वामित्व माझें आहे. मीच त्या सिद्धि देणारा व त्यांचें रक्षण करणारा आहें. इतकेंच नव्हे तर मी मोक्षाचा, मोक्षसाधनभूत ज्ञानाचा, धर्माचा व त्याचा उपदेश करणाऱ्या गुरूचाही स्वामी आहें. कारण, मी सर्व जीवांचा अंतर्यामी अर्थात् आत्मा होय. आणि आकाशादिक भूतांमध्यें सर्व जीवांच्या अंतर्बाह्य माझी ओतप्रोत व्याप्ति आहे इति । २९.

---

# अध्याय ३० वा.

---

## पृथूचें चरित्र (४-२३)

मैत्रेय उवाचः—

दृष्ट्वाऽऽत्मानं प्रवयसमेकदा वैन्य आत्मवान् ॥
आत्मना वर्धिताशेषस्वानुसर्गः प्रजापतिः ॥ १ ॥
जगतस्तस्थुषश्चापि वृत्तिदो धर्मभृत्सताम् ॥
निष्पादितेश्वरादेशो यदर्थमिह जज्ञिवान् ॥ २ ॥
आत्मजेष्वात्मजां न्यस्य विरहाद्रुदतीमिव ॥
प्रजासु विमनःस्वेकः सदारोऽगात्तपोवनम् ॥ ३ ॥

मैत्रेय ह्मणाले:—विदुरा, वेनाचा पुत्र पृथुराजा महाबुद्धिमान्, विरागी व धर्मसंपन्न असा होता. त्यानें अन्नादिकांची उत्पत्ति व नगरें, ग्राम यांची उत्तरोत्तर वृद्धि करून उत्तम प्रकारें प्रजेचें पालन केलें. पुढें कांहीं दिवसांनीं त्याला असें वाटलें कीं, " आपण ईश्वराची आज्ञा उत्तम प्रकारानें प्रतिपालन करून प्रजेचें पालन व साधूंच्या धर्माचें संरक्षण केलें. आतां आपलें उतार वय झालें आहे; तेव्हां आपण आत्मचिंतनाचा मार्ग धरावा हेंच आपणास योग्य होय. " असा विचार करून त्यानें सर्व राज्य पुत्रांच्या स्वाधीन केलें आणि आपण पत्नीसह-

वर्तमान तपोवनांत निघून गेला. त्यावेळीं त्याच्या पुत्रांना व प्रजाजनांना फार वाईट वाटलें. त्या योगें जिकडे तिकडे उदासीनता दिसूं लागली. ह्या तीव्र वैराग्य पावलेल्या पुरुषानें वनामध्यें कडकडीत तपश्चर्या करण्याचा उद्योग चालविला. तप करणें हा वानप्रस्थ लोकांचा परममान्य धर्म होय. पृथूचे नियम विघ्नांच्या योगानें कधींही ढळत नसत:— प्रथम कित्येक दिवस तो कंद, मुळें व फळें भक्षण करीत असे; पुढें कांहीं दिवस सुकलेलीं पानें खाऊन आपला निर्वाह चालवूं लागला; नंतर बहुतेक महिनेपर्यंत नुसतें उदक प्राशन करून राहत असे; आणि शेवटी तर वायु भक्षण करून राहूं लागला! त्या प्रभावशाली राजर्षीनें, ग्रीष्म ऋतूंत ( उन्हाळ्यांत ) पांच दिशांकडे पांच अग्नि पेटलेले आहेत व मस्तकावर सूर्य तापत आहे, अशा रीतीनें पंचाग्निसाधन चालवावें; वर्षाऋतूंत ( पावसाळ्यांत ) पर्जन्यामध्यें बसून वृष्टिवेग सहन करावा. शिशिरऋतूंत (हिंवाळ्यांत) गळ्याइतक्या पाण्यामध्यें बसून रहावें, आणि प्रति दिवशीं भूमीवर शयन करावें असा क्रम चालविला! पुढें, पृथुराजानें आत्मसाक्षात्काराच्या इच्छेनें सहनशीलता, मौनव्रत, इंद्रियनिग्रह, रेतस्खलन होऊं न देणें, इतके नियम धारण केले; आणि प्राणायामाच्या योगानें प्राणवायु स्वाधीन करून घेऊन उत्तम तपश्चर्या केली. अशा क्रमानें हळूहळू तपश्चर्या सिद्ध झाली; तेव्हां त्याचीं सर्व कर्मे क्षीण होऊन अंतःकरण निर्मळ झालें. प्राणायामाच्या योगानें कामक्रोधादि षड्रिपूंच्या शक्ति सर्वथा नष्ट झाल्या, व वासनारूपी बंधनें तुटून गेलीं. पुढें त्या श्रेष्ठ पुरुषानें, ज्ञानसंपन्न सनत्कुमार मुनींनीं ज्या अध्यात्म योगाचा उपदेश केला होता, त्याच पद्धतीनें अंतर्यामी परमेश्वराची आराधना करण्याचा क्रम आरंभिला. अशा रीतीनें पृथुराजा भागवतधर्माप्रमाणें वागून विश्वासपूर्वक नित्य आत्मज्ञानाचा यत्न करीत चालला, तेव्हां त्याच्या अंतरीं ब्रह्मरूप ईश्वराविषयीं एकनिष्ठ भक्ति

उत्पन्न झाली. पुढें त्याला वैराग्य उत्पन्न होऊन त्या द्वारें ज्ञान प्राप्त झालें. त्या ज्ञानेंकरून त्यानें उपाधिभूत जी हृदयग्रंथि ( अहंकार ) ती तोडून टाकिली. ही अहंकाररूपी हृदयग्रंथि सर्व संशयांचा निधि होय. कारण. हिच्यामुळेंच प्राण्याला शरीर व स्त्रीपुत्रादिकांवर अहंता ममतादि दुराग्रह उत्पन्न होतात. आत्मज्ञान झाल्यामुळें त्याची देहात्मबुद्धि नष्ट झाली. त्या तपस्व्यानें अशा प्रकारें आत्म्याचें परमात्मरूपीं ऐक्य केलें; व पूर्ण ब्रह्मरूपता प्राप्त झाली तेव्हां योग्य कालीं स्वतःच्या शरीराचा त्याग केला. विदुरा, त्या महान भाग्यशाली पृथूनें देहत्याग कसा केला त्याचा प्रकार तुला सांगतों ऐकः—

( १ ) **देहत्याग प्रकारः**—पृथूनें आपल्या डाव्या पायाच्या टांचेनें प्रथम गुदद्वार बंद केलें. व मूलाधारचक्रावरून वायु हळू हळू वर चढवीत नाभिप्रदेशीं आणून ठेविला. तेथून पुन्हां क्रमानें हृदय, उर आणि कंठ ह्या स्थलांच्या ठिकाणीं चढवीत चढवीत तो ललाटस्थानीं आणिला आणि शेवटीं तेथून युक्तीनें वर सरकावून ब्रह्मरंध्रांत निविष्ट केला. पृथूला कोणत्याही प्रकारची इच्छा राहिली नव्हती, म्हणून त्यानें शरीर उत्पन्न करणाऱ्या पंचभौतिक समष्टि शरीरांत आपल्या देहतत्त्वांचा लय केला. तो लय प्रकार असाः——

( २ ) **लय प्रकार**- पृथु राजानें आपल्या प्राणवायूचें महावायूशीं ऐक्य केलें. शरीरांतील पृथ्वीचे भाग पृथ्वींत मिळविले, तेज तेजाशीं जोडिलें. इंद्रियांचा पोकळ भाग आकाशांत मिळविला, रुधिर रेतादिकांपैकीं पातळ भाग उदकांत संयुक्त केला. अशा रीतीनें जें ज्याच्यापासून उत्पन्न झालें होतें, तें त्याच्या ठिकाणीं समाविष्ट केलें. नंतर

( १ ) योगप्रकरण अध्याय २५ वा पहा, ( २ ) योगप्रकरणाच्या १८ व्या अध्यायांतील सृष्टीचा उपसंहाराचा क्रम पहा.

त्यानें ब्रह्मरूपास प्राप्त होण्याकरितां पंचमहाभूतांचाही लय केला तो प्रकार असा:--त्यानें पृथ्वितत्त्वाचा उदकतत्त्वांत, उदकाचा तेजांत, तेजाचा वायूंत व वायूचा आकाशांत विलय केला. ( येथपर्यंत तामस अहंकाराच्या कार्याचा आकाशापर्यंत लय सांगितला. आकाशाचा लय अहंकारांत व्हावयाचा तो प्रकार पुढें सांगितला आहे. ) मग त्यानें अधिष्ठात्री देवतांसह मनाचा इंद्रियांच्या ठिकाणीं लय केला. त्या इंद्रियांचाही, ज्याची वृत्ति ज्या सूक्ष्मभूतावर चालते, त्याचा त्या सूक्ष्मभूतामध्यें लय केला. जसें श्रोत्रेंद्रियांची वृत्ति शब्दावर ह्मणजे आकाश सूक्ष्म भूतावर चालते, म्हणून त्या कर्मेंद्रियाचा आकाश सूक्ष्मभूतांत विलय केला, ह्याच क्रमानें त्वगिंद्रियाचा स्पर्शांत म्हणजे सूक्ष्मवायूंत, चक्षुरिंद्रियांचा रूपांत म्हणजे तेजांत, जिव्हेंद्रियाचा रसांत म्हणजे उदकांत व घ्राणेंद्रियाचा गंधांत म्हणजे सूक्ष्म पृथ्वींत विलय केला. हा सात्विक व राजस अहंकारांच्या कार्याचा लय होय. नंतर त्यानें तामस अहंकारांतील अवशिष्ट राहिलेल्या आकाशासह ह्या सूक्ष्मभूतांना वर नेऊन सर्व भूतांचें आदिकरण जो अहंकार त्यांत सोडून दिलें. व त्या अहंकाराचाहि महत्तत्त्वाशीं संयोग केला. ह्या महत्तत्त्वांतच सर्व गुणकार्यांची स्थिति आहे. पुढें त्यानें त्या महत्तत्त्वाचें मायोपाधिप्रधान जो जीव, त्या जीवाच्या ठिकाणीं ऐक्य केलें. नंतर ज्ञान आणि वैराग्य ह्यांच्या प्रभावानें स्वस्वरूपीं स्थिर झालेल्या त्या महासमर्थ पृथूनें तो मायोपाधि जीवभावहि सोडून दिला. पूर्वीं त्या मायोपाधीमुळें जो पृथू नांवाचा जीव होता तोच आतां ब्रह्मरूप झाला.

( ३ ) **अर्चीचें चरित्रः**—विदुरा, महापुण्यपुरुष जो पृथुराजा त्याची पत्नी महाराज्ञी अर्चि ही त्याच्या मागोमाग गेली होती. ती इतकी सुकुमार होती कीं, भूमीला पाय लावण्याचा देखील तिला प्रसंग आलेला नव्हता ! आणि आतां तर तिला पतीप्रमाणें निष्ठापूर्वक व्रतें व

धर्माचरण करावें लागून पतीची सेवाही करावी लागत असे; आणि ऋषिमार्गें कंद, मुळें व फळें खाऊन शरीराचा निर्वाह चालविणें भाग पडे! अशा प्रकारें पुष्कळ कष्ट सोसावे लागत असत; तथापि तिला कधींही दुःख वाटलें नाहीं. कारण, पतिसेवा घडत आहे, ह्यांतच तिला विशेष आनंद वाटत असे! आपला प्रियपति जो पृथुराजा, त्याच्या देहांतील सर्व चेतना नष्ट झाल्या. हें पाहून त्या साध्वीला दुःख झालें. तिनें किंचित् शोक करून तेथेंच पर्वताच्या शिखरावर चिता सिद्ध केली, आणि त्यावर तें प्रेत ठेविलें; नंतर तिनें स्नान करून उचित क्रिया केल्या. ज्यांनें पृथ्वीवर अनेक सत्कृत्यें करून अंतीं सद्गतीही मिळविली, त्या आपल्या पतीला उदक दिलें. स्वर्गस्थ देवांना नमस्कार केला, व त्या चितेभोंवतीं त्रिवार प्रदक्षिणा करून पतीच्या चरणांचें ध्यान करीत अग्नीमध्यें प्रवेश केला! त्या साध्वीनें आपल्या महावीर पतीशीं सहगमन केलेलें पाहून देवांनीं व देवस्त्रियांनीं त्या अर्चिची स्तुति केली. तेव्हां देवस्त्रियांनीं परस्परांशीं संभाषण चालविलें तें असें:—

(४) देवस्त्रियांची वाणी—" अहो! ही स्त्री ( अर्चि ) अत्यंत धन्य होय. कारण हिनें त्या राजेश्वर पृथूची सर्वात्मभावानें विलक्षण सेवा केली! ह्या साध्वीनें जें पुण्यकर्म आचरलें तसें इतर कोणत्याही स्त्रीच्या हातून घडणें अशक्य होय. त्या पुण्यप्रभावानें ही अर्चि आह्मांला टाकून पृथु नामक पतीच्या मागून उच्च पदास जात आहे! पहा! पहा!! ती जात आहे तें आह्मी नुसतें पहावेंच! तें पद मिळविण्याची आह्मांला योग्यता नाहीं! अहो पहा! ह्या मनुष्यांचें आयुष्य ह्मटलें तर क्षणभंगुर आहे असें असतांही प्रत्यक्ष भगवत्पदाची प्राप्ति करून देणारें व कर्माचा क्षय करणारें जें ज्ञान तीं संपादन करितात, तेव्हां त्यांना दुसरें दुर्लभ तें काय!" अहो, मनुष्यजन्म हें मोक्षप्राप्तीचें

साधन होय. हा जन्म मिळविण्यासाठीं प्राण्याला अनेक योनींत फिरण्याचे कष्ट सोसावे लागतात. तेव्हां त्याला ही दुर्लभ नरतनु प्राप्त होते! असा दुर्लभ नरदेह मिळाला असतां जो प्राणी विषयसुखांत आसक्त होऊन राहत असेल, तो अगदीं फसला. असें म्हटलें पाहिजे. खरोखर तो आत्मद्रोहीच होय."

**मैत्रेय म्हणाले**:- विदुरा, देवांच्या स्त्रिया अशा रीतीनें स्तुति करीत होत्या. इतक्यांत ती अर्चि, आत्मज्ञान्यांमध्यें श्रेष्ठ असा आपला पति पृथुराज भगवत्स्वरूपीं चित्त ठेविल्यामुळें ज्या पदीं प्राप्त झाला, त्या लोकाला गेली. महाभगवद्भक्त पृथूचा प्रभाव हा अशा प्रकारचा आहे. त्या पुण्यश्लोक पुरुषाचें चरित्र मी तुला सांगितलें. जो मनुष्य विस्तीर्ण व पुण्यकारक असें हें चरित्र नम्रतेनें भक्तिपूर्वक पठण करितो, लोकांना ऐकवितो किंवा इतरांच्या मुखांतून ऐकतो, तो पृथूच्या पदास प्राप्त होतो. इति । १०.



योगप्रकरण समाप्तः

॥ ॐ नमो नारायणाय ॥



# ज्ञानप्रकरण प्रारंभः

## अध्याय १ ला.

### ईश्वराची विश्रांत प्रकटता ( ११ १२ ).

उद्धव उवाचः --

संशयः शृण्वतो वाचं तव योगेश्वरेश्वर ॥
न निवर्तत आत्मस्थो येन भ्राम्यति मे मनः ॥ १६ ॥

उद्धव ह्मणालाः—हे योगेश्वरांच्या ईश्वरा ! पूर्वोक्त ( तिन्ही प्रकरणांतील ) आपलीं भाषणें श्रवण करूनही माझ्या मनांतील संशय निवृत्त झाला नाहीं. याकरितां असा एखादा उपाय सांगावा कीं, त्यायोगें त्या संशयाची निवृत्ति होऊन आत्मज्ञानाची प्राप्ति होईल.

**श्रीकृष्ण ह्मणालेः**—बा उद्धवा, परमात्म्याचें ज्ञान झालें असतां

तुझ्या संशयाची निवृत्ति होते. आतां तो परमात्मा जीवकोटींत कशा प्रकारें प्रविष्ट होऊन प्रकट झाला, व त्यापासून जन्ममरणांस कारणीभूत प्रपंचरचना कशी झाली. ते सर्व प्रकार तुला सांगतों. एकाग्र चित्तानें एक——सर्वव्यापक व सर्वांस जीवन देणारा असा जो परमेश्वर तो देहांतील विवरांत नादयुक्त प्राणांसह प्रवेश करून आधारादि चक्रांचे ठायीं अभिव्यक्त ( प्रकट ) झाल्यासारखा होतो. तो असा:—

**प्रकटता**— ( १ ) आधारचक्राचे ठायीं परानामक नादरूपानें परमात्मा प्रकट होतो. व तेथें तो आनंदमयरूप होऊन तुर्यावत् अत्यंत सूक्ष्म दिसतो; ( २ ) मणिपूरचक्राच्या ठिकाणीं पश्यंति नामक नादरूपानें आविर्भूत होतो, व तेथें तो विज्ञानमयरूप होऊन सुषुप्तिवत् सूक्ष्म दिसतो; ( ३ ) विशुद्धचक्राचे ठायीं मध्यमानामक नादरूप पावतो, व तेथें तो मनोमयरूप होऊन स्वप्नवत् स्पष्ट दिसतो; आणि (४) अखेरीस मुखाच्या ठिकाणीं वैखरीनामक नाद ह्मणजे मात्रा, स्वर, वर्ण, अक्षर इत्यादि स्थूलरूपानें प्रतीतीस येतो. व तेथें प्राणमयरूप होऊन जाग्रतवत् अत्यंत स्पष्ट असा दिसतो. व मग अतिस्थूल वेदशाखादिरूप असा होतो.

( १ ) "कृत्वा रूपांतरं चैवं देहे प्राविशदीश्वरः । इति ताः श्रुतयः प्राहुर्जीवत्वं प्राणधारणात् ॥" **अर्थ**—परमात्मा देहीं प्रवेशून । जीवत्व घे आपल्या म्हणून । ऐसें ही बोलियलें प्रमाण । यात श्रुतिमध्यें ॥ एवं एकचि परमात्मा । परंतु जीव शिव दो नामा । घालित बगला हमामा । लोकीं दया ॥ —**पञ्चदशी.**

(२) पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः। वेद्यं पवित्रमोंकार ऋक्साम यजुरेव च **अर्थ** त्या जगाचा आई, बाप, पालक व आजा हे सर्व मीच आहें. जाणण्यास योग्य असा परम पवित्र ॐकार ( प्रणव ) मीच आहे. तसेंच ऋक्, साम व यजु हे वेद मीच आहें.-- **तात्पर्य**--अंकुरांत जो रस असतो, तोच त्या वृक्षाच्या विस्तारामध्यें ह्मणजे त्याच्या खोडांत, खांद्यांत, डाहाळ्यांत, पानांत असा सर्वत्र

**उद्धवा.** परमेश्वर अव्यक्त असून सूक्ष्ममध्यमादि क्रमानें व्यक्त कसा होतो, याविषयीं एक दृष्टांत सांगतों, तो तूं लक्ष्यांत आण. पहा— अग्नि हा आकाशाप्रमाणें सर्वत्र उष्णरूपानें अव्यक्त स्थितींत असून काष्ठाचे ठायीं मंथन केलें असतां तो सूक्ष्मरूपानें प्रकट होतो. पुढें त्यास वायूचें साहाय्य मिळालें ह्मणजे तो अधिक स्पष्टपणें दिसतो; तोच पुढें प्रज्वलित होऊन होमद्रव्यांच्या योगानें अत्यंत वृद्धिंगत होतो. तद्वत् पूर्वोक्त परापश्यंत्यादि वाणी माझी (ईश्वराची) अभिव्यक्ति (प्रकटता) होय.

**उद्धवा,** चतुर्विधवाणीरूपानें परमेश्वराची प्रकटता जशी प्रतीतीस येते; तसेंच देणें, घेणें, बोलणें, चालणें, मलत्याग, रतिसुख, हुंगणें, रसग्रहण, पाहणें, स्पर्श करणें, ऐकणें, संकल्प विकल्प, निश्चय, अभिमान, श्वासोच्छ्वासादि प्राणक्रिया, आणि सत्व, रज व तम या त्रिगुणांपासून आलेला अधिदैविक, अध्यात्मिक व अधिभौतिक असा त्रिविध प्रपंच ह्याच्या रूपानेंही परमेश्वराची प्रकटता प्रतीतीस येते. प्रपंचांत ज्या अर्थीं ईश्वराची अभिव्यक्ति आहे, त्या अर्थीं प्रपंच हा ईश्वराहून भिन्न नाहीं, हें सिद्ध आलें. आतां ईश्वर एक असून बहुरूप कसा झाला तें सांगतों:—

**ईश्वराची बहुरूपता**— उद्धवा, हा ईश्वर जगदुत्पत्तीपूर्वी अव्यक्त असा एकच होता; परंतु पुढें काळाच्या योगानें त्रिगुणात्मक विश्व प्रकट झाल्यानंतर तो बहुरूप झाल्यासारखा भासूं लागला. एकच ईश्वर बहुरूप कसा झाला, याविषयीं दृष्टांत:—बीज हीं एकरूप असून पृथ्वी जलादि-

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

असतां; तद्वत प्रणवाचा ह्मणजे ॐकाराचा अर्थ जो परमेश्वर तोच सगळ्या वेदाच्या कांडांचा व शास्त्रांचाही अर्थ असणें हें योग्यच आहे. **गीता.** तसाच योगप्रकरण अध्याय १५ वा आणि १६ वा यांत सांगितला आहे, तेथें पहा.

(१) ज्ञानप्रकरण ११ वा अध्याय पहा.

कांच्या संबंधानें अनेक रूप होतात; तद्वत् ईश्वर एक असून मायेच्या-संबंधानें अनेकरूप झाला. हें सर्व जग ईश्वरमय आहे; ईश्वराहून भिन्न कांहीं नाहीं. ह्याला दृष्टांतः—जसें पटामध्यें केवळ तंतुसमूहाची अनुस्यूत व्याप्ति आहे; तद्वत् समष्टिव्यष्ट्यात्मक जगतांत ब्रह्म सर्वत्र ओतप्रोत भरलेलें आहे. अशा त्या ब्रह्मरूप आत्म्याचे ठायीं अविद्येच्या अध्यासामुळें भासमान झालेला प्रपंचरूप वृक्षच जीवाला कर्तृत्वभोक्तृत्वादि संसाराचें कारणभूत आहे. आतां तो संसारवृक्ष कोणता तो सांगतों:—

**संसारवृक्षः**—उद्धवा, अनादि कर्मात्मक असा एक संसारवृक्ष आहे. पुण्य आणि पाप हीं त्याचीं दोन बीजें आहेत; अगणित वासना ह्या मुळ्या; सत्व, रज व तम हीं तीन खोडें ( पेरें ); पंचमहाभूतें ह्या फांद्या; शब्दस्पर्शादि पांच विषय. हे पांच प्रकारचे रसः मनासह अकरा इंद्रियें* ह्या लहान लहान फांद्या; वात, पित्त, कफ ह्या तीन त्वचा ( साली ) आणि सुख व दुःख हीं दोन ह्या संसारतरूचीं फळें असून ह्या वृक्षावर जीव व ईश्वर ह्या दोन पक्ष्यांचें घरटें आहे. असा हा अनादि संसारवृक्ष सूर्यमंडलापर्यंत व्यापलेला आहे! ह्या वृक्षाची

( १ ) " काष्ठाचा घोडा केला । अंगीं ठाणें आंत मिरवला । तो काष्ठपणा नाहीं मुकला । सर्वांगीं शोभला काष्ठत्वें । त्याचे पाहतां वेगळाले अवयव । खूर मांडे काष्ठचि सर्व । तैसा महाभूतें गुणस्वभाव । स्वरूप सावेव शिवाचें । सुवर्णाचें आलें लेणं । तें जेवीं मिरवे सोनेपण । तेवि महाभूतें विषय करणें । आभासपणें शिवरूप ॥ फडा पुच्छ वाकुडा चांग । येणें आकारें ह्मणती नाग । तो नाग नव्हे सोनेंचि चांग । तेवीं हें जग मद्रूप ॥ प्रपंच ईश्वरासि अभिन्न । येचि अर्थी श्रीनारायण । उद्धवासी सांगे आपण । अभिन्नपण जीवशिवां ॥—**एकनाथ.**

* पंचमहाभूतें, पांच विषय व एक मन अशीं इंद्रियें यांचे पृथक्करण, ज्ञानप्रकरण अध्याय दोन यांत आहे तेथें पहा.

जीं सुखदुःख नामक दोन फळें सांगितलीं, त्यांपैकीं एक दुःख नामक फळ गांवांत राहणारे गृध्रपक्षी म्हणजे विषयसुखांत रममाण असणारीं मनुष्यें भोगितात; आणि सुख नामक फळ वनामध्यें राहणारे हंसपक्षी म्हणजे परमहंस पुरुष सेवन करितात. उद्धवा. अशा प्रकारें एकच परमात्मा मायाशक्तीच्या योगानें बहुरूप झाल्यासारखा दिसतो. असें जो पुरुष सद्गुरूच्या उपदेशानें जाणतो. तोच श्रुतीचा तात्त्विक ( सत्य ) अर्थ जाणतो. यास्तव अनन्य भावानें सद्गुरूंची सेवा चालवीत त्यास प्रसन्न करावें. आणि त्याजकडून आत्मज्ञान संपादन करून ज्ञानरूप कुठारानें त्रिगुणमय लिंगदेहाचा भंग करावा. मग परमात्मस्वरूपीं मिळून नंतर सकळ साधनें सोडावीं. इति । १.

# अध्याय २२वा.

## तत्त्वसंख्या निरूपण ( ११-२२. )

उद्धव उवाच —

कति तत्त्वानि विश्वेश संख्यातान्यृषिभिः प्रभो ॥
नवैकादश पंच त्रीण्यात्थ त्वमिह शुश्रुम ॥ १ ॥
केचित् षड्विंशतिं प्राहुरपरे पंचविंशतिम् ॥
सप्तैके नव षट् केचिच्चत्वार्येकादशापरे ॥ २ ॥

(१) "तैसें करितां गुरुभजन । नव्हे भवबंधनें छेदन । केवळ जाण गुरुभक्ति । [illegible] निवळणा निवारण । तेवीं निजशक्ति गुरूंची ॥ दूर करावया दुरित । जेवीं गंगाजळ समर्थ । तेवीं भवभया भस्म करित । जाण निश्चित गुरुभक्ति ॥" —**नाथ.**

(२) अश्वत्थमेनं सुविरूढमूलमसंगशस्त्रेण दृढेन छित्त्वा । ततः पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूयः ॥ **अर्थ**--या संसाररूपी वृक्षास संगत्यागरूपी बळकट अशा शस्त्रानें तोडून टाकावें, नंतर माझें परमपदाचा शोध करावा. तेथें गेलेले लोक पुन्हां परत येत नाहींत.—**गीता.**

केचित्सप्तदश प्राहुः षोडशैके त्रयोदश ॥
एतावत्त्वं हि संख्यानामृषयो यद्विवक्षया ॥
गायंति पृथगायुष्मन्निदं नो वक्तुमर्हसि ॥ ३ ॥

**उद्धव ह्मणालाः**—हे प्रभो विश्वेश्वरा ! उपनिषदांमध्यें ऋषींनीं तत्त्वांची संख्या पुष्कळ प्रकारची सांगितली आहे. त्यांत खरीं तत्त्वें कोणतीं ? वेदवेत्त्या ऋषींपैकीं ( १ ) कित्येक सव्वीस तत्त्वें सांगतात. ( २ ) कित्येक पंचवीस तत्त्वें सांगतात. ( ३ ) कित्येक सात सांगतात. ( ४ ) कित्येक सहा सांगतात. ( ५ ) कित्येक चार सांगतात. ( ६ ) कित्येक सतरा सांगतात. ( ७ ) कित्येक सोळा सांगतात. ( ८ ) कित्येक तेरा सांगतात. ( ९ ) कित्येक अकरा सांगतात आणि ( १० ) कित्येक नऊ सांगतात; तेव्हां तत्त्वांच्या गणनेविषयीं ऋषिसांप्रदायामध्यें हा भेद असण्याचें कारण कोणतें ? आणि अशा निरनिराळ्या प्रकारची तत्त्वांची गणना ऋषींनीं कोणत्या उद्देशानें केली आहे, तें मला कृपा करून सांगावें.

**भगवान् श्रीकृष्ण ह्मणाले:** बा उद्धवा ! ब्राह्मण जें जें व्याख्यान करितात तें सर्व जरी व्याख्यानें करणारांच्या उद्देशभेदामुळें एकमेकांच्या विरुद्ध दिसतें, तथापि युक्तिसिद्ध आहे. बरें, खरें पाहूं गेलें तर तसें कांहीं विरुद्धही नाहीं. कारण, सर्व तत्त्वें सर्वत्र परस्परांच्या अंतर्भाव आहेतच. शिवाय, माझ्या मायेचा स्वीकार करून जे भाषण करितात, त्यांना निरनिराळ्या प्रकारांनीं विवेचन करणें काय दुर्घट आहे ! आणि त्या मायेच्यायोगें अंतःकरणांत क्षोभ झाला असतां अर्थात् सत्व, रज व तम ह्या त्रिगुणांची साम्यावस्था नाहींशी झाली ह्मणजे व्याख्यान करणाऱ्यांत मतभेद सहज उद्भवतो; परंतु शम व दम यांचा उदय झाला असतां अर्थात् अंतर्वृत्तींचा व बाह्य वृत्तींचा निग्रह केला ह्मणजे हा मतभेद नाहींसा होऊन वाद मिटतो. आतां सर्व प्रका-

रचीं व्याख्यानें सयुक्तिक कशीं आहेत तें स्पष्ट सांगतों. एकाग्र चित्तानें श्रवण कर.

**तत्त्वांचा कार्यकारणभाव:**—उद्धवा, तूं सर्व पुरुषांत श्रेष्ठ आहेस ! हा तत्त्वांचा कार्यकारणभाव सहज तुझ्या लक्ष्यांत येईल. कार्यकारणभाव म्हणजे तत्त्वांचा कार्यकारणरूपानें एकमेकांत अन्वय असणें हा होय. आतां तीं तत्त्वें एकमेकांत अन्वयरूपानें कशीं अंतर्भात असतात, तें सांगतों:—मृत्तिका ही घटाचें कारण आहे, व घट हा मृत्तिकेचें कार्य आहे. म्हणून मृत्तिका ही तद्रूपी घटाला व्यापून असतेच; तद्वत् आकाशतत्त्व हें वायूचें कारण आहे, व वायु हा आकाशाचें कार्य आहे; म्हणून आकाशतत्त्वाचा वायुतत्त्वांत अंतर्भाव आहे. असा तत्त्वांचा कार्यकारणरूपानें एकमेकांत अन्वय आहे. म्हणून तत्त्वांची गणना कार्यकारणरूपानें वक्त्याच्या मनोगतीप्रमाणें जास्ती कमी केलेली आढळते. कारण, एकाच कारणांत इतर अनेक कार्यांचा समुदाय असतो. दृष्टांत—जसें कारणरूपी आकाशतत्त्वांत कार्यरूपी वायुतेजादि तत्त्वांचा समुदाय सूक्ष्मरूपानें अंतर्भाव असतो; तद्वत् एका कार्यांत इतर कारणांचा अन्वयरूपानें अंतर्भाव असतो. पहा—पृथ्वीतत्त्वांत उदक, अग्नि, वायु इत्यादि तत्त्वें अंतर्भाव आहेत; म्हणून व्याख्यानाच्या अभिप्रायाला अनुसरून ऋषींनीं या तत्त्वांची कार्यकारणरूपानें जी कसी जास्ती गणना केली आहे, ती सयुक्तिक असल्यामुळें आम्ही तिचा स्वीकार करितों !

(१) " पूर्ण स्थिति जे तें कारण । त्यापासून उपजे कार्य जाण । हें कार्य कारणाचें लक्षण । तत्त्व विचक्षण बोलती ॥ "—**नाथ.**

(२) " साखरेचा नारळ केला । परि तो साखरत्वा नाहीं मुकला । तेवीं कारणाचीं कार्य जहालीं । असतां संचलीं कारणत्वें ॥ "—**नाथ.**

उद्धवा! जीव व ईश्वर हे दोघेही चैतन्यरूप असल्यामुळें त्यांमध्यें भेद मुळींच नाहीं. त्यांच्या भेदाची कल्पनाही व्यर्थ आहे. बरें. त्या जीवेश्वरांचा भेद मानण्याचें कारण. (१) जीव अनादि कालापासून अविद्येनें संयुक्त आहे. यामुळें त्याला आपल्या स्वरूपाचें ज्ञान स्वयं होऊं शकत नाहीं. त्याचा ज्ञानदाता ईश्वर पृथक् आहे (२) असें जाणून जीव आणि ईश्वर यांचा भेद मानिला आहे. म्हणून त्या भेद मानणाऱ्यांच्या मतांमध्यें तत्त्वांची गणना न्यूनाधिक झाली आहे. आतां ईश्वर आणि जीव ह्यांचा भेद व अभेद दर्शविण्याच्या अभिप्रायानें तत्त्वांची गणना न्यूनाधिक कशी झाली आहे. तें सांगतों:—

( १ ) **सव्वीस तत्त्वें:**—[१] ईश्वर; [१] जीव; [१] प्रकृति; [१] महत्तत्त्व; [१] अहंकार; [५] पंचमहाभूतें ( आकाश, वायु, तेज, आप व पृथ्वी ); [५] पंचज्ञानेंद्रियें (श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा व घ्राण) [५] पंचकर्मेंद्रियें ( वाक्, पाणी, पाद, उपस्थ व गुद ); [१] मन; आणि [५] पंचविषय ( शब्द, स्पर्श, रूप, रस, व गंध ); अशीं एकंदर सव्वीस तत्त्वें झालीं. उद्धवा, जीव आणि ईश्वर हीं दोन भिन्न तत्त्वें आहेत. असें कल्पून तत्त्वांची संख्या सव्वीस मानिली आहे. ह्याचें कारण असें कीं, जीव हा अनादि अविद्येनें बद्ध झालेला असतो; म्हणून त्याला ईश्वराच्या माहात्म्यावांचून स्वस्वरूपाचें ( आत्म्याचें ) ज्ञान स्वतंत्रपणें होण्याचा संभव नाहीं. ईश्वर हा केवळ ज्ञानरूप आहे. त्या-

( १ ) जीव आणि ईश्वर या दोघांचाही स्वरूपास्थितीनें एकत्व. भेद हा अविद्येनें कल्पित असतो, तो आत्मज्ञानानें नष्ट होतो. —**नाथाचा अभिप्राय.**

( २ ) " स्वभावें पाहतां दर्पण। एकाचें देखिजे दुजेपण। परि द्विधा नव्हेचि आपण। या परी जाण जीव शिव॥ अज्ञान प्रतिबिंबित जीव। त्याचा द्रष्टा तो सदाशिव। तरी ऐक्यतेचें जें वैभव। तो निजस्वभाव मोडेना॥" —**नाथ.**

च्या कृपेनें जीवाला आत्म्याचें ज्ञान प्राप्त होतें. ह्या कारणास्तव जीवेश्वराचा भेद मानिला आहे.

(२) **पंचवीस तत्त्वें**–[१] जीव; [१] प्रकृति; [१] महत्तत्त्व; [१] अहंकार; [५] पंचमहाभूतें; [५] पंचज्ञानेंद्रियें; [५] पंचकर्मेंद्रियें; [१] मन; [५] पंचविषय; अशीं एकंदर पंचवीस तत्त्वें झालीं. उद्धवा, जीवाला आत्मज्ञान प्राप्त झाल्यानंतर मात्र जीवेश्वरभेद राहत नाहीं. असें कल्पून तत्त्वांची संख्या पंचवीस मानिली आहे. कारण, त्या दोघांमध्यें राहणारें अनुस्यूत व्यापक चैतन्य एकच. त्यांचे ठायीं अविद्येच्या व विद्येच्या योगानें भेद भासतो. त्यांच्या भेदाची कल्पना हें वाचारंभण होय.

(३) **सात तत्त्वें**–[५] आकाशादि पंचमहाभूतें; [१] यांचा द्रष्टा जीव; [१] दृश्य ह्मणजे आकाशादि पंचमहाभूतें आणि द्रष्टा ह्मणजे जीव ह्या दोहोंनाही आधार परब्रह्म. ह्या सात तत्त्वांपासून देह इंद्रियें व प्राण हीं उत्पन्न होतात. म्हणून देहेंद्रियादिकांचा कार्यत्वानें आणि प्रकृति, महत्तत्त्व व अहंकार ह्यांचा कारणत्वानें पंचमहाभूतांत अंतर्भाव समजावा.

(४) **सहा तत्त्वें**–[५] पंचमहाभूतें व [१] ईश्वर. तो ईश्वर आपण उत्पन्न केलेल्या पंचभूतांशीं संयोग होऊन हें सर्व ब्रह्मांड उत्पन्न करिता झाला; व आपण त्यामध्यें स्थित झाला. ह्या सहा तत्त्वांनीं हें

(१) "जीव नियम्य ईश्वर नियंता । जीव अज्ञान ईश्वर ज्ञानदाता । जीव परिच्छिन्न एकदेशता । ईश्वर सर्वथा सर्वज्ञ ॥ जीव हीन दीन अज्ञान । ईश्वर समर्थ सर्वज्ञ । जीवास सदा कर्मबंधन । ईश्वर तो आपण निष्कर्म ॥" —**नाथ.**

(२) "वाचारंभणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥" **अर्थ**--घागर, घडा इत्यादि कार्य केवळ वाणीनें उच्चारण्याला आधार ह्मणजे नांवापुरतीं होत. वास्तविक तीं सगळीं मृत्तिका हेंच खरें. —**श्रुति.**

ब्रह्मांड उद्भवतें म्हणून अशा मताचें प्रतिपादन करणारांनीं एवढीच तत्त्वें मुख्य मानलीं आहेत. येथें जीवाचा ईश्वरामध्यें अंतर्भाव व इतर तत्त्वांचा पंचमहाभूतांत अंतर्भाव समजावा.

( ५ ) **चार तत्त्वें**—[३] तेज, उदक व पृथ्वी, आणि [१] त्यांत क्रिया उत्पन्न करणारा चेतन आत्मा; हीं चार तत्त्वें होत. इतक्यानें ह्या सृष्टीची व्यवस्था लागते. म्हणून अशा मतानें मुख्य तत्त्वें चारच ठरविलीं आहेत. आत्म्यामध्यें जीवाचा किंवा ईश्वराचा आणि तेज, उदक व पृथ्वी ह्या तीन तत्त्वांमध्यें बाकीच्या तत्त्वांचा अंतर्भाव समजावा.

( ६ ) **सतरा तत्त्वें**—[१] आत्मा, [५] पंचमहाभूतें, [५] पंच ज्ञानेंद्रियें, [५] पंचविषय, व [१] मन. ह्या सतरा तत्त्वांमध्यें इतर कित्येकांचा कारणरूपानें व कित्येकांचा कार्यरूपानें अंतर्भाव समजावा.

( ७ ) **सोळा तत्त्वें**—[१] आत्मा, [५] पंचमहाभूतें, [५] पंच ज्ञानेंद्रियें, [५] पंचविषय. अशीं सोळा तत्त्वें आहेत. आत्मा व मन हीं भिन्न तत्त्वें नव्हेत, आत्माच मन असें मानिलें आहे. कारण, आत्मा क्रिया करूं लागला, म्हणजे त्यालाच मन असें म्हणतात. अर्थात् आत्म्यामध्यें मन अंतर्भाव करून सोळा तत्त्वें मानितात.

( ८ ) **तेरा तत्त्वें**—[१] ईश्वर, [१] जीव, [१] मन, [५] पंच

( १ ) "राजा सिंहासनीं बैसला। तो राज्यत्वें पूज्य झाला। जरी मग खेळतां भा-विभ्रला। तरी काय मुकला राज्यपदा॥ जेवीं सागर क्षोभला। आला थोर लहरी तो बोलिजे सागर। कां निश्चल राहिलिया नीर। तरी समुद्र समुद्रत्वें॥ तेवीं मनपणें अति चंचळ। कां आत्मत्वें निज निश्चळ। दोहींपरी अविकळ। जाण केवळ परमात्मा॥" जीव मन व आत्मा हीं तिन्हीं एकच. ह्याला दृष्टांत—"दाति ( कोष, पिशवी ) मधु ( मकरंद ) आणि पिंवळा। तीन नांवें एक चांपेकळा। सुवास सुस्वाद सुनीळा। एकत्र मेळा आम्रफळें॥ तेवीं जीव शिव आणि मन। तिन्हीं एकरूपाचि जाण। जेवीं हेममणी संपूर्ण। हेमसूत्रीं समान वोंविती॥"—**नाथ**.

महाभूतें आणि (५) पंचज्ञानेंद्रियें अशीं तेरा तत्त्वें कित्येक मुनी कल्पितात. येथें पांच विषयांचा पंचमहाभूतांत अंतर्भाव समजावा. आणि आत्म्यामध्यें (परब्रह्मामध्यें) जीव व ईश्वर यांचा अंतर्भाव मानावा.

(११) **अकरा तत्त्वें** — (१) आत्मा, (५) पंचमहाभूतें, (५) पंचज्ञानेंद्रियें अशीं अकरा तत्त्वें मिळून हें जगांत उत्पन्न झालें आहे. येथें जीव व मन यांचा आत्म्यामध्यें अंतर्भाव समजावा.

(९) **नऊ तत्त्वें** — (१) पुरुष, (१) प्रकृति, (१) महत्तत्त्व, (१) अहंकार, (५) पंचमहाभूतें अशा नऊ तत्त्वांपासून ही सृष्टि निर्माण झाली आहे. असें कित्येक विद्वानांचें मत आहे. येथें ज्ञानेंद्रियपंचक, कर्मेंद्रियपंचक, विषयपंचक, मन एक व सत्वादि तीन गुण ह्या कार्यांचा कारणरूपी पंचमहाभूतांत अंतर्भाव समजावा.

**उद्धवा**, ह्याप्रमाणें ऋषींनीं तत्त्वांची निरनिराळी संख्या प्रतिपादन केली आहे. सर्वांचा उद्देश प्रकृति व पुरुष ह्यांचें यथार्थ ज्ञान व्हावें व त्यांच्यामधील भेद ध्यानांत यावा हाच होय. सर्वांचीं मतें सयुक्तिक व सप्रमाण आहेत. विद्वानांकडून अयोग्य गोष्ट कधींही सांगण्यांत येत नसते हें तूं लक्षांत ठेव ! इति । २.

---

# अध्याय. ३ रा.

---

## तत्त्वांचीं लक्षणें. ( ३–२६ ).

श्रीभगवानुवाच:—

**अथ ते संप्रवक्ष्यामि तत्त्वानां लक्षणं पृथक् ॥**
**यद्विदित्वा विमुच्येत पुरुषः प्राकृतैर्गुणैः ॥ १ ॥**

**भगवान् कपिल महामुनि ह्मणाले:—माते देवहूति ! आतां**

तुला तत्त्वांचीं निरनिराळीं लक्षणें सांगतों. त्या लक्षणांचें ज्ञान झालें, ह्मणजे मनुष्य प्रकृतीच्या ( मायेच्या ) गुणांपासून मुक्त होतो. ह्यावर ' श्रुतीमध्यें " आत्मज्ञानापासूनच मोक्ष होतो " असें सांगितलें असून पुन्हां तत्त्वांचीं लक्षणें कां समजलीं पाहिजेत ' असें तूं ह्मणशील, तर माते, ती गोष्ट खरी आहे; पण आत्मा हें एक मुख्य तत्त्वच मानिलें आहे, म्हणून तत्त्वांचीं लक्षणें जाणणें हें योग्य आहे. कारण, त्यांचीं लक्षणें समजलीं ह्मणजे विविक्त आत्मस्वरूपाचें ज्ञान होतें. व आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला ह्मणजे तत्त्वज्ञ पुरुषांच्या अंतःकरणांतील अहंकाररूप ' ग्रंथि ( गांठ ) ' तुटून जाते. ह्मणून तीं सर्व लक्षणें क्रमानें सांगतों:-

**पुरुषाचें लक्षणः**---हें विश्व ज्याच्या स्फूर्तीनें ( सत्तेनें ) व्याप्त झालें आहे, तो आत्माच पुरुष होय. तो अनादि, प्रकृतीहून पर, निर्गुण आणि स्वयंप्रकाश असा आहे.

**प्रकृति पुरुषांचे दोन दोन भेदः**--- प्रकृतीचे दोन भेद आहेत. एक आवरणशक्ति आणि दुसरी विक्षेपशक्ति. आवरणशक्ति ही स्वस्वरूप ज्ञानाचें आच्छादन करणारी जीवाची उपाधि तीच अविद्या होय. आणि विक्षेपशक्ति ही ब्रह्मांडाचा पसारा करणारी, ईश्वराची उपाधि तीच माया होय. जसे प्रकृतीचे दोन भेद आहेत; तसेच पुरुषाचेही दोन भेद आ-

( १ ) एक तलाव आहे; त्यामध्यें अपरंपार पाणी आहे. आतां त्या तलावांतील पाण्याच्या ठिकाणी ईश्वर असें कल्पूं , आणि त्या तलावाच्या भोंवतालच्या गाळाच्या ठिकाणीं माया असें मानूं . अशा ह्या तलावाचा एक पाट काढून शेतांत नेला असून त्या पाटाचें पाणी प्रत्येक वाफ्यांत सोडिलें आहे. येथें वाफ्यांत गेलेलें पाणी हा जीव होय; आणि वाफेचे भोंवताला असलेली मातीची पाळी ही जीवाची उपाधीभूत अविद्या होय. यावरून ईश्वर, माया, जीव व अविद्या ह्यांचीं स्वरूपें सहज लक्ष्यांत येतील.

होत. एक अविद्योपहितचैतन्य जीव व दुसरे मायोपहितचैतन्य ईश्वर. अविद्योपहित जीव ह्मणजे. प्रकृतीचें ज्ञान न झाल्यामुळें तिचे स्वाधीन होऊन संसारांत गुंतलेला पुरुष. आणि मायोपहित ईश्वर ह्मणजे प्रकृतीचें ज्ञान झाल्यामुळें तिला स्वाधीन ठेवून विश्वाला प्रकाश करणारा पुरुष. आतां प्रकृतीचें ज्ञान न झाल्यामुळें जीवाला संसारांत कर्से पडावें लागतें, तें सांगतों:--

**जीवाला संसारप्राप्तिः**—सोत ! त्याच ह्या व्यापक पुरुषानें, विष्णूची त्रिगुणात्मक शक्ति जी माया, ती लीलेनें जवळ आली असतां, सहज तिचा अंगीकार केला. त्या शक्तीचें स्वरूप स्पष्ट समजत नाहीं. ती माया सत्व. रज व तम ह्या तीन गुणांच्या योगानें आपल्यासारख्या त्रिगुणात्मक अशा अनेक प्रकारच्या प्रजा उत्पन्न करिते. तिच्या ठिकाणीं पुरुषाचें ज्ञान आच्छादित करण्याची शक्ति असल्यामुळें तिला पाहिल्याबरोबर त्या पुरुषाला ( जीवाला ) आपल्या स्वरूपाचा विसर पडला. अर्थात् मी देह आहें असें तो समजूं लागला. पुरुष प्रकृतीचा स्वीकार करितो व तिच्या अभ्यासामुळें स्वतःच्या ठिकाणीं कर्तृत्वभोक्तृत्वादि धर्म मानितो. वस्तुतः तो आत्मा अकर्ता व सर्वसाक्षी असा आहे. कर्तृत्वादि अभिमानामुळें जीवाला कर्मापासून बंधन प्राप्त होतें; व त्या बंधनामुळें जन्ममरणरूप संसार भोगावा लागतो. जीवाच्या ठिकाणीं स्थूलसूक्ष्मादि देहधर्म प्राप्त होण्याला कारण प्रकृति होय. जीवात्मा अकर्ता असल्यामुळें त्याच्याकडे कर्तृत्वादि कोणतेही धर्म नाहींत; तर प्रकृतीचा परिणाम जो अहंकार त्याच्याकडे ते धर्म आहेत. कर्तृ-

( १ ) " पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान । कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु " अर्थ—हा पुरुष प्रकृतीमध्यें राहून प्रकृतीपासून उद्भवणाऱ्या गुणांचा उपभोग घेतो; ह्मणून चांगल्या किंवा वाईट योनींमध्यें याचा जन्म होण्याला गुणांशीं याचा संबंध हेंच कारण होतें,—गीता.

त्व. कारणत्व. कार्यत्व. शांतत्व, घोरत्व, विमूढत्व हीं अहंकाराचीं लक्षणें आहेत. ह्मणून कार्यत्व. कारणत्व, कर्तृत्व आणि भोक्तृत्व हे सर्व धर्म अहंकाराचेच आहेत हें जरी खरें आहे; तथापि त्यांपैकीं कार्यत्व. कारणत्व, कर्तृत्व हे विकार केवळ जडावरच ह्मणजे देहादिकांवरच अनुभवाला येतात, ह्मणून त्याचें कारण जड प्रकृति ' अविद्या ' होय असें सांगितलें. आणि अवशेष भोक्तृत्व हा धर्म चेतन जीवावर दिसून येतो, ह्मणून त्याला कारण पुरुष ' संसारी जीव ' असें ह्मटलें.

**देवहूति ह्मणाली:**—हे पुण्यपुरुषा कपिला. पुरुष 'संसारी जीव' आणि त्याला उपाधिभूत जी अविद्या ह्या दोघांचीं लक्षणें मला समजलीं. आतां स्थूल आणि सूक्ष्म कार्य हें ज्यांचें स्वरूप आहे. त्या प्रकृति आणि पुरुष ह्या जगाच्या कारणभूत अशा दोन्ही तत्त्वांचीं लक्षणें सांगून माझा संशय घालवावे. •

**कपिल महामुनि ह्मणाले:**—सांत, प्रधान आणि प्रकृति हीं एकाच तत्त्वाची नावें आहेत. त्या तत्त्वामध्यें कोणतेही विशेष धर्म नाहींत; पण तें विशेष धर्मांना आधार आहे. उदाहरण–आकाशामध्यें घटमठादिक अनेक पदार्थ आहेत; पण तें सर्व पदार्थांचा आधार आहे; ब्रह्माचे ठायीं सत्व, रज व तम हे तीन गुण आहेत, पण तें सर्वांचा अधार आहे. तें कोणाचेंही कार्य नव्हें. किंवा तें इंद्रियांना समजतही नाहीं. व तें कधींही नष्ट होणारें नव्हे. पंचमहाभूतें. पंचसूक्ष्मभूतें, अंतःकरणचतुष्टय आणि दशेंद्रियें ह्या चोवीस तत्त्वांच्या समुदायाला " प्रधानकार्यरूपी ब्रह्म " असें मानितात. तीं चोवीस तत्त्वें अशीं:—पृथ्वी, आप, तेज, वायु आणि आकाश हीं पांच महाभूतें; शब्द, स्पर्श, रूप, रस, आणि गंध, हीं पांच सूक्ष्मभूतें; श्रोत्र, त्वचा. नेत्र, जिव्हा, नासिका, वाणी हात, पाय, शिश्न. आणि गुद हीं दहा इंद्रियें होत. अंतःकरणाचे, मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार असे चार

भेद आहेत. क्रमानें या चतुर्विध अंतःकरणाचे धर्म सांगतोः--संकल्पविकल्प, निश्चय, चिंतन आणि अहंपणा अशा निरनिराळ्या बोधक वृत्तीवरून समजून येतात. मीं सांगितल्या एवढ्यात सगुण ब्रह्माच्या विशेष अवस्था तत्त्वज्ञानी पुरुषांनी धरिल्या आहेत. काल नांवाचें एक पंचविसावें तत्त्व कित्येक लोक मानितात. तो एक प्रकृतीचाच अवस्थाविशेष आहे. कित्येक लोक तर ईश्वराच्या पराक्रमालाच काल असें ह्मणतात. ह्या कालाचे दोन भेद आहेत, ते सांगतोः—

**कालाचे भेदः** --सांगतो, ह्या कालाचे दोन भेद आहेत. एक संहार करणारा व दुसरा सृष्टि करणारा. ज्यापासून प्रकृतिरूप उपाधीमुळें देहावरच " अहं " असा अभिमान ठेवून मूढ होऊन राहिलेल्या जीवाला भय प्राप्त होतें, तो संहार करणारा काल होय. आणि प्रकृति म्हणजे तीन गुणांची साम्यावस्था, तिच्यामध्यें कोणतेही विशेष धर्म नाहींत; असें असून ज्याच्या योगानें तिच्यामध्यें चलन उत्पन्न होतें, तो भगवान् सृष्टिकर्ता काल होय असें म्हणतात. तो हाच भगवान् आपल्या मायेच्या योगानें, सर्व प्राण्यांच्या अंतरीं नियामक पुरुषाच्या रूपानें कोणताही विकार न पावतां राहतो, व बाहेर कालरूपानें राहतो. एतावता, जीव आणि ईश्वर हे एकच आहेत असें मानिलें तर प्रकृतीचे चोवीस भेद व एक पुरुष मिळून पंचवीस तत्त्वें होतात. जीव आणि ईश्वर हीं निरनिराळीं तत्त्वें असें धरलें, तर हीं दोन व प्रकृतीचे भेद चोवीस मिळून सव्वीस तत्त्वें होतात. इति । २.

# अध्याय ४ था.

---

## प्रकृतिपुरुषविवेक. ( ११–२२ )

उद्धव उवाच:

> प्रकृतिः पुरुषश्चोभौ यद्यप्यात्मविलक्षणौ ॥
> अन्योऽन्यापाश्रयात्कृष्ण दृश्यते न भिदा तयोः ॥
> प्रकृतौ लक्ष्यते ह्यात्मा प्रकृतिश्च तथाऽऽत्मनि ॥ २६ ॥
> एवं मे पुंडरीकाक्ष महांतं संशयं हृदि ॥
> छेत्तुमर्हसि सर्वज्ञ वचोभिर्नयनैपुणैः ॥ २७ ॥

**उद्धव म्हणाला**:—हे श्रीकृष्णा, प्रकृति जड व पुरुष चेतन अशा जडचेतन विभागेंकरून परस्परांपासून यद्यपि भिन्न आहेत, ही गोष्ट मलाही कबूल आहे; तथापि तीं एकमेकांपासून भिन्न रूपानें कोठेंच प्रत्ययास येत नसल्यामुळें त्यांचा भेद लक्ष्यांत येत नाहीं. प्रकृतीच्या ठिकाणीं आत्म्याचा अध्यास ( भास ) व आत्म्याच्या ठिकाणीं प्रकृतीचा अध्यास होतो. म्हणजे प्रकृतीचें कार्य जो जडदेह; तोच चेतन आत्मा व चेतन आत्मा तोच जडदेह असें विपरीत ज्ञान उत्पन्न होतें; यामुळें परस्परांचा भेद समजत नाहीं. हे कमलनयना श्रीकृष्णा, तूं सर्वज्ञ आहेस, म्हणून युक्तिकौशल्यानें परिपूर्ण अशा आपल्या भाषणानें तूं माझ्या अंतःकरणांतील संशयाचें छेदन कर.

**श्रीभगवान् म्हणाले**:—उद्धवा, प्रकृति (चेतनाशून्य जड द्रव्य) आणि पुरुष ( चेतना उत्पन्न करणारी शक्ति ) ह्यांच्यामध्यें प्रकाश-

---

( १ ) " जैसा तप्त लोहाचा गोळ । दिसे अग्नीच केवळ । तेवीं प्रकृतिपुरुषांचा मेळ । दिसे सबळ एकत्वें ॥ गोडी वेगळी साखर होये । परिमळावेगळा कापूर राहे । तैं आत्म्या वेगळी पाहे । प्रकृति लाहे अव्यक्ती ॥ "—**नाथ**.

अंधकारवत् महान् विलक्षणता आहे. ती अशी कीं, प्रकृतीचें कार्य जो हा देह, इंद्रियें, मन व प्राण इत्यादिकांचा संघात ( समुदाय ) तो त्रिगुणांच्या मिश्रणापासून उत्पन्न झाला असल्या कारणानें वृद्धि, क्षय, नाश इत्यादि विकारवान आहे; आणि आत्मा तर अविकारी आहे. उद्धवा, माझी त्रिगुणात्मक माया ही नानाप्रकारचे भेद व भेदबुद्धि आपल्या गुणांच्या योगानें उत्पन्न करिते, ह्मणून हा संघातरूपी विकारी कार्यवर्ग अध्यात्म, अधिभूत आणि अधिदैव अशा तीन प्रकारचा दिसतो. त्या तीन रूपांलाच त्रिपुटी अशी संज्ञा आहे. ती जाणण्यास नेत्रेंद्रियाचा दृष्टांत देतों:—नेत्रेंद्रिय ( अध्यात्म ), रूप ( अधिभूत ) व त्या नेत्रेंद्रियाची अधिष्ठात्री देवता सूर्य ( अधिदैव ) हीं तिन्ही जेव्हां असतील तेव्हांच परस्परांची सिद्धि होते. यांपैकीं एकाचा अभाव झाला कीं, दुसरीं दोन्ही सिद्ध होत नाहींत. पहा—नेत्र व त्याचा विषय रूप आहेत; पण सूर्यप्रकाश नाहीं तर रूपदर्शन संभवत नाहीं. तसेंच रूप व सूर्यप्रकाश आहेत; पण डोळाच नाहीं तरीही रूपदर्शन नाहीं.

( ) “ प्रकृति पुरुष हे दोन्ही । सदा अत्यंत वेगळेपणीं । जैसा दिवस आणि रजनी । एक लोपतां एक प्रबळ ॥ दिवस लोपतांचि जाण । अंधकारेंसी परिपूर्ण । येऊनिया तारागण । रात्री आपण उद्भवे ॥ तेवीं लोपतां पुरुषाचें भान । घेऊनि कार्येंसी ( देहादिकांसी ) कारण गुण । ज्ञानाज्ञानेंसी परिपूर्ण । प्रकृति जाण थोरावे ॥” तसेंच “जगाचें आदि कारण । प्रकृति होय गा आपण । प्रकृति प्रकाशी पुरुष जाण । तो महाकारण या हेतू ॥ प्रकृति व्यक्त पुरुष अव्यक्त । हे विकारी तो विकाररहित । हे गुणमयी गुणभरित । तो गुणातीत निजांगें ॥ प्रकृति स्वभावें चंचल । पुरुष अन्वयत्वें अचळ । प्रकृति बद्धत्वें सबळ । पुरुष केवळ बंधातीत ॥ प्रकृति स्वभावें सदा शून्य । पुरुष केवळ चैतन्यघन । प्रकृतीस होय अवसान । पुरुष तो जाण अनंत ॥ प्रकृति केवळ निरानंद । यालागीं तेथ विषयछंद । पुरुष पूर्ण परमानंद । विषयकंदछेदक ॥ ”—**नाथ**.

याप्रमाणें दुसऱ्यांच्या साहाय्यावांचून एकाची देखील स्वतंत्रता सिद्ध होत नाहीं; परंतु आकाशांतील सूर्य स्वयंप्रकाश असल्यामुळें त्याला आपल्या सिद्धीसाठीं कोणाचीच अपेक्षा असत नाहीं. आणि तो आपल्या प्रकाशानें सकल पदार्थांला प्रकाशित करूनही स्वतः त्यांपासून अलिप्त असतो; तद्वत् चेतन आत्मा अध्यात्मिकादि सर्व त्रिपुटींचें आदिकरण असून आपल्या चिद्रूपानें सकल पदार्थांना प्रकाशित करणारा व सर्वसाक्षी असा आहे. ह्या चेतन आत्म्याच्या साहाय्याशिवाय जड कार्यांची सिद्धि होऊं शकत नाहीं; पण जड वस्तु असोत किंवा नसोत, चेतन आत्म्याच्या सिद्धीसाठीं त्यांची कांहीं अपेक्षा नाहीं. कारण, आत्मा स्वतःसिद्ध चैतन्यरूप आहे. उद्धवा, पूर्वोक्त नेत्रेंद्रियाच्या दृष्टांतामध्यें जशी त्रिपुटीची व्यवस्था दाखविली, तशीच पांच कर्मेंद्रियें, पांच ज्ञानेंद्रियें आणि मन, बुद्धि, चित्त, अहंकार मिळून चौदा त्रिपुटींची व्यवस्था दाखवितों:—

**(२) कर्मेंद्रियांची त्रिपुटी.**

| अध्यात्म इंद्रियें. | अधिभूत विषय. | अधिदैव देवता. |
|---|---|---|
| वाक् (वाचा) | बोलणें | अग्नि |
| पाणी (हात) | देणें घेणें | इंद्र |
| पाद (पाय) | जाणें येणें | उपेंद्र |
| उपस्थ (शिश्न) | रतिभोग | प्रजापति |
| गुद | मलत्याग | यम |

**(२) ज्ञानेंद्रियांची त्रिपुटी.**

| अध्यात्म इंद्रियें. | अधिभूत विषय. | अधिदैव देवता. |
|---|---|---|
| श्रोत्र | शब्द | दिशा |
| त्वचा | स्पर्श | वायु |
| चक्षु | रूप | सूर्य |
| जिव्हा | रस | वरुण |
| घ्राण | गंध | अश्विनीकुमार |

## (३) अंतःकरण चतुष्टयाची त्रिपुटी.

| अध्यात्म करण. | आधिभूत विषय | आधिदैव देवता |
|---|---|---|
| मन | संकल्पविकल्प | चंद्र |
| बुद्धि | निश्चयात्मक | ब्रह्मा |
| चित्त | चिंतनात्मक | वासुदेव |
| अहंकार | अहंपणा | रुद्र |

उद्धवा, याप्रमाणें चौदा त्रिपुटींची व्यवस्था सांगितली. यावरून नानाप्रकारचे भेद व भेदबुद्धि यांचें ज्ञान होतें. आतां त्या भेदबुद्धीचें कारण सविस्तर सांगतों. एकाग्र चित्तानें श्रवण कर:---

**भेदबुद्धीचें कारण:**--हे उद्धवा! महत्तत्त्वाचें उपादान कारण प्रकृति आहे, ह्मणजे मूळ प्रकृतिपासून महत्तत्त्व निर्माण झालें; त्या महत्तत्त्वापासून गुणक्षोभ करणारा अहंकार उत्पन्न झाला. ( ह्याचें रूप आत्म्याला न जाणणें हें होय. ) तो सात्त्विक, राजस व तामस असा

(१) " चित्तचतुष्टय चमत्कार। मन बुद्धि चित्त अहंकार। हीं एकचि परि भिन्न प्रकार। जैसा व्यापार तैसें नांव॥ केवळ देहाकारें मीपण। तो सबळ अहंकार जाण। संकल्प विकल्प जें गहन। तेंचि मन उद्धवा॥ गतभोगाचें जें चिंतन। तें चित्ताचें लक्षण। केवळ निश्चयात्मक जाण। बुद्धि संपूर्ण तिचें नांव॥"--**नाथ.**

(२) " स्वस्वरूपातें विसरून। दृढ जें स्फुरे मीपण। तोचि अहंकार जाण। त्रिगुण क्षोभक॥ "—**नाथ.**

तीन प्रकारचा असून तो मोहें उत्पन्न करणाऱ्या भेदबुद्धीचें कारण आहे. ही भेदबुद्धि ह्मणजे केवळ संसार होय. हा स्वस्वरूपाच्या ( आत्म्याच्या ) विस्मरणानें उत्पन्न झाला आहे; यामुळें तो स्वरूपज्ञानाशिवाय शांत होत नाहीं. आत्मा शुद्ध चिन्मात्र आहे. असें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें देहादि संघाताहून आत्मा भिन्न आहे, किंवा अभिन्न आहे, अशा महान् संशयानें भेदबुद्धि स्वीकारून मतवादि व्यर्थ वादें करीत असतात. हा भेदवाद भ्रांतिमूलक असून अगदीं मिथ्या आहे स्वतः तथापि त्याच्या निवृत्तीकरितां विवेकादि बहिरंग साधनांची व श्रवण मननादि अंतरंग साधनांची अपेक्षा आहे. कारण, स्वस्वरूपभूत आत्म्याच्या विस्मरणानें बहिर्मुख ह्मणजे विषयासक्त लोकांची भेदबुद्धि या साधनांशिवाय शांत होत नाहीं ! तर ते आपल्या भेदबुद्धियुक्त केलेल्या कर्मांनीं उच्चनीच योनींत जन्ममृत्यु प्रवाहरूपी संसार भोगीत असतात. इति । ४.

---

( १ ) " विकारें क्षोभती तिन्ही गुण । हें विस्मरण मोहाचें लक्षण । तेणें विकारले तीन गुण । ते विकार भिन्न अवधारीं ॥ "—**नाथ.**

( २ ) " संसार ह्मणजे काय । जागृतीचा जो विसरू । तोची स्वप्नसृष्टीचा विस्तारू । विस्तु (परमेश्वर) विमुख जो अहंकारू । तोची संसार गुणात्मक॥ "—**नाथ.**

( ३ ) " जेवीं कृष्ण पीत रक्त श्वेत । स्फटिक ठेवितां तेथ तेथ । जरी तदाकार भासत । तरी तो अलिप्त शुद्धत्वें ॥ तेसा गुणसंगें जीवात्मा बद्ध । दिसे तरी तो अति शुद्ध । हा नेणोनिया निजबोध । करितीं विवाद मतवादी ॥ "—**नाथ.**

**( ४ ) ज्ञानप्रकरण १७ वा अध्याय पहा.**

# अध्याय ५ वा.

## जीवेश्वरस्वरूप निरूपण. ( १–३ )

सूतोवाच:

एतद्रूपं भगवतो ह्यरूपस्य चिदात्मनः ॥
मायागुणैर्विरचितं महदादिभिरात्मनि ॥ ३० ॥

**सूत ह्मणाले:**—शौनकादिक हो, जीव आणि ईश्वर ह्यांच्यांतील भेद समजण्याकरितां प्रथम जीवाचें स्वरूप निरूपण करितों:—

**जीवस्वरूप:**–जिच्या संबंधामुळें आपल्याला स्वरूपाची विस्मृति व परतंत्रता प्राप्त होतात, त्या आवरणशक्तीला अविद्या असें म्हणतात. चेतन आत्म्याला अविद्येचा संबंध जडला कीं तोच ( अविद्योपहित चैतन्यच ) जीव असें म्हणवितो. आत्मस्वरूपाच्या अज्ञानामुळें त्या जीवाला स्थूलसूक्ष्मादि देह प्राप्त होतात. हे देह, परमेश्वराच्या शक्तिरूपी मायेचे जे गुण, महत्तत्त्व, अहंकार इत्यादि तेवीस तत्त्वें यांच्या योगानें आत्म्याचे ठायीं कल्पिलेले आहेत. वस्तुतः तो जीव रूपरहित व चैतन्यस्वरूप आहे. हे स्थूलसूक्ष्म देह आत्मस्वरूपावर कसे कल्पिले

१ " याचि ब्रह्मांडीं पुरुष हें नांव । पिंडीं याचि ह्मणती जीव । मायेचा मुख्य स्वभाव । प्रतिबिंबला देव जीव शिवरूप "—**नाथ.**

( २ ) " चैतन्यं यदधिष्ठानं लिंगदेहश्च यः पुनः । चिच्छाया लिंगदेहस्था तत्संघो जीव उच्यते ॥ " **अर्थ**—लिंगदेहासी अधिष्ठान । वसे सर्वगत चैतन्य । जयावरी लिंगदेह कल्पून । अधिष्ठिती ॥ तो लिंगदेह आणि चैतन्य । तिसरा चिदाभास त्यांत मिळून । संघात मिळाला जो पूर्ण । तया जीव बोलती ॥—**पंचदशी.**

आहेत तें सांगतो:—उदाहरण—आपण असें म्हणतो कीं. "आकाशांत अभ्रें आलीं आहेत" म्हणजे वस्तुतः तीं अभ्रें वायूचे आश्रयावर असतां आपण त्यांना आकाशावर आरोपितो; किंवा फुलांतील सुगंध वायूमधून आला असतां आपण "वारा कसा सुगंधी सुटला आहे" असें म्हणून हें सुगंधत्व वायूवर आरोपितो. वस्तुतः गंध हा धर्म पुष्पाचा आहे. वायूचा नाहीं; तद्वत् अज्ञानी लोक. आत्मा स्वतः द्रष्टा (पाहणारा साक्षी) असतांना त्याच्यावर दृश्यत्वादि धर्मयुक्त जे जडदेह त्यांचा आरोप करितात. ज्या वेळेस अज्ञानानें आत्म्याच्या ठिकाणीं आरोपित केलेले हे स्थूलसूक्ष्म देह स्वस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झाल्यानें नष्ट होऊन वाच्यांश जो जीवभाव तो नाहींसा होतो. तेव्हां लक्ष्यांश जो कूटस्थ तोच ज्ञानरूप ब्रह्म होय असें समजतात. अर्थात् या ब्रह्मभावनेनें ब्रह्मरूप बनतात.

**ईश्वरस्वरूपः**—जो पुरुष मायेला स्वाधीन ठेवून विश्वाला प्रकाशित करितो तोच (मायोपहितचैतन्यच) ईश्वर होय. तो ईश्वर सर्वांचा अंतर्यामी, स्वतः कोणतेंही कार्य न करणारा व जन्ममरणरहित असा आहे. आणि तो ह्या जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करितो; पण त्याच्या ठिकाणीं तो कधींही सक्त होत नाहीं. त्याचा सृष्टि करण्यामध्यें कांहीं एक उद्देश नसतो, तरी त्याची क्रीडा कधींहि व्यर्थ होत नाहीं. ह्मणजे

(१) "प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः। यः पश्यति तथात्मानमकर्तारं स पश्यति ॥" **अर्थ**—आकाशामध्यें ढगाची हालचाल होत असते, पण आकाश जसें त्यांत लिप्त नसतें; तद्वत् प्रकृतीकडून सर्व कर्में सर्व तऱ्हेनें घडत असतात, **आणि आत्मा कांहींच करीत नाहीं, असें ज्याला कळलें त्याला खरें कळलें ह्मणावयाचें.—गीता.**

**(२) "ब्रह्मवेद ब्रह्मैव भवति" अर्थ—सर्वत्र परब्रह्माची व्याप्ति आहे व त्यावांचून विश्वांत दुसरें कांहींही नाहीं, असें जे जाणतात ते ब्रह्मरूपच होतात.—श्रुति.**

त्या क्रीडेपासून या जगाची उत्पत्त्यादि कार्ये सहज घडतात. आणखी तोच ईश्वर [illegible] उत्पन्न केल्यावर स्वतः श्रोत्र, त्वचा, चक्षु, जिव्हा, घ्राण आणि मन [illegible] सहा इंद्रियांचा प्रेरक होऊन प्राणिमात्रांच्या देहांमध्यें वास [illegible] त्या इंद्रियांनीं शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध आणि मनन [illegible] सहा विषय त्यांना, त्यांवर आसक्ति न ठेवितां जीवात्म्या [illegible] कर्मफळें भोगावयास देतो. आणि जीव त्यामध्यें आसक्त [illegible] भोग घेतो. [illegible] ईश्वर स्वतंत्र आहे, आणि जीव परतंत्र आहे. [illegible] ३.

# अध्याय ६ वा.

## मायास्वरूप निरूपण (६ १-३)

[illegible]

परस्या विष्णोरीशस्य मायिनामपि मोहिनीम ॥
मायां वेदितुमिच्छामो भगवंतो ब्रुवंतु नः ॥ १ ॥

**राजा जनक ह्मणाला:-** सर्वज्ञ मुनिवरहो ! विश्वव्यापक व सर्वशक्तिमान् विष्णूची जी माया, ब्रह्मदेवासारख्या मोठमोठ्यांनाही मोह घालिते, तिचें [illegible] जाणण्यास इच्छितो; आपण सर्वज्ञ आहां, करितां तें मला सांगण्याची कृपा करावी. •

**योगेश्वर अंतरिक्ष ह्मणाले:**--हे विदेही राजा ! मायेचें स्वरूप

(१) **नाथ ह्मणतात:-** अंतरिक्षानें राजाला उत्तर सांगितलें, तें असें:- राजा, तूं मायेचें लक्षण विचारतोस; पण तुझा प्रश्न फुकट गेला. कारण, माया ह्मणजे खोटी, भूल, ती सांगणार कशी ? वांझेच्या मुलाची पत्रिका वर्तवूं लागलें, तर त्याचा उपयोग होईल काय ? मृगजळाची पाणपोय गंधर्व नगरींत घालूं जाणें, वाऱ्याची वात वळून काजव्याच्या ज्योतीनें दिवा लावणें, आपल्या सावलीचें डोकें

अमुक प्रकारचें आहे. असें स्पष्ट सांगतां येत नाहीं; परंतु कार्यावरून मात्र तिचें अनुमान करितां येतें, तें असें:—आदिपुरुष ( ईश्वर ) ज्या आपल्या शक्तीच्यायोगें भूतांचें कारण होऊन स्वतःच निर्मिलेल्या पंचमहाभूतांच्या योगानें उच्च, नीच सकल पदार्थ उत्पन्न करिता झाला, ती हीच हरीची माया होय. विश्व निर्माण करण्यांत भगवंताचा उद्देश एवढाच असतो कीं, "स्वतःची ( आत्म्याची ) उपासना चालविणाऱ्या जीवाला उत्तम सिद्धि मिळवून द्यावी." किंवा "आपल्याच अंशभूत जीवाला देहद्वारें आत्मप्राप्ति व्हावी म्हणजे मोक्ष मिळावा." ह्यासाठीं भगवंतानें ज्या शक्तीच्या योगें ही सृष्टि निर्मिली, तीच मायेचें रूप होय. तो आदि पुरुष ईश्वर, अशा रीतीनें पंचमहाभूतांच्या योगानें सृष्टि रचून संपूर्ण प्राण्यांच्यामध्यें अंतर्यामीरूपानें प्रविष्ट (जीव) होतो. आणि त्या अंतरात्म्यालाच ( जीवालाच ) एक मन व श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा, घ्राण हीं पांच ज्ञानेंद्रियें आणि वाणी, हस्त, पाद, गुद व शिश्न हीं पांच कर्मेंद्रियें मिळून अकरा इंद्रियें; अशा अकरांनीं विभागून त्यांचे त्यांचे ( मनाचे व इंद्रियांचे ) विषय भोगवूं लागतो. तो जीव वस्तुतः

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

फोडूं लागणें, आकाशाची साल काढणें, अचकाच नेत्रानें सरपटून घालवूं पडणें, वागुलबोवाचा आपल्या शब्दानें पलायन करणें इ आदि कार्ये करूं लागे, आणि मायेचें स्वरूप सांगायाला लागणें; हा केवळ भासल्यावाचून योग्यतेचा होत. आणि "त्या मायेचें मुख्य लक्षण । स्वस्वरूपाचें आवरण । द्वैताचें जें जें स्फुरे स्फुरण । मूळ माया जाण तिचें नांव ॥ ब्रह्म अद्वैत परिपूर्ण । तें स्वरूपा स्फुरे जें मीपण । तेंचि मायेचें मूळस्थान । निश्चयें जाण नरनाथा ॥"

( १ ) "जेविं कां ऊंस वीजा पडे । तो वाढे अलपणेंची वाढ । जरी भिन्न भिन्न कांडें चढे । तरी मागें पुढें रस एक ॥ तैसा विषय आणि कारणें । प्रकाशूनि एकपणें । मग विषयास सेवणें । जीवपणें स्वयें सेवा ॥ "—**नाथ**.

महासमर्थ असतांही अंतर्यामी राहणाऱ्या आत्म्यानें प्रकाशित केलेल्या इंद्रियांच्या द्वारानें विषय भोगूं लागतो; आणि मायारचित हा सूक्ष्म देहच आत्मा असें मानून त्याच देहादिकांवर आसक्त होतो, म्हणून त्याला जन्ममरणरूप संसार भोगावा लागतो. कदाचित् उपभोग संपल्यावर तो मुक्त होतो असें म्हणावें, तरी तसें संभवत नाहीं. कारण, तो अंतःकरणांत विषयोपभोगाची वासना धरून कर्में करीत असतो. म्हणून त्या त्या पूर्व कर्मांचीं फळें भोगण्यासाठीं त्याला नानाप्रकारचीं शरीरें धारण करणें भाग पडतें. अर्थात् नानायोनींत घिरट्या घालीत तो ह्या संसारांत सुखदुःखरूप कर्मफळें भोगीत राहतो, परंतु मुक्त होत नाहीं. हाच मायेचा प्रभाव होय. अशा रीतीनें पुरुषाला ( जीवाला ) कर्माच्यायोगें अनेक दुःखें देणाऱ्या विविध गती प्राप्त होतात. आणि तो परतंत्र ( कर्मांच्या आधीन ) झाल्यामुळें त्या गती भोगण्यासाठीं जगाचा लय होईतोंपर्यंत जन्ममरणांच्या फेऱ्यांत पडून राहतो. भगवंताची माया ती हीच होय. इति । ६.

---

# अध्याय ७ वा.

## ब्रह्मस्वरूप निरूपण ( ११-३ ).

राजोवाचः--

नारायणाभिधानस्य ब्रह्मणः परमात्मनः ॥
निष्ठामर्हथ नो वक्तुं यूयं हि ब्रह्मवित्तमाः ॥ ३४ ॥

**विदेही राजा म्हणालाः**--हे मुनिवर्य, आपणास ब्रह्मानुभव उत्तम प्रकारचा असल्यामुळें माझी आपणांस अशी प्रार्थना आहे कीं, ज्यास नारायण, परमात्मा व परब्रह्म अशा संज्ञा देतात, तें ब्रह्म एकच

असून हीं पृथक् नांवें आहेत, कीं त्याचें कांहीं भिन्न स्वरूप आहे ? योगीराज, ही माझी शंका आपण कृपा करून दूर करा.

**योगीश्वर पिप्पलायन म्हणाले**:--हे राजा जनका, वस्तुतः विचार करितां परब्रह्म एकच आहे. त्याचे जे निरनिराळे संबंध आहेत; त्यांवरून त्यांस नारायण, परमात्मा व परब्रह्म ह्या भिन्न भिन्न संज्ञा पडल्या आहेत. जें ह्या विश्वाची उत्पत्ति, स्थिति व लय होण्याला मायेच्या द्वारें कारण आहे, व ज्याच्या ठिकाणीं मायेला स्वाधीन ठेवण्याचें पूर्ण सामर्थ्य असल्यामुळें जें विश्वाच्या उत्पत्यादिकांचें कारण नाहीं, त्यास " नारायण " अशी संज्ञा आहे। देह, इंद्रियें, प्राण व मन हीं ज्याच्या ' चैतन्याच्या ' योगानें कार्य करण्यास समर्थ होतात, त्याला " परमात्मा " अशी संज्ञा आहे; आणि जें स्वरूप जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीन अवस्थांमध्यें आणि ह्याखेरीज समाधि वगैरेमध्येंही सर्वत्र ओतप्रोत भरलेलें असतें, त्यास " परब्रह्म " अशी संज्ञा आहे. एवंच नारायण, परमात्मा व परब्रह्म अशीं भिन्न भिन्न नांवें त्यांच्या लक्षणभेदानें दृष्टोत्पत्तीस येतात. तथापि ह्या तिन्ही तत्त्वांचें एकरूपच आहे असें जाण. राजा, हें जें सर्वव्यापक ब्रह्म त्याचें ज्ञान होण्यास किंवा वर्णन करण्यास मन, वाणी, नेत्र, बुद्धि, प्राण अथवा दुसरीं इंद्रियें समर्थ नव्हत. कारण, सर्व इंद्रियांना प्रकाशित करणारें तत्त्व ब्रह्म हेंच असल्यामुळें त्या जड इंद्रियांच्या योगानें ब्रह्मरूप कसें जाणूं शकतील बरें ? अर्थात् नाहीं. आणि प्रत्यक्ष श्रुतीलाही ब्रह्मरूपाचें व-

---

(१) " ब्रह्म तें जाणावें आकाशासारिखें । सत्य तें स्वरूप वेगळेंची । वेगळेंची परी भरलें सर्व ठायीं । रिता ठाव नाहीं तयावीण ॥ तयासी जो रिता म्हणे तो अज्ञान । रामदासें खूण सांगितली ॥ "—रामदास.

(२) " जेवीं सायंप्रातमध्यान्ह । तिन्ही काळीं अलिप्त गगन । तेवीं उत्पत्ति स्थिति प्रलयीं जाण । अलिप्त नारायण परमात्मा ॥ "—नाथ.

र्णन करितां न आल्यामुळें तिनें त्या ब्रह्मरूप आत्म्याचीं पर्यायानें लक्षणें सांगितलीं आहेत. तें असें:–" श्रोत्रस्य श्रोत्रं मनसो मनो यद्वाचो ह वाचं स उ प्राणस्य प्राणः " ह्या श्रुतिवाक्याचा आशय–श्रोत्राचें जें श्रोत्र, मनाचें जें मन, वाचाची जी वाचा व प्राणाचा जो प्राण तें ब्रह्म समजावें. जें अमुक प्रकारचें आहे असें वाणीनें सांगतां येत नाहीं तेंच ब्रह्म तूं जाण. श्रुतींतील आत्मस्वरूपबोधक निषेध वचनें " नेति नेति ( हें आत्मा नव्हे, हें आत्मा नव्हे. ) " असें सांगणारीं आहेत; तरी ह्या श्रुतिवचनांच्या तात्पर्यावरून सुद्धां आत्म्याची सत्ता सहज सिद्ध होते. पहा-" सद्रूप आधार असल्यावांचून निषेध वचन प्रवृत्त होणार नाहीं; निषेधाला कांहीं तरी आधार असलाच पाहिजे." असा वेदांतसिद्धांत आहे. उदाहरण —एखाद्या सभेमध्यें एका अज्ञ मुलास विचारलें कीं, बाळा! ह्या सभेंतील लोकांपैकीं तुझा बाप कोणता? तेव्हां तो मुलगा 'हा नव्हे, तो नव्हे.' असें सांगणारच; पण त्याच्या त्या " नव्हे " म्हणण्याला आधार त्याच्या अंतःकरणामध्यें " आहे " हा भाव असलाच पाहिजे, अर्थात् बापाचें अस्तित्व सिद्ध होतें; तद्वत् श्रुतिवाक्यें 'स्थूल देह आत्मा नव्हे, सूक्ष्म देह आत्मा नव्हे,' असें सांगतात, तरी पण त्यांवरून सुद्धां आत्म्याचें अस्तित्व सिद्ध होतें. तेंच ब्रह्म मूळचें एक असूनही त्याच्या शक्ति अनंत असल्यामुळें, तें अनेकविध स्थूल

---

( १ ) " यद्वाचाऽनभ्युदितं येन वागभ्युद्यते तदेव ब्रह्म त्वं विद्धि " **अर्थ**—जें वाणीनें वर्णिलें जात नाहीं, व जें वाणीला बोलवितें तें ब्रह्म तूं जाण. याच अर्थाच्या श्रुति—" यन्मनो न मनुते " **अर्थ**—मन ज्याबद्दल तर्क करूं शकत नाहीं.—" न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् " **अर्थ**—कोणी देखील त्याला डोळ्यानें पाहत नाहीं.—" अस्थूलमनण्वह्रस्वमदीर्घम् " **अर्थ**—जाड नव्हे, बारीक नव्हे लांब नव्हे. ( २ ) " त्या स्वरूपाचा वचनपाट । करावया वेदें केली खटपट । तेथें श्रुतीचाही बोभाट । लाजली करूनी ' नेति, नेति ' वाटे ॥ "—**नाथ.**

सूक्ष्मांचें कारण होऊं शकतें. यहा—आधीं जें एक होतें, तेंच ब्रह्म सत्त्व रज, तम अशा तीन गुणांनीं युक्त प्रकृति म्हणवितें. व तेंच क्रियाशक्तीनें ' सूत्र ' आणि ' महत्तत्त्व ' अशी संज्ञा पावतें, आणि त्यालाच ' अहंभाव ' म्हणजे जीवोपाधि ' अहंकार ' अशी संज्ञा येते. तेव्हां जीव बद्ध होतो असें म्हणतात. पुढें अधिष्ठात्री देवता, इंद्रियें व विषय त्यापासून उद्भवणारीं सुखदुःखें ह्या रूपांनींही ब्रह्मच सर्वत्र भासत असतें. जें स्वतः सकल रूपांनीं भासतें. त्या प्रकाशमान ब्रह्माला स्वतःचें अस्तित्व सिद्ध करण्यास इतर प्रमाणांची अपेक्षा नकोच हें उघड आहे. ह्यावर तूं अशी शंका घेशील की, 'ब्रह्मरूपी आत्मा सकल जगद्रूप आहे. तर ह्या सर्व कार्यरूपी सृष्टीला जन्मादि सहा विकार आहेत. तसे आत्म्यालाही असावे. ' तर तिचेंही समाधान सांगतों:—

(१) आत्मा मुळींच उत्पन्न झाला नाहीं; (२) उत्पत्तिच नाहीं, तेव्हां त्याला उत्पत्तीनंतरचें अस्तित्व नाहीं; तसेंच (३) तो वाढत नाहीं; अर्थात् (४) त्याला परिपक्वदशा म्हणून कांहीं नाहींच. त्याचप्रमाणें (५) तो क्षीण होत नाहीं. व (६) मृत्युही पावत नाहीं. कारण, तो उत्पत्ति नाशवान् असे जे बाल्यतरुण देह, त्यांच्या त्या त्या बाल्यतारुण्यादि अवस्थांचा साक्षी होय. मग त्याला अवस्था संभवत

(१) " अगाध तिचा पतिव्रता धर्म । नपुंसका उपजली काम । अनाम्या ठेवी **नाम** । की निष्कर्मा कर्म निपजवी ॥ ते निःसंगसंग रतली । स्पर्शेवीण गुर्विणी ( गर्भिणी ) झाली । प्रधान महत्तत्त्वें गर्भा आली । तेथ त्रिगुणांनी व्याली विचारयुक्त ॥ "—**नाथ**. (२) " जायते, अस्ति, वर्धते, विपरिणमते, अपक्षीयते, नश्यति " **अर्थ**-जन्मानंतर असतो, वाढतो, पूर्ण दशेस येतो, क्षीण होऊं लागतो व नाश पावतो, हे सहा विकार होत.—**श्रुति.** (३) " जन्मापूर्वी बाळाचें नास्तिक्य । जन्मापाठीं मानिती आस्तिक्य । या अस्तिनास्तीतें भज । आत्म्यासि देख असेना ॥ "—**नाथ.**

नाहींत. दृष्टांत–घटादि पदार्थांस पाहणारा त्या पदार्थांहून जसा निराळा असतो; तद्वत् बाल्यतारुण्यादि अवस्थांचा साक्षी ह्मणजे पाहणारा त्या अवस्थांहून भिन्न आहे. असा अवस्थांतील साक्षी आत्मा, त्रिकाल अबाधित असून सतत राहणारा केवळ ज्ञानरूप होय. आतां ह्यावर कोणी शंका घेईल कीं, 'सर्व पदार्थांना जर जन्म नाश वगैरे आहेत, तर ज्ञानाचाही नाश असावा.' तर यास समाधान ज्ञान हें सतत रहाणारें असल्यामुळें त्याचा नाश संभवत नाहीं. पुन्हां यावर कोणी ह्मणेल कीं, 'निळेपणाचें ज्ञान आलें व पिंवळेपणाचें ज्ञान नाश पावलें, असें आपण ह्मणतों; तेव्हां निळेपणाच्या ज्ञानाची उत्पत्ति आणि पिंवळेपणाचा नाश आला. अर्थात् ज्ञानाचा नाश संभवतो ना?' यास समाधान असें:– मूळचें ज्ञान वृत्तिभेदानें नानाप्रकारानें कल्पिलें जातें. वस्तुतः ज्ञानाला उत्पत्तिनाशादि नाहींत. तें स्वतःसिद्ध आहे. यास दृष्टांत—प्राणवायु हा बाल्य, तारुण्यादि अवस्थांमध्यें देहाचें पोषण करीत राहिलेला असतो, तरी तो बाल, तरुण किंवा वृद्ध होत नाहीं; तद्वत् ज्ञान हें निळेपणा, पिंवळेपणा, इत्यादिकांमध्यें नानाप्रकारचें दिसून येतें; तरी तें ज्ञान निळें किंवा पिंवळें होत नाहीं. अर्थात् ज्ञान हें नित्यसिद्ध उत्पत्तिनाशरहित असून एकरूप आहे असें सिद्ध झालें.

राजा! सृष्टीमध्यें पक्ष्यादिक अंडज, मनुष्यादिक जरायुज, वृक्षादिक उद्भिज्ज, आणि मत्कुणादिक स्वेदज, ह्या चर अचर प्राणिमात्रांमध्यें प्राणवायु वसत असतो, तरी त्या त्या प्राण्यांच्या संबंधामुळें प्राणाला कोणताही विकार घडत नाहीं; तद्वत् ब्रह्मरूप आत्मा हा सर्वत्र व्यापक असूनही त्यास कोणताही विकार नाहीं. तो जागृत, स्वप्न व सुषुप्ति ह्या

(१) "सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म"—श्रुति.

(२) "तेचि अर्थाचा पूर्ण दृष्टांत। जेवीं प्राण देहातें वाढवित। तो देहोचि होय अवस्थाभूत। प्राण निरवस्थ जैसा तैसा॥"—नाथ.

तिन्ही अवस्थांमध्येंही निर्विकारच असतो. यावर कोणी शंका घेईल कीं, ' मनुष्यादिक देहांत आत्मा विकारवानासारखा कां दिसतो. ' तर यास समाधान—आत्मा जाग्रतींत इंद्रियांच्या संबंधामुळें, व स्वप्नांत अहंकाराच्या संबंधामुळें विकारवानाप्रमाणें भासतो; परंतु गाढ निद्रेच्या वेळीं इंद्रियसमुदाय व अहंकार हीं लीन झालेलीं असतात. तेव्हां आत्मा निर्विकार असलेला यथार्थ आपल्या सर्वांच्या अनुभवाला येतोच. कारण, तेथें विकारांचा हेतुभूत लिंगदेहरूपी उपाधीचा अभाव असतो. उपाधिवांचून त्याची सत्ता जर अनुभवसिद्ध आहे, तर तो निर्विकार आहे, हें सिद्ध होतें. पुन्हां ह्यावर कोणी अशी शंका घेईल कीं, ' निद्रेमध्यें अहंकारासुद्धां सर्वांचा लय झाला असतां आत्मा राहतो, हें कसें समजावें. ' तर यास समाधान—" आज मी फार सुखानें निजलों होतों. " असें झोंपेंतून जागृत झाल्यावर सांगतोना. तर मग एवढ्यावरून असें सिद्ध होतें कीं, सुषुप्तींत आत्म्याला सुखानुभव झाला असलाच पाहिजे. कारण, " मी फार सुखानें निजलों होतों " हें ज्ञान अनुभवाविना आपल्याला कधींच यावयाचें नाहीं. अर्थात् सुषुप्तीमध्येंही आत्मानुभव आहेच. आतां तेथें विषयांचा संबंध नसल्यामुळें तो स्पष्ट समजत नाहीं एवढें खरें, तरी पण त्याची सत्ता नाहीं असें होत नाहीं. ही गोष्ट प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध होते. पहा—जाग्रतीमध्यें इंद्रियें कर्मे करितात, व स्वप्नांत इंद्रियें स्वस्थ असतात. पण त्या इंद्रियांचा जाग्रदवस्थेंतील संस्कार घेऊन मन कर्म करितें, असा आपणांस भास होतो; परंतु इंद्रियें जड असल्यामुळें त्यांस स्वतंत्र सत्ता नसतें. ह्मणून त्यांचा प्रकाशक कोणी तरी ( आत्मा ) असलाच पाहिजे. अर्थात् त्या कर्मीवरून सुद्धां आत्म्याचा अनुभव सिद्ध होतो. तसाच सुषुप्तींत ह्मणजे गाढ निद्रेंत स्थूल व सूक्ष्म ह्या दोन्ही देहांचीं कर्मे मुळींच नसतांही गाढ निद्रा लागल्यामुळें सुखाचा अनुभव होतो. ह्मणजे "इतका वेळपर्यंत

मी सुखानें निजलों होतों. व मला ह्या वेळपर्यंत स्वस्थ झोंप लागल्यामुळें कांहींएक समजलें नाहीं. " असें आपण निद्रेंतून जागृत झाल्यावर म्हणतों; तेव्हां त्या निद्रेंतील सुखाचा किंवा स्वस्थतेचा अनुभव आत्म्याला असल्याखेरीज सांगतां येणार नाहीं. यावरून सुषुप्तीमध्यें आत्म्याचा अनुभव प्रकट होतो. असा निर्विकार आत्माच परब्रह्म होय. इति । ७.

---

# अध्याय ८ वा.

## जीवस्थिति निर्णय (११–१०।११).

उद्धव उवाचः—

गुणेषु वर्तमानोऽपि देहजेष्वनपावृतः ॥
गुणैर्न बध्यते देही बध्यते वा कथं विभो ॥ ३५ ॥

उद्धव म्हणालाः—हे विभो ! जीवात्मा देहादि गुणकार्यांच्या ठिकाणीं वागत असूनही त्या गुणांमध्यें बद्ध होत नाहीं कीं काय ? अथवा तो आकाशाप्रमाणें निर्लेप असल्यामुळें देहाच्या गुणांत बद्ध होत नाहीं. म्हणावें तर आरंभीं देहबंधनांत कसा पडला ? ह्याचा निर्णय स्पष्ट सांग.

(१) " उद्धव म्हणे कृष्णनाथा ? आत्मा देहामाजी असतां । बंधन पावे सर्वथा । कीं सर्वथा पावेना ॥ गुण असतां मुक्ति घडे । कीं गुण गेलिया मुक्ति जोडे । हेंचि सांगावें मजपुढें । अति निवाडें निश्चित ॥ गुण असतां मुक्ति घडे । हें सर्वथा बोलणें कुडें । ज्वर असतां आरोग्य न घडे । वृक्ष न वाढे भिडंडेसीं ॥ बाहीं बांधोनियां पाषाण । समुद्रामाजी तरे कोण । तैसे देहीं असतां त्रिगुण । मुक्तपण कैसेनी ॥ गुण गेलिया मुक्ति । हेंही न घडे गा श्रीपति । गुणाचें कार्य देहेंद्रियें । ते गुण जाऊनि देह राहे । भूमीवीण वृक्ष होवे । हें असंबद्ध पाहें बोलणें ॥ कारण जाऊ-

**श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा, आत्मा बद्ध आहे, व मुक्त आहे, असा व्यवहार केवळ माझ्या आधीन असणाऱ्या सत्त्वादि गुणरूप उपाधीमुळें प्रतीतीस येतो एवढेंच. पण तो वास्तविक नव्हे. ह्यावर कोणी शंका घेईल कीं, 'उपाधिकृत बंधमोक्ष वास्तविक कां ह्मणूं नये.' तर त्यास समाधानः—गुणांना मूळ कारण माया होय. ती माया माझ्या ठिकाणीं मिथ्या आहे; तेव्हां तन्मूलक गुणांनीं केलेलें बंधन मला नाहीं, बंधनच नाहीं तर मोक्षही नाहीं. बंध व मोक्ष हे दोन्ही आत्म्याच्या ठिकाणीं कल्पित आहेत. बंधमोक्षांचा निर्णय माझ्या मतें असा आहे:—उद्धवा, जसा शोक, मोह, सुख, दुःख, देहाची प्राप्ति हा सर्व पसारा मायेनें रचिलेला केवळ भासमात्र आहे; तद्वत् स्वप्नतुल्य बंध, मोक्ष हा बुद्धीचा भ्रमात्मक खेळच होय. आत्म्याची ही संसृति वास्तविक नव्हे; पण त्याची प्रतीति मात्र उपाधींनीं केलेली घडते. पहा, विद्या (ज्ञान) आणि अविद्या (अज्ञान) ह्या दोन माझ्या तनु (शक्ति) होत. माझ्या शक्ति ह्मणण्याचें कारण एवढेंच कीं, त्या माझ्या मायेनें निर्मिलेल्या

मागील पृष्ठावरून पुढें चालू

नि कार्य राहे । हे बोलणें घडे काये । गुण जातां देहोनि जाये । मुक्त तंव स्वयें केसेनी ॥ एवं गुण असतां नसतां । मुक्ति न घडे सर्वथा । येथ विचार कृष्णनाथा । तुज मी तत्त्वतां पुसतो ॥ " **—नाथ.**

(१) " आत्मा व्यापक गुण परिच्छिन्न । याही हेतु न घडे बंधन । समुद्राचें प्राशन । केवीं रांजण करूं शके ॥ मोहरीमाजीं मेरु राहे । पद्मामाजीं पृथ्वी समाये । मुंगी गज गिळोनि जाये । खद्योत खाये सूर्यातें ॥ मशक ब्रह्मांडातें आकळी । पतंग प्रळयानळ गिळी । तरी आत्मा गुणाचे मेळीं । गुणकल्लोळीं बांधवेना ॥ या परि न संभवे बद्धता । बद्धते सवें गेली मुक्तता । बद्धमुक्त अवस्था पाहतां । जाण तत्त्वतां आत्मा मी ॥ " **—नाथ.** (२) तन्यते मोक्षबंधावाभ्यामिति तनु " **अर्थ**--ज्यानीं मोक्ष व बंध विस्तारिले जातात त्या शक्ति.**—श्रुति.**

आहेत, हें होय. त्या दोन शक्ति शरीरधारी जीवांना अनुक्रमें मोक्ष व बंध प्राप्त करून देतात. त्यांपैकीं विद्या मोक्ष देते. व अविद्या बंधांत घालिते. यावर कोणी शंका घेईल कीं, ' मोक्ष व बंध हे अनुक्रमें विद्येनें आणि अविद्येनें कार्य असें म्हटलें तर अनादि व नित्य होणार नाहींत. ' तर त्याचें समाधान—त्या माझ्या शक्ति अनादि आहेत, म्हणून जोंपर्यंत जीव त्या अविद्येनें प्रवर्तित असतो, तोंपर्यंत बंध असतो. व जेव्हां तो विद्या सेवी, तेव्हां मोक्ष प्राप्त होतो असें समजावें. " शरीरधारी जीवांना मोक्ष व बंध देणाऱ्या विद्या आणि अविद्या होत " असें म्हटल्यानें ऐकणाराला अशी भ्रांति पडेल कीं, जीव आणि ईश्वर हे भिन्न भिन्न दोघांतून विरोध दूर केला. तर तसें नव्हे. बंधाची आणि मोक्षाची व्यवस्था अशी आहे:—

**बंधमोक्षाची व्यवस्थाः**¹ हे महाबुद्धिमंता! जीव आणि आत्मा एकच होत. त्या जीवाला अविद्येच्या योगानें अनादि काळापासून बंध व आत्मस्वरूपानें तसाच मोक्षही प्राप्तच आहे. यावर तूं म्हणशील कीं, ' जीव आणि आत्मा अभिन्न आहेत, तर जीव तो वेगळा कोणता, व त्याला बंध, मोक्ष, सुख, दुःख इत्यादि प्राप्त होतात, तर त्यांची व्यवस्था काय? ' तर याचें उत्तर असें:—जसा चंद्र एक असतां उदकादि उपाधींच्या योगानें त्याचे बिंब व प्रतिबिंब असे भेद होतात; आणि जसे वायूच्या योगानें उदकाला घडणारे कंपादि धर्म ते त्यांतील प्रतिबिंबावर दिसून येतात, पण आकाशांतील बिंबाशीं त्यांचा कांहींएक

(१) " जीव एकचि त्रिजगतीं । हें जाण उद्धवा निश्चितीं । जैसे नाना दीपांचिया दीप्ती । तेजाची ज्योति अभिन्न ॥ दोनी दीप एक होतां । तैसा दिवळीं एकत्वासी न येतां । जडत्वापाशीं भेद प्राप्ती । ऐक्य स्फूर्ती अजडत्वीं ॥ चंदनकुटके बहुवस । परी गंधा एकचि सुवास । तैसा जीवरूपें मी अविनाश । परमपरेश आभासें ॥ "—**नाथ**.

संबंध नसतो. शिवाय जशीं प्रतिबिंबेंही अनेक घटांच्या उपाधिभेदानें परस्परांहून भिन्न असतात, म्हणून एक भांडें फुटलें तर त्यांतील तेवढें प्रतिबिंब मात्र विनाशीं मिळून जातें, त्याच्याबरोबर दुसऱ्या भांड्यांतील प्रतिबिंब जात नाहीं; तद्वत् अविद्येंत प्रतिबिंबलेल्या माझ्या अंशभूत जीवाला अहंकाराचा संबंध जडला म्हणजे तोच जीव उपाधिभेदांनीं भिन्न असा भासतो; यामुळें बंधमोक्षांबद्दल कोणत्याही प्रकारची अव्यवस्था राहत नाहीं. ज्याला अविद्या उपाधि आहे तो बद्ध, व ज्याचा उपाधि नष्ट झाला तो मुक्त असें समजावें. ही बंध आणि मोक्ष यांची व्यवस्था सांगितली. आतां बद्ध आणि मुक्त यांचा भेद सांगतों:—

**बद्धमुक्तांचा भेदः**—उद्धवा, जीव बद्ध आहे, आणि ईश्वर मुक्त आहे, म्हणून ह्या उभयतांचे धर्म एकमेकांशीं अगदीं विरुद्ध आहेत. ते असे:–जीवाच्या ठिकाणीं शोक तर ईश्वराच्या ठिकाणीं आनंद असतो; जीवाच्या ठिकाणीं अज्ञान तर ईश्वराच्या ठिकाणीं ज्ञान असतें; एका देहामध्येंच ह्या दोघांचें अस्तित्व आहे; जीव नियम्य आणि ईश्वर नियामक अशा भावानें राहतात. पहा:—जीव आणि ईश्वर हे जणूं काय दोन पक्षी देहरूप अश्वत्थ वृक्षावर घरटें करून राहतात. हे दोघे सारखे असून परस्परांचे मित्र आहेत. ह्यांपैकीं जीव त्या अश्व-

(१) "यथैकस्मिन् घटाकाशे रजोधूमादिभिर्युते । न सर्वे संप्रयुज्यन्ते तथा जीवाः सुखादिभिः ॥" **अर्थ**—जसें एका घटामधील आकाश धुळीनें किंवा धुरानें संयुक्त झालें म्हणजे सगळ्या ठिकाणचें आकाश तसें होत नाहीत; तद्वत् जीवही एकादा सुखी किंवा दुःखी झाला म्हणून सर्व सुखदुःखादिकांनीं युक्त होत नाहींत. —**श्रुति.** (२) "अश्वत्थ म्हणण्याचें कारण 'न श्वः तिष्ठति' उद्यां न राहणारा म्हणजे क्षणभंगुर आहे हें होय." (३) "जसे 'पक्षी' वृक्षाहून वेगळे असतात; तद्वत् जीव आणि शिव हे दोघे देहरूप वृक्षाहून भिन्न आहेत. ज्ञानरूपानें त्यांचा परस्परांशीं सारखेपणा आहे. हे एकमेकांला सोडून राहत नाहींत व एक मतानें वागतात."—**नाथाचा अभिप्राय.**

त्य वृक्षापासून उद्भवलेलें फळ खातो; व ईश्वर कांहींएक भक्षण करीत नसूनही शक्तीनें अधिक मोठा आहे. जो कर्मफळ भोगित नाहीं, तो ईश्वर विद्वान् असून स्वतःला व जीवालाही जाणतो. आणि देहाचा उपभोक्ता ( अहंकारी ) जीव तर स्वतःला सुद्धां ओळखीत नाहीं. एतावता, जीव अविद्येनें युक्त असल्यामुळें अनादिकालापासून बद्ध आहे; व ईश्वर विद्येनें युक्त असल्यामुळें अनादिकालापासून मुक्त आहे. इति।८.

# अध्याय ९ वा.

## जीवाचें वास्तवस्थिति-विवेचन ( १०-८७ ).

श्रुतयः—

अपरिमिता ध्रुवास्तनुभृतो यदि सर्वगतास्तर्हि न शास्य-
तेति नियमो ध्रुव नेतरथा ॥ अजनि च यन्मयं तदविमुच्य
नियंतृ भवेत् सममनुजानतां यदमतं मतदुष्टतया ॥ ३० ॥

श्रुति म्हणाल्याः—हे नित्यमुक्ता, अविद्येच्या संबंधानें तुझ्यापासून बिंबप्रतिबिंबन्यायवत् अनंत जीव उत्पन्न होतात. यावर कोणी शंका घेईल कीं, 'हे सर्व जीव मिळून एकच जीव मानिला पाहिजे, किंवा जीवांचें पृथक् रूपानें अनंतत्व मानिलें पाहिजे. ह्यांतील पहिला पक्ष सर्व जीव मिळून एकच जीव असें मानिल्यास, एका जीवाचा मोक्ष झाला म्हणजे सर्व जीवांचा मोक्ष झाला पाहिजे असें होईल; व दुसरा पक्ष जीवांचें अनेकत्व स्वीकारिल्यास अविद्येचेंही अनंतत्व सिद्ध होऊन जीवाला मोक्षच संभवणार नाहीं असें होईल, यास्तव हे दोन्ही पक्ष संभवत नाहींत.' तर यास समाधान—मायाही एकच असून ती आपल्या अनंत शक्तींनीं अनंत ( कार्यरूप ) जीव उत्पन्न करिते, व प्र-

संबंध नसतो. शिवाय जशीं प्रतिबिंबेंही अनेक घटांच्या उपाधिभेदानें परस्परांहून भिन्न असतात, म्हणून एक भांडें फुटलें तर त्यांतील तेवढें प्रतिबिंब मात्र बिंबाशीं मिळून जातें, त्याच्याबरोबर दुसऱ्या भांड्यांतील प्रतिबिंब जात नाहीं; तद्वत् अविद्येंत प्रतिबिंबलेल्या माझ्या अंशभूत जीवाला अहंकाराचा संबंध जडला म्हणजे तोच जीव उपाधिभेदांनीं भिन्न असा भासतो; यामुळें बंधमोक्षांबद्दल कोणत्याही प्रकारची अव्यवस्था राहत नाहीं. ज्याला अविद्या उपाधि आहे तो बद्ध, व ज्याचा उपाधि नष्ट झाला तो मुक्त असें समजावें. ही बंध आणि मोक्ष यांची व्यवस्था सांगितली. आतां बद्ध आणि मुक्त यांचा भेद सांगतों:—

**बद्धमुक्तांचा भेदः**—उद्धवा, जीव बद्ध आहे, आणि ईश्वर मुक्त आहे, म्हणून ह्या उभयतांचे धर्म एकमेकांशीं अगदीं विरुद्ध आहेत. ते असेः—जीवाच्या ठिकाणीं शोक तर ईश्वराच्या ठिकाणीं आनंद असतो; जीवाच्या ठिकाणीं अज्ञान तर ईश्वराच्या ठिकाणीं ज्ञान असतें; एका देहामध्येंच ह्या दोघांचें अस्तित्व आहे; जीव नियम्य आणि ईश्वर नियामक अशा भावानें राहतात. पहाः—जीव आणि ईश्वर हे जणूं काय दोन पक्षी देहरूप अश्वत्थ वृक्षावर घरटें करून राहतात. हे दोघे सारखे असून परस्परांचे मित्र आहेत. ह्यांपैकीं जीव त्या अश्व-

(१) "यथैकस्मिन् घटाकाशे रजोधूमादिभिर्युते । न सर्वे संप्रयुज्यन्ते तथा जीवाः सुखादिभिः ॥" **अर्थ**—जसें एका घटामधील आकाश धुळीनें किंवा धुरानें संयुक्त झालें म्हणजे सगळ्या ठिकाणचें आकाश तशीं होत नाहींत; तद्वत् जीवही एकादा सुखी किंवा दुःखी झाला म्हणून सर्व सुखदुःखादिकांनीं युक्त होत नाहींत. —**श्रुति.** (२) "अश्वत्थ म्हणण्याचें कारण 'न श्वः तिष्ठति' उद्यां न राहणारा म्हणजे क्षणभंगुर आहे हें होय." (३) "जसे 'पक्षी' वृक्षाहून वेगळे असतात; तद्वत् जीव आणि शिव हे दोघे देहरूप वृक्षाहून भिन्न आहेत. ज्ञानरूपानें त्यांचा परस्परांशीं सारखेपणा आहे. हे एकमेकांला सोडून राहत नाहींत व एक मतानें वागतात."—**नाथांचा अभिप्राय.**

त्य वृक्षापासून उद्भवलेलें फळ खातो; व ईश्वर कांहींएक भक्षण करीत नसूनही शक्तीनें अधिक मोठा आहे. जो कर्मफळ भोगित नाहीं, तो ईश्वर विद्वान् असून स्वतःला व जीवालाही जाणतो. आणि देहाचा उपभोक्ता ( अहंकारी ) जीव तर स्वतःला सुद्धां ओळखीत नाहीं. एतावता, जीव अविद्येनें युक्त असल्यामुळें अनादिकालापासून बद्ध आहे; व ईश्वर विद्येनें युक्त असल्यामुळें अनादिकालापासून मुक्त आहे. इति।८.

# अध्याय ९ वा.

## जीवाचें वास्तवस्थिति-विवेचन ( १०-८७ ).

श्रुत्युवाच: -

अपरिमिता ध्रुवास्तनुभृतो यदि सर्वगतास्तर्हि न शास्यतेति नियमो ध्रुव नेतरथा ॥ अजनि च यन्मयं तदविमुच्य नियंतृ भवेत् सममनुजानतां यदमतं मतदुष्टतया ॥ ३० ॥

श्रुति म्हणाल्या:—हे नित्यमुक्ता, अविद्येच्या संबंधानें तुझ्यापासून चित्रप्रतिबिंबन्यायवत् अनंत जीव उत्पन्न होतात. यावर कोणी शंका घेईल कीं, ' हे सर्व जीव मिळून एकच जीव मानिला पाहिजे, किंवा जीवांचें पृथक् रूपानें अनंतत्व मानिलें पाहिजे. ह्यांतील पहिला पक्ष सर्व जीव मिळून एकच जीव असें मानिल्यास, एका जीवाचा मोक्ष झाला म्हणजे सर्व जीवांचा मोक्ष झाला पाहिजे असें होईल; व दुसरा पक्ष जीवांचें अनेकत्व स्वीकारिल्यास अविद्येचेंही अनंतत्व सिद्ध होऊन जीवाला मोक्षच संभवणार नाहीं असें होईल, यास्तव हे दोन्ही पक्ष संभवत नाहींत.' तर यास समाधान—मायाही एकच असून ती आपल्या अनंत शक्तींनीं अनंत ( कार्यरूप ) जीव उत्पन्न करिते, व प्र-

त्येक जीवाला जोंपर्यंत प्रकृतीच्या स्वरूपाचें ज्ञान होत नाहीं. तोंपर्यंत तो जन्ममरणाधीन असतो; आणि ज्या वेळीं आपल्या स्वरूपाचें ज्ञान होतें, त्या वेळीं तो मोक्षास जातो. असेंच मानणें अवश्य आहे. ' कदाचित् जीव हा अणु ( सूक्ष्म ) असून देहव्यापि आहे ' अशी कोणी शंका घेईल तर यास समाधान—जीव हा अणुप्रमाणें सूक्ष्म मानिला, तर चैतन्य देहव्यापि होणार नाहीं; बरें देहाएवढा मानावा तर तो मध्यम परिणामाचा अर्थात् सावयव होऊन अनित्य ठरेल. ह्यास्तव जीव हा सर्वगत व नित्य आहे. असें म्हणतात. कारण, त्याला स्थूल किंवा सूक्ष्म मान मुळींच नसून. तो केवळ अविद्येमुळें भासमान होणारा व ज्ञानानें तत्काळ नष्ट होणारा आहे असेंच स्वीकारिलें आहे. याचें विस्तृत विवेचन असें:—

विभो, सर्वत्र व्यापकरूपानें नित्य वास करणारा हा तुझा अंश काय आहे, ह्याचें निरूपण करणें फार दुर्घट आहे. कारण. तुझ्या अगाध स्वरूपाचें ज्ञान झालें आहे. म्हणून जे कोणी म्हणतील. त्यांना तें न समजल्यासारखेंच आहे. कारण तें कळण्याचा विषय नव्हे. पुनः कोणाला अशी शंका येईल की. ' जर परमात्म्यापासून जीव उत्पन्न होतात असें म्हटलें तर परमात्मा कारण व जीव कार्य झालें; आणि मग "जें जें कार्य तें तें अनित्य." ह्या वेदांतसिद्धांताप्रमाणें जीव अनित्य ठरतील. जर जीव अनित्य ठरतील तर त्यांना कृतनाश व अकृताभ्यागम दोष प्राप्त होईल. ह्मणजे केलेल्या कर्मांचीं फळें भोगतां यावयाचीं नाहींत. व न केलेल्या

( १ ) ज्ञानप्रकरण ४ था अध्याय पहा.

( २ ) " यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह " **अर्थ**— सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपाच्या बोधासाठीं कोणतेही वाचक शब्द योजिले तरी त्यांची शक्ति ब्रह्मरूप प्रकाशित करण्याच्या कामीं चालत नाहीं. आणि ते शब्द तसेच परततात व मनोवृत्तीलांही त्याचें प्रकाशन करितां येत नाहीं.—श्रुति.

कर्माचीं फळें अनुभवावीं लागतील. अशा स्थितींत मोक्ष ह्मणजे स्वरूपनाश ( मृत्यु ) असा अर्थ होईल; पण हें कोणासही इष्ट नाहीं. कारण मोक्ष ह्मणजे दुःखाची अत्यंत निवृत्ति आणि परमानंदसुखाची प्राप्ति हा होय. त्याची सर्वांस इच्छा आहे. मग त्याची संगति कशी लागावी ?' तर यास समाधान असें: उपाधींचे जन्म हेच जीवांचे जन्म होत. जीवांस स्वतंत्र जन्म नाहींत. कारण, प्रकृति आणि पुरुष जन्मरहित आहेत; मग यांचा उद्भव होणें संभवतच नाहीं. जर जीव हा प्रकृतीचें कार्य आहे असें म्हणावें, तर प्रकृति जड ह्मणून जीव जड ठरेल; तसाच जीव हा पुरुषाचें कार्य आहे असें म्हटलें, तर पुरुष विकारी आहे असें ह्मणावें लागेल; बरें, जीव हा प्रकृति व पुरुष ह्यांच्या संयोगाचें कार्य आहे असें कल्पावें, तर जीवाच्या अंगीं प्रकृति आणि पुरुष ह्या दोघांचे गुण ह्मणजे जड आणि चैतन्य हीं मानवीं लागतील. एतावता जीवाच्या उत्पत्तीविषयीं ह्या तिन्ही कल्पना संयुक्तिक नाहींत. तर मग जीव हें कोणाचेंही कार्य नव्हे असें सिद्ध झालें. आतां जीव कसे निर्माण होतात, त्यांचा प्रकार असा:--

**जीवनिर्माण:**—प्रकृति ( चेतनाशून्य जड द्रव्य ) व पुरुष ( चेतना उत्पन्न करणारी शक्ति ) हे दोघे जन्मरहित आहेत. ह्यांचा अन्योन्याध्यास म्हणजे जडाचा अध्यास चैतन्यावर, आणि चैतन्याचा अध्यास जडावर असा अध्यासरूप संबंध घडतो; तेव्हां प्राणादि उपाधीं-

---

( १ ) " यथाकाशो हृषीकेशो नानोपाधिगतो विभुः । तद्भेदाद्भिन्नवद्भाति तन्नाशे केवलो भवेत् ॥ " **अर्थ** – ज्याप्रमाणें आकाश, घट, मठ, रांजण इत्यादि उपाधींच्या योगानें भिन्न भिन्न भासतें, व उपाधींचा नाश झाला असतां अखंड प्रत्ययास येतें, त्याचप्रमाणें परमात्मा स्थूल सूक्ष्मादि शरीररूपी उपाधींच्या योगानें भिन्न भिन्न भासतो. उपाधि नष्ट झाल्यानंतर त्याचें अखंड व्यापकत्व प्रत्ययास येतें.

**—आत्मबोध.**

नीं युक्त असे जीव जन्मतात. हें कसें घडतें, तें लक्ष्यांत येण्याकरितां पाण्यावरील बुडबुड्याचा विचार करावा. पहा--बुडबुडे हे केवळ वायूनें उत्पन्न होत नाहींत; तसेंच ते केवळ पाण्यानेंही उत्पन्न होत नाहींत; वायु आणि पाणी ह्यांचें संमेलन होईल, तेव्हां बुडबुडे उत्पन्न होतात; तद्वत् प्रकृतिपुरुषांच्या परस्पराध्यासानें जीव जन्म पावतात. जसे बुडबुड्यांना वायु हे निमित्तकारण, व जल हे उपादानकारण; तद्वत् जीवाला प्रकृति हें निमित्यकारण व पुरुष हें उपादानकारण समजावें. ह्यावरून जीवाचा जन्म वास्तविक नव्हे असें सिद्ध झालें. पुरुषाच्या ठिकाणीं अविद्येच्या उपाधीमुळें होणारे जे आभास, तेच जीव होत. हे जीव जोंपर्यंत उपाधिमान असतात तोंपर्यंत त्यांच्या ठिकाणीं नानाविध नामरूपें व गुण प्रत्ययास येतात; परंतु तेच तुझ्या ठिकाणीं लीन झाले म्हणजे त्यांचे नामरूपांसह सर्व गुण नष्ट होतात. ही गोष्ट स्पष्ट मनांत येण्याकरितां अनुक्रमें मधाचें व सागराचें उदाहरण योग्य आहे तें असें:--जसे अनेक जातींच्या फुलांचे रस मधामध्यें एकवटतात व जशा नद्या समुद्रामध्यें मिळून जातात; तद्वत् हे जीव त्यांना, वास्तविक जन्म नाहीं म्हणूनच, नानाप्रकारचीं नामरूपें व गुण ह्या कार्योपाधीसह निरुपाधी अशा तुझ्या स्वरूपीं लीन होतात. इति । ९.

---

(१) " एकमेवाद्वितीयं ब्रह्म । अविनाशीवारेऽयमात्मा ॥ " अर्थ—इत्यादि श्रुतीवरूनही जीवांचे जन्म वास्तवीक नाहींत तर औपाधिक होत असें सिद्ध झालें.

(२) " यथा नद्यः स्यंदमानाः समुद्रेऽस्तं गच्छन्ति नामरूपे विहाय । तथा विद्वान्नामरूपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥ " अर्थ—जशा नद्या वाहत जाऊन समुद्राला मिळतात, व नांवें आणि रूपें सोडून समुद्रांत एकवटतात; तद्वत ज्ञानसंपन्न पुरुष मुक्तिकाळीं नामरूपापासून सुटून परात्पर दिव्यभूत ब्रह्मरूपीं मिळतो.—श्रुति.

# अध्याय १० वा.

## देहमिथ्या विवेचन ( ७-१९ ).

नारद उवाचः—

आबाधितो ऽपि ह्यभासो यथा वस्तुतया स्मृतः ॥
दुर्घटत्वादैन्द्रियकं तद्वदर्थविकल्पितम् ॥ ५८ ॥

**नारद म्हणाले:**—धर्मराजा, ह्या विश्वामध्यें आपल्याला जे देहादि पदार्थ सत्यवत् दिसतात, ते सर्व मिथ्या होत. उदाहरण–सूर्याचें जें प्रतिबिंब पाण्यांत दिसतें, तें प्रतिबिंब वास्तविक सूर्य नसतें जरी तें दिसत आहे तरी तें तर्कानें बाधित ठरतें; तद्वत् विषयांचा आभास म्हणजे इंद्रियांनीं उपभोग घेण्याचे सर्व विषय वस्तुरूपानें कल्पिलेलेच आहेत, यथार्थ नव्हेत. प्रत्यक्ष दिसत असले तरी त्यांचा तर्कानें बाध करावा लागतो, म्हणजे ते मिथ्याच असें जाणावें लागतें. कारण, ते सत्य होणें दुर्घट आहे. राजा, पृथिव्यादि पंचमहाभूतांच्या एकीकरणानें बनलेल्या देहादिक पदार्थांना ( १ ) पंचमहाभूतांचा समुदाय म्हणावा, किंवा ( २ ) त्यांचा विकार म्हणावा, अथवा ( ३ ) परिणाम म्हणावा. ह्यांचा विचार केला असतां ह्या तिहींपैकीं एकाचेंही सत्यत्व सिद्ध होत नाहीं. कसें तें पहाः–( १ ) अनेक वृक्षांनीं बनलेल्या स्थलास आपण वन म्हणतों; तेव्हां वन म्हणजे वृक्षांचा समुदाय असें म्हटलें तरी चालेल; पण तसाच अनेक भूतांच्या समुदायांनीं देह बनतो, म्हणून त्याला भूतांचा समुदाय असें म्हणावें तर तें जुळत नाहीं. कारण, वनांतील एकच वृक्ष ओढिला असतां तें सर्व वन ओढिलें जात नाहीं; तद्वत् देहाचें एक बोट ओढिलें तर सर्व देह ओढिला जाऊं नये; पण सर्व देह ओढिला जातो; त्या अर्थी या देहाला पंचमहाभूतांचा

समुदाय असें म्हणणें बरोबर जुळत नाहीं. बरें ( २ ) हा देह पंचमहाभूतांचा विकार अथवा ( ३ ) रूपांतर आहे असें म्हणावें, तर तसेंही संभवत नाहीं. कारण असें होण्यास तो सावयव देह ज्यांचें रूपांतर आहे, त्यांहून भिन्न झाला पाहिजे किंवा त्यांनीं युक्त तरी असला पाहिजे. रूपांतर पावलेला अवयवी देह पंचमहाभूतांहून निराळा आहे, असें म्हणतांच येत नाहीं. त्या भूतांनीं युक्त आहे असें म्हणावें तरी शंका येतेच. कीं तो पंचमहाभूतात्मक देह प्रत्येक अवयवांत सगळाच मिळून राहतो, कीं अंशानें राहतो. जर प्रत्येक अवयवांत सगळाच मिळून राहतो म्हणावें, तर बोटालासुद्धां देह म्हणावें लागेल. बरें, अंशानें युक्त आहे असें म्हणावें, तर तो कसा ? मग त्याला दुसरा अंशदेह मानावा लागेल; आणि तसें मानिलें तर तो अंशदेह बोटाच्या ठिकाणीं कसा आहे, हा प्रश्न निघतोच. पुन्हां तेथेही ' अंशानें ' असेंच उत्तर द्यावें लागणार. अशा रीतीनें अनंत अंश होऊन शेवट मुळींच लागणार नाहीं; अर्थात् अनवस्थादोष संभवेल. एतावता देहादिक सर्व पदार्थ असत्य आहेत, असें म्हणणें भाग आहे. ज्या अर्थी देहादिक पदार्थ मिथ्या ठरले, त्या अर्थी त्यांना कारण ( हेतुभूत ) म्हणविणारीं भूतेंही मिथ्याच होत हें सिद्ध झालें. कारण, अवयवीं दिसेल तर अवयव आहेत असें म्हणावयाचें. अवयवीच नाहीं तर अवयव आहेत असें म्हणतां येईल कसें ? ह्यावर कोणी ह्मणेल कीं, ' देहादिक अवयवी पदार्थ मिथ्या कसें म्हणतां ? " आम्हीं जो लहान मुलगा पाहिला होता, तोच हा केवढा तरी मोठा झाला आहे ! " असे उद्गार आपल्याला नेहमीं ऐकूं येतात, व लहान अवस्थेत पाहिलेल्या वस्तूची मोठ्या अवस्थेंत ओळख पटलेली आढळते; एक अवस्था नाहींशी होऊन दुसरी उत्पन्न झाली तरी मुलगा तो देह ( ओळख पटण्यापुरता ) जशाचा तसा राहिला, अर्थात् त्याला खरा ह्मटला पा-

हिजे ' तर त्याचेंही उत्तर सांगतों:—जो मुलगा लहान होता, तोच पुढें मोठा झाला; यांमधील लहानपणा व थोरपणा हा भास एकाच देहावर होत असतो; त्यामुळें त्या देहाच्या सारखेपणाचा व ओळख पटण्याचा भ्रम होतो खरा; पण तो कोठपर्यंत ? जोंपर्यंत आत्मस्वरूपीं अविद्येनें कल्पिलेला भेद सुटत नाहीं तोंपर्यंत. पहा:—सारखेपणा म्हटला कीं, तेथें दोन वस्तु असल्या पाहिजेत. परमात्म्याशिवाय दुसरी वस्तूच नाहीं. अविद्येच्या योगानें दुसरी वस्तु भासते म्हणून सारखेपणा वाटतो. अविद्या नाहींशी झाली कीं, ओळख पटण्याचा भ्रम मुळींच नाहींसा होतो. अर्थात् मिथ्यत्वाची सिद्धि झाली. आतां ह्यावर दुसरी शंका येण्यासारखी आहे; ती अशी:—' सर्वच जर मिथ्या आहे, तर शास्त्रानें अमुक गोष्टी कराव्या व अमुक करूं नयेत असे विधिनिषेध कां ठरविले आहेत ? ' या शंकेचें निराकरण असें कीं,—स्वप्नामध्यें आपल्याला आपण जागे आहों किंवा झोंप घेत आहों असें वाटतें; तर मग स्वप्नांतलें तें जागेपण अथवा झोंप जशी मिथ्या, तशीच ह्या मिथ्या सृष्टींतील विधिनिषेध सांगणारीं शास्त्रेंही मिथ्या होत. इति । २२ ।

---

# अध्याय ११ वा.

## प्रपंच मिथ्या विवेचन ( १२–४ ).

श्रीशुक उवाच—

**बुद्धींद्रियार्थरूपेण ज्ञानं भाति तदाश्रयम् ॥**
**दृश्यत्वाव्यतिरेकाभ्यामाद्यंतवदवस्तु यत् ॥ २३ ॥**

**श्रीशुकाचार्य ह्मणाले:**—राजा परिक्षिते! प्रपंच हा वस्तुतः मिथ्या आहे, आणि ज्ञानरूप परब्रह्माहून निराळें त्याचें अस्तित्व नाहीं. पहा:-विषयग्रहण करणारी बुद्धि, ते ग्रहण करण्यास साधक अशीं इंद्रियें व ग्रहण करावयाचे प्रत्यक्ष विषय ह्या सर्वांच्या एकीकरणामुळें अनुभवास येणाऱ्या ह्या प्रपंचाला मुख्य आश्रय म्हटला म्हणजे परब्रह्मच होय. आणि त्या परब्रह्माचें ज्ञानमयस्वरूप प्रपंचावरून व्यक्त होतें. प्रपंचाची निराळी सत्ता मुळींच नाहीं. व त्या प्रपंचाचें मिथ्यात्व सिद्ध करण्यास ( १ ) प्रपंचाचें दृश्यत्व. ( २ ) प्रपंचाचें अव्यतिरेकत्व म्हणजे त्यास पृथक् सत्ता नसणें आणि ( ३ ) प्रपंचास आदि व अंत नसणें हे तीन हेतु दिले आहेत:-

( १ ) **दृश्यत्वावरून मिथ्यात्वसिद्धि**—"जो पदार्थ इंद्रियांना दिसतो किंवा कळतो तो नश्वर असतो" हा वेदांतसिद्धांत होय. जसें रज्जूच्या अज्ञानानें रज्जूवर ( दोरीच्या ठिकाणीं ) सर्पाचा भास होतो; तेव्हां रज्जूच सर्परूपानें दिसते. रज्जू रज्जुरूपानें दिसत नाहीं, अर्थात् दिसणारा सर्प मिथ्या ठरला; तद्वत् आत्म्याच्या अज्ञानानें आत्म्यावर प्रपंचाचा भास होतो; तेव्हां आत्माच प्रपंचरूपानें दिसतो. आत्मा आत्मरूपानें दिसत नाहीं, अर्थात् दिसणारा प्रपंच मिथ्या होय.

( २ ) **अव्यतिरेकत्वावरून मिथ्यात्वसिद्धि**—"ज्या पदार्थास स्वतंत्र सत्ता नसते, तो मिथ्या असतो" हा वेदांतसिद्धांत होय. जसें रज्जूच्या अज्ञानानें रज्जूवर सर्पाचा भास होतो, तेव्हां भासमान अशा सर्परूपतेस स्वतंत्र सत्ता नसते, अर्थात् सत्तारहित जो सर्प तो मिथ्या

---

( १ ) " इदं प्रपंचं नास्त्येव नोत्पन्नं नो स्थितं जगत् ॥ " **अर्थ—**हा प्रपंच मुळीं नाहींच. कारण, जग हें उत्पन्नही झालें नाहीं व राहिलेंही नाहीं.—**श्रुति.**

ठरतो; तद्वत् आत्म्याच्या अज्ञानानें आत्म्यावर प्रपंचाचा भास होतो; तेव्हां भासमान् अशा प्रपंचास स्वतंत्र सत्ता नसते, अर्थात् सत्तारहित प्रपंच हा मिथ्या होय.

( ३ ) आद्यंतावरून मिथ्यात्वसिद्धि–" ज्या पदार्थास आदि व अंत आहेत, तो पदार्थ मिथ्या असतो " हा वेदांतसिद्धांत होय. जसें रज्जूच्या अज्ञानानें रज्जूवर सर्पाचा भास होतो; तेव्हां सर्परूपता दिसण्यास प्रारंभ होतो, आणि तसेंच यथार्थ ज्ञानानें अंत होतो, अर्थात् आदि व अंत असणारा सर्प मिथ्या ठरतो; तद्वत् आत्म्याच्या अज्ञानानें आत्म्यावर प्रपंचाचा भास होतो; तेव्हां प्रपंचरूपता दिसण्यास प्रारंभ होतो, आणि तसेंच यथार्थ ज्ञानानें अंत होतो, अर्थात् आदि व अंत असणारा प्रपंच मिथ्या होय. राजा, हा रज्जुसर्पाचा दृष्टांत झाला. आतां कार्यकारणाचा दृष्टांत सांगतों. तो असा:—

कार्यकारणदृष्टांत—राजा ! दिवा, नेत्र व रूप हीं कार्यें, कारणरूप तेजाहून निराळीं नाहींत; तद्वत् बुद्धि, इंद्रियें व विषय हीं कार्यें कारणरूपी सद्रूप आत्म्याहून निराळीं नाहींत. यावर कोणी शंका घेईल कीं, 'कार्य व कारण ज्या अर्थी एक आहेत, त्या अर्थी कार्याचा नाश झाला असतां कारणाचाही नाश व्हावा, म्हणजे कार्यरूपी प्रपंचाचा नाश होतो, तर त्याला कारण असा आत्म्याचाही नाश झाला पाहिजे.' तर यास समाधान–कार्याचा नाश झाला असतां कारणाचाही नाश झालाच पाहिजे असा नियम नाहीं. दृष्टांत–कार्यरूपी दागिना मोडला म्हणून त्याचें कारण सोनें नाहींसें होतें काय ? कारणाची सत्ता कार्याहून वेगळी असली कीं, कार्याचा नाश झाला तरी कारणाचा नाश होत नाहीं. दागिनारूपी कार्याहून सोनेंरूप कारणाची सत्ता वेगळी असते, अर्थात दागिन्याचा नाश झाला तरी सोन्याचा होऊं शकत नाहीं, तद्वत् ज्ञानरू-

प ब्रह्माची सत्ता प्रपंचाहून भिन्न आहे. प्रपंच नसला तरी ज्ञानरूपी ब्रह्म आहेच. म्हणून प्रपंचाचा लय झाला तरी ब्रह्म जशाचें तसें असतें.

**मेघाकाश दृष्टांत**—राजा! जाग्रती, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीन अवस्था बुद्धीच्या आहेत. अंतरात्म्याच्या ठिकाणीं ह्या अवस्था आरोपून क्रमानें त्याला विश्व, तैजस व प्राज्ञ इत्यादि अनेक नामरूपें देणें, ही केवळ माया होय. दृष्टांत—जसे मेघ वायूच्या योगानें आकाशांत उत्पन्न होतात व नाश पावतात; तद्वत् हें सावयव विश्व मायेच्या योगानें अधिष्ठानावर म्हणजे परब्रह्माच्या ठिकाणीं उद्भवतें. व नाश पावतें. "ज्याला अवयव आहेत. तें घटादि पदार्थांप्रमाणें अनित्य असतें" ह्या वेदांतसिद्धांतवाक्याप्रमाणें हें विश्व अनित्य होय. दृष्टांत:—आकाशामध्यें कितीही मेघ उद्भवले व नाश पावले. तरी आकाश जसें अविकृत व नित्य राहतें; तद्वत् अधिष्ठानावर जगाचे कितीही वेळां उदयास्त झाले तरी तें ब्रह्म नित्य असतें.

**तंतुपट दृष्टांत**—राजा. पट हा तंतूच्या योगानें बनतो; यास्तव अधिष्ठानरूप तंतु हे सत्य होत. व दृश्य पट हा मिथ्या होय. कारणरूप तंतूचा अभाव असेल तर कार्यरूप पटाचें अस्तित्व संभवणार नाहीं; परंतु कार्यरूप पटाचा अभाव झाला तरी कारणरूप तंतूचें अस्तित्व संभवतें; तद्वत् कारणरूप परब्रह्म नसेल तर कार्यरूप प्रपंचाचा भास संभवणार नाहीं. कार्यरूप प्रपंचाच्या अभावीं कारणरूप परब्रह्माचें अस्तित्व संभवतें, म्हणून 'परब्रह्म सत्य' व 'प्रपंच मिथ्या' होय. ह्यावर तूं कदाचित् शंका घेशील कीं. 'परब्रह्म हें कारण व प्रपंच हें कार्य असा अर्थ होतो. व ह्यामुळें कार्यरूप प्रपंचाच्या मिथ्यात्वाबरोबर कारणरूप परब्रह्माचेंही मिथ्यात्व सिद्ध होतें.' तर यास समाधान:—पर-

(१) "सत्यं ज्ञानमनंतम् ब्रह्म ॥" [1] **अर्थ**—ब्रह्म हें सत्य व ज्ञानमय असून अनंत आहे. **श्रुति.**

ब्रह्म हें प्रपंचाचें कारण आहे. हें म्हणणें भ्रमच होय. कारण, त्यांचा एकमेकांशीं संबंध मानणें हें केवळ प्रपंच मिथ्या दर्शविण्यासाठींच होय. सारांश—प्रपंचाच्या ठिकाणीं आदि व अंत हे उपलब्ध असल्यामुळें तो मिथ्या व परब्रह्माच्या ठिकाणीं ते नसल्यामुळें तें सत्य हाच निश्चय होय. इति । ११.

# अध्याय १२ रा.

## विश्व अनित्यत्वाविषयीं शंकासमाधान. ( १२–८७ )

श्रुत्युवाच:

> सत इदमुत्थितं सदिति चेन्ननु तर्कहतं
> व्यभिचरति क्व च क्व च मृषा न तथोभययुक्‌ ॥
> व्यवहृतये विकल्प इषितोऽन्धपरंपरया
> भ्रमयति भारती त उरुवृत्तिभिरुक्थजडान्‌ ॥ ३६ ॥

श्रुति ह्मणाल्या: हे विश्वाधारा! ब्रह्मवादी पुरुष या मायामय विश्वाचा विचार करितांना "जगन्मिथ्या व ब्रह्मसत्य" या वचनाविषयीं नानाविध शंकेचें समाधान सयुक्तिक रीतीनीं सांगतात, तें असें:—

शंका:—ज्या अर्थीं हें विश्व सत्य वस्तूपासून ( परब्रह्मापासून ) उत्पन्न झालें आहे, त्या अर्थीं हें ( विश्व ) परब्रह्माप्रमाणें सत्यच असावें. पहा—" कोणतीही एक वस्तु ज्या दुसऱ्या वस्तूपासून उत्पन्न होते, त्या दुसऱ्या वस्तूचे गुण त्या पहिल्या वस्तूमध्यें असतात, " असा व्यवहारिक नियम आहे. उदाहरण—कारणरूप सुवर्णापासून बनलेले कटककुंडलादिक कार्यरूप अलंकार सुवर्णरूपच असतात; तद्वत्

( १ ) " जगन्मिथ्या ब्रह्मसत्यं ॥ " अर्थ—जग हें खोटें आहे, आणि ब्रह्म हें खरें आहे.—श्रुति.

कारणरूप ब्रह्मापासून निर्माण झालेलें कार्यरूप हें जग ब्रह्मरूपच असावयास पाहिजे.

**समाधानः**--हें विश्व सत्यब्रह्मापासून उत्पन्न झालें म्हणून सत्य आहे असें म्हणावें, तर ही गोष्ट तर्कानें बाधित ठरते. पहा-जें ज्यापासून उत्पन्न झालें, तें तद्रूप असतें हा नियम सार्वत्रिक नाहीं. तर कोठें कोठें व्यभिचारित ठरतो. उदाहरण--कारणरूप पित्यापासून उत्पन्न झालेला कार्यरूप पुत्र पितृरूप नसतो; व कारणरूप दंडापासून झालेल्या कार्यरूप घटाचा नाश दंडरूप नसतो; तद्वत् कारणरूप ब्रह्मापासून झालेलें कार्यरूप जग ब्रह्मरूप नसतें. यास्तव हें विश्व मिथ्या होय.

**शंकाः**—कारणेंही दोन प्रकारचीं असतात; एक उपादानकारण. व दुसरें निमित्तकारण. ह्यांपैकीं मृत्तिका हें घटाचें उपादानकारण होय; व दंड, चक्र, कुलाल हे निमित्तकारण होत. जसें उपादानकारणाचें रूप कार्यामध्यें असतें, तसें निमित्तकारणाचें रूप कार्यामध्यें नसतें. **दृष्टांतः**-मृत्तिका हें घटाचें उपादानकारण आहे, म्हणून घट हा मृत्तिकारूप आहे; आणि दंड हें घटनाशाचें निमित्तकारण आहे, म्हणून घटनाश हा दंडरूप नाहीं; तद्वत् परब्रह्म हें विश्वाचें उपादन कारण आहे, म्हणून विश्व हें सत्यच मानिलें पाहिजे.

**समाधानः**--उपादानकारणापासून उत्पन्न झालेलें कार्य उपादानरूप असतें हाही नियम कित्येक प्रसंगीं ग्राह्य नसतो. दृष्टांत-रज्जु ह्या उपादानकारणापासून सर्पाभास हें कार्य उत्पन्न झालें; पण तो सर्प मिथ्या असतो, रज्जुरूप नसतो. कारण, रज्जूचें ज्ञान झालें कीं, सर्पाभास नाहींसा होतो; तद्वत उपादानकारणरूप ब्रह्मापासून उत्पन्न झालेलें कार्यरूप विश्व ब्रह्मरूप नसतें. कारण, ब्रह्माचें ज्ञान झालें म्हणजे विश्वाचें मिथ्यात्व सिद्ध होतें. करितां हें विश्व नश्वर आहे.

**शंकाः**--सर्पाभासाला कारण एकटी रज्जु ( दोरी ) नाहीं, तर

अज्ञान हें दुसरें एक आहे. अज्ञानसहित रज्जु, ह्या उपादानकारणापासून उत्पन्न झालेला सर्प मिथ्या ठरतो; पण अज्ञानरहित एक सद्रूप ब्रह्म, ह्या उपादानापासून उत्पन्न होणाऱ्या जगाला मिथ्यात्व संभवत नाहीं. ह्यामुळें सद्रूप ब्रह्माप्रमाणें जग हें सत्यच असावें.

**समाधान:**--सर्पाभासाला जसें अज्ञान हें दुसरें कारण आहे, तसेंच जगाचेंही अविद्या हें दुसरें कारण आहेच. म्हणून ब्रह्म ह्या उपादानापासून उत्पन्न झालेलें अविद्यात्मक विश्व मिथ्या होय.

**शंका**--अनुमानप्रमाणानें जरी जगाची सत्यता सिद्ध होत नाहीं, तरी दुसऱ्या व्यवहारिक अनुभवप्रमाणावरून सत्यत्व सिद्ध करितां येतें. पहा-ह्या विश्वापासून अनेक व्यवहारिक क्रिया चालत असतात, ह्मणून हें विश्व सत्य होय. व ज्यापासून व्यवहारीक क्रिया चालत नाहींत तें मिथ्या होय. उदाहरण-शिंपीरौप्यन्यायाप्रमाणें शिंपीवर भासणाऱ्या चांदीनें व्यवहार संभवत नाहीं, ह्मणून तिला आम्ही खोटी म्हणतों; पण आपण घागरीनें पाणी आणतों, भोजन केल्यानें पोट भरतें इत्यादि प्रत्यक्ष अनुभवितों. अशा व्यवहारीक क्रिया चालण्यास आधारभूत अशा विश्वाला मिथ्या कसें म्हणतां येईल बरें?

**समाधान**—कित्येक प्रसंगीं गारोड्याचा खेळ, लांकडाचा घोडा इत्यादि मिथ्या व्यवहार सुद्धां सत्य भासतो. व्यवहाराला कारण सुद्धां भ्रम होय. असा भ्रम अंधपरंपरेनें चाललेला असतो. भ्रम हा संस्कारजन्य आहे. म्हणजे भ्रमाच्या उत्पत्तीला कारण पूर्वी एखाद्याला घडलेली तशी प्रतीति एवढीच होय. वस्तु सत्य असेल तरच तिचा भ्रम होतो असा कांहीं नियम नाहीं. मिथ्या पदार्थानें सुद्धां कित्येक ठिकाणीं व्यवहार चाललेला आढळतो. पहा—एखाद्याला पिंपळावर "मुंजा" आहे असा उगाच भास झाला. त्यानें ती गोष्ट दुसऱ्याला सांगितली,

दुसऱ्यानें तिसऱ्याला सांगितली, मग जिकडे तिकडे पिंपळावर मुंजा असल्याचा बोभाट झाला. मूळ पाहूं गेलें तर कांहींच नाहीं. " गतानुगतिको लोको न लोकः पारमार्थिकः " अर्थः-लोक हे आंधळ्याच्या मालिकेप्रमाणें एकामागून एक असे जाणारे आहेत; पण खऱ्याखोट्याचा निर्णय करून वागणारे नव्हत. ह्या प्रमाणवाक्याकडे लक्ष देऊन मूळ शोधतो कोण ? पिंपळावरील मुंजासारखीच जगद्भ्रमाची रहाटी अंधपरंपरा अव्याहत चालली आहे. तिजवरून जगाची सत्यता सिद्ध होत नाहीं. पूर्वी निश्चित झालेला भेदभ्रम उत्तरोत्तर भ्रांतीला कारण होतो. अशी परंपरा अनादिकाळापासून चालत आली आहे. एतावता जगापासून व्यवहारिक क्रिया चालतात, म्हणून तें सत्य असें मानणें हें अप्रयोजक होय. कारण, ज्या अर्थी जगांतील सकल पदार्थ असत ठरतात; त्या-अर्थी विश्वाचेंही मिथ्यात्व सिद्ध होतें. म्हणून हें विश्व मिथ्या होय.

**शंका**--वेदामध्यें " चातुर्मास्य यज्ञ करणाराला अक्षय स्वर्गफळ प्राप्त होतें. व आम्ही सोम पिऊन अमर ( अनंतकाळपर्यंत स्वर्ग भोगणारे ) झालों असें कर्मफळ ' नित्य ' सांगितलें आहे, तें असत्य कसें म्हणावें ?

**समाधान**--हाही पक्ष निर्बलच आहे. कारण, वेदरूप वाणी, ज्यांच्या बुद्धि कर्मविषयक अतिश्रद्धेनें मंद होऊन गेल्या असतील, त्या पुरुषांना गौणी, लक्षणा इत्यादिक वृत्तींच्या योगें मोह घालीत असते. वेदवचनांचा अभिप्राय कर्मफल नित्य आहे असें सांगण्याचा नव्हे; तर लक्षणावृत्तीनें केवळ कर्माची प्रशंसा करणें एवढाच असतो. असें न म्हणावें तर वेदामध्येंच " जसें इहलोकांतील भोग भोगल्यावर संपून जातात. तसेंच स्वर्गांतील भोग भोगल्यावर क्षीण होतात " असें सांगितलें आहे. त्या पूर्व वचनांशीं विरोध येईल, अर्थात कर्मफल मिथ्या

होय. कर्मांची प्रशंसा करण्यांत वेदाचा उद्देश संसारकार्यांत गढून गे-लेल्या पुरुषाला चित्तशुद्धीसाठीं कर्ममार्गाची गोडी लावावी एवढाच अ-सतो; पण कर्मजड मीमांसक हें न जाणतां 'स्वर्गादिक फळच नित्य' असा आग्रह धरून बसतात. हाच त्यांचा भ्रम होय.

**विश्वाची वास्तवस्थिति**—हे ईश्वरा! विश्व सत्य आहे, असें सिद्ध करण्याला कोणतेंही प्रमाण योग्य नाहीसें झालें; पण उलट तें मिथ्या आहे, असें अनुमानानें व श्रुतिवचनांवरूनही सिद्ध होतें. पहा हें विश्व उत्पत्तीच्या पूर्वी नव्हतें व प्रलयानंतर असणार नाहीं, त्याअर्थी मध्य भासणारें विश्व मिथ्या; आणि ब्रह्म सत्य होय. जसे मृत्तिकेपासून बनलेले घटादि पदार्थ मृत्तिकारूप होत; सुवर्णापासून तयार झालेले क-टककुंडलादि अलंकार सुवर्णमय होत. आणि लोहापासून सिद्ध झालेलीं बहुविध आयुधें लोहमय होत; तद्वत् आकाशादि तत्त्वांनीं बनलेलें हें विश्व ब्रह्ममय होय. एतावता विश्वाच्या सत्यतेला कांहीं प्रमाण नाहीं. व असत्यतेला अनेक प्रमाणें आहेत. असें असतांना जे कोणी मिथ्या-भूत आणि मनाचे काल्पनिक खेळ अशा विश्वाला सत्य मानितात ते मूढ होत! इति। १२.

---

(१) "द्वितीयकारणाभावादनुत्पन्नमिदं जगत्। यथेदं नभः शून्यं जगच्छून्यं तथैव हि॥" **अर्थ**--एका ब्रह्मावांचून दुसरें कारण या जगास नाहीं, म्हणून जग उत्पन्नच झालें नाहीं, असें म्हणावें लागतें. जसें आकाश दिसतें तरी तें शून्य आहे तसेंच जगही शून्यच आहे.—**श्रुति.**

# अध्याय १३ वा.

## देहादिकांहून आत्म्याचें भिन्नत्व ( ११-१० ).

श्रीभगवानुवाचः—

विलक्षणः स्थूलसूक्ष्माद्देहादात्मेक्षिता स्वदृक् ॥
यथा ऽग्निर्दारुणोदाह्याद्दाहको ऽन्यः प्रकाशकः ॥ ८ ॥

**भगवान् श्रीकृष्ण ह्मणालेः**—बा उद्धवा! कोणत्याही प्राण्याच्या तत्त्वांचें पृथक्करण केलें, तर त्यांत तीन वस्तु असतात असें प्रत्ययास येतें. पहाः—एक स्थूल ( जड ) देह. दुसरा सूक्ष्म ( लिंग ) देह आणि तिसरा आत्मा ( परब्रह्म ). हें स्पष्ट समजण्याकरितां गुरुशिष्य-संवादरूपानें सांगतोंः—

**शिष्य**—गुरुजी! आत्मा तो कोणता?

**गुरु**—बा शिष्या! स्थूल शरीर, सूक्ष्म शरीर व कारण शरीर यांहून आत्मा निराळा आहे. आणि अन्नमयादि पंचकोशांहून भिन्न असून जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या तीन अवस्थांचा साक्षी आहे. तसाच सच्चिदानन्द ह्मणजे सत्, चित् व आनंदरूप असा आहे, तोच आत्मा होय.

**शिष्य**—स्थूल शरीर कोणतें?

**गुरु**—पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश ह्या पंचमहाभूतांच्या एकेक भूताचे दोन दोन विभाग करून त्यांतून एकेक अर्ध विभाग प्रथम ठेवून देणें. आणि दुसऱ्या अर्ध विभागाचे चार चार भाग करून ते ठेवलेले पांच अर्ध विभाग, त्या प्रत्येक विभागांत हे केलेले चार चार विभाग मिळवावे, म्हणजे पंचीकरण होतें. याप्रमाणें पंचवीस विभाग केलेलीं जीं पंचीकृत पंचमहाभूतें तींही करून केलेलें आहे. आणि कर्में

करून त्याची उत्पत्ति आहे. असें सुखदुःखादि भोगावयाचें स्थान तेंच स्थूल शरीर होय. त्या स्थूल देहाचीं पंचवीस तत्त्वें आहेत तीं या खालील कोष्टकावरून लक्ष्यांत येतील:-

( १ ) स्थूल देहाच्या तत्त्वांचें कोष्टक.

| आकाशाचीं. | वायूचीं | तेजाचीं | आपाचीं | पृथ्वीचीं |
|---|---|---|---|---|
| काम | चलन | क्षुधा | शुक्र | अस्थि |
| क्रोध | वलन | तृषा | शोणित | मांस |
| शोक | धावन | आलस्य | लाळ | त्वचा |
| मोह | प्रसारण | निद्रा | मूत्र | नाडी |
| भय | आकुंचन | कांति | स्वेद | रोम |

शिष्य–सूक्ष्म देह कोणता ?

गुरु–पंचीकरणानें विभाग न केलेलीं जीं अपंचीकृत पंचमहाभूतें तिं-हींकरून केलेला आहे. आणि कर्मबीजेंकरून उत्पन्न होत आहे, असें जें सुखदुःखादि भोग घेण्याचें साधन त्यास लिंगदेह म्हणतात. तो सतरा तत्त्वांचा आहे:–पांच ज्ञानेंद्रियें ( श्रोत्र, त्वचा, नेत्र, जिव्हा व नासिका ). पांच कर्मेंद्रियें ( वाणी, हस्त, पाद, गुद व उपस्थ ) पांच प्राण ( प्राण, अपान, व्यान. उदान व समान ) व मन आणि बुद्धि अशा सतरा कलांसहवर्तमान जें आहे, त्यास सूक्ष्म देह म्हणावें. आणि हा देह कोणी कोणी पंचवीस तत्त्वांचा आहे, असें सांगतात. तें ह्या खालील कोष्टकावरून लक्ष्यांत येईल.

## ( २ ) सूक्ष्म देहाच्या विचारांचें कोष्टक.

| पंचमहाभूतें, | आकाशाचें अंतःकरण पंचक. | वायूचें प्राणपंचक. | तेजाचें ज्ञानेंद्रिय पंचक. | आपाचें कर्मेंद्रिय पंचक. | पृथ्वीचें विषय पंचक |
|---|---|---|---|---|---|
| आकाश. | अंतःकरण स्फुरण देवता विष्णु. | व्यान सर्वांगांत देहाच्या संधींस मागेंपुढें करणें. | श्रोत्र, देवता दिशा, त्याच्या योगानें शब्दाचें श्रवण होतें. | वाचा, देवता अग्नि, तिच्या योगें जीव शब्द बोलतो. | शब्द. |
| वायु. | मन, संकल्प विकल्पात्मक. देवता चंद्रमा. | समान, नाभिस्थान, अन्नरस नाड्यांच्या द्वारें रोमरोमांत पोहोंचविणें. | त्वचा, देवता वायु, तिच्या योगानें शीत, उष्ण इत्यादि स्पर्श समजतो. | पाणि, देवता इंद्र, त्यानें जीव पदार्थ देतो घेतो. | स्पर्श. |
| तेज. | बुद्धि, निश्चयात्मक. देवता ब्रह्मा. | उदान, कंठस्थान, अन्नरसाचे विभाग करणें उचकी उत्पन्न करणें, स्वप्न पा | चक्षु, देवता सूर्य, त्यांच्या योगानें जीव रूप पाहतो. | पाद, देवता उपेंद्र, त्याच्या योगें जीव जातो येतो. | रूप. |
| आप. | चित्त, चिंतनात्मक, देवता नारायण. | प्राण हृदयस्थान, एकवीस हजार सहाशें श्वासोच्छ्वास | जिव्हा, देवता वरुण, तिनें रसस्वाद समजतो. | शिश्न, देवता प्रजापति, त्यानें मूत्र व रतिभोग होतात. | रस. |
| पृथ्वी | अहंकार, अहंपणा, देवता रुद्र. | अपान, गुदस्थान, मलमूत्रोत्सर्ग करणें. | घ्राण, देवता अश्विनी कुमार. त्यत्नें जीवास सुगंध दुर्गंध समजतात. | गुद, देवता मृत्यु, त्या द्वारें मलाचा त्याग होतो. | गंध. |

शिष्य-गुरुमहाराज ! स्थूल व सूक्ष्म ह्या दोन्ही शरीरांचें ज्ञान झालें. आतां कारण देह कोणता. तें कृपा करून सांगा ?

गुरु-बा शिष्या. अनिर्वाच्य म्हणजे जें सांगतां येत नाहीं, अनादि अज्ञानरूप असें स्थूल व सूक्ष्म ह्या दोहों शरीरांस कारण असून ज्यास आत्मस्वरूपाचें ज्ञान नाहीं; आणि निर्विकल्प म्हणजे जेथें कल्पना कुंठित आहे, अशा प्रकारचें जें आहे, तोच कारण देह होय.

शिष्य-वर सांगितलेल्या तीन अवस्था कोणत्या ?

गुरु-जागृति. स्वप्न आणि सुषुप्ति ह्या होत.

शिष्य-जागृति अवस्था कोणती ?

गुरु-शब्दादि पंच विषय ज्या अवस्थेंत कळत आहेत. ती जागृति अवस्था होय. व या स्थूल देहाचा अभिमानी विश्व आहे.

शिष्य-स्वप्नावस्था कोणती ?

गुरु-जाग्रदवस्थेंचे ठायीं जें पाहण्यांत व ऐकण्यांत आलें, त्या योगेंकरून उत्पन्न झालेल्या वासनेनुरूप निद्रासमयीं ज्याचा विस्तार प्रत्ययास येतो. ती स्वप्नावस्था होय. आणि या लिंगदेहाचा अभिमानी तैजस आहे.

शिष्य-सुषुप्त्यवस्था कोणती ?

गुरु-मी कांहीं जाणत नव्हतों. सुखेंकरून निद्रेचा अनुभव घेतला. अशा प्रकारची जी गाढ अवस्था, ती सुषुप्ति अवस्था होय. या कारण देहाचा अभिमानी प्राज्ञ आहे.

शिष्य—आतां मला अन्नमयादि पंचकोश कोणते, तें कृपा करून सांगा ?

गुरु—अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय असे पांच कोश आहेत. ते असेः—अन्नरसाच्या योगानें उत्पन्न होऊन

त्यानेंच वृद्धिंगत पावतें, त्या शरीराला **अन्नमयकोश** ह्मणतात. प्राण. अपान. व्यान, उदान व समान हे पांच वायु आणि पंचकर्मेंद्रियें मिळून **प्राणमयकोश** होतो. पांच ज्ञानेंद्रियें व मन मिळून **मनोमयकोश** होतो. बुद्धि मिळून **विज्ञानमयकोश** होतो, आणि अहंकार मिळून **आनंदमयकोश** होतो. हेच पंचकोश होत. उद्धवा, अशा प्रकारें पंचीकृत पंचमहाभूतांच्या पंचवीस तत्त्वांनीं स्थूल देह बनला आहे. आणि अपंचीकृत पंचमहाभूतांच्या पंचवीस तत्त्वांनीं सूक्ष्म देह झाला आहे. आत्मा ह्मणजे परब्रह्म हें ह्या दोहोंचें उपादानकारण किंवा अधिष्ठान होय. आत्मा हा स्वतःसिद्ध व सर्वशक्तिमान् असून स्थूल व सूक्ष्म देहांची कांहींएक शक्ति नसल्यामुळें, त्यांना शक्ति देणारा आत्मा हाच होय. आणि तो स्थूल व सूक्ष्म देहांपासून निराळाच आहे.

**शिष्य**--आत्मा स्थूल देहाहून कसा निराळा आहे ?

**गुरु**--बा शिष्या ! तूं नेहमीं असें म्हणतोस कीं, माझा देह आहे, माझें डोकें आहे, माझें पोट, हात, पाय इत्यादि माझे आहेत; पण मीच देह आहें, मीच डोकें आहें, मीच पोट, हात, पाय इत्यादि मीच आहें असें कधींही तूं ह्मणत नाहींस. ज्याअर्थीं तूं अमुक माझें आहे असें म्हणतोस, त्याअर्थीं तूं स्वतः त्या पदार्थाहून निराळा असलाच पाहिजेस. दृष्टांत--विटा व गोटे यांनीं बांधलेल्या घरांत राहणारा पुरुष त्या घराहून जसा निराळा असतो; तद्वत् पंचमहाभूतांनीं बनलेल्या देहरूप घरांत राहणारा देहाचा द्रष्टा (आत्मा) त्या देहाहून भिन्न आहे.

**शिष्य**--गुरुमहाराज ! जसें घरांत राहणारा मनुष्य 'मी घर आहें' असें कधींही ह्मणत नाहीं हें खरें; पण 'घर माझें आहे' असें तो जाणतो; तद्वत् देहाचा द्रष्टा जो आत्मा तो देहच नव्हे हें खरें, पण देह माझा आहे असें त्यास समजतोना ?

**गुरु**--बाळा ! तुझा हा समज चुकीचा आहे. कारण तूं देहच न-

व्हेस. तर देह तुझाही नव्हे. हें उघड आहे. पहा–देह पंचमहाभूतांचा असून तो माझाच आहे असें जें तूं म्हणतोस. तें निवळ अज्ञान होय. दृष्टांत---जसें घर विटा व गोटे इत्यादिकांचें असून भ्रमानें तें माझेंच आहे, असें तो जाणतो; तद्वत् हाडें, मांस, नाड्या, त्वचा इत्यादिकांनीं बनलेल्या देह पंचीकृत पंचमहाभूतांचा असून तूं आपलाच समजतोस, तर हाच तुझा निवळ भ्रम होय. तूं देहाचा द्रष्टा ( आत्मा ) आहेस, म्हणून तूं स्थूल देह नव्हेस. आणि तो पंचमहाभूतांचा असल्यामुळें तुझाही नव्हे. कारण, स्थूल देह जड आहे, व तूं चैतन्य आहेस; यामुळें घटद्रष्टान्यायवत् तूं याचा साक्षी आहेस.

**शिष्य**---महाराज ! हा स्थूल देह मी नाहीं, आणि माझाही नाहीं अशी माझी खातरी झाली; पण मी बोलतों, मी पाहतों, मी सुखी आहें, मी दुःखी आहें इत्यादि अहंप्रत्यय सूक्ष्मदेहरूप मनाच्या ठिकाणीं दिसून येतात. यामुळें मी सूक्ष्म देह आहें असें मला वाटतें.

**गुरु**---अरे बाळा ! सूक्ष्म देह तरी तूं कसा असूं शकशील ? कारण, तो सुद्धां भौतिक, जड आणि दृश्य आहे, व तूं त्याचा द्रष्टा ( पाहणारा ) आहेस. म्हणून तो तूं नव्हेस. आणि तो सूक्ष्म देह अपंचीकृत पंचमहाभूतांचा आहे. म्हणून तुझाही होऊं शकत नाहीं. कारण, घटदृष्टान्यायवत् म्हणजे घटाला पाहणारा जसा त्या घटाहून भिन्न असतो; तद्वत् तूं त्या देहादिकांचा द्रष्टा आहेस. उद्धवा ! तुला स्पष्ट

( १ ) " म्हणे माझा डोळा दुखों लागला । परी न म्हणे मीचि दुखों आला । माझा पावोच मोडला । परी मी मोडला हें न म्हणे ॥ यापरी देहीं वर्ततां । प्रत्यक्ष सांगे देहातीतता "---**नाथ.**

( २ ) " मन जडत्वें जड जाण । आत्मा स्वप्रकाशें प्रकाशघन । मन तें आत्म्या आधीन । आत्मा स्वाधीन आत्मत्वें ॥ प्रत्यक्ष म्हणे माझें मन । परी मीच मन न म्हणे आण । या लागीं मनाहोनी आत्मा भिन्न । वेगळेपणा साक्षित्वें ॥ "–**नाथ.**

समजण्याकरितां गुरुशिष्यसंवादरूपानें, आत्मा स्थूल आणि सूक्ष्म देहाहून निराळा आहे असें सांगितलें. आतां ह्याच्या सिद्धीकरितां दृष्टांतासह सिद्धांत सांगतों:--

**दृष्टांतासह सिद्धांतः**--उद्धवा. जसा जाळणारा व प्रकाश देणारा अग्नि जें जाळावयाचें, व ज्याला प्रकाशित करावयाचें, त्या काष्ठाहून निराळा असतो; तद्वत् द्रष्टा ह्मणजे पाहणारा व स्वयंप्रकाश ह्मणजे दृश्य पदार्थास प्रकाशून निराळा असणारा असा जो आत्मा तो स्थूल व सूक्ष्म देहाहून विलक्षण (भिन्न) आहे असें सिद्ध होतें. आणि अग्नि काष्ठामध्यें प्रविष्ट झाला असतां काष्ठाचा झालेला नाश, उत्पत्ति; लहानपणा, मोटेपणा. इत्यादि धर्म धारण करितोसा दिसतो, काष्ट नाहींसें झालें कीं अग्नि नष्ट झालासा वाटतो, लांकूड लहान व मोठें असेल तसा अग्नि लहान व मोठा दिसतो, पण ते नाशादि धर्म त्याचे स्वतःसिद्ध नव्हत; तद्वत् परमात्मा देहांत प्रविष्ट झाला ह्मणजे देहाचे नाशादि धर्म अनुभवितोसा दिसतो; पण ते आत्म्याचे नव्हत; आत्मा देहादिकांहून निराळा असून तो केवळ परब्रह्मरूप आहे. ह्यावर कोणी शंका घेईल कीं. ' काष्ठाच्या संयोगामुळें अग्नीवर काष्ठाचे नाशादि धर्म येणें बरोबरच आहे; पण आत्मा तर असंग आहे, म्हणजे कोणाशीं संयोग पावत नाहीं, तेव्हां देहांशीं किंवा त्या देहांच्या धर्मांशीं त्याचा संबंध घडतो कसा ? बरें संबंध जडला असें म्हटलें तर त्याची निवृत्ति व्हावी कशी ? ' तर यास समाधान--ईश्वराच्या आधीन असलेल्या मायेच्या गुणांनीं झालेले हे स्थूल सूक्ष्म देहांच्या अ-

(२) " अग्नि काष्ठामाजी वसे । परि तो काष्ठ होऊनि नसे । मथिल्या काष्ठीं प्रकट दिसे । जाळीं उल्हासें काष्ठातें ॥ तैसा आत्मा देहीं असे । तो देहोचि होऊनि नसे । ब्रह्मज्ञानें जेव्हां प्रकाशे । जाळी अनायासें देहभाव "--**नाथ.**

अध्यासानें ( आरोपितसंबंधानें ) जीवाला हा संसार प्राप्त होतो. म्हणून स्वस्वरूपाचें ( आत्म्याचें ) ज्ञान केलें त्या अध्यासमूलक संसाराचें छेदक होय. असें आहे त्याअर्थी पुरुषानें विचार करून त्या द्वारें आत्मा कार्यकारणरूप संघातामध्यें (समुदायामध्यें) राहिलेला असूनही निर्लेप निःसंग, निर्विकार व नित्य आहे. असें पूर्णपणें ज्ञान संपादावें. आणि हे दृष्ट देहादिकच सत्य असा समज विचारानें ( प्रथम स्थूल देहाला आत्मा मानणें सोडावें, नंतर सूक्ष्म देहाला अशा रीतीनें ) सोडून द्यावा. म्हणजे कार्यकारणरूप देहादिकांवरील अहंममाभिमान नष्ट होतो. अर्थात् जीव परमानंदरूप ( ब्रह्मरूप ) होतो. इति । १४.

---

( १ ) ईश्वराच्या मायेनें नाना प्रकारचीं कार्यें उपजविलीं असून जीवाला मोह घालण्यासाठीं हा निरर्थक श्रम वाढविला आहे व अहंकार ममकाररूप अविद्येच्या संबंधानें जीवाला संसार भोगावा लागतो. अविद्या नष्ट झाली कीं तो मुक्तच आहे. दृष्टांत--एखाद्या भांड्यांत पडलेल्या चंद्राच्या प्रतिबिंबाला जसे वायूच्या ( वाऱ्याच्या ) संबंधानें कंपादिक होतात, पण आकाशांत राहणाऱ्या बिंबभूत चंद्राला त्याचा कांहीं एक संबंध नसतो, तर तो अलिप्तपणें प्रकाशत असतो; तद्वत्, अंतःकरणांत पडलेल्या आत्म्याच्या प्रतिबिंबरूप जीवाला ( चिदाभासाला ) उपाधिभूत अविद्येच्या संबंधानें जन्ममरणरूप संसार प्राप्त होतो. परंतु बिंबभूत आत्म्याला त्याचा कांहींच संबंध नसतो, तर तो आत्मा सर्वांचा प्रकाशक असून देहादिकांहून निराळा राहिलेला आहे. (२) " दोर भासला होता विखार । त्याचा करितां निज निर्धार । हारपोनियां सर्पाकार । उरे दोर निजरूपें ॥ पाहतां विवेकाचे निवाडें । दोराचें सर्पत्व जेवीं उडे । तेवीं ब्रह्मसद्भावीं रोकडें । देह नातुडे सत्यत्वें ॥ "—नाथ. (३) ज्ञानप्रकरण १५ वा अध्याय पहा. (४) " वपुस्तुषादिभिः कोशैर्युक्तं युक्त्यावघाततः । आत्मानमन्तरं शुद्धं विविच्यात्तण्डुलं यथा ॥ " **अर्थ**–भात कांडून त्यावरील साल काढून टाकल्यानें जसा आपणांस तांदूळच मिळतो; तद्वत् शरीर व कोश हीं आत्म्या वरील टरफलें गुरूपदेश, श्रुतिप्रमाण, युक्ति इत्यादिकांच्या योगानें काढून टाकल्यानें सर्वांतर्यामी शुद्ध आत्म्याची प्राप्ती होते.--**आत्मबोध.**

# अध्याय १४ वा.

## चतुःश्लोकी भागवत ( २-९ ).

श्रीभगवानुवाच:--

अहमेवासमेवाग्रे नान्यद्यत्सदसत्परम् ॥
पश्चादहं यदेतच्च योऽवशिष्येत सोऽस्म्यहम ॥ ३२ ॥
ऋतेऽर्थं यत्प्रतीयेत न प्रतीयेत चात्मानि ॥
तद्विद्यादात्मनो मायां यथाऽऽभासो यथा तमः ॥ ३३ ॥
यथा महांति भूतानि भूतेषूच्चावचेष्वनु ॥
प्रविष्टान्यप्रविष्टानि तथा तेषु न तेष्वहम ॥ ३४ ॥
एतावदेव जिज्ञास्यं तत्त्वजिज्ञासुनाऽऽत्मनः ॥
अन्वयव्यतिरेकाभ्यां यत्स्यात्सर्वत्र सर्वदा ॥ ३५ ॥
एतन्मतं समातिष्ठ परमेण समाधिना ॥
भवान कल्पविकल्पेषु न विमुह्यति कर्हिचित् ॥ ३६ ॥

**श्रीभगवान् म्हणाले:**--ब्रह्मदेवा, सृष्टीच्या पूर्वी मीच होतो. स्थूल आणि सूक्ष्म ह्या दोहोंना कारण जी प्रकृति. ती माझ्याहून भिन्न नाहीं. आणि सृष्टि निर्माण झाल्यावर मीच आहे. हे सर्व दिसून येणारे पदार्थ माझेंच स्वरूप होत, व सर्व जग माझेंच स्वरूप आहे. सृष्टीचा प्रलय झाल्यावर जो अवशिष्ट राहणारा तो मीच! एतावता मी अनादि व अनंत आहें; माझ्याहून भिन्न कांहीं नाहीं. दृष्टांत--आकाशांत चंद्र एकच असतां कामिलादि दोषामुळें जसें एखाद्या मनुष्याला चंद्र पिंवळा आहे, किंवा दोन अथवा त्याहूनहि अधिक आहेत असा भास होतो; तद्वत् आत्मा एकच असतां मायेमुळें त्याच्या ठिकाणीं नानात्व भासतें. तसेंच पंचमहाभूतें आपल्यापासूनच उत्पन्न झालेल्या अनेक कार्यांमध्यें प्रविष्ट असतात, तरी तीं भूतें कार्यें

नव्हे. आणि तो त्या कार्याच्या पूर्वीच असल्यामुळें तो त्याचें कारण आहे; तद्वत् मी जसा मजपासूनच उत्पन्न झालेल्या जगामध्यें प्रविष्ट आहें असें असतों, तसा मी असें नव्हे; आणि मी त्या जगद्रूप कार्यापूर्वीच असल्यामुळें त्याचें कारण आहें. अर्थात् मी जगाचें उपादानकारण होय. आतां अशा त्या आत्म्याचें स्वरूप समजण्यास अन्वयव्यतिरेक सांगतों:—

**अन्वयव्यतिरेक**— "कार्येषु कारणत्वेनानुवृत्तिरन्वयः" अर्थ—कार्यामध्यें कारणभावानें जो सदा वर्ततो त्यास अन्वय असें म्हणतात. आणि "कारणावस्थायां च तेभ्यो भिन्नो व्यतिरेकः" अर्थ—कारण अवस्थेंत त्याहून जो निराळा असतो त्यास व्यतिरेक म्हणतात. उदाहरण—जशी माती घटाचें कारण असल्यामुळें ती घटास व्यापून असते. हा अन्वय होय; तशीच मातीही कारणरूपानें घटाहून निराळी आहे. हा व्यतिरेक होय; तद्वत् आत्मा सर्वांचें कारण असल्यामुळें त्याचें कार्यरूप सर्व जगामध्यें व्याप्त आहे. हा आत्म्याचा अन्वय होय. तसाच कारणरूपानें सर्व दृश्य पदार्थांहून निराळा आहे. हा त्याचा व्यतिरेक होय. अशा अन्वयव्यतिरेकांनीं जें सर्व ठिकाणीं व सर्वकाळ भरलें आहे, तेंच आत्मस्वरूप होय. आत्म्याचें तत्त्वस्वरूप जाणण्याची इच्छा करणारानें तें जाणावयाचें तें एवढेंच.

**ब्रह्मदेवा,** अहंकारानें बद्ध होऊं नये अशी तुझी इच्छा असेल तर तूं उत्तम प्रकारें चित्त एकाग्र करून हा सांगितलेला माझा उपदेश नीट लक्षांत ठेव. म्हणजे कल्पांतील निरनिराळी सृष्टि उत्पन्न करीत असलास तरी तुला कधींही अहंकार उत्पन्न होणार नाहीं इति । १४.

---

(१) "आत्मा वाऽरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मन्तव्यो निदिध्यासितव्यः ॥" **अर्थ**—हे मैत्रेयी, वारंवार आत्मविषयक श्रवण, मनन व निदिध्यास चालवून त्याचा साक्षात्कार मिळवावा.—**श्रुति.**

# अध्याय १५ वा.

## आत्मानात्म विचार ( ७-७ ).

प्रल्हाद उवाचः--

> जन्माद्याः षडिमे भावा दृष्टा देहस्य नात्मनः ॥
> फलानामिव वृक्षस्य कालेनेश्वरमूर्तिना ॥ १८ ॥

प्रल्हाद म्हणालेः— दैत्यपुत्रांनों ! नारदांनी सांगितलेला आत्मानात्मविचार तुह्मांस समजण्यासाठीं स्थूल देहाला घडणारे षड्विकार कोणते तें प्रथम तुला सांगतोः--

**षड्विकार**-[१] जायते (जन्मतो). [२] अस्ति (जन्मल्यानंतर असतो). [३] वर्द्धते (जन्मल्यानंतर वाढतो), [४] विपरिणमते (तरुण होतो), [५] अपक्षीयते (वृद्ध होतो) आणि [६] विनश्यति ( मरतो ) हे देहाचे सहा विकार होत. उदाहरणः—जसे वृक्ष अस्तित्वांत असे तोंपर्यंत त्याच्या फलांनाच होतात; परंतु त्या वृक्षावर त्यांचा कांहींच परिणाम न होतां तो जसा भावरहित असतो; तद्वत् हे सर्व विकार कालामुळें देहाला होतात. पण आत्म्याला मुळींच होत नाहींत. कारण, तो विकाररहित आहे. दृष्टांत- कुलाल, दंड, चक्र इत्यादि उपाधींच्या योगें घट तयार झाल्यावर ' घट बनला ' नंतर ठोकून लांब, रुंद झाला ह्मणजे ' वाढला ' आव्यांत भाजून पक्का झाला ह्मणजे ' परिणामावस्थेला आला ' त्यानंतर तो घासण्यानें पुसण्यानें झिजला म्हणजे ' वृद्ध झाला ' आणि शेवटीं फुटला ह्मणजे ' नाश पावला ' अर्थात् हे घडलेले विकार घटाचे ठायीं होतात; पण घटांत जें आकाश असतें त्याला त्यांपैकीं एकही विकार होत नाहीं; तद्वत् देह जन्मतो, जन्मल्यानंतर असतो, क्रमानें वाढतो, तरुण होतो, वृद्ध होतो आणि शेवटीं मरतो हे

षड्विकार देहालाच होतात. आत्म्याला होत नाहींत. कारण, आत्मा ह्या सहाही विकारांहून भिन्न म्हणजे निर्विकार, निरवयव आणि असंग आहे. आतां त्या देहाहून आत्मा कसा भिन्न आहे, हें समजण्यासाठीं त्या दोघांचीं लक्षणें दर्शवितों:—

**आत्म्याचीं व देहाचीं लक्षणें** आत्मा नित्य तर देह अनित्य, आत्मा निर्विकार तर देह सविकार, आत्मा शुद्ध तर देह अशुद्ध, आत्मा एक तर देह अनेक, आत्मा क्षेत्रज्ञ ( देहाला पाहणारा ) तर देह अनभिज्ञ ( न जाणणारा ), आत्मा सर्वाधार तर देह आत्माश्रय, आत्मा क्रियाशून्य तर देह क्रियायुक्त, आत्मा स्वयंप्रकाश तर देह परप्रकाश, आत्मा सर्वकारण तर देह कार्य पदार्थ, आत्मा सर्वव्यापी तर देह व्याप्य, आत्मा असंग तर देह संगयुक्त व आत्मा आवरणरहित तर देह आच्छादित. या प्रकारें देह व आत्मा यांमध्यें भेद आहे. त्याअर्थी आत्म्याचें ह्या श्रेष्ठ द्वादश लक्षणांवरून आत्मा देहाहून भिन्न आहे, असें जाणून पुरुषानें " देहादिकांवरील अहंमम ( मी व माझें ) " ह्या मोहामुळें उद्भवणारा असद्भाव सोडून द्यावा, आणि मोक्षप्राप्तीसाठीं आत्म्याचा शोध लावावा. आतां त्याच्या शोधाचा प्रकार सांगतों:—

**आत्म्याचा शोध**—मर्मज्ञ शोधक पुरुष खाणींतील दगडांत सोनें आहे, असें ओळखून नानायुक्त्यादिकांच्या योगानें त्याला जसें निराळें करितात; तद्वत् अध्यात्मज्ञानी पुरुष देह मध्यवर्ती जीवाच्या द्वारें आत्मलक्षरूप योगानें ब्रह्मगति जाणतात! आणि आत्मा व अनात्मा यांचा

( १ ) " निर्मानमोहा जितसंगदोषा अध्यात्मनित्या विनिवृत्तकामाः । द्वंद्वैर्विमुक्ताः सुखदुःखसंज्ञैर्गच्छन्त्यमूढाः पदमव्ययं तत् ॥ " **अर्थ**—मान व मोह सोडून नश्वर अशा विषयांवरील प्रेमरूपी दोषाला दूर करून व वासनेपासून निवृत्त होऊन अध्यात्म चिंतन करणारे ज्ञानी पुरुष सुखदुःख या द्वंद्वांपासून निवृत्त होऊन शाश्वतपदाला जाऊन मिळतात,—**गीता.**

विचार करून तद्वारें परमपदास प्राप्त होतात. आतां तो आत्मानात्मविचार सांगतों:-मुलांनो ! कपिलादि पूर्वाचार्यांनीं मूलप्रकृति ( मूलाविद्या ) महत्तत्त्व. अहंकार, पंचसूक्ष्मभूतें (शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध), ह्या आठांना ' प्रकृति ' असें ह्मटलें आहे. त्या प्रकृतीचे सत्वादि तीन गुण ( सत्व, रज व तम ) अकरा इंद्रियें ( श्रोत्र. त्वचा, चक्षु. जिव्हा. नासिका हीं पांच ज्ञानेंद्रियें; वाक्. पाणी. पाद उपस्थ आणि गुद हीं पांच कर्मेंद्रियें व एक मन ). आणि पंचमहाभूतें ( आकाश. वायु. अग्नि. उदक व पृथ्वी ) एकंदर मिळून हे सोळा विकार आहेत. आत्मा या विकारांनीं रहित असल्यामुळें जीव व ब्रह्म " एक " म्हटला आहे. पूर्वोक्त आठ प्रकृति व हे सोळा विकार मिळून एकंदर चोवीस तत्त्वें होतात. आत्मा या सर्वांमध्यें साक्षित्वानें राहत आहे. ह्मणून तो ' एक ' होय. या चोवीस तत्त्वांच्या समुदायालाच शरीर म्हणतात. याचे स्थावर व जंगम असे दोन प्रकार आहेत. यांपैकीं मानवदेह हा मोक्षप्राप्तीचें साधनरूप आहे. ह्मणून या देहांतच जीवद्वारें ब्रह्माचा शोध करितां येतो. व ही देखील अशी कांहीं कठिण गोष्ट नाहीं. कारण " नेति नेति ( हें आत्मा नव्हे. हें आत्मा नव्हे ) " या निषेध श्रुतिवचनावरून सुद्धां आत्म्याचा शोध सहज होऊं शकतो. पहा " स्थूलारुंधति न्यायवत् " म्हणजे अरुंधति नामक नक्षत्र सूक्ष्म असतें. म्हणून तें दाखवितेवेळीं " हें मोठें नक्षत्र नव्हे. त्याच्या जवळचें नव्हे " असें सांगतात. याप्रकारें सांगत सांगत गेलें असतां जसें त्यास अरुंधतीचें दर्शन होतें; तद्वत् अत्यंत सूक्ष्म अशा आत्म्याच्या शोधासाठीं " स्थूल देह आत्मा नव्हे, सूक्ष्म देह आत्मा नव्हे " या प्रकारें विचार करीत करीत गेलें असतां हा आत्मा आपोआप निराळा होतो. अर्थात् आत्मा

( १ ) ज्ञानप्रकरण १३ वा अध्याय पहा.

स्थूल सूक्ष्म देहादिकांहून भिन्न आहे असें ज्ञान होतें, यास दृष्टांत—कागदावर लिहिलेली अक्षरें जशीं शाईहून भिन्न नाहींत; परंतु शाई अक्षरांहून निराळी असते; तद्वत् मायारचित देहादिक हे आत्म्याहून निराळे नाहींत. परंतु आत्मा त्यांहून पृथक् आहे. तसाच आत्म्याचा शोध अन्वयव्यतिरेकावरूनही करितां येतो. आतां त्याचाही प्रकार सांगतों:—

**अन्वय व्यतिरेक**—दैत्यपुत्रांनो ! जसें माळेच्या मण्यांत गोंविलेलें सूत्र ( सूत ) एकच असून तें सर्व मण्यांमध्यें व्यापक असतें; तद्वत् आत्मा एक असून सर्वत्र व्यापून रहतो. हाच आत्म्याचा अन्वय; आणि सूत्र जसें मण्यांत असूनही त्यांपासून भिन्न असतें; तद्वत् आत्मा हा सर्वत्र व्यापक असूनही देहादि संघातांहून निराळा आहे, हाच आत्म्याचा व्यतिरेक. ह्या अन्वयव्यतिरेकांचा विचार केल्यानें मन शुद्ध होतें. त्या शुद्ध मनानें ज्यापासून उत्पत्ति, स्थिति आणि लय होतात व जो त्या संघातांहून निराळा असतो, त्या आत्म्याची ओळख करून घ्यावी लागते. म्हणून त्या आत्मस्वरूपाचें निरूपण करितों:—

**आत्म्याचें स्वरूप**—मुलांनो ! बुद्धीच्या तीन वृत्ति ( अवस्था ) आहेत. त्या जाग्रति, स्वप्न आणि सुषुप्ति ह्या होत. ह्या तीन अवस्था ज्याच्या योगानें जाणल्या जातात, तोच स्वयंप्रकाश व सर्वसाक्षी आत्मा होय. कर्मापासून उद्भवणाऱ्या जाग्रदादि तीन अवस्था बुद्धीलाच आहेत. आत्म्याला नाहींत. क्रियारहित आत्मा ह्या अवस्थांमध्यें साक्षी-

( १ ) " यथा सर्वगतं सौक्ष्म्यादाकाशं नोपलिप्यते । सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते ॥ " **अर्थ**—ज्याप्रमाणें आकाश सर्वत्र भरून राहिलें आहे, तरी तें कशानेंही लिप्त होऊन रहात नाहीं; तद्वत् आत्मा देहामध्यें सर्वत्र स्थित असून त्याहून निराळा आहे.— **गीता.**

( २ ) " आत्मा वाऽरे द्रष्टव्यः श्रोतव्यो मंतव्यो निदिध्यासितव्यः ॥ " **अर्थ**—हे मैत्रेयी, हा आत्मा श्रवण, मनन व निदिध्यास चालविण्यास योग्य आहे. —**श्रुति.**

रूपानें व्यापक असून त्यांहून निराळा आहे. दृष्टांत—जसा वायु गंधरहित असूनही पुष्पांच्या संबंधानें गंधवान् भासतो; तद्वत् आत्मा अवस्थारहित असूनही बुद्धीच्या संबंधामुळें अवस्थावान् भासतो.

दैत्यपुत्रांनों, बुद्धि ही संसाराचें मूळ कारण आहे. गुण आणि कर्में ह्यांच्या योगें हा संसार सतत चालला आहे. व हा मिथ्याभूत संसार अज्ञानमूलक सत्यवत् भासत असल्यामुळें पुरुषाला स्वप्नाप्रमाणें तो मिथ्यासंसारही भोगावा लागतो. म्हणून मुलांनो. तुम्ही ह्या त्रिगुणात्मक कर्माचें बीज ( अज्ञान ) जाळून टाकणाऱ्या ज्ञानयोगाचें आचरण करा. तें बुद्धीचा जाग्रदादि अवस्थारूप प्रवाह बंद करितें. इति। १९.

---

# अध्याय १६ वा.

## ज्ञानविज्ञानयोग ( ११–१९ ).

श्रीभगवानुवाच:—

> यो विद्याश्रुतसंपन्न आत्मवान्नानुमानिकः ॥
> मायामात्रमिदं ज्ञात्वा ज्ञानं च मयि संन्यसेत् ॥ १ ॥

**भगवान् श्रीकृष्ण म्हणाले:**—उद्धवा. ज्याला अनुभवापर्यंत ज्ञान होऊन आत्मतत्त्व प्राप्त झालें, व जो केवळ शाब्दिक ज्ञानवानच राहि-

( १ ) " जेवीं कृष्ण पीत रक्त श्वेत । स्फटिक ठेवितां तेथ तेथ । जरी तदाकार भासत । तरी तो अलिप्त शुद्धत्वें ॥ तसा गुणसंगें जीवात्मा बद्ध । दिसे परी तो अति शुद्ध । हा नेणोनिया निजबोध । करिती विवाद मतवादी ॥ "—**नाथ.**

( २ ) " पूर्वे आहे माझें गमन । पूर्व जाय धरून स्मरण । परी दिग्भ्रम चढल्या जाण । पश्चिमे आपण पूर्व मानी ॥ तैसें शाब्दिक, शास्त्रज्ञान । बोले आन करी आन । तेणें नव्हे समाधान । सर्वथा जाण साधका ॥ " **नाथ.**

ला नाहीं. त्यानें हें द्वैत आणि त्याचें निवृत्तिसाधन हा सजवर शुद्ध मायेचा खेळ होय. असें जाणून. त्या ज्ञानसाधनाचाही त्याग करावा. कारण, ज्ञानी पुरुषाला अपेक्षित फल कोय तो मीच. तें फळ मिळविण्याचें साधन मीच मान्य असतों; आणि त्याचा स्वर्ग ( अभ्युदय ) व मोक्ष ( संसारनिवृत्ति ) हीं मीच. एकंदरीत त्याला मजहून अन्य कोणतीच वस्तु प्रिय नसते. अशाविषयीं विद्वानांचा अनुभवही प्रमाण आहे. पहा—परोक्ष आणि अपरोक्ष ह्या उभय ज्ञानांनीं संपन्न पुरुष माझें पदच श्रेष्ठ असें समजतात. म्हणूनच ज्ञानी पुरुष मला अत्यंत प्रिय असतो. कारण. तो ज्ञानानें मला अंतरीं धारण करितो. ज्ञानाच्या एका अंशानें जी सिद्धि मिळते, ती तपश्चर्या, जप. दान व इतर पवित्र पदार्थ ह्या सर्वांच्या योगेंही पूर्णपणें प्राप्त होत नाहीं. म्हणून, उद्धवा, ब्रह्मसाक्षात्कार होईपर्यंत स्वात्मज्ञान संपादन करण्याचा अभ्यास ठेव, आणि परोक्ष व अपरोक्ष ह्या दोन्ही ज्ञानांनीं संपन्न होत्साता माझेंच मनन करीत रहा. प्राचीन काळीं अनेक मुनि, सकल यज्ञांचा अधिप-

( १ ) "तेषां ज्ञानी नित्ययुक्त एकभक्तिर्विशिष्यते। प्रियो हि ज्ञानिनोऽत्यर्थमहं स च मम प्रियः ॥" **अर्थ**—एकनिष्ठेनें नेहमीं माझी भक्ति करणारा ज्ञानी सर्वांत श्रेष्ठ होय. कारण, त्याला माझ्यांत फार आवड असते व मलाही तो फार आवडतो.

( २ ) "नहि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते। तत्स्वयं योगसंसिद्धः कालेनाऽत्मनि विन्दति ॥" **अर्थ**—ज्ञानासारखें पवित्र या लोकीं दुसरें कांहींच नाहीं, व तें ज्ञान आत्मनिष्ठ योग्याला कालांतरानें आपोआप आपल्या ठिकाणींच मिळतें. **गीता.**

( ३ ) "जे ज्ञानधनें अति संपन्न । परम पवित्र विज्ञानें जाण । ऐसे ब्रह्मभूत जे ब्राह्मण । यज्ञद्वारा करिती भजन माझें ॥ हृदयाच्या निज भुवनीं । विकल्पाची भूमि खणोनी । शम दम विरक्ति कुंडें तिन्ही । केली आवों साधुनी श्रद्धेचा ॥ तेथें क्षराक्षर अरणी दोन्ही । गुरुमंत्रें दृढ मथुनी । काढिला सूक्ष्म निर्धूमाग्नी । कुंडीं स्थापुनी पेटविला ॥ शुद्ध सत्त्वाचें घृत तेथ । रजतमद्वयेंसीं मिश्रित । वैराग्य स्रुवेनें आहुति देत । मंत्र तेथ युक्तीचे ॥ घेऊनी विद्याशाखा लखलखित । संकल्प करूनि

ति व अंतरात्मा जो मी, त्या मला आत्म्याच्या ठिकाणींच ज्ञानाच्या योगानें आराधून उत्तम सिद्धिस पावले. आतां त्या ज्ञानाचा संक्षेपतः तुला उपदेश करितोंः--

**ज्ञानोपदेशः**--हे पुण्यपुरुषा उद्धवा, तुझ्या ठिकाणीं देह व इंद्रियें यांचा जो विकार ( कार्यवर्ग ) भासत आहे तो केवळ माया होय. यथार्थ वस्तु नव्हे. कारण, तो विकार देहाच्या उत्पत्तीपूर्वीं नव्हता, व नाशानंतर राहत नाहीं. जो नुसता रज्जुसर्पवत् ( दोरीवर भास होणाऱ्या सर्पाप्रमाणें ) मध्येंच कांहीं वेळ भासत असतो, तोच भ्रम होय. दृष्टांत-जसा रज्जूवर ( दोरीवर ) होणारा सर्पाचा भास. पूर्वीं तीच दोरी आपण पुष्कळ वेळां पाहिली होती तेव्हां नव्हता, व पुढें दोरी खरी आहे, असें ज्ञान झाल्यावर नाहींसा होणारच, आणि अज्ञानानें मध्येंच कांहीं वेळ भासतो. तो भासमान सर्प सत्य नव्हे; तद्वत् हा देहेंद्रियादि सकल प्रपंच पूर्वीं नव्हता पुढें नसणार व मध्येंच अज्ञानानें कांहीं काल भासतो, म्हणून तो सत्य नव्हे, तर मिथ्या होय. अशा त्या मिथ्याभूत देहेंद्रियादिकांना जेव्हां जन्मनाशादि षड्विकार घडतात, तेव्हां त्यांचा प्रकाशक अशा तुला ( आत्म्याला ) त्यांचें काय असावयाचें ? अर्थात् कांहींच नाहीं. म्हणून तूं विकाररहित आहेस. यास सिद्धांतः "आदि व अंतीं जें राहतें, तेंच मध्येंही असतें." हा वे-

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

पशूचा घात । तेणें यज्ञपति श्रीअनंत । केला तृप्त निजबोधें ॥ तेथें पूर्णाहुति सकारण । घालितां जीवभावाचें अवदान । यज्ञभोक्ता श्रीनारायण । परमात्मा जाण सुखी केला ॥ "--**नाथ.**

( १ ) " सूर्या आदीं मृगजळ नसे । अस्तमानीं उरलें न दिसे । मध्यें कांहीं आभासे । तेथेंही नसे जळलेश ॥ "--**नाथ.**

**( २ ) ज्ञानप्रकरण १५ वा अध्याय पहा.**

दांतसिद्धांत होय. पहा–सर्पाचा भास होण्यापूर्वी जी दोरी असते, व भाससमान सर्पाच्या ज्ञानानंतर जी दोरी राहते, तीच दोरी मध्येंही असते; तद्वत देहेंद्रियांच्या उत्पत्तीपूर्वी जें असतें, व नाशानंतर जें राहणार, आणि मध्यें जें असतें. तें आत्मस्वरूपच तूं निर्विकार ब्रह्म आहेस. आतां त्या ज्ञानविज्ञानें योगाचा विशेष अर्थ समजून घेण्यासाठीं उद्धव प्रश्न करितो:–

**उद्धव ह्मणाला:** -हे विश्वेश्वरा ! ह्या सृष्टीमध्यें तुझी व्याप्ति सर्वत्र ओतप्रोत आहे खरी; परंतु मजसारख्या अज्ञाला त्या व्यापक (ब्रह्म) स्वरूपाचें यथार्थ ज्ञान अद्याप झालें नाहीं ! ह्यास्तव तेंच सविस्तर सांग.

**श्रीकृष्ण ह्मणाले:** –उद्धवा, आतां लोकांच्या उद्धारासाठीं उत्तम प्रश्न केलास. त्याचें सविस्तर उत्तर सांगतों, एकाग्र चित्तानें श्रवण कर. उद्धवा, ज्ञानाचे दोन भेद आहेत. एक परोक्ष व दुसरा अपरोक्ष. ह्यांपैकीं पहिल्यानें परोक्षज्ञान म्हणजे काय तें सांगतों:––

**परोक्ष ज्ञान** प्रकृति, पुरुष, महत्तत्त्व, अहंकार व पांच सूक्ष्मभूतें हीं नऊ तत्त्वें, पांच ज्ञानेंद्रियें पांच कर्मेंद्रियें व मन हीं अकरा तत्त्वें, पांच महाभूतें हीं पांच तत्त्वें आणि सत्व, रज व तम हीं तीन तत्त्वें, मिळून एकंदर अठ्ठावीस तत्त्वें ब्रह्मदेवापासून स्थावरापर्यंत समस्त कार्यांमध्यें प्रविष्ट झालेलीं आहेत असें ज्या ज्ञानानें दिसून येतें; आणि ह्या सर्व तत्त्वांमध्यें एक परमात्तत्त्व व्यापून राहिलें आहे असें ज्या ज्ञानाच्या योगानें जाणतां येतें; म्हणजे कार्यकारणात्मक हें विविध विश्व

(१) " स्वयें स्वयंपाक केला जाण । न जाणे कटु मधुर लवण । जंव चाखिला नाहीं आपण । ते दशा सज्ञान ज्ञान म्हणती ॥ केलिया रसाचें रसास्वादन । स्वयें गोडी सेवी आपण । ऐसी दशा तें विज्ञान । उद्धवा जाण निश्चितीं ॥ किंवा जीव परमात्मा दोनी एक । ऐसें जाणणें तें ज्ञान देख । ऐक्य भोगणें परमात्मसुख । विज्ञान सम्यक त्या नांव ॥ " —**नाथ.** (२) ज्ञानप्रकरण ७ वा अध्याय पहा.

व देहेंद्रियांचा साक्षी म्हणजे तिन्ही देहांस पाहणारा त्याला्च येथें " त्वम् " असें म्हटलें आहे; आणि " असि " या क्रियापदानें ' तत् ' व ' त्वम् ' या दोन्ही पदांचें ऐक्य दाखविलें आहे. आतां अथर्वण वेदांतर्गत महावाक्याचा अर्थ सांगतों:—

" **अयमात्मब्रह्म** " या महावाक्यांतील ( अयम्-आत्मा-ब्रह्म ) या शब्दांचा अर्थ असा:—जो असंग असून स्वयंप्रकाश व अपरोक्ष आहे, जो अदृश्य पदार्थासारखा परोक्षही नाहीं. आणि घटादि पदार्थासारखा दृश्यही नाहीं. त्याला्च येथें ' अयम् ' असें म्हटलें आहे; अहंकारापासून देहापर्यंत जितकीं म्हणून तत्त्वें आहेत. त्या सर्वांचा जो साक्षी तोच येथें ' आत्मा ' असें समजावें. जितके म्हणून दृश्य पदार्थ आहेत. त्या सर्वांचें जें अधिष्ठान आहे. तेंच येथें ' ब्रह्म ' असें समजावें. हें ब्रह्म आणि वर सांगितलेला आत्मा हीं दोन्ही 'एकच' होय, असें या महावाक्याचें तात्पर्य आहे.

[२] **प्रत्यक्ष प्रमाण**—घट तंतूहून निराळा नाहीं. व घट मृत्तिकेहून निराळा नाहीं. एकंदरींत कार्य कारणाहून निराळें राहत नाहीं; तद्वत् चैतन्याव्यतिरिक्त काहीं निराळें संभवत नाहीं.

[ ३ ] **महद्वचनप्रमाण:**—महान् महान् ऋषींनीं पूर्वोक्त गोष्टींचा अनुभव घेऊन नानाविध युक्त्यादिकांच्या योगानें ह्याच सिद्धांतवाक्यांचें पुष्टीकरण करून सांगितलें आहे तें हेंच होय.

[ ४ ] **अनुमानप्रमाण:**—ज्या ज्या पर्वतामध्यें अग्नि असतो. त्या त्या ठिकाणीं धूर असतो. हें प्रमाण होय. उदाहरण – जसा भृंगकरून

( १ ) " यथा यथाव भासोय: शिव एवेति पश्यति। तथा तथा महाभाव भजते यत्नतस्तुस: ॥ " **अर्थ**—जें जें हें भासमान। तें तें शिवचि शिवरूपपूर्ण। हें जाणिजे जे खूण। तें शिवभजन होय सत्य ॥—**ब्रह्मगीता**.

असीचा निश्चय दृग्विना येतो; तद्वत् सकल तत्त्वांत व्यापक असणाऱ्या चैतन्यावरून ब्रह्माचा निश्चय करितां येतो.

उद्धवा, ह्या चारी प्रमाणांवरूनही सर्वांमध्यें ब्रह्माचें व्यापकत्व सिद्ध होतें. सर्वत्र परमात्मतत्त्व भरलेलें आहे असें पाहणारा पुरुष प्रपंचाला मिथ्या जाणून त्यापासून विरक्त होतो. इति । १६.

---

# अध्याय १७ वा.

## मीमांसादिकांचें मंडन व खंडन (१८–८७).

श्रुतयः

> जनिमसतः सतो मृतिमुतात्मनि ये च भिदां
> विपणमृतं स्मरन्त्युपदिशन्ति त आरुपितैः ॥
> त्रिगुणमयः पुमानिति भिदा यदबोधकृता
> त्वयि न ततः परत्र स भवेदवबोधरसे ॥ २० ॥

श्रुति म्हणाल्या:—हे विश्वाधारा, तूं सृष्टीचा नियंता असून सर्वांचें उपादानकारण असल्यामुळें हें सर्व विश्व पूर्वी तुजमध्यें लीन झालेलें होतें, व जगदुत्पत्तीच्या प्रसंगीं हें तुजपासून उत्पन्न झालें. म्हणजे वस्तुतः अभावरूपानें कधींच नव्हतें. कारण, सर्वांमध्यें तुझी शक्ति अनुस्यूत व्यापक आहे, व तूं आकाशाप्रमाणें निर्लेप आहेस. याप्रमाणें श्रुतींचा ढंढोरा असूनही मोठमोठे पंडित म्हणविणारे मीमांसादिक पुरुष केवळ युक्ति लढवून श्रुतींचा भलताच अर्थ करून भ्रांतींत पडतात. आतां येथें त्यांचीं मतें सारांशरूपानें दर्शविलीं आहेत तीं अशीं:—

(१) "आराममस्य पश्यन्ति न तं पश्यति कश्चन ॥ न तं विदाथ य इमा जजानान्यद्युष्माकमन्तरं बभूव ॥ नीहारेण प्रावृता जल्प्या चासुतृप उक्थशासश्चरन्ति ॥" **अर्थ**—लोक ह्या परमेश्वराची ग्राम, नगर इत्यादि क्रीडास्थानें पाहतात.

**मतांचें मंडनः**—कित्येक “ वैशेषिक ” म्हणतात कीं, ‘ पूर्वी नसलेल्या जगाची ( अभावापासून ) उत्पत्ति झाली; ’ कित्येक “ पातंजलादि योगशास्त्रकर्ते ” म्हणतात कीं, ‘ तांब्र वगैरे कित्येक धातु मूळच्या सुवर्ण नसतांना जशा मागाहून रासायनिक द्रव्यांच्या संस्कारांनीं सुवर्ण बनवितां येतात; तद्वत् जीवाला मूळचें ब्रह्मत्व नाहीं, तर तो

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

पण ज्यानें हां निर्माण केला त्याच्याकडे लक्ष कोणीच देत नाहीं. ॥ हां ज्यानें निर्मिली त्याला तुम्ही जाणत नाहीं. म्हणून त्याच्यामध्यें आणि तुम्हांमध्यें मोठें अंतर पडलें आहे. अज्ञानानें वेष्टिलेले बडबडे म्हणजे ‘ तार्किक ’ आणि इंद्रियांची तृप्ति करणारे कर्ममार्गोपदेशक म्हणजे ‘मिमांसक’ संसारमार्गांत भ्रमण पावतात.—**श्रुति**.

( १ ) ( हे नवीन तार्किक समपदार्थवादी होत ) हे म्हणतातः—“ प्रत्येक कार्याचा प्रागभाव हें त्याच्या उत्पत्तीचें निमित्त कारण आहे. कार्य उद्भवलें कीं प्रागभाव नष्ट झाला असें समजावें. पहा—“ अनादिः सान्तः प्रागभावः ” **अर्थ**—ज्यांस आदि नसते; पण शेवट असतो तो प्रागभाव होय.

( २ ) ( पातंजलादिक योगशास्त्रकर्ते ) हे म्हणतातः जीवाचें रूप ब्रह्माहून अभिन्न असून तें सत्य आहे. उपाधीमुळें बनलेलें नव्हे, जसें—जसें तांबें वगैरे धातु सुवर्णरूप नसतांना कांहीं रासायनिक क्रिया करून सुवर्णरूप बनवितां येतात; तद्वत् मूळचा अब्रह्मरूप जीव योगबलानें ब्रह्मरूप होतो. ( वेदांती ) हे म्हणतातः—जीव वस्तुतः ब्रह्मरूपच आहे; परंतु तो अज्ञानामुळें स्वतःला अब्रह्मरूप मानून संसार चिकटून घेतो. दृष्टांत—कुंतीचा पुत्र जो कर्ण त्याला कुंतीनें गंगातीरा सोडिला. एका दासीनें त्याचें लालन पालन केलें. त्या दासीच्या नित्य सहवासामुळें तो स्वतःला “ आपण एक दासीपुत्र आहों ” असें मानून वास्तविक आपलें राजपुत्रपण विसरून जातो. पुढें भीष्म, द्रोणादि आचार्यांनीं त्यास असा उपदेश केला कीं, “ अरे, तूं पंडुराजाचा पुत्र आहेस ” तेव्हां तो “ आपण दासीपुत्र आहों ” हा अज्ञानकृत भाव सोडून देऊन पुन्हां राजा होतो. हाच प्रकार जीवब्रह्मस्थितीचा आहे.

मागाहून योगसामर्थ्यानें ब्रह्मरूप होतो. कित्येक "नैय्यायिक" म्हणतात कीं, 'पांच ज्ञानेंद्रियें व मन हीं सहा, त्यांचे सहा विषय, सहा इंद्रियांपासून होणारीं सहा ज्ञानें, शरीर, सुख आणि दुःख अशा एकवीस प्रकारचीं दुःखें नष्ट होणें हाच मोक्ष.' कित्येक "सांख्यवादि" म्हणतात कीं, 'घटाकाश व महाकाश ह्याप्रमाणवत् जीवात्मा व परमात्मा ह्यांत भेद आहे.' कित्येक शास्त्रकार "मीमांसक" म्हणतात कीं, 'सृष्टि' ही अनादि आणि अनंत असल्यामुळें तिला उत्पत्ति व प्रल-

(१) (हे प्राचीन तार्किक षोडश पदार्थवादी होत) ह्यांचें मत असें:—सहा इंद्रियें, त्यांचे सहा विषय, त्यांपासून होणारीं सहा ज्ञानें, शरीर, सुख व दुःख हे दुःखाचे एकवीस प्रकार आहेत. सुखाची दुःखामध्यें गणना करण्याचें कारण, तें नाशवंत आहे, असें कळलें असतां दुःख होतें. शरीर व इंद्रियें तर दुःखाचीं आदि कारणें अर्थात् तीं दुःखच होत. हीं दुःखें सत्यच आहेत. ज्ञानानें त्या दुःखांचा नाश होणें हा मोक्ष होय. (२) (सांख्यवादी) हे म्हणतात: "सतापासून जगाची उत्पत्ति मृत्तिकाघटन्यायाप्रमाणें कारणामध्यें कार्य सूक्ष्मरूपानें असतें, म्हणजे मृत्तिकेंत घट सूक्ष्म रूपानें असतें; म्हणजे मृत्तिकेंत घट सूक्ष्मरूपानें असतें, तेंच कुलाल, दंड चक्र इत्यादिकांच्या योगानें व्यक्त होतें."

(३) (मीमांसक) ह्यांचें मत असें:—हे मुळीं स्वर्गादि कर्मफलाचा नाश होतो, असें म्हणणें पतकरीत नाहींत. कारण, श्रुतींत त्याला अक्षय्य म्हटलें आहे. ह्यांच्या मतें सृष्टि व प्रलय नाहींतच; तर जगाला आदिही नाहीं व अंतही नाहीं. दुःख उत्पन्न होणार नाहीं असा बंदोबस्त राखणें हेंच काय तो मोक्ष. यज्ञादि केले नाहींत कीं दुःख उत्पन्न होतें, तेंच काय तें बंधन समजावें. यज्ञ केले कीं अक्षय्य स्वर्ग मिळतो व दुःखाचा प्रतिबंध होतो हाच मोक्ष. परंतु वेदांती तर ब्रह्मभिन्न सर्व अनित्य मानितात. (४) "को अद्धा वेद क इह प्रवोचत् कुत आजाता कुत इयं विसृष्टिः ॥" **अर्थ**—ही सृष्टि झाली कोठून, किंवा हिची स्थिति चालत आहे कशी, हें प्रत्यक्ष कळतें आहे कोणाला ! व हें सांगणारा ह्या संसारांत आजपर्यंत होऊन गेला आहे कोण ! कोणाला कळत नाहीं व कोणी सांगणार नाहीं. आणि ब्रह्मादि देवांना ठाऊक

य नाहींत. आणि या कारणास्तव कर्मफळ भोगणें हा व्यवहार सत्य आहे. ' ह्याप्रमाणें मीमांसादिकांचीं मतें होत. ' या प्रकारें मतांचें मंडन झालें. आतां त्या मतांचें खंडन असें:—

**मतांचें खंडनः**—ईश्वरा, ज्ञानोपदेश करणाऱ्या पुरुषांमध्यें हीं जीं भिन्न भिन्न मतें आढळतात, ह्याचें कारण त्यांनीं भलभलत्या समजुतींच्या पायावर आपापलीं अनुमानें बसविलीं आहेत हें होय. देवा, त्या सर्वांचे ते उपदेश केवळ भ्रांतिमूलक आहेत, तत्त्व दृष्टीनें नव्हेत. कारण, एक तर तसें म्हटल्यानें श्रुतिवचनांना विरोध येतो. शिवाय पुरुष त्रिगुणमय असता तर त्या सगळ्यांचें म्हणणे जुळलें असतें; पण तो आधारच मुळीं खोटा आहे. पुरुष त्रिगुणात्मक आहे, अशा हेतूवर अवलंबून जे हे भिन्न भिन्न प्रकार सांगितले, ते मूळ तुजविषयीं ( ईश्वराविषयीं ) अज्ञानामुळें रचिले गेले आहेत; व तें अज्ञान तुझ्या ठिकाणीं अभाव आहे. कारण, तूं अज्ञानापलीकडे असणारा शुद्ध ज्ञानघन आहेस. ह्यावर कोणी म्हणेल कीं, ' जर अविद्यमान जग उत्पन्न होत नाहीं व पुरुष त्रिगुणमय नाहीं, तर जग आणि पुरुष हीं कांहीं ब्रह्माहून निराळीं नाहींत असें होईल. मग तीं भिन्न असलेलीं प्रत्यक्ष अनुभवास कशीं येतात ? ' तर त्याचें निरसन असें:-केवळ मनाच्या कल्पनाचे

मागील पृष्ठावरून पुढें चालू

असेल ह्मणावें तर " अर्वाग्देवा अस्य विसर्जनेना था को वेद आबभूव " **अर्थ**— ब्रह्मादि देव देखील त्यानें उत्पन्न केले ह्मणून त्याच्या अलीकडेच; तेव्हां ही सृष्टि झाली कोणापासून हें जाणतो कोण ? कोणी नाहीं. ह्मणजे जगाची उत्पत्ति कशी झाली तें सांगणें दुर्घट आहे.--**श्रुति.**

( १ ) " सदेव सोम्येदमग्र आसीत् " **अर्थ**—हे सौम्या ! सृष्टीपूर्वी हें सर्व ब्रह्मरूप होतें. " ब्रह्मैव सन् ब्रह्माप्येति " **अर्थ**—जीव मूळ ब्रह्मरूपच. तो ज्ञान संपादून पुन्हां ब्रह्मरूपाप्रत पावतो.—**श्रुति.**

स्वप्नतुल्य मेळ असें हें त्रिगुणात्मक विश्व, वस्तुतः अविद्यमान असतां तुझ्या आश्रयावर विद्यमानासारखें भासतें. दृष्टांत- जसा मिथ्याभूत सर्प दोरीवर भासतो. तो दोरीच्या सत्यपणामुळें होय; तद्वत् तुझ्या सत्यतेमुळेंच हें जग असलेलें प्रतीतीस येतें. केवळ हें जग एकच नव्हे. तर पुरुषासुद्धां सर्व तुझ्या ठिकाणी दिसून येतें. म्हणजे पुरुषाची सत्ता मनानें कल्पिलेलीच होय. ईश्वरा तुझें अनुस्यूत व्यापकचैतन्य ह्या सर्व जगामध्यें अद्वैतरूपानें व्यापक असल्यामुळें आत्मवेत्ते पुरुष हें सकल विश्व आत्मस्वरूप आहे, अर्थात् हें विश्व आत्म्याचें कार्य असल्यामुळें त्याहून भिन्न नाहीं असें जाणतात. दृष्टांत- ज्यांना सुवर्ण पाहिजे असतें. ते लोक सुवर्णाचीं कार्यें कटककुंडलादि टाकीत नाहींत. कारण. तीं कार्यें सुवर्णरूपच असतात; तद्वत् स्वतःच निर्मिलेलें हें विश्व, व त्यांत प्रविष्ट झालेला पुरुषही आत्मरूपच आहे. हाच निश्चयार्थ होय. ह्यावर कोणी शंका घेईल की. "सत्यं ज्ञानमनंतं ब्रह्म" अर्थ-ब्रह्म त्रिकालाबाधित. ज्ञानरूप व अंतरहित आहे. "नेहनानाऽस्ति किंचन" अर्थ ब्रह्माच्या ठिकाणी भेदयुक्त कोणताही पदार्थ नाहीं. "मृत्योः स मृत्युमाप्नोति य इह नानेव पश्यति" अर्थ-जो ब्रह्मरूपी भेदयुक्त विश्व आहे. असें मानितो. त्याला मृत्यु मागून मृत्यु म्हणजे जन्ममरणपरंपरा भोगणें भाग पडतें. इत्यादि श्रुतिवचनावरून ब्रह्मज्ञान तर सुलभ आहे

(१) "असतोऽधि मनोऽसृज्यत मनः प्रजापतिमसृजत प्रजापतिः प्रजा असृजत तद्वा इदं मनस्येव सर्वं प्रतिष्ठितं यदिदं किंच" अर्थ—नामरूपांनीं रहित अर्थात् शून्यवत् जें ब्रह्म, त्याला निमित्त करून म्हणजे त्याच्या आधारानें मूलाज्ञान असें महत्तत्व संज्ञक मन उत्पन्न झालें, म्हणजे ब्रह्माच्या आश्रयानें अज्ञान, समष्टि मनाच्या रूपानें भासूं लागलें, त्या मनानें ब्रह्मदेव उत्पन्न केला. ब्रह्मदेवानें प्रजा निर्मिल्या; तेव्हां हें जें कांहीं दिसतें, तें सर्व समष्टि मनावर राहिलेलें आहे. मन जर मिथ्या तर त्याचा आश्रित समूह मिथ्या हें निराळें सांगायाला नकोच.—श्रुति.

ज्ञानानें मोक्ष प्राप्त होणारच; मग भक्ति कां केली पाहिजे ? तिची कांहीं आवश्यकता नाहीं. ' तर या शंकेचें समाधान असें:-देवा तूं सकल प्राण्यांच्या अंतरीं राहणारा आहेस, अशा भावनेनें जे लोक भक्तिपूर्वक तुझी सेवा करितात. ते मृत्यूला न जुमानितां त्याच्या मस्तकावर पाय देतात, म्हणजे मृत्यूला जिंकून मोक्ष पावतात. वरें जे तुझ्या सेवेस सादर होत नाहींत. ते विद्वान् असले तरी तूं त्यांना आपल्या वेदवाणी रूप रज्जूनें बांधून टाकितोस म्हणजे घोटाळ्यांत पाडतोस. जे तुजवर प्रेम ठेवितात, ते स्वतःला व दुसऱ्यांनाही पवित्र करितात. इतरांना ही योग्यता येत नाहीं. सांगण्याचा अभिप्राय असा की, श्रुतींनीं सत्यज्ञानानंतस्वरूपानें ब्रह्माचें प्रतिपादन केलें आहे. ही गोष्ट खरी; व प्रत्यक्ष वस्तूचें ज्ञान करून देणाऱ्या प्रमाणावरून प्रत्यक्ष ज्ञान व्हावें हेंही खरें; तथापि तें असंभावना व विपरीतभावना यांनीं आच्छादून गेल्यामुळें मलिनचित्त पुरुषांना अप्रत्यक्षासारखेंच होतें. म्हणून त्या तशा ज्ञानाचें सामर्थ्य प्रत्यक्ष अनुभवास येणाऱ्या संसारभ्रमाची निवृत्ति करण्यास चालत नाहीं. यास्तव भक्तिपूर्वक भगवंताची सेवा केली की, पुरुषाचें चित्त निर्मळ होतें, मग भगवत्कृपेनें त्यांना अपरोक्षज्ञान मिळून मोक्ष सहज प्राप्त होतो. इति । १७.

---

(१) " तस्य वाक्तंतिर्नामानि दामानि तदस्येदं वाचा तन्त्या नामभिर्दामभिः सर्वं सितम् " **अर्थ**—परमेश्वराची वेदरूप वाणी ही मोठी दावण आहे व ब्राह्मणादिक नांवें हीं या दावणीला जोडलेलीं दावीं आहेत. जसें दाव्यांनीं बैलांना वगैरे दावणीशीं बांधून ठेवितात; तद्वत वेदरूप दावणीशीं सर्व जग, ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि नांवांनीं बांधलेलें आहे, म्हणजे प्रत्येकाला लावून दिलेले विधि निषेध पाळावे लागत आहेत.—**श्रुति**. (२) " यमेवैष वृणुते तेन लभ्यः " **अर्थ**—परमात्मा ज्यावर अनुग्रह करितो त्यालाच त्याची प्राप्ति होते.—**श्रुति**.

# अध्याय १८ वा.

## द्वैतवाद्यांचें मंडन व खंडन ( ११-१० ).

आगमनश्रुताः—

अथैषां कर्मकर्तॄणां भोक्तॄणां सुखदुःखयोः ॥
नानात्वमथ नित्यत्वं लोककालागमात्मनाम ॥ १४ ॥

भगवान् श्रीकृष्ण म्हणाले:—उद्धवा, ही त्रिगुणात्मक सृष्टि असत्य व मिथ्या आहे. ही गोष्ट कित्येक द्वैतवाद्यांस मान्य नाहीं. ह्यास्तव त्यांचें मत ऐकून कदाचित् तुझ्या मनास फिरून संशय उत्पन्न होण्याचा संभव आहे; म्हणून त्यांच्या मताचें मंडन करून त्यांचें खंडन करणें हें अवश्य होय. तें असें:—

मताचें मंडन—उद्धवा, द्वैतवादी म्हणतात कीं, नानाविध कर्म करणारे. व सुखदुःख भोगणारे. हे जीवात्मे अनेक असून अगदीं स्वतंत्र आहेत. हे जीव परमात्म्याहून भिन्न असून नित्य आहेत. ह्या जीवांच्या बऱ्यावाईट कर्माप्रमाणें प्राप्त होणारीं जीं स्वर्गनरकादिक स्थानें, त्या त्या स्थानीं सुखदुःखादिक भोगण्याचे जे काल, व धर्माधर्मादिक प्रतिपादन करणारी आगमें. हीं सर्वही नित्य आहेत. स्रक्चंदनवनितादि सकल उपभोग्य पदार्थांचा ओघ जसा चालत आहे, तसाच प्रवाहरूपानें नित्य

( १ ) हे वादी असें म्हणतात कीं, " मोक्ष होणें संभवतच नाहीं. कारण भोगस्थानें भोगकाळ. भोगप्राप्तीचे उपायभूत जीं कर्में त्यांचे प्रतिपादक वेद व भोक्ता आत्मा हीं जर अनित्य असतील, तर मोक्ष होणार; पण तसा भाग मुळींच नाहीं, तर तीं सगळीं नित्य आहेत व कल्पांतीं सर्व जीवांस मोक्ष सिद्ध आहेच."

( २ ) " आत्मा आहे जग नाहीं। हें घडलेंचि नाहीं कांहीं । जळेंवीण समुद्र पाहीं । उरला नाहीं सर्वथा ॥ "—नाथ.

चालणारा. आणि त्या त्या भिन्न वस्तूंच्या आकाराप्रमाणें जी निरनिराळी भावना होते तेंच ज्ञानें होय.

**मतांचें विवेचन**—उद्धवा ! द्वैतप्रतिपादकांच्या ह्या मतांचें पृथक्करण केल्यास त्यांत चार भाग आहेत असें दिसून येईल. (१) जीव स्वतंत्र आहेत. (२) जीव नित्य आहेत. (३) भोगसाधनें नित्य आहेत. व (४) द्वैत सत्य मानणें हेंच ज्ञान होय. ह्या चारही भागांचा एकमेकांशीं आधाराधेय संबंध पाहिल्यास 'जीव स्वतंत्र आहेत' ह्या एका आधारावर बाकी तिन्ही भाग उभारलेले आहेत असें स्पष्ट दिसतें. पहा—जीव स्वतंत्र आहेत असें म्हटल्यास, ते नित्य आहेत असें मानिलेंच पाहिजे. कारण, जीव अनित्य मानिल्यास, ते स्वतंत्र आहेत असें म्हणतां येणार नाहीं. जीवांची स्वतंत्रता सिद्ध झाली, म्हणजे त्यांच्या भोगसाधनांचीही नित्यता सिद्ध होते; व भोगसाधनांची नित्यता न मानिल्यास जीवांची स्वतंत्रता नाहींशी होते. जीव स्वतंत्र आहेत असें म्हटलें की, द्वैत सत्य म्हटल्याशिवाय गत्यंतरच नाहीं; व जीवाचे उपभोग्य पदार्थ सत्य होत, असें नाकबूल केल्यास जीव स्वतंत्र ते कसे ? एतावता ह्या चारही गोष्टींच्या मुळाशीं जीव स्वतंत्र आहेत, हें एकच तत्त्व आहे.

**मतांचें खंडनः**—उद्धवा, "जीव स्वतंत्र आहेत" ही एक गोष्ट जर मिथ्या ठरेल तर बाकीच्या तिन्ही गोष्टीही आपोआप मिथ्या ठरतीलच. व मग जीव परतंत्र आहेत, असें सिद्ध झाल्यास ते नित्य आहेत, किंवा द्वैत मानणें हेंच ज्ञान होय, ह्या सर्व गोष्टी आपोआपच

(१) नरदेहीं ज्ञान उपजलें । तेणें देहांत नाशिलें । फळें वृक्षमूळ छेदिलें । कोणीं देखिलें कोठेंही ॥ ज्ञानाचे परिपाकदशे । म्हणती अवघा संसारचि नासे । सृष्टि प्रवाहरूपीं नित्य असे । नित्य नासे कैसेनी ॥ मनुष्याचें हृदयींचें ज्ञान । तेणें संसाराचें निर्दाळण । तरी खद्योततेजें जळे जाण । ग्रहगण शशिसूर्य ॥ "—नाथ.

मिथ्या ठरतात. तें असें:--" जीव स्वतंत्र आहेत " हें द्वैतवाद्यांचें मत मान्य केलें, तरी सर्व प्राण्यांना देहाच्या संबंधामुळें कालगतीपासून जन्म, वृद्धि, नाश इत्यादि विकार वारंवार भोगावे लागतातचना. ज्याअर्थी जन्मनाशादि षड्विकार वारंवार भोगावे लागतात, त्याअर्थी कर्में करणारा आणि सुखदुःखें भोगणारा पुरुष स्वतंत्र नाहीं असें सिद्ध आलें. तो स्वतंत्र असता तर दुःखभोगाची कधींच इच्छा करीत नस-त्यामुळें दुष्कर्म करताच ना. ज्याअर्थी तो दुष्कर्म करून दुःखें भोगीत पडतो, त्याअर्थी तो परतंत्र आहे हें उघड होय. जो पुरुष पराधीन आहे, त्याला सुख तें कोणतें प्राप्त होणार बरें ? तूं ह्मणशील कीं, 'जे चांगल्या प्रकारें कर्में करावयास जाणतात ते सुखी, व जे तसें जाणत नाहींत ते दुःखी.' तर त्यास उत्तर असें:--ज्ञानवान् पुरुषांना एखादेवेळीं सुख नाहींसें होतें, तसेंच मूढजनांनाही कव्हां कव्हां दुःख नाहीं अशी स्थिति असते. व " आह्मी यज्ञयागादिक वगैरे कर्माचरणांत कुशल ह्मणून सुखी आहों " असें मानणें हा केवळ त्यांचा निरर्थक अभिमान होय. ह्मास्तव, जीवांचें पारतंत्र्य कबूल केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. तूं ह्मणशील कीं, 'तरी पण देह आहे तोंपर्यंत सुख तर भोगावयास मिळेलच.' तर त्याचेंही उत्तर सांगतों:--ज्याअर्थी मृत्यु जवळ नित्य टपून बसलेला आहे, त्याअर्थी ह्या पुरुषाला कोणता द्रव्यादि पदार्थ अथवा उपभोगसुख देईल ? पहा--वधस्तंभाकडे चालविलेल्या वध्य पुरुषाला पुष्कळ मिष्टान्न, हारतुरे इत्यादि उपभोग्य

(१) " अग्नि तो तव स्वरूप माझें । श्रुतिमंत्र ते तव मासीं वाजे । आणि होमद्रव्यही जें जें । तेंही माझें स्वरूप ॥ ऐशिया मज सर्वगतातें । नास्तिक्य देखोनि निज चित्तें । अनीश्वरवादी करिती यागातें । तोचि त्यातें बाधक ॥ मज यज्ञपुरुषातें सांडून । करिती इंद्रादिकांचें भजन । चुकवूनियां निजसुख । सर्वांगीं खिटीसामरेचा देख । लेपु देतां न वचे भूक । अधिक दुःख तेणें होय. ॥ "—नाथ.

पदार्थ दिले, तरी किंचित्‌ही संतोष वाटावयाचा नाहीं; तद्वत् मृत्यु ह्या पुरुषाच्या मागें नित्य लागून राहिलेला आहे, तर त्याला ऐहिक कोणत्याही विषयांपासून सुख वाटावयाचें नाहीं हें उघड आहे. उद्धवा, ह्या सर्व गोष्टींचा नीट विचार कर, ह्मणजे जीव हे निःसंशय पराधीन आहेत असें तुला निश्चयानें दिसून येईल. उद्धवा ! आतां स्वर्गादिकांची स्थिति कशी आहे, तेथील सुखसाधनें मिळविण्यास किती कष्ट करावे लागतात, कष्ट करून साध्य केलेल्या गोष्टीही त्यांच्यापासून कशा सुटून जातात इत्यादिकांचा निर्णय केला असतां द्वैतवाद्यांची शंका अगदीं निवृत्त होईल. आतां धर्माचरणानें प्राप्त होणारी स्वर्गलोकांतील स्थिति कशी आहे, ती सांगतों:—

**धर्माचरणाचा परिणाम:**—उद्धवा ! इहलोकीं दिसून येणाऱ्या सुखाप्रमाणेंच, जें आपल्याला ऐकून ठाऊक आहे तें स्वर्गादि लोकांतील सुखही हेवा, दुसऱ्याला नसतें दोष देणें, व ऱ्हास ह्या दोषांनीं ग्रासलेलें आहे. पहा—स्वर्गामध्यें इंद्र हा राजा आहे, तर देवगण ही प्रजा असलीच पाहिजे. त्या प्रजारूप देवांच्या ठिकाणीं त्यांच्या न्यूनाधिक पुण्यानुरूप तारतम्य असतेंच. जेथें तारतम्य आहे, तेथें दोष असतात हें उघड आहे. व स्वर्गांत पुष्कळ सुखें आहेत असें मान्य केलें, तरी तीं पदरांत पडत तोंपर्यंत नानाविध विघ्नें प्राप्त होतात. उदाहरण—एका

(१) " प्रत्यक्ष ये लोकीं लोक । धर्म अर्थ काम कामुक । येचि विखीं ज्ञान देख । आवश्यक करिताती ॥ आह्मी स्वधर्म करितों ह्मणतां । स्नानसंध्येचा कांनि मिरविती । शेवटीं गायत्रीचें फळ देती । अर्थप्राप्ती लागोनी ॥ वेदोक्त आह्मी करितों याग । संस्थापितों वेदमार्ग । शेखीं तो करिती जीविकायोग । स्वर्गभोग वांच्छिती ॥ परि परमार्थाचिया चाडा । कोणी वेंचीना कवडा । भूल कैशी पडली मूढा । स्वार्थ रोकडा विसरले ॥ "—नाथ.

(२) " जैसे क्षयरोगाचे रोगियासी । अल्प कुपथ्य बाधी त्यासी । तैसें जाण काम्य कर्मासी । अल्प दोषीं विघ्न ॥ "—नाथ.

शेतांत चांगलें पीक आलें आहे. परंतु तें तसेंच पदरांत पडेल असें कोणी सांगावें! तोच प्रकार स्वर्गादि सुखांचा! अर्थात् स्वर्गसुख अशाश्वत होय.

**धर्माचरणाचें फळ**—उद्धवा! स्वर्गप्राप्ति होण्याकरितां जी कर्में करण्याविषयीं वेदांच्या आज्ञा आहेत, तीं कर्में करूं लागल्यावर त्यांस अनेक विघ्नें उद्भवतात. कदाचित् तीं विघ्नें दूर होऊन एकदाचें कर्मानुष्ठान सिद्धीस गेलें, म्हणजे प्राणी स्वर्गास जातो. स्वर्गप्राप्तीसाठीं याज्ञिकास नानाविध यज्ञ करून इंद्रादिक देवांना बलि अर्पण करावे लागतात; आणि ते यज्ञ पूर्ण झाले म्हणजे यज्ञकर्ता पुरुष स्वर्गांत जाऊन तेथें देवांप्रमाणें स्वतः कष्ट करून मिळविलेले दिव्यभोग उपभोगितो. मग तो पुरुष मनोहर वेष धारण करून पुण्यानें प्राप्त झालेल्या शुभ्र विमानांत बसून अप्सरांच्या समुदायामध्यें विहार करीत फिरतो, व गंधर्व त्याचे गुण गात असतात. सुवर्णघंटादिकांच्या माळांनीं शृंगारलेलें, आणि इच्छेस येईल तिकडे गमन करणारें, अशा त्या विमानांत स्त्रियांसहवर्तमान बसून देवांच्या उपवनांत क्रीडा करितां करितां तो त्या सुखांत इतका रंगून जातो कीं, 'आपण पुन्हां मृत्युलोकीं पडणार आहों' याचें त्यास भान देखील रहात नाहीं. अशा रीतीनें पुण्य संपेपर्यंत स्वर्गामध्यें आनंद भोगित असतो, व पुण्य संपलें कीं, त्याची इच्छा नसली, तरी तो काळाच्या तावडींत सांपडून आपोआप खालीं पडतो! उद्धवा. प्रवृत्तिमार्गही दोन प्रकारचे आहेत. एक—धर्मास अनुसरून अ-

---

(१) "ते तं भुक्त्वा स्वर्गलोकं विशालं। क्षीणपुण्ये मर्त्यलोकं विशन्ति। एवं त्रयीधर्ममनुप्रपन्ना गतागतं कामकामा लभन्ते॥" **अर्थ**—वेदत्रयींत सांगितलेल्या धर्मांप्रमाणें सकाम कर्म करणारे लोक विशाल अशा स्वर्ग लोकाचा उपभोग घेऊन यज्ञकर्मापासून प्राप्त झालेलें पुण्य संपल्याबरोबर मृत्युलोकाप्रत येऊन पुन्हां जन्ममरणाच्या फेऱ्यांत पडतात.—**गीता.**

सणारा, व दुसरा–धर्मास अनुसरून नसणारा. धर्मास अनुसरून असणारें आचरण करून सुख कसें मिळतें, व तें शेवटीं हातचें आपोआप कसें निसटून जातें हें तुला सांगितलें. आतां धर्मास अनुसरून नसणारें आचरण केल्यानें कसकशीं फळें मिळतात, तींही सांगतों:—

**अधर्माचरणाचा परिणाम**—उद्धवा! जर कदाचित् मनुष्य दुष्टांच्या ( विषयी लोकांच्या ) संगतीमुळें अधर्म मार्गांत रमून जाईल, तर इंद्रियें स्वाधीन नसल्यामुळें चित्त विषयव्याप्त होऊन तो दीन, भोगेच्छांनीं व्याकुळ, स्त्रीलंपट व भोगांसाठीं भूतांची हिंसा करणारा होईल.

**अधर्माचरणाचें फळ**—उद्धवा! दुष्ट जनांनीं मोह घातल्यामुळें धनादिकांसाठीं तो विधि सोडून पशुहिंसा करील, आणि त्यांच्या योगें प्रेतगणांचें यजन करीत जाईल, तर तो प्राणी परवश होतसाता नरकांत पडून शेवटीं घोर स्थावर योनीस प्राप्त होतो. एकंदरींत प्रवृत्तिमार्गानें वागत असतां धर्माचरण करणारास चांगली स्थिति प्राप्त होते, व अधर्माचरण करणारास दुःस्थिति प्राप्त होते; परंतु ह्या दोन्ही स्थितींचा शेवट दुःखांतच होतो. कारण, ह्या दोन्ही प्रकारांपासून पुनर्जन्म नष्ट होत नाहीं! ज्या प्राण्यास जन्ममरण आहे, त्यास खरें सुख दुर्लभ होय. ह्यांत संदेह नाहीं. एतावता प्रवृत्तिमार्ग ( द्वैतमार्ग ) सगळा जिकडून तिकडून अनार्थावह आहे. ह्मणून ही द्वैतकल्पना व्यर्थ होय. निवृत्तिमार्गच ( अद्वैतमार्गच ) मोक्षसाधनरूप असल्यामुळें श्रेष्ठ होय.

**निवृत्तिमार्ग**—उद्धवा! कार्यकारणात्मक सृष्टीचें सामान्य स्वरूप असें आहे कीं, इंद्रियें हीं कर्में करितात. व सत्वादिक गुण इंद्रियांस कर्में करण्यास लावितात. जीव ( आत्मा ) हा कांहींएक करीत नाहीं. अथवा सुखदुःखादिक कांहींएक भोगीत नाहीं. आत्मा कर्तृत्व व भोक्तृत्वरहित असूनही त्या गुणांशीं संयुक्त झाला कीं, त्यांचा अभिमान

वाळगूं लागतो. म्हणून कर्मफळें भोगितो! उद्धवा, जोंपर्यंत सत्वादि गुणांमुळें अहंकाराचें अस्तित्व कायम असतें, तोंपर्यंत जीव आपण स्वतंत्र आहों असें मानितो. जोंपर्यंत मी स्वतंत्र आहें असें वाटत असतें, तोंपर्यंत आत्म्याचें नानात्व ( भेद ) जाणवतें. आत्म्याचें नानात्व जाणवत आहे, तोंपर्यंत परतंत्रपणाही असतो. म्हणजे जीव कर्माधीन असतात. व जोंपर्यंत परतंत्रपणा आहे, तोंपर्यंत प्राण्याला माझें ( ईश्वराचें ) भय असतेंच. एकंदरींत सिद्धांत हा कीं, जे कोणी अज्ञानामुळें, हें त्यानें केलेलें कर्म आणि स्त्री, पुत्र, स्वर्ग इत्यादिकांच्या भजनीं लागतात, ते वास्तविकपणें फसून जाऊन दुःखसागरांत पडतात. उद्धवा, जीव, काल, कर्मप्रतिपादक आगम, स्वर्गादिक लोक, नानाविध उपभोगाचें कारण धर्म, ही सर्व मायेच्या गुणांना क्षोभ आला असतां मलाच नांवें मिळतात. तीं मजहून वेगळीं नाहींत. एतावता आत्मा हा एकच होय. त्याला गुणांचें कार्य जो देह त्याच्या संबंधामुळें संसार भोगावा लागतो. व आत्मज्ञानानें मुक्ति मिळते असें सांगितलें. आणि इतर मतांचें खंडन करून तोच सिद्धांत दृढ केला आहे. इति । १८.

---

(१) "जैसें कवळें ( कावळीत ) अस्तगिल्या डोळा। तो चंद्रमा देखे पिवळा। तेवीं आत्मा कर्ता भासे स्थूळा। केवळ निश्चळा नेणतां॥ सवेग चालतां आभाळें। वाटे म्हणती चंद्रमा पळे। तेवीं आत्मा कर्ता मानिती स्थूळें। उपाधि मेळें अध्यास॥"

(२) "जैसें आपुलेंचि निजमुख। आरिसा करी आपणा सन्मुख। तैसें अविद्यायोगें मायिक। द्वैत देख ते दाखवी॥ आकाशामाजीं आपुला। जो द्वैतभावो स्वयें दिसला। तेणें आपण नाहीं द्विधा झाला। मिथ्या भासला आभास॥" —**नाथ.**

(३) "भीषाऽस्माद्वातः पवते भीषोदेति सूर्यः। भीषाऽस्मादग्निश्चेन्द्रश्च मृत्युर्धावति पञ्चमः॥" **अर्थ** —परमेश्वराच्या भीतीनें वायु वाहतो व सूर्य उगवतो, आणि त्याच्या भयास्तव अग्नि, इंद्र, तसाच पांचवा मृत्यु, हे आपापले कामावर धांवत असतात.—**श्रुति.**

# अध्याय १९ वा.

## कपिलोपदेश ( ३-२७ ).

श्रीभगवानुवाच:--

प्रकृतिस्थोऽपि पुरुषो नाज्यते प्रकृतेर्गुणैः ॥
अविकारादकर्तृत्वान्निर्गुणत्वाज्जलार्कवत् ॥ १ ॥

**भगवान् कपिल महामुनि ह्मणाले:**—माते देवहूति ! सूर्याचें प्रतिबिंब पाण्यामध्यें पडलें असतां वाऱ्यानें पाणी हाललें, किंवा उष्णतेनें तें सुकलें, ह्मणजे सूर्य हलल्याचा अथवा अभाव झाल्याचा भास होतो; पण सूर्याला त्यांपैकीं कोणताच विकार घडत नाहीं; तद्वत् देहामध्यें असणाऱ्या जीवावर देहास होणाऱ्या सुखदुःखादिक विकारांचा परिणाम झाल्यासारखा भास होतो; पण त्याला त्यांपैकीं कोणताच विकार होत नाहीं. कारण, तो निर्गुण निर्विकार असल्यामुळें कोणतीही क्रिया करीत नाहीं; जो क्रियाच करीत नाहीं, त्यास विकार कोठून उद्भवणार ? अर्थात् नाहीं. माते, वास्तविक स्थिति अशी असतांना, जेव्हां हा जीव देहाच्या गुणांवर आसक्ति ठेवितो, व अहंकारामुळें स्वतःचें ( आत्म्याचें ) स्वरूप विसरून जाऊन " मीच सर्व कर्में करितों " असा अभिमान बाळगितो; तेव्हां त्या अभिमानामुळें तो ( चिदाभास जीव ) पराधीन होतो, त्याची शांत वृत्ति नाहींशी होते व देहावरील आसक्तीच्यासंबंधानें घडलेल्या कर्मांच्या पापपुण्यानुरूप उत्तम ( देव ), मिश्र ( मनुष्य ) आणि अधम ( तिर्यक् म्हणजे पशु, पक्षी, वृक्ष, कीट इत्यादि ) अशा योनीमध्यें जन्मास येतो, अर्थात् जन्ममरणरूप संसारमार्गात त्याला पडावें लागतें. आतां तूं ह्मणशील कीं, ' संसार जर मिथ्या आहे, तर त्याच्या निवृत्तीबद्दल यत्न कां केला पाहिजे ? '

तर तसें नाहीं. यत्न करणें अवश्य आहे. दृष्टांत–स्वप्न जरी खोटें आहे, तरी त्याकाळीं स्वप्नांतील व्याघ्र सत्य भासत असल्यामुळें त्यांचे भय, शोक, कंप इत्यादि अनर्थ जागृतकाळीं अनुभवास येतात; तद्वत् संसार जरी मिथ्या आहे, तरी प्राण्याला मिथ्या विषयांचा ध्यास लागल्यामुळें, हे अनर्थ प्राप्त होतात. अर्थात् त्यांचा संसार सुटत नाहीं ! म्हणून मनुष्यानें दुष्ट इंद्रियांच्या विषयरूप मार्गामध्यें आसक्त झालेलें आपलें मन, दृढभक्ति आणि तीव्र वैराग्य यांच्या योगानें हळू हळू आपल्या स्वाधीन करून घ्यावें

सारांश ! हा आपला देह व त्याचे संबंधी पुत्रकलत्र इत्यादिकांवरील आणि " मी " व " माझें " असा दुरभिमान सोडून द्यावा. प्रकृति व पुरुष त्यांचें सत्य स्वरूप समजण्याचें साधन जें तत्त्वज्ञान तें प्राप्त करून घ्यावें. त्या ज्ञानाच्या योगानें जागृति, स्वप्न व सुषुप्ति ह्या बुद्धीच्या अवस्था निवृत्त होतात; व मग अर्थातच भेदबुद्धी नाहींशी होते. नंतर जसें आपण नेत्रेंद्रियांतील सूर्य नामक अधिष्ठात्री देवतेच्या साह्यानें आकाशांतील सूर्यबिंब पाहतों; तद्वत् मुमुक्षु पुरुषानें अहंकारावच्छिन्न अहंकारोपाधित आत्म्याच्या योगानें शुद्ध आत्मस्वरूपाचें दर्शन घ्यावें. अशा रीतीनें आत्मसाक्षात्कार झाला म्हणजे तो मुमुक्षु ब्रह्मरूपाप्रत प्राप्त होतो. त्या ब्रह्मरूपास देहादिक कोणतेही उपाधि नाहींत; तें मिथ्याभूत अहंकाराच्या ठिकाणीं मुद्रपानें भासत असतें; सर्व जगाचें

(1) " शास्त्राण्यधीत्य मेधावी अभ्यस्य च पुनः पुनः । परमं ब्रह्म विज्ञाय उल्कावत्तान्यथोत्सृजेत् ॥ ग्रंथमभ्यस्य मेधावी ज्ञानविज्ञानतत्परः । पलालमिव धान्यार्थी त्यजेत् ग्रंथमशेषतः ॥ " **अर्थ**—बुद्धिमान पुरुषानें पुनः पुनः शास्त्राचा अभ्यास करून ब्रह्मज्ञान झाल्यावर उल्काप्रमाणें त्यांचा त्याग करावा. ज्याप्रमाणें धान्याचें फोलकट टाकून देऊन फक्त धान्य दाणाच मनुष्य ग्रहण करतो; त्याचप्रमाणें सर्व शास्त्रांचा अभ्यास करून ज्ञानप्राप्तीनंतर त्यांचा त्याग करावा.—**पंचदशी.**

आदिकारण जी प्रकृति तिचा आधार तेंच होय. सर्व कार्याला त्यापासून प्रकाश मिळतो, अर्थात त्याच्या सत्तेमुळें सर्व कार्यें घडतात. व तें सर्व पदार्थांमध्यें ओतप्रोत भरलेलें असून परिपूर्ण आहे.

मातें. अहंकारावच्छिन्न आत्म्याच्या योगानें ब्रह्मस्वरूपाचें ज्ञान कसें होतें, तें खालीं दर्शविलेल्या दृष्टांतावरून सहज लक्षांत येईल. दृष्टांत पहा- आकाशांतील बिंबभूत सूर्याचें प्रतिबिंब पाण्यांत पडून त्या प्रतिबिंबाचें दुसरें प्रतिबिंब ( कवडसा ) भिंतीवर पडतें. आतां प्रथम त्या कवडशाकडे पाहिलें, व त्याचा विचार केला. म्हणजे त्याच्या मुळाकडे ( पाण्यांतील प्रतिबिंबाकडे ) लक्ष जातें; आणि त्याकडे लक्ष गेलें असतां त्यावरून जसें बिंबभूत सूर्याचें ज्ञान होतें; तद्वत् भूतें, इंद्रियें आणि मन ह्यांमध्यें अहंकाराचें प्रतिबिंब आहे, व त्या अहंकारामध्यें आत्म्याचें प्रतिबिंब असल्याशिवाय विषयांची स्फूर्ति व्हावयाची नाहीं. यावरून त्रिगुणात्मक अहंकारामध्यें आत्म्याचें प्रतिबिंब आहे हें सिद्ध झालें. त्या अहंकारामध्यें आत्म्याचें प्रतिबिंब आहे असा विचार केला म्हणजे त्यावरून बिंबभूत सत्यज्ञानरूपी ब्रह्माचाही बोध होतो. अशा रीतीनें विचार करीत गेला, म्हणजे त्याला आत्मस्वरूपाचें ज्ञान होतें. आतां तुला आत्मानुभवाची एक युक्ति सांगतों:--

**आत्मानुभवाची युक्ति:**--मातें. सुषुप्ति अवस्थेंत सूक्ष्मभूतें, इंद्रियें, मन, बुद्धि यांसहित अहंकार आपला कारणरूपी अव्याकृतांत ( सामान्य अहंकारांत ) लीन झालेला असतो, पण त्या वेळीं जो जागृत असून सर्व पाहात असतो, आणि ज्याला मुळींच अहंकार नसून कांहींएक करीत नसतो, तोच आत्मा होय. यावर तूं कदाचित् अशी शंका घेशील कीं, ' झोंप लागल्यावर आत्मा जागृत आहे असें जर म्हणावें तर जसा जागेपणीं आणि स्वप्नांत त्याचा आपल्याला स्पष्ट भास होत असतो; तसा झोंपेंत कां भासत नाहीं ? ' तर यास समा-

भान–जागृतावस्थेमध्यें तो सर्व गोष्टी पाहत असतो. म्हणून स्पष्ट प्रतीतीस येतें; व आपोआप सर्व इंद्रियांसह अहंकार देखील आपलें कारणरूप अज्ञानामध्यें लीन झालेला असतो. म्हणून प्रतीतीस येत नाहीं. दृष्टांत जसा एखाद्या द्रव्यलोभी मनुष्याचें द्रव्य नष्ट झालें असतां "स्वतःच नष्ट झालों" असें वाटतें; तद्वत मनुष्याचा देह हाच आत्मा अशी देहात्मक बुद्धि असते, म्हणून तो स्वतःला नष्ट झाल्याप्रमाणें मानितो; पण वस्तुतः आत्मा अविनाशी असल्यामुळें त्याचा मुळींच नाश होत नाहीं. तो आत्मा अहंकारासह कार्यकारणात्मक सर्व पदार्थांचा प्रकाशक असून आधार होय. इति ॥ २०.

---

# अध्याय २० वा.

## हंसोपदेश ( ११–१३ ).

सनकादय ऊचुः—

गुणेष्वाविशते चेतो गुणाश्चेतसि च प्रभो ॥
कथमन्योऽन्यसंत्यागो मुमुक्षोरतितितीर्षोः ॥ १७ ॥

**सनकादिक म्हणाले:**—हे ब्रह्मदेवा, चित्त स्वाभाविक प्रेमादिकांमुळें विषयांमध्यें प्रवेश करितें, व ते विषय वासनारूपानें चित्तांत प्रविष्ट होतात. मुमुक्षूला तर ते विषय उल्लंघून पार जावयाचें असतें; तेव्हां त्यानें त्या दोहोंची म्हणजे, चित्त व विषय यांची गांठ परस्परांपासून कशी सोडवावी ?

---

(१) "फळ काळ दोन्ही नाहीं । तरी जैसे आंबे गोड पाहीं । ऐसे विषय चित्ताचे ठायीं । रिघाले कांहीं न निघती ॥ परणिली कांता माहेरा जाये । चित्तीं रिघाली दुरी न राहे । या परी विषयो पाहें । जडला ठायें चित्तेसी ॥"—**नाथ.**

झाला नसता; पण ब्रह्मानुसंधानाच्या योगें त्यांचा वियोग संभवतो. म्हणून " मी ब्रह्मरूप आहें " असे ब्रह्माभ्यासाच्या बळेंकरून वारंवार विषयांमध्यें प्रवेश करणारें चित्त, आणि पुन्हां वासनारूपानें चित्तांत उद्भवणारे गुण, हीं दोन्ही घालवावीं. जीवाचें खरें स्वरूप ह्मटलें ह्मणजे " ब्रह्माभिन्नसच्चिदानंदलक्षणत्वात् ब्रह्मवत् " अर्थ--ब्रह्माहून अभिन्न सत्-चित्-आनंद या लक्षणांनीं युक्त ब्रह्माप्रमाणें आहे, अर्थात् ब्रह्मरूपच होय. यावर कोणी शंका घेईल कीं, ' जीवाला जागृति, स्वप्न इत्यादि अवस्था आहेत; तेव्हां त्याला निर्विकार ब्रह्मरूपता यावी कशी ? ' तर यास समाधान—जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति ह्या बुद्धीच्या तीन अवस्था होत, जीवाच्या नव्हत. कारण, त्या अवस्था सत्वादि गुणांमुळें झालेल्या असतात. जीव तर त्या तिन्हींहून विलक्षण म्हणजे, त्या तिन्ही अवस्थांनीं रहित आहे. कारण, तो त्या अवस्थांचा साक्षी निश्चित ठरलेला असतो. ह्यावर कोणी शंका घेईल कीं, ' मी जागा आहें, मीं स्वप्न पाहिलें, इत्यादि अनुभव कसा येतो ? ' तर त्यास समाधान--ज्या-

(१) " मी देह हें मानोनि चित्तें । निजरूप विसरला भावार्थें । हें मिथ्या बंधन जीवातें । सत्यत्वें त्यालें अभिमानें ॥ मिथ्या बुद्धिबळाचा खेळ । हारजित्ती (जय) निष्फळ । तरी खेळत्या अभिमान प्रबळ । तैसें देहबळ जीवासी ॥ त्या खेळाचे घोडे हत्ती । पहिले काय जीत (जीवंत) होती । मी मारिले ह्मणोनि भांडती । तेवीं जन्मपंक्ती जीवासी ॥ हें निरसावया जीवबंधन । निःशेष सांडावा देहाभिमान । अभिमान सांडितांचि जाण । मद्रूपपण सहजेंची ॥ "—**नाथ.**

(२) " सत्वाज्जागरणं विद्याद्रजसा स्वप्नमादिशेत् । प्रस्वापं तमसाजन्तोस्तुरीयं त्रिषु संततम् ॥ " **अर्थ**--सत्वगुणापासून जागृति, रजोगुणाच्या योगें स्वप्न, आणि तमोगुणानें निद्रा ह्या अवस्था प्राप्त होतात. चवथें तुरीय (ज्ञान) तिन्ही अवस्थांत भरून राहिलेलें असतें.--**श्रुति.**

च्या योगानें निर्बाधपणें प्रपंचप्रवाह चालतो, तीच संसृति होय. त्या संसृतीच्या ( बुद्धीच्या ) योगें बद्ध होऊन, तो आपल्या त्या गुणकृत वृत्ति ( जाग्रदादि अवस्था ) प्राप्त करून घेतो. म्हणून पुरुषानें त्या तिन्ही अवस्थांच्या पलीकडे असणाऱ्या तुर्येमध्यें स्थित राहून संसृति-बंध तोडून द्यावा. असें केलें असतां विषय आणि चित्त हीं परस्परांस सोडितात; तेव्हां आपोआप उपाधि नाहींशा होतात. अहंकारकृत बंध तो काय ? व तो सोडावा कसा ? तें सांगतो:—

**बंधनिवृत्तीच्या युक्ती**—मुलांनो ! जीवात्मा मूळ सच्चिदानंदरूप आहे; परंतु त्याला देहादिकांच्या संबंधानें अहंकार उत्पन्न होऊन त्यामुळें बंध प्राप्त होतो; आणि तो बंध त्याचें सच्चिदानंदरूप आच्छादून त्याच्या वास्तव स्थितीमध्यें विपर्यय आणितो. यास्तव पुरुषानें देहादिक सकल पदार्थ दुःखमय होत, असा विचार करून वैराग्य धारण करावें आणि तुरीयमध्यें ( आत्मरूपीं ) स्थित होऊन देहादिकांचा अभिमान व तन्मूलक भोगचिंता हीं सोडून द्यावीं. जोंपर्यंत पुरुषाची " द्वैतप्रपंच सत्य होय " अशी जी भेदबुद्धि, ती युक्त्यांनीं निवृत्त झाली नाहीं

( १ ) " संसरणं देवादियोनिषु भ्रमणमनयेति संसृतिः बुद्धिः तया बंधः ॥ " **अर्थ**—संसरण म्हणजे देवादि योनींत फिरणें जिच्या योगें घडतें ती संसृति, अर्थात् बुद्धि. तिच्यायोगें बंध.—**बालप्रबोधिनी**. ( २ ) " हां कां लोखंड काम घडतां । लोहाचे घाय असीचे माथां । प्रत्यक्ष दिसतां वाजतां । लोह तदात्मता संयोग ॥ तेणें अग्निसंगें वांकडें कोंडें । लोहकामाचें बंड मोडे । परी अग्नीसी घडमोड न घडे । तेणें पाडपाडें जीव येथें ॥ जेवीं अग्नीविण लोह न घडे । तेवीं आत्मसंयोगेंवीण पुढें । बुद्धि केवळ जड वेडें । कर्मक्रिया नातुडे सर्वथा ॥ "—**नाथ**. ( ३ ) " नानार्थेषु देवमनुष्यादि शरीरादिषु अहंममात्मिका धीः ॥ " **अर्थ**—विविध पदार्थांवरील म्हणजे देव, मनुष्य इत्यादि शरीरांवरील " मी " व " माझी " अशी बुद्धि.—**गीता**.

( ४ ) "गुरूपदिष्टशास्त्राभ्यासजन्याभिः युक्तिभिः॥" **अर्थ**—गुरूनें उपदेशिलेल्या शास्त्रांच्या अभ्यासापासून समजलेल्या युक्त्यांनीं.—**बालप्रबोधिनी**.

तोंपर्यंत तो, यद्यपि वेदार्थ जाणण्यामध्यें निपुण असला, तरी स्वप्नच पाहत आहे असें समजावें. कारण, त्याला आत्म्याचें यथार्थ ज्ञान नसतें. त्याची ती स्थिति म्हणजे स्वप्नांतील जागेपणा होय. आत्म्याहून अन्य देहादिक सकल पदार्थ मिथ्या असल्यामुळें, त्या पदार्थांनीं केलेला वर्णाश्रमादि भेद, त्यांचीं स्वर्गादि फलें आणि त्यांचीं हेतुभूत कर्मे हीं सर्व आत्मसाक्षात्काराला निरुपयोगी होत. दृष्टांत—स्वप्नांत दिसलेले अनेक पदार्थ त्या स्वप्नद्रष्ट्या पुरुषाला जसे उपयोगीं पडत नाहींत; तद्वत् वेदामध्यें जीं वर्णाश्रमाला उद्देशून भिन्न भिन्न कर्में सांगितलीं आहेत, तीं वेदार्थनिपुण पुरुषाला निरुपयोगी आहेत. व तीं अंतःकरणशुद्धीकरितां सांगून ठेविलीं आहेत. आतां भेदनिवृत्तीच्या युक्ती कोणत्या त्या सांगतों:—

**भेदनिवृत्तीच्या युक्ती**–सनकादिकांनो! प्रथमतः पुरुषानें असा विचार करावा कीं, ज्यांचे धर्म क्षणिक आहेत. म्हणजे ज्यांना कालवशात् एकामागून एक उत्पत्तिनाशादि विकार प्राप्त होत असतात, अशा त्या विकारी पदार्थांना जागृतीमध्यें समस्त इंद्रियांच्या योगें जो उपभोगीत असतो; तसेच स्वप्नामध्यें जागृतींत पाहिलेल्या पदार्थांसारखे मनांत उद्भवलेल्या स्वप्न पदार्थांचा जो अनुभव घेतो; आणि सुषुप्तीमध्यें जो त्या सर्वांना आटोपून टाकितो; तो तिन्हीं अवस्थांचा द्रष्टा ( पाहणारा ) होय. [1]यामुळें आत्मा एक असला पाहिजे. इंद्रियें, मन, बुद्धि जड असल्यामुळें त्यांना स्वतः त्या पदार्थांना पाहतां येत नाहीं. आत्मा चैतन्य असल्यामुळें पाहतां येतें; व त्याच्याकडून प्रेरणा मिळेल तेव्हांच त्यांची प्रवृत्ति होते. यावरूनही आत्मा एक असलाच पाहिजे. शिवाय, ज्यानें स्वप्न पाहिलें त्याची मी झोंपेंत होतों तेव्हां मला कांहीं कळत नव्हतें,

(१) "बुद्धेः साक्षितया स्थित्वा स्फुरन्नहमितीर्यते" अर्थ—आत्म्यास जेव्हां बुद्धीच्या साक्षित्वानें स्फुरण होतें, तेव्हां त्यास अहंकार म्हणतात.—श्रुति.

व तोच मी आतां जागा आहें, म्हणून सर्व कळतें अशा रीतीनें स्मृति सर्वत्र सारखी असतें; म्हणून आत्म्याच्या स्मृतिरूपानें त्या जाग्रदादि तिन्ही अवस्थांमध्यें अनुभव दिसून येतो. ह्यावरूनही आत्मा एक आहे, असें सिद्ध होतें. अशाच रीतीनें बाल्य, तारुण्य, वार्धक्य इत्यादि अवस्थांमध्येंही मीं बाल्य व तारुण्य भोगिलें; आतां वृद्धावस्था भोगीत आहें. ह्यावरून आत्म्याचा अनुभव करून येतो. म्हणून आत्मा एक होय. सनकादिक मुनीनो ! ह्या प्रकारें विचार करून तुम्ही, सत्त्वादि गुणांमुळें बुद्धीच्या ज्या जाग्रदादि तीन अवस्था उत्पन्न होतात, त्या अविवेकानें आत्म्यावर आरोपिल्या जातात; वस्तुतः नाहींत. असा आत्मस्वरूपाबद्दल निश्चय ठरवा. शिवाय अनुमानानें, सत्पुरुषांचे उपदेश व श्रुति ह्यांच्यायोगें आपला ज्ञानखड्ग तीक्ष्ण करून घ्या; आणि त्यायोगें आपली सकल संशयाची ग्रंथी ( अहंकार[1]) तोडून टाका. मग हृदयमंदिरांत राहणाऱ्या मला भजत जा. आतां तीं अनुमानादिक कशीं करावीं, तें सांगतों:—

**संशयनिवृत्तीविषयीं अनुमानादिक—मुनीनो ! "यद्दृष्टं तन्नष्टं" जें दिसतें तें नाशवंत होय, असा नियम आहे; तेव्हां हें दृश्य जग केवळ मनाचा खेळ असून नाशवंत आहे. दृष्टांत—जसें पेटलेली कोलती गरगरा फिरविली म्हणजे विस्तवाचें लाल कडें गोलाकार दिसतें;**

---

( १ ) " हृदयग्रन्थिरस्तित्वे छेदने ब्रह्मचक्रकम् । संशये समनुप्राप्ते ब्रह्मनिश्चयमाप्नुयात ॥ " अर्थ—अहंकाराची गांठ ब्रह्मसाक्षात्कारानें छेदिली जाते. जर त्याविषयीं संशय उत्पन्न झाल्यास ब्रह्माविषयीं पूर्ण निश्चय करावा, म्हणजे संशयग्रन्थी तुटून जाते.—श्रुति.

( २ ) " भिद्यते हृदयग्रन्थिश्छिद्यन्ते सर्वसंशयाः । क्षीयन्ते चास्य कर्माणि तस्मिन्दृष्टे परावरे ॥ " अर्थ -परावर असा जो आत्मा त्याचा साक्षात्कार झाला असतां हृदयग्रन्थी तुटते मग सर्व संशय दूर होऊन त्याच्या बन्धाकारक सर्व कर्मांचा क्षय ( नाश ) होतो.—श्रुति.

तद्वत् अति चंचल असें हें जग भ्रमामुळें स्थिर दिसतें, म्हणून हें जग मिथ्या आहे असें पाहावें. "भ्रम झाला तरी आधार खरा असल्याशिवाय होत नाहीं," ह्या नियमाप्रमाणें जगाचा आधार खरा आहे. आत्मरूप ज्ञान एक असतांना तें जगाच्या रूपानें विविध भासत असतें; म्हणून गुणांच्या परिणामांनीं इंद्रियें, विषय, अधिष्ठात्री देवता असा जो त्रिविध भेद रचिलेला आहे, तो केवळ माया होय. एवढ्यासाठीं पुरुषानें त्या दृश्य पदार्थांवरून दृष्टि परतवून आत्मसुखाचा अनुभव घेत रहावें, व तीच स्थिति निश्चल राहण्यासाठीं विषयेच्छा सोडून मनाचे, वाणीचे किंवा शरीराचे कसलेही व्यापार न करितां स्वस्थ बसावें. ह्यावर कोणी शंका घेईल कीं, 'देह आहे तोपर्यंत सर्वथा द्वैतदृष्टि निवृत्त होणें संभवत नाहीं, अर्थात् पुन्हां संसार पाठीस आहेच.' तर ह्यास समाधान— आहारादि आवश्यक पदार्थांपुरता क्वचित् प्रसंगीं यद्यपि प्रपंच दिसून आला, तरी पूर्वी ज्ञानानें मिथ्या मानून त्याचा त्याग केलेला असल्यामुळें आत्मज्ञानी पुरुषाला पुन्हां तो, मोह घालूं शकत नाहीं; पण देह पडेपर्यंत संसाराच्या संस्कारामुळें भास हा व्हावयाचाच. तथापि मद्याच्या मदानें धुंद झालेल्या मनुष्याला जसें आंगावर पांघरलेल्या वस्त्राचें भान नसतें; तद्वत् सिद्ध पुरुषांना नश्वर देह आसनादिकांवर बसला आहे, किंवा त्यांवरून उठला आहे, अथवा दैवयोगानें तेथून कोठें निघून

( १ ) " चित्तं कारणमर्थानां तस्मिन्सति जगत्त्रयम् । तस्मिन्क्षीणे जगत्क्षीण तच्चिकित्स्यं प्रयत्नतः ॥ " **अर्थ**—सर्व हेतूंचें कारण चित्त आहे, व तें आहे म्हणून स्वर्ग, मृत्यु, पाताळ ह्या तिन्ही लोकांचें अस्तित्व आहे तें नाहींसें झाल्याबरोबर जगही नाहींसें होतें; म्हणून मोठ्या सावधगिरीनें त्या चित्ताला ओळखून असावें.—श्रुति.

( २ ) " दंड काढोनि नेलिया कुंभारें । पहिले भवंडी चक्र फिरे । तेवीं प्रारब्धाचेनि संस्कारें । कर्मानुसारें देह वर्ते ॥ कुलालचक्रीं बसली माशी । न हालतां भोंवे चक्रासरसी । कोटी फेरे भोवती तिसी । तेवीं मुक्तासी देहकर्में ॥ "—नाथ.

दूर गेला आहे, किंवा पुन्हां दैववशात् परत जागयावर आला आहे, त्याचें अनुसंधान नसतें. ह्यावर तुम्हांला शंका येईल कीं, 'देहाची नित्य निगा करीत असलें तरी देखील तो मृत्युमुखीं पडलेला असतो; मग त्याच्याकडे मुळीं लक्षच न दिलें तर तो तात्काल पडेलना.' तर याचें उत्तर सांगतों. देह प्रारब्धकर्माच्या आधीन असल्यामुळें स्वतःचें उत्पादक कर्म जोंपर्यंत असतें, तोंपर्यंत प्राणेंद्रियासहवर्तमान दम धरून (जिवंत) असतोच. ज्याला समाधिपर्यंत योग सिद्ध झाला, व आत्मवस्तूचा साक्षात्कार घडला, तो पुरुष तर त्या स्वप्नतुल्य प्रपंचासहित देहावर कदापि आसक्त व्हावयाचा नाहीं. ब्राह्मणहो! सांख्य (तत्त्वविचार) योग (चित्तवृत्तींची निवृत्ति व चित्तैकाग्रतेची प्राप्ति) ह्या शास्त्रांचें रहस्य असें हें तत्त्व मी तुम्हांला सांगितलें. ही गोष्ट तुम्ही ध्यानांत आणा कीं, तुम्हांला धर्माचा उपदेश करण्यासाठीं मी विष्णु येथें आलेला आहें.

उद्धवा! अशा रीतीनें मीं त्या सनकादि मुनींचे संशय तोडून टाकिले; तेव्हां त्यांनीं परमभक्तिपुरःसर सन्मानून स्तोत्रांच्या योगें माझी स्तुति केली. त्या महर्षींनीं उत्तम प्रकारें पूजा व स्तुति केली; तेव्हां मीं ब्रह्मदेवाच्या समक्ष तेथून परत गेलों! इति। २०.

---

(१) "जैसा कां मदिरेचें घोडें । जेणें आणिलें निजधामा रोकडें । तें आहे कां गेलें कोणीकडे । हें स्मरेना पुढें तो जैसा ॥ जो कां दैवयोगें पालखी चढे । तो पूर्वील तुटके सोवडे । आहेत कीं गेले कोणीकडे । हें स्मरेना पुढें हरिसें ॥"—**नाथ.** तसेंच "अन्धवज्जडवच्चापि मूकवत् महीं चरेत् ॥" **अर्थ**—**आत्मसाक्षात्कार झालेला पुरुष डोळे असून आंधळ्याप्रमाणें, बोलका असून मुक्या प्रमाणें व चैतन्ययुक्त असून जडाप्रमाणें सर्व पृथ्वीवर हिंडत असतो.—श्रुति.**

# अध्याय २१ वा.

## श्रीकृष्णोपदेश ( ११-७ ).

श्रीभगवानुवाचः—

त्वं तु सर्वं परित्यज्य स्नेहं स्वजनबंधुषु ॥
मय्यावेश्य मनः सम्यक् समदृग्विचरस्व गाम् ॥ ६ ॥

**भगवान् श्रीकृष्ण ह्मणालेः**—अा उद्धवा! पूर्वी मीं सनकादिक मुनींना जो कांहीं उपदेश केला होता, तोच चांगला समजण्याकरितां, आतां तुला त्याचेंच स्पष्टीकारण सांगतों. एकाग्र चित्तानें श्रवण करः-

उद्धवा ! आतां तूं आप्तजन, बंधुवर्ग यांच्यावरील सर्व स्नेह सोडून देऊन मन मजकडे निश्चल लाव; आणि सर्वत्र समदृष्टि ठेवून ह्या भूतलावर संचार करीत जा. तूं ह्मणशील कीं, ' ह्या लोकामध्यें कोणाच्या अंगीं गुण अधिक, कोणामध्यें दोष अधिक, असा विषमपणा भरलेला आहे; तेव्हां सर्वत्र समदृष्टि ठेवावी कशी ? ' तर यास उत्तर असेंः-मनाला ज्याचें ज्ञान होतें, वाणीनें जें बोलून दाखवितां येतें, नेत्रांनीं जें पाहतां येतें, कानांनीं जें ऐकतां येतें, नाकानें जें हुंगतां येतें, व त्वचेनें जें स्पर्श करितां येतें, ते सर्व विषय मिथ्या व काल्पनिक होत. म्हणून ते नाशवंत आहेत असें समज. अशा रीतीनें सर्वांची योग्यता सारखी झाली कीं, विषमपणा कोठेंच दिसण्याला आधार नाहींसा होतो;

( १ ) घरदारावर प्रेम ठेवून नुसतें शरीरानें बाहेर पडणें कांहीं उपयोगी नाहीं. उलट तें अधिक त्रासदायक व अनर्थावह होतें. -**नाथांचा अभिप्राय.**

( २ ) " जैसी स्वप्नींची राणीव ( राज्य )। केवळ भ्रमचि जाणाव । तैसेंचि जाण हें सर्व । भव वैभव विलास ॥ "—**नाथ.**

मनुष्याचें मन स्थिर नसलें. म्हणजे त्याला भेदविषयक भ्रम उत्पन्न होतो; आणि तो भ्रमच गुणांचा व दोषांचा आधार होय. ह्यावर कोणी ह्मणेल कीं, 'वेदांनींच विधिनिषेध सांगून देऊन, तद्द्वारा भेदाची सत्यता सिद्ध केली आहे; आह्मीं नवीन कल्पिलें असें नाहीं.' तर त्यांना उत्तरः—वेदामध्यें कर्म ( विहित ), अकर्म ( विहित कर्म न करणें ) आणि विकर्म ( निषिद्ध ) हा जो भेद सांगितला आहे, तो ज्याच्या बुद्धीमध्यें भ्रमाचे विलासभूत गुणदोष खिळले असतील, त्या अज्ञानी पुरुषालाच उद्देशून आहे. ज्याचें चित्त शुद्ध झालें आहे, त्या पुरुषाकरितां नव्हे. ह्मणून उद्धवा, तूं आपला देहेंद्रियसमुदाय आंवरून धर. चित्त स्वाधीन ठेव. आणि हें सर्व पसरलेलें जग आत्म्याच्या आधारानें स्थित आहे, असें पहात जा; म्हणजे तुला सर्वत्र समदृष्टि ठेवतां येईल. ह्यावर तूं ह्मणशील कीं, 'माझ्या ( उद्धवाच्या ) साडेतीन हात शरीरांत राहणाऱ्या लहानशा आत्म्यावर एवढें मोठें जग राहतें असें कसें पहावें?' ह्यास उत्तरः—तो जीवात्मा सकल चराचरांचा नियामक जो मी तो मत्स्वरूप ( आत्मस्वरूप ) आहे, अशी भावना ठेव. आत्मा शरीरानें आच्छादित व समर्याद आहे असें समजूं नकोस; तो सर्वव्यापी ब्रह्मरूप आहे असें पहा. तुला वाटेल कीं, अशा प्रकारें चित्ताचें नियमन केलें, व कर्में करीत गेलें नाहीं, तर देव विघ्नें करतील अशी शंकाही नको. कारण, तुला वेदाचें निश्चित तात्पर्य कळलें, व त्याप्रमाणें अनुभव मिळून तुझें चित्त आत्मानुभवानें संतोष पावलें, ह्मणजे तूं सर्व प्राण्यांचा आत्मरूप होशील; व मग तुला को-

( १ ) "यस्य एवं भ्रमः स एव पुमान् गुणदोषभाक् पुण्यपापसुखदुःखादिमान् भवति ॥" अर्थ—ज्याला तसा भ्रम पडला तोच पुरुष गुणदोष भोगणारा ह्मणजे पुण्यपाप किंवा सुखदुःख भोगणारा होतो.—बालप्रबोधिनी.

( २ ) 'ब्रह्मादिकांसी जो प्रासी । त्या काळाचा तूं आत्मा होसी । पाठी थापटून हर्षाकर्षी । उद्धवासी सांगत ॥"—भाष्य.

णाकडूनही विघ्नांची बाधा होणार नाहीं. ह्यावरून कोणी ह्मणेल कीं, ' ज्याला ज्ञान झालें, त्याच्या हातून भलतींच आचरणें घडत असतील.' तर त्यास उत्तर:—आत्मानुभवी पुरुष विधि आणि निषेध ह्यांच्या चक्रांतून पलीकडे असतो, तरी तो पूर्व संस्कारानुरोधानें निषिद्ध कर्मे करण्यापासून निवृत्त होतो; व त्यांच्यापासून दोष घडले असेंहि त्याच्या बुद्धीला वाटत नसतें. तो प्रायः विहित कर्मांचेंच अनुष्ठान करीत असतो; पण तो विहितकर्म केलें असतां आपल्याला स्वर्गादि फलें मिळतील, अशा समजुतीनें तें करितो असें नव्हे; तर जसें लहान मूल एकादेवेळीं हात, पाय हलवणें, रडणें इत्यादि कांहीं तरी करितें, एकादेवेळीं कांहीं-च करीत नाहीं; तद्वत् ज्ञानी पुरुषाचीं कर्मे संकल्पविकल्पावांचून साह-जीकपणें चाललेलीं असतात. अशा प्रकारें जो पुरुष सकल प्राण्यांचा मित्र व शांत असा झाला, तसेंच ज्याला वेदांचें तात्पर्य कळून तदनुरूप आत्मानुभव निश्चयानें मिळाला, आणि जो सर्व विश्व मद्रूप (ईश्वररूप) होय असें पाहूं लागला, त्याला पुन्हां हा दुःखमय संसार भोगावा लागत नाहीं, अर्थात् तो त्यापासून अलिप्त असतो.

उद्धव ह्मणाला:–हे योगेश्वरा! त्वां माझ्या आत्यंतिक कल्याणासाठीं मला संन्यासयोगाचा उपदेश केला खरा; पण मी तर अत्यंत मूढ आहे कारण, माझी बुद्धि तुझ्यामायेनें रचिलेल्या स्त्रीपुत्र परिवारासहित "देह हाच मी" आणि "हीं स्त्रिपुत्रादिक माझी" अशा अभिमानानें

(१) " निंदिता मार्गे बैसला वाघु । अथवा पुढें आला स्वर्गभोगु । त्यासि नाहीं रागविरागु । तैसा लागु ज्ञात्याचा ॥ "—**नाथ.**

(२) " दाटूनि निश्चळ होणें । दांत चावूनि साहणें । ते शांति ऐसें कोण ह्मणे । आक्रोशपणें साहतसे ॥ शांति ह्मणजे ते ऐशी । सागरीं अक्षोभ्यता जैसी । चढ वो-हट नाहीं तिशी । सर्व देशीं सर्वदा ॥ नाना सरितांचे खळाळ । आणूनि घालितीं समळ जळ । तो तिळभरी नव्हे डहुळ । अति निर्मळ निजांगें ॥ "—**नाथ.**

पूर्णपणें झालेली असते. ह्यासाठीं ईश्वरा, मी तुला सर्वभावें शरण आलों आहे, तर मला अनायासें संपूर्ण साधितां येईल असा उपाय सांग.

**श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा! जगामध्यें प्रायः लोकतत्त्वाचें सूक्ष्म दृष्टीनें परीक्षण करणारे पुरुष आपल्या विवेक बुद्धीच्या साह्यानें सुमार्ग कोणता? व कुमार्ग कोणता? ह्याचा निश्चय ठरवितात; आणि ते दुष्ट विषयवासनांतून आपल्या योगेंच ( विवेक बुद्धीच्या साह्यानेंच ) आपला उद्धार करून घेतात; पण पश्वादि तिर्यग्योनींतील प्राण्यालाही अमूक गोष्टींत आपलें हित आहे, व अमुक केलें असतां अहित आहे, असा उपदेश ज्याचा त्याला आपल्याकडूनच मिळतो. ह्यास्तव आपला गुरु आपणच बनावें. हेंच श्रेयस्कर होय. कारण, मनुष्यामध्यें सदसद्विवेचनशक्ति उत्तम प्रकारें असल्यामुळें प्रत्यक्ष व अनुमान ह्या दोन प्रमाणांच्या योगें उत्तम पुरुषार्थ साध्य करून घेतां येतो. उद्धवा, नरतनूमध्यें ज्ञानशक्ति कमी आहे असें समजूं नकोस. कारण, सांख्यशास्त्रांत, योगशास्त्रांत निष्णात असे धैर्यसंपन्न लोक, मी ( आत्मा ) मनुष्ययोनीमध्यें सकल शक्तींनीं भरलेला असल्यामुळें विशेष प्रकट असतो असें पाहतात; ह्मणून मला मनुष्यदेह अधिक आवडतो. एक, दोन,

(१) "सदुपदेशेन रक्षितावमस्य स्यामि ॥" **अर्थ**—तूंच सदुपदेशाच्या योगें रक्षण करणारा आहेस असा निश्चय करून राहिलों.—**बालप्रबोधिनी.**

(२) "बुद्धितत्त्वेन धीदोषशून्येनैकान्तवासिना। दीर्घं प्रणवमुच्चार्य मनोराज्यं विजीयते ॥ जिते तस्मिन्वृत्तिशून्यं मनस्तिष्ठति मूकवत् । एतत्पदं वसिष्ठेन रामाय बहुधेरितं ॥" **अर्थ**—वसिष्ठ मुनींनीं रामास उपदेश केला कीं बुद्धि तत्त्वाचा पूर्ण विचार करून कामादि षड्रिपूंना अंतःकरणांतून पार काढून टाकावें व मग एकांत स्थलीं बसून प्रणवाचा ( ॐ या अक्षराचा ) उच्च स्वरानें उच्चार केला असतां ध्वनी मूर्धींत भरून त्या योगें मनाचा जय होतो. याप्रमाणें जय झाल्यावर सकल वृत्ति नाहींशा होतात. वृत्तिशून्य झालेलें मन मुक्याप्रमाणें शांत राहतें.—**पंचदशी.**

यांचा संवाद होय. यदुराजाला धर्माचें रहस्य पूर्णपणें समजत असे. एके प्रसंगीं वयानें तरुण असा कोणी एक अवधूत ब्राह्मण कशाची काळजी किंवा कोणाची भीति न बाळगतां स्वच्छंदानें पृथ्वीपर्यटण करीत असलेला, त्या राजाच्या दृष्टीस पडला. त्या धर्मशील राजानें ब्राह्मणाच्या लक्षणावरून हा कोणी ब्रह्मवेत्ता असावा, असें तत्काळ ओळखिलें; व त्याच्या मुखानें कांहीं आत्मज्ञानाच्या गोष्टी ऐकाव्या अशा इच्छेनें त्या ब्राह्मणाला प्रश्न केला, तो असा:—

यदुराजा ह्मणाला:—हे ब्रह्मन्, आपण कोणताही व्यवसाय करीत नाहीं असें असतांना आपल्याला ही अति निपुण बुद्धि कशी प्राप्त झाली? व आपण महाविद्वान दिसत असतांही एखाद्या अज्ञान बालकाप्रमाणें ह्या पृथ्वीच्या पृष्ठभागीं संचार करीत असतां, हें पाहून मला मोठें आश्चर्य वाटतें. कारण, पृथ्वीच्या पाठीवर जिकडे तिकडे हा प्रकार दिसून येतो कीं, धर्म, अर्थ, काम व आत्मविचार ह्यां साधण्याकडे मनुष्य प्रायः आपण होऊन प्रवृत्त होत असतात; आणि त्यांची ती प्रवृत्ति तरी शारीरिक व मानसिक सुखाकरितां आणि धनादिक मिळविण्याकरितांच घडलेली असते. व आपण तर कोणतेंही कर्म करीत

(१) "प्रायशा ये लोकां लोक। धर्मअर्थकामकामुक। येचि विद्या ज्ञान देख। आवश्यक करिताति॥ आह्मी स्वधर्म करितों ह्मणतां। स्नानसंध्येची कीर्ति मिरवितां। शेवटीं गायत्रीचें फळ देतां। अर्थप्राप्तीलागोनी॥ वेदोक्त आह्मी करितों याग। संस्थापितों वेदमार्ग। शेवटीं तो करितां जीविकायोग। स्वर्गभोग वांछिती॥ एक ह्मणती आह्मी स्वकर्मक। कुशमृत्तिका नाशिती उदक। समयीं आलिया याचक। ते वेळीं भीक न घालिती॥ दांभिक वाढवावया स्फीती। वैष्णवदीक्षा अवलंबिती। देवपूजा झळफळांत दाविती। शंख लाविती दो हातीं॥ आयुष्यदानी पुण्य पुरुष। आह्मी चिकित्सक अहिंस। स्थावरजंगम जीव अशेष। मारूनिया यश मिरविती॥ यश वाढवावयाचें कारण।

नाहीं, कसलीही इच्छा धरीत नाहीं, तर एखाद्या अज्ञान, मद्य पिऊन धुंद झालेल्या, किंवा पिशाचानें झपाटलेल्या मनुष्यासारखे कां वागत असतां बरें? आपल्याला शक्ति, ज्ञान, निपुणता, सौंदर्य आणि मधुर भाषण ह्यांपैकीं कोणताही गुण अनुकूल नसल्यामुळें उदासीन राहणें भाग पडतें, असें ह्मणावें तर तसेंही नाहीं. आपण सशक्त, ज्ञानसंपन्न, कुशल, सुंदर व अमृताप्रमाणें मधुर भाषण करणारे आहां. जगांतील सर्व लोक काम क्रोध इत्यादिकांच्या वणव्यांत भाजून निघत असतां. आपण मात्र गंगोदकांत उभा राहिलेल्या हत्तीप्रमाणें शांत व स्वस्थ असून आनंदांत असतां व अगदीं ताप पावत नाहीं! ब्रह्मन्, आपल्या अंतरीं इतका आनंद असण्याचें कारण काय तें आह्मांला निवेदन करावें. आमची समज तर असा आहे कीं, संसारांतील सुखें भोगावयास मिळालीं तरच आनंद प्राप्त होतो; आणि आपण तर कशाचाही संबंध न ठेवितां एकाकी संचरत असतां. अर्थात् भोगैश्वर्यें सर्वथा सोडून दिलीं आहेत; मग आपल्याला आनंद मिळतो तरी कोठून?

अवधूत ह्मणाले:—यदुराजा, माझी भोगैश्वर्यादिक विषयवासना नष्ट होण्याचें व नित्यानंदांत निमग्न असण्याचें कारण म्हटलें ह्मणजे मी आपल्या बुद्धीनेंच वरिलेले असे माझे बहुत गुरू आहेत हें होय.

---

मागील पृष्ठावरून पुढें चालू.

तुळापुरुष करितां दान । देह सुवर्णेंच परिपूर्ण । मन त्यागमान ओसरती ॥ पाय परमार्थाचिया वाटा । कोणी वेचीना करटा । भूल केली पडली सुटा । स्वार्थ शंकरा विसरले ॥ पूर्वी अदृष्ट नाहीं प्रासी । ते श्रीकामा उपास्ती करिती । श्रियेचा स्वामी श्रीपती । त्यातें न भजती अभाग्य ॥ लक्ष्मी विश्वगुरु हरीची पत्नी । तीतें जो तो राखे अभिलाषूनी । नेंदिती हरीची हरिलागोनी । त्यातें पतनी हरि पचवी ॥ रोगल्यागें आयुष्य मागती । यालागीं सविता उपासिती । देह नश्वर हें नाठवे चित्तीं । पडली भ्रांति निजपदा ॥"—नाथ.

त्यांपासून शिक्षण घेऊन मी आपल्या स्वरूपांत निमग्न होत्साता या भूतलावर पर्यटण करीत असतों. •आतां ते माझे गुरू कोणते ते सांगतों:—(१) पृथ्वी, (२) वायु, (३). आकाश, (४) उदक, (५) अग्नि, (६) चंद्रमा, (७) सूर्य. (८) कपोत. (९) अजगर. (१०) समुद्र; (११) पतंग, (१२) मधुकर, (१३) हत्ती. (१४) मधु हरण करणारा, (१५) हरिण. (१६) मत्स्य, (१७) पिंगला वेश्या, (१८) कुरर पक्षी, (१९) लहान मूल, (२०) कुमारी, (२१) बाण तयार करणारा कारागीर, (२२) सर्प. (२३) कोळी नामक किडा आणि (२४) कुंभारीण माशी. राजा, ह्या चोवीस गुरूंच्या आचरणावरून मी बहुविध गोष्टींचें ज्ञान मिळविलें आहे. त्यांजकडून प्राप्त झालेल्या ज्ञानाप्रमाणें मी आचरण करीत असतो, म्हणून माझी विषयवासना अत्यंत निवृत्त होऊन मला अखंड सच्चिदानंद सुख प्राप्त झालें. इति । २२.

---

# अध्याय २३ वा.

## अवधूताचें ज्ञानोपदेशग्रहण ( ११. ७ ).

ब्राह्मण उवाच—

**यतो यदनुशिक्षामि यथा वा नाहुषात्मज ॥**
**तत्तथा पुरुषव्याघ्र निबोध कथयामि ते ॥ ३२ ॥**

**अवधूत म्हणाले:**—बा मनुजश्रेष्ठा ययातीपुत्रा, आतां मी कोणापासून काय व कसकसें शिकलों, तें तसतसें तुला सांगतों. एकाग्र चित्तानें श्रवण कर:—

**पृथ्वीपासून शिकलेली गोष्ट:**—राजा, दैवाच्या आधीन वागणाऱ्या प्राण्यांनीं कितीही गांजिलें किंवा छळिलें तरी सहन करावें, व

आपला मार्ग सोडूं नये. जे कांहीं घडतात ते सर्व आपल्या दैवयोगानेंच. ह्यांत त्या प्राण्याकडे मुळींच दोष नाहीं हें लक्ष्यांत धरावें. पहा—प्राणी पृथ्वीला किती तुडवितात, व कसे फाळितात ? तरी तिला कधीं विषाद उत्पन्न होऊन, ती त्या गांजणाऱ्यांच्या नाशाकरितां उद्युक्त होत नाहीं; आणि प्राणिमात्रानें पृथ्वीशीं कसेंही वर्तन केलें, तरी ती प्राण्याविषयींची उपकारबुद्धि कधींही सोडीत नाहीं; तद्वत् विचारसंपन्न पुरुषानें सर्व भूतांविषयीं अभेदबुद्धि धारण करून नित्य क्षमा करण्यामध्यें निमग्न असावें.

[१] पर्वत आणि वृक्ष :—पर्वत आणि वृक्ष हे पृथ्वीचेच विशेष विकार आहेत. ह्यांपासून कोणते गुण घेतले, ते सांगतो:—आपला जन्म केवळ दुसऱ्यांच्या उपजीविकेसाठीं आहे, ही गोष्ट पर्वतापासून शिकावी; आणि त्यानें वृक्षाचा शिष्य बनून आपला देह केवळ पराधीन आहे, अशा ह्या तत्त्वाचा उपदेश घ्यावा. पहा—पर्वत आपल्या पाठीवर उत्पन्न होणारे, झाडझुडपें गवत, झरे इत्यादि पदार्थ परोपकाराच्या कारणीं लावीत असतो; आणि वृक्ष तर आपलें शरीर ह्मणजे खांद्या, खोड वगैरे सुद्धां लोकांनीं तोडून नेले तरी नेऊं देतो, तद्वत् नित्य आपले व्यापार परोपकारासाठीं घडत असावें. अशी साधूची वृत्ति असावी.

(१) "येथ पृथ्वी भूतीं पूजिली । ना नरी विष्ठमूत्रीं गांजिली । हर्षोवषादा नाहीं आली । निश्चळ ठेली निजक्षांती ॥ पृथ्वी दाहे करूनि जाळिली । नांगर घालूनि फाळिली । लातवरी तुडविली । तोडिली साडिली पैं भूतीं ॥ तो अपराधु न मानूनि क्षिती । सर्वांचि भूतांतें प्रसन्न होती । तेथींचि पिकवूनि नाना संपत्ति । तृप्ति देती भूतांतें ॥"—नाथ,

(२) "ग्रीष्माअंतीं सर्व सरे । परी तो देतां मागें न सरे । सर्वेचि भगवंतें कांजे पुरे । वर्षोनि जलधरें समृद्धि ॥ जंव जंव उल्हासें दाता देतु । तंव तंव पुरवी जगन्नाथु । विकल्प न धरितां मनांतु । देतां अच्युतु अनिवार ॥ "—नाथ.

**वायूपासून शिकलेली गोष्ट.**—वायु दोन प्रकारचा आहे. एक देहांत संचार करणारा ह्मणजे प्राणवायु व दुसरा अंतरिक्षांत संचार करणारा बाह्य वायु. ह्यांपैकीं प्राणवायूपासून कोणता उपदेश घ्यावयाचा तो ऐकः—

[१] **प्राणवायुः**—देहनिर्वाह होऊन मनाची सुस्थिति रहावी, आणि त्यायोगें ब्रह्मचिंतन उत्तम प्रकारें चालवितां यावें, एवढ्याकरितांच आहारादि पदार्थ ग्रहण करावे. प्राणांच्या रक्षणाकरितां अन्न सेवन करण्याची आवश्यकता आहे खरी; परंतु षड्रस अन्न सेवन करण्याची हाव बाळगूं नये. जाडें भरडें अन्न ग्रहण केलें असतांही देहाची स्थिति चांगली राहूं शकते; ह्यास्तव जिव्हेच्या तृप्तीकडे मुळींच लक्ष न देतां केवळ उदरभरणाकडे दृष्टि ठेवून सर्वदां संतोषवृत्तीनें वागावें.

[२] **बाह्य वायुः**— वायु हा वनांत, वणव्यांत, समुद्रावर, सुगंधि पुष्पांवर अथवा दुर्गंधि स्थलीं असा सर्वत्र संचार करितो; पण तो अमुक एक स्थलीं आसक्त होऊन [१]राहिला आहे असें कधींही घडत नाहीं. त्याला सर्व स्थलें सारखींच वाटतात. तद्वत् योगी पुरुषानें विषयादिकांमध्यें प्रवेश केला तरी त्यांत आसक्त होऊन राहूं नये. आज एखाद्या राजमंदिरांत राहवयास सांपडलें व उद्यां एखाद्या पर्णकुटींत रहाण्याची पाळी आली, किंवा कधीं मिष्टान्न मिळालें अथवा केव्हां तुकड्यावरच निर्वाह करावा लागला, तरी त्याच्या मनास हर्ष व विषाद वाटूं नये. अमुक वस्तु प्रिय व अमुक अप्रिय अशा विचाराचा त्याचे ठायीं पूर्ण अभाव असला पाहिजे. [२]कालानुसार जी जी स्थिति प्राप्त

(१) " क्षुधेचिया तोंडा । मिळो कोंडा अथवा मांडा । परी रसनेचा पांगडा । न धरी धडपुडा तयासि ॥ "—**नाथ**

(२) ब्रह्मादिकांचा देह पाळूं । कीं सूकराचा देह टाळूं । ऐसा न मनीच विटाळू । प्राण कृपाळू समभावें ॥ तैसें योगियाचें कर्म । न धरी उंचनीच मनोधर्म । कदा न देखे अधमोत्तम । भावना सम समभावें ॥ "—**नाथ.**

होईल, त्या त्या स्थितीनें त्यास एकसारखें समाधान वाटलें पाहिजे. ही गोष्ट बाह्य वायूपासून घेण्यासारखी आहे.

(३) आकाशापासून शिकलेली गोष्टः—राजा, आकाश सर्वत्र भरून राहिलें असतांही घटादि पदार्थांशी लिप्त होत नाहीं; तद्वत् आत्मा स्थावर जंगम सर्व पदार्थांमध्यें समन्वयानें सर्वत्र व्यापून भरून राहिलेला आहे; म्हणून देहाच्या अंतरीं रहात असतांही आत्मा देहादिकांशी संयुक्त नाहीं. आणि जसा वायूनें इतस्ततः चाळविलेल्या मेघांची फळी, धूळ इत्यादि पदार्थांचा आकाशाशीं स्पर्श घडत नाहीं; तद्वत् अंतर्यामी आत्म्याला तेज, उदक, पृथ्वी एतद्रूपी अंश काळानें निर्मिलेले जे देहादि विकारी गुण यांचा संबंध नाहीं; म्हणून मुनीनें आत्मा ब्रह्मरूप आहे अशी भावना करावी.

(४) उदकापासून शिकलेली गोष्टः—जसें उदक स्वभावतः स्वच्छ व स्निग्ध असून मधुर आणि पदार्थांना शुद्धता मिळविण्याचें स्थान असतें; तद्वत् मुनीनें आपलें चित्त रागद्वेषरहित राखावें, प्राणिमात्रांशी प्रेमळपणानें वागावें, त्यांशीं गोड बोलावें आणि मनुष्यांना शुद्धि मिळविण्यास आधार होऊन रहावें. मुनी आपलें दर्शन, स्पर्शन व वर्णन करणाऱ्या जनांना पवित्र करितो.

(१) "तेंवि गगनगुणाचा । आकाश देहीं असतांचा । तेंवि निरंतरा आकाशाचा । तो निर्लेप योगियाचा पाहिजे ॥" नाथ.

(२) "जळ सांपडल्या काढी मळ । योगिया सबाह्य करी निर्मळ । उदक सुखी करी एक वेळ । योगिया सर्वकाळ सुखदाता ॥ उदकाचें सुख तें किती । सवेंचि क्षणा तृषित होती । योगिया दे स्वानंद तृप्ति । सुखासि विकृति पैं नाहीं ॥" नाथ.

(३) "सांडूनि भगवंताचें कीर्तन । केल्या भक्ताचें नामस्मरण । केवीं तुटे भवबंधन । ऐसें न म्हणें सर्वथा ॥ देवासि पूर्वी नामचि नाहीं । त्यासि भक्तीं प्रतिष्ठूनि पाहीं । नामरूपादि सर्वही । नाना विलासींहि अर्पिले ॥" —नाथ.

(५) **अग्नीपासून शिकलेले उपदेशः**--अग्नीपासून सात गुण ग्रहण केले . ते हेः--[१] तेजस्विता, [२] दिव्यकांति, [३] मनोवशता, [४] उदासीनता, [५] समदृष्टि, [६] उपकारबुद्धि व [७] निरुपाधित्व. हे सात गुण होत. त्यांचें सविस्तर वर्णन सांगतोंः--

[१] **तेजस्विताः**— अग्नीचें तेज जसें प्रखर असतें; तद्वत् स्वतःच्या ज्ञानातिशयामुळें योग्याचें तेज प्रकाशमान असतें.

[२] **दिव्य कांतिः**---अग्नीच्या अंगीं जशी दिव्य कांति असते; तद्वत् तपस्व्याच्या अंगींही तपश्चर्येमुळें विशेष कांति असते.

[३] **मनोवशताः**--अग्नीचें तेज दुःसह असल्यामुळें हस्तादिकानें त्यास जसें धरून ठेवितां येत नाहीं; तद्वत् विषयसुखाचा अभिलाष दाखवून योग्याचें मन स्वाधीन करून घेतां येत नाहीं.

[४] **उदासीनताः**--अग्नि जसे केवळ आपल्या उदरपूर्तीपलीकडे संग्रहादिक करीत नाहीं; तद्वत् योगीही केवळ जें मिळेल तें भक्षण करून देहनिर्वाहापलीकडे इंद्रियतृप्तीची लालसा धरीत नाहीं.

[५] **समदृष्टिः**—अग्नि जसा कांहींही मिळालें तरी त्याचा समदृष्टीनें स्वीकार करतो; तद्वत् योगीही आवडनिवड न धरितां मिळेल तो पदार्थ समदृष्टीनें भक्षण करितो.

[६] **उपकारबुद्धिः**--अग्नि कोठें स्पष्ट दिसतो, व कोठें स्पष्ट दिसत नाहीं, आणि तो आपल्या उदरतृप्तीकरितां मुळींच प्रयत्न करीत नाहीं; पण जेव्हां जेव्हां लोक त्याची उपासना करून त्यास हविर्भाग अर्पण करितात, तेव्हां तो ते हविर्भाग ग्रहण करून, उपासकांचीं भूतभविष्य पातकें भस्म करून टाकितो; तद्वत् योग्यानें एखाद्या प्रदेशांत गुप्त असावें, व कोठें प्रकट असावें, परमार्थमार्गेच्छु जनांचें उपास्यदैवत व्हावें, आणि त्यानें इंद्रियतृप्तीची इच्छा न धरितां जो कोणी

जें कांहीं देईल, तें भक्षून दात्यांचीं प्राचीन व भविष्य काळीं घडणारीं पातकें दग्ध करीत असावें.

[७] निरुपाधित्व:—अग्नि ज्या काष्ठामध्यें प्रविष्ट होतो, त्या काष्ठाच्या आकारासारखा लांब, रुंद, वाटोळा, त्रिकोनी, चौकोनी वगैरे दिसतो; तद्वत् आत्मा सर्वत्र व्यापक असूनही स्वतःच्या मायेनें निर्मिलेल्या उच्च नीच भूतांमध्यें ( देव, मनुष्य, तिर्यक् इत्यादि योनींत ) प्रविष्ट झाला असतां, त्या त्या भूतांच्या रूपासारखा प्रतीतीला येतो; पण वस्तुतः त्याला उच्चनीचता मुळींच नाहींत, आणि अग्नीपासून उत्पन्न झालेल्या ठिणग्या अग्नीहून भिन्न नाहींत; तद्वत् ब्रह्मापासून उत्पन्न झालेले जीव ब्रह्माभिन्न होत. इति । २३.

---

# अध्याय २४ वा.

## अवधूताचें ज्ञानोपदेशग्रहण. ( ११—७. )

ब्राह्मण उवाचः—

यतो यदनुशिक्षामि यथा वा नाहुषात्मज ॥
तत्तथा पुरुषव्याघ्र निबोध कथयामि ते ॥

अवधूत म्हणाले:—हा पुरुषश्रेष्ठा यदुराजा ! आतां मी कोणापासून काय व कसकसें शिकलों, तें तसतसें तुला सांगतों, तें ऐक:—

( १ ) " ऐशियांच्याही ठायीं । भावबळें भाविक पाहीं । अर्पिती जें जें कांहीं । तेणें मोक्ष पाहीं मुमुक्षां ॥ तें पडतांचि योगियाच्या मुखीं । संचित क्रियमाणें आसकीं । जाळोनियां एकाएकीं । करी सुखी निजपदीं ॥ "—नाथ.

( ६ ) **चंद्रापासून शिकलेली गोष्ट**—कळा वाढल्या किंवा क्षय पावल्या, तरी चंद्राला वृद्धि अथवा क्षय हीं नसतात; तद्वत् कालाच्यायोगें जन्मापासून मृत्यूपर्यंत जे विकार घडतात, ते सर्व देहाचे होत; आत्म्याचे नव्हत.

( ७) **सूर्यापासून शिकलेली गोष्ट**—सूर्यापासून दोन गुण घेण्याजोगे आहेत. पैकीं पहिला गुण हाः—सूर्य हा आपल्या किरणांच्या योगें सतत उदक शोषून घेतो, व पावसाळ्यांत त्याची परत वृष्टिही करितो, पण त्या दोन्ही कृत्यांबद्दल अभिमान अगदीं बाळगीत नाहीं; तद्वत् योगी पुरुषही इंद्रियांच्या योगें विषय ग्रहण करितो, व योग्य प्रसंगीं ह्मणजे कोणी याचक आला असतां त्याला ते देऊनही टाकितो; पण त्या विषयाबद्दल तो मुळींच अहंभाव धरीत नाहीं. दुसरा गुण असाः—आकाशामध्यें सूर्य एकच आहे, पाण्यानें भरलेलीं अनेक भांडीं उन्हांत मांडून ठेविलीं आणि त्यांत पाहिले, तर प्रत्येक भांड्यांतील प्रतिबिंबाच्या रूपानें सूर्य अनेक प्रकारचा दिसतो; तद्वत् आत्मा हा एकच असतां देहादिकाच्यासंबंधामुळें नानारूपांनीं भासतो.

( ८ ) **कपोतापासून शिकलेली गोष्ट**--कोणी कशावरही अति प्रेम किंवा लालसाची आवड ठेवूं नये; ठेवील तर त्याची बुद्धि कपोतासारखी दीन होऊन त्याला संताप भोगावा लागेल ! याविषयीं एक गोष्ट सांगतोंः—

**एका कपोत पक्ष्याची गोष्ट**--राजा ! कोणी एक कपोत पक्षी अरण्यांत एका वृक्षावर घरटें बांधून, आपल्या स्त्रीसहवर्तमान कित्येक वर्षे राहत असे. तो कपोत व त्याची स्त्री कपोती हीं संसार-

(१) " सूर्यो थिल्लरामाजीं बिंबला । मूढ ह्मणती थिल्लारीं बुडाला । त्याचे कंपें कंपु मानिला । डहुळें डहुळला ह्मणती तो.॥ त्या थिल्लारातें नातळतां । गगनीं अलिप्त जेवीं सविता । तैसीच योगयाची योग्यता । देहातीत देहकर्म ॥ "—**नाथ.**

सुखांत निमग्न असून एकमेकांवर अत्यंत प्रेम करीत असत. इतकें की, त्यांच्या हिंडणें, फिरणें, पाहणें, खेळणें, खाणें, पिणें इत्यादि सर्व व्यवहारावरून जणूं काय तें दंपत्य एकजीव झालेलें आहे असें वाटे! ह्याप्रमाणें तीं एकमेकांवर अत्यंत प्रेम करीत, व खुशाल वनामध्यें फिरत. ती कपोती मधुर भाषणानें व सप्रेम अवलोकनानें आपल्या पतीला संतोषवी, ह्मणून कपोताचें मन तिजविषयीं सदय व सुप्रसन्न असे. तिची ज्या ज्या पदार्थावर इच्छा जाईल, तो तो इच्छित पदार्थ मिळविण्यास कितीहि कष्ट पडले तरी त्यानें तिला तो आणून द्यावा. कारण, इंद्रियें जिंकिलीं नसल्यामुळें तो तिचा अगदीं दास बनून गेला होता! राजा, कालगतीनें त्या कपोतीला गर्भ राहिला, व पुढें योग्य काल लोटल्यावर त्या घरट्यामध्यें आपल्या पतीच्या सन्निध तिनें अंडीं घातलीं. नंतर कांहीं कालानें ईश्वराच्या अचिंत्य शक्तीच्यायोगें, आरंभीं केवळ पाण्यानें भरलेल्या त्या अंड्यांत अवयवांची रचना होऊन नंतर कोमल शरीरांचीं व मृदु पखांचीं पिलें बाहेर पडलीं. तीं पिलें पाहून त्या दंपत्याला जो आनंद झाला, त्याचें वर्णन करणें अशक्य आहे! असो. त्या उभयतांनीं त्या पिलांचें उत्तम प्रकारें पालनपोषण चालविलें. पिलेंहि थोडथोडीं मोठीं होत चाललीं, आणि त्यांचे सुंदर अवयव, मनोहर "चिव चिव" शब्द, नाचणें, बागडणें व अन्य चेष्टा पाहून आईबापांस अधिकाधिक संतोष होऊं लागला! तीं उभयतां उदरपोषणाकरितां व पिलांच्या अन्नाकरितां घरटें सोडून बाहेर जात असत; पण तेव्हां त्यांचें सर्व लक्ष्य त्या पिलांकडे असे. तीं परत आलीं ह्मणजे त्या पिलांनीं मोठ्या कौतुकानें पुढें यावें, व तें पाहून त्या मातापितरांना मोठी धन्यता वाटावी. असा क्रम बरेच दिवस चालला असतां, एके दिवशीं

(२) "देखोनि मृगजळाचा पूर। मूर्ख करूं जाती तारूं। तैसा मिथ्या हा संसारू। भयंकर मूर्खांसी॥"—नाथ.

त्या आईबापांना परत येण्यास रोजच्यापेक्षां अधिक वेळ लागला. तों इकडे तीं पिलें आपल्या घरट्याच्या आसपास स्वच्छंदानें वागडत असतां, एका पारध्यानें आपलें जाळें पसरून त्यांत त्यांस धरिलें. तितक्यांत कपोत आणि कपोती पिलांकरितां कांहीं अन्न घेऊन परत आपल्या घरट्याजवळ आलीं, तों आपलीं लहान लहान पिलें जाळ्यांत सांपडून ओरडत असलेलीं त्यांस आढळलीं! राजा, मातृप्रेम मोठें विलक्षण असतें; ती कपोती दुःखानें व्याकुळ होऊन आक्रोश करीत तत्काळ त्या जाळ्यांत उडी टाकून आपल्या पिलांजवळ जाऊन बसली! त्या प्रसंगीं तिला इतका मायामोह उत्पन्न झाला कीं, आपण ह्या जाळ्यांत गुंतून मरूं हें सुद्धां तिला भान राहिलें नाहीं! असो. कपोतानें तो सर्व प्रकार अवलोकन केला. तेव्हां जिवापेक्षांही प्रिय अशीं अपत्यें जाळ्यांत सांपडलीं, आणि आपल्या अनुरूप भार्येनेंही तीच वाट धरिली असें पाहून बिचारा अति दुःखाकुल होऊन विलाप करूं लागला:—"केवढाहो माझा घात झाला पहा! मी आजपर्यंत संसारसुखांत धुंद होऊन राहिलों होतों. आज तें सुखही नाहींसें झालें! व संसारगुंगीमुळें परमार्थसाधनाचा प्रयत्न न करून सद्गतीसही अंतरलों! अरेरे! खरोखरी मी मूर्ख व पातकी आहें, ह्यांत संदेह नाहीं! हाय! हाय! धर्म, अर्थ, काम संपादन करून देणारा जो गृहस्थाश्रम नष्ट झाला, त्याला काय करावें बरें? माझी भार्या कशी अगदीं माझ्या मनाप्रमाणें वागणारी व पतीला (मला) देवाप्रमाणें भजणारी होती; पण आतां ती ह्या ओसाड घरांत मला टाकून आपल्या पुत्रांसहवर्तमान परलोकास जात आहे! बायको गेली! मुलें मेलीं! आणि आतां मला विधुरावस्थेंत दीनपणें ह्या ओसाड घरांत कष्टमय आयुष्य काढावें लागणार! तर अशा संकटांत मीं तरी जिवंत रहावें कशासाठीं?" राजा, या प्रकारें शोक करीत असतां, त्याचें भान नष्ट होऊन, तो कपोतही

आपण होऊन जाळ्यांत पडला! राजा, इकडे तो दुष्ट पारधी, पिलांबरोबर त्यांची मातापितरें आयतींच जाळ्यांत सांपडलेलीं पाहून, त्या सर्वांना घेऊन फार संतुष्ट झाला, व आपल्या घरीं परत गेला. तात्पर्य:–

यदुराजा, ह्या कपोताप्रमाणें जो कोणी कुटुंबी पुरुष चित्त शांत न राखितां सुख, दुःख, लाभ, हानी, जय अपजय इत्यादि द्वंद्वांमध्येंच रमून स्त्रीपुत्रादिकांचें पोषण करीत रहातो, तो आपल्या परिवारासह व्यर्थ जन्म घालवून अखेरीस नाश पावतो. राजा, नरजन्म ह्मणजे उघडून ठेविलेलें मोक्षाचें द्वारच होय. असा मनुष्यदेह प्राप्त झाल्यावर जो प्राणी परमार्थसिद्धीचा प्रयत्न न करितां, ह्या कपोत पक्ष्याप्रमाणें स्त्रीपुत्रांमध्यें आसक्त होतो, तो मोक्षाचा जिना चढून जाऊन पुन्हां खालीं आदळला, असें विद्वान लोक समजतात. इति । २४.

---

# अध्याय २५ वा.

—:*:—

## अवधूताचें ज्ञानोपदेश ग्रहण ( ११-८ ).

ब्राह्मण उवाचः—

**यतो तदनुशिक्षामि यथा वा नाहुषात्मज ॥**
**तत्तथा पुरुषव्याघ्र निबोध कथयामि ते ॥**

**अवधूत ह्मणालेः**—बा मुनिश्रेष्ठा यदुराजा, आतां मी कोणापासून काय व कसकसें शिकलों, तें तसतसें तुला सांगतों, चित्त देऊन ऐकः–

**(९) अजगरापासून शिकलेली गोष्टः**—प्रारब्धजन्य सुखदुःखभोग प्राप्त होणें अवश्य असल्यामुळें उदरपोषणासाठीं उद्योग करण्या-

---

(१) ". श्रेयोमार्गसोपानमारुह्य च्युतं " **अर्थ**—कल्याणमार्गाच्या पायऱ्यांवर चढून जाऊन पुन्हां खालीं पडला असें होतें.—बालप्रबोधिनी.

मध्यें आयुष्य फुकट घालवूं नये. कारण इच्छा केली अथवा न केली तरीं जसें सुख मिळतें; तद्वत् इंद्रियसंबंधीं सुखही प्राण्यांना, ते स्वर्गामध्यें असोत किंवा नरकांत असोत जेथें तेथें मिळावयाचेंच ! म्हणून शहाण्या मनुष्यानें त्याची इच्छा करीत बसूं नये. ह्यासाठीं योग्यानें अजगराची वृत्ति स्वीकारावी. राजा, अजगर हा कोणतीही क्रिया न करितां स्वस्थ पडून राहून, दैवयोगानें जेव्हां एखादें बरें वाईट भक्ष्य प्राप्त होईल तेव्हां तें खातो; व पुन्हां पडून राहतो; तसें सहजगत्या जें कांहीं थोडें बहुत मिष्ट अथवा निरस अन्न मिळेल, त्यावर योग्यानें आपला निर्वाह करावा. कदाचित् अन्न अगदींच मिळालें नाहीं, तरीही विषाद न मानितां आपलें दैवच उपभोग देणारें होय, अशा निश्चयानें धैर्य धरून रहावें, व आहाराकरितां उद्योग वगैरे कांहीं न करितां निराहारावरच दिवस काढावे ! राजा, हस्तपादादिक अवयव आपापलीं कर्में करण्यांत कुशल आहेत, मन हें अनेक युक्ती योजण्यांत निपुण आहे व शरीर चांगलें बळकट आहे, तेव्हां देहनिर्वाहाकरितां व्यासंग करावयाचें सोडून स्वस्थ पडून रहावें, म्हणून जें मी तुला सांगतों, त्यावर कदाचित् तुझा भरंवसा बसणार नाहीं; पण हें लक्ष्यांत ठेव की, शरीरादिकांची सुस्थिति असतांना जो अशा प्रकारें चित्ताचा जय करून आहारादिकांविषयीं उदासीन राहील, तोच खरा जितेंद्रिय होय. राजा, योग्यानें अन्नादिकांच्या प्राप्तीसाठीं कांहीं एक प्रयत्न करावयाचा नाहीं, म्हणजे खुशाल झोंप घेऊन दिवस घालवावयाचे, असा मात्र अर्थ समजूं नको. योग्याला तर एक महत्त्वाची गोष्ट साध्य करण्याचा प्रयत्न क-

(१) " भोगितां उर्वशीसीं । जें सुख स्वर्गी इंद्रासी । तेंचि विष्टेमाजी सूकरासी । सूकरीपाशीं निश्चित ॥ हें जाणोनि साधुजन । उभय भोगीं न घालिती मन । न घेघे प्रेतासी आलिंगन । तेवीं साधुजन विषयासी ॥ जीत साप धरावा हातीं । हें प्राण्यासी नुपजे चित्तीं । तेवीं विषयाची आसक्ति । साधु न धरिती सर्वथा. नाथ.

गणें अत्यावश्यक आहे. व तें ह्मणजे स्वस्वरूपज्ञान हें होय. ह्यास्तव योग्यानें आपल्या सर्व शक्तींचा व्यय ब्रह्मचिंतनांत करावा.

(१०) **समुद्रापासून शिकलेली गोष्ट:**—राजा, ब्रह्मचिंतन करणाऱ्या मुनीनें समुद्रापासून पुष्कळच गोष्टी शिकण्यासारख्या आहेत. समुद्राचें उदक शांत असतां त्याचा पृष्ठभाग जसा रमणीय असतो; तशी मुनीची वृत्ति शांत असून मुद्रा प्रसन्न असावी. समुद्राचा जसा ठावठिकाण लागत नाहीं; तसें मुनीचें ज्ञान गंभीर असावें. समुद्रांत जसें भलत्याच कोणाला पोहतां वगैरे येत नाहीं; तसें मुनीच्या ठिकाणीं अगाध ज्ञान असून कोणा अनधिकारी पुरुषाला त्या मुनीशीं वादविवाद करितां येऊं नये. मुनीच्या ठिकाणीं इतका ज्ञानसंचय असला पाहिजे कीं, समुद्राप्रमाणें त्या महाज्ञानी पुरुषाच्या वाटेस कोणासही जातां येऊं नये. मुनीची चित्तवृत्ति समुद्राप्रमाणें सर्वविषयीं रागद्वेषरहित असून तो ब्रह्मचिंतनांत इतका गढून गेला पाहिजे कीं, त्या योगें त्यास आपण देशकालातीत, नित्य व चिद्रूप आहों असें वाटावें. राजा, पर्जन्यकालीं अनेक नद्या, समुद्रास येऊन मिळतात, तरी त्याचें पाणी कधीं वाढत नाहीं; तद्वत् मुनीपाशीं उपभोग्य वस्तूंचा संग्रह झाला असतांही त्याची वासना वृद्धिंगत होऊं नये; ह्मणजे फक्त देहनिर्वाहापुरतें त्याचें लक्ष असावें. तसेंच ऋतुमानानुसार उन्हाळ्यांत नद्या वाहात नसल्या तरी समुद्राचें पाणी कमी न होतां समुद्र जसाचा तसा असतो; तद्वत् कर्मानुसार

(१) "समुद्रामाजी जळ । लाटांखालीं अति चंचळ । योगिया अंतरीं अति निश्चळ । नाहीं चळमळ कल्पना ॥ समुद्र क्षोभे वेळोवेळे । योगिया क्षोभेना कवणे काळें । सर्वथा योगी नुचंबळे । योगबळें सावळ ॥ समुद्रीं भरतें पर्वसंबंधें । योगिया परिपूर्ण सदानंदें । समुद्रीं चढू वोहटू चांदें । योगिया निजबोधें सदा सम । समुद्र सर्वांसनी क्षार । तैसा नव्हे योगेश्वर । तो सर्वां जीवांसी मधुर । बोधु साचार पैं त्याचा ॥ "—**नाथ.**

उपभोग्य पदार्थांचा अभाव झाला असतांही मुनीच्या चित्तास किंचित् सुद्धां विषाद होऊं नये. आतां तूं ह्मणशील कीं, ' ह्या सर्व दुःसाध्य गोष्टी साधकानें कशा प्राप्त करून घ्याव्या ! ' तर यास उत्तर असें कीं, आपल्या स्वरूपीं चित्त लावून स्वस्थ असावें; ह्मणजे सर्व गोष्टी आपोआप साध्य होतीलच. इति । २५.

---

# अध्याय २६ वा.

## अवधूताचें ज्ञानोपदेशग्रहण ( ११–८ ).

ब्राह्मण उवाचः—

यतो यदनुशिक्षामि यथा वा नाहुषात्मज ॥
तत्तथा पुरुषव्याघ्र निबोध कथयामि ते ॥

**अवधूत ह्मणालेः**—बा मुनिश्रेष्ठा राजा, आतां मी कोणापासून काय व कसकसें शिकलों, तें तसतसें तुला सांगतों, सावधान चित्तानें ऐक. १ रूप, २ गंध, ३ स्पर्श, ४ शब्द व ५ रस ह्या पांच विषयांनीं मोहून गेल्यामुळें अनुक्रमें १ पतंग, २ भ्रमर, ३ गज, ५ हरिण व ५ मत्स्य हे पांचजण नाश पावले; ह्मणून त्या पांच विषयांवर आसक्ति न ठेवण्याविषयीं ते पांचजण माझे गुरू झाले. त्या प्रत्येक गुरूपासून काय शिकलों, तें क्रमशः निरूपण करितों:—

---

( १ ) " पतंग मातंग कुरंग भृंग मीना हताः पंचभिरेव पंच । एकः प्रमादी स कथं न हन्यते यः सेवते पंचभिरेव पंच॥ " अर्थ—रूप, स्पर्श, शब्द, गंध व रस ह्या पांच विषयांनीं अनुक्रमें प्रत्येकानें एकेकाला असें पतंग, गज, हरिण, भ्रमर आणि मत्स्य ह्या पांचाना ठार केले; तेव्हां जो पुरुष सावध न होतां, तें पांचही विषय एकटा पांच इंद्रियांनीं सेवन करितो, तो कसा बरें मारिला जाणार नाहीं. "—नाथ.

## रूपेच्छेचा परिणाम.

**(११) पतंगापासून शिकलेली गोष्टः**--राजा, स्त्री ह्मणजे मूर्तिमंत मायाच होय! ज्यानें इंद्रियें आकळिलीं नाहींत, अशा त्या पुरुषाच्या दृष्टीस पडली कीं, तिच्या शृंगारचेष्टांस तो मोहून जातो! दृष्टांत--जसा पतंग अग्नीच्या रूपास भुलून त्यावर झडप घालून शेवटीं नाश पावतो; तद्वत् तो वेडावलेला पुरुष स्त्रियांच्या रूपास भुलून स्त्रीसुखांत रममाण झाला कीं, नाश पावतो! तसेंच सुवर्ण, अलंकार, वस्त्रें इत्यादि द्रव्येंही स्त्रियांप्रमाणेंच मोठीं ओकदार दिसत असल्यामुळें मनुष्याला अधिक अधिक मोहांत पाडितात. ह्मणून जो मनुष्य दूरवर दृष्टि न देतां या मोहक पदार्थांच्या ठिकाणीं आसक्त होतो, तो वेडावलेला पुरुषही पतंगाप्रमाणेंच दुःखास प्राप्त होऊन अधोगतीस पावतो.

## २ गंधेच्छेचा परिणाम.

**( १२ ) मधुकरापासून शिकलेली गोष्ट**—राजा! मधुकराच्या दोन जाती आहेत. एक–मधुकर ( भ्रमर ) आणि दुसरी–मधमाशी.

**[१] मधुकर**—भ्रमर हा जसा फुलांना न दुखवितां प्रत्येकांतून आपल्या निर्वाहापुरता थोडा थोडा मध काढून घेतो; तद्वत् मुनीनें गृहस्थाश्रम्यांना त्रास न देतां, ह्मणजे एकावरच ओझें न घालतां त्यापासून थोडी थोडी माधुकरी ग्रहण करून आपली उपजीविका चालवावी. कोणाही एकाच्या घरीं भोजनास राहूं नये. दृष्टांत–भ्रमर एकाद्या कमलाचा गंध विशेष आवडला कीं, लोभानें त्यावरच पुष्कळ वेळ बसतो, आणि अस्तमानीं कमळ मिटून गेलें ह्मणजे त्यांतच अडकून पडतो;

( १ ) " स्त्री, सुवर्ण, अलंकार व वस्त्रें यांपैकीं कोणत्याही एकाद्या पदार्थावर आसक्ति ठेवणाऱ्या पुरुषांला नरकांत लोटण्यास त्यांच्या अंगीं शक्ति आहे. मग स्त्रीच्या आंगावर तर ते सर्व पदार्थ एकत्र जमलेले असतात; तेव्हां इतक्यांच्या तावडींत एकदम सांपडलेल्या पुरुषाची सुटका व्हावी कशी ? "—नाथ.

तद्वत् योगी पुरुष एकाच्याच घरीं विशेष जाऊं येऊं लागला तर तेथें मोह उद्भवून बंधन पावेल; याकरितां एका घरीं कोठेंच राहूं नये; आणि भ्रमराप्रमाणें आपली स्थिति न होऊं देण्याविषयीं योग्यानें दक्षता राखावी. शिवाय जसा भ्रमर लहानमोठ्या अनेक फुलांतून सारभूत मध घेत असतो; तद्वत् कुशल पुरुषानें लहान मोठ्या सकल शास्त्रांतील सारभूत असें आत्मज्ञान ग्रहण करावें. व भ्रमर जसा दुसऱ्या दिवसासाठीं संचय न करितां केवळ आपल्या एका वेळेच्या उदरभरणाकडेच लक्ष्य देतो; तद्वत् साधकानेंही माधुकरीचा दुसऱ्या दिवसासाठीं संचय न करितां आत्मज्ञान संपादण्याकडे लक्ष्य द्यावें.

[ २ ] **मधुमाशी**-जशा मधमाशा मध सांठवून ठेवितात, म्हणून तो मध लुटून नेण्यासाठीं जो कोणी येतो, तो माशांना मारून मध घेऊन जातो; तद्वत् मुनीनें " हें संध्याकाळीं खाऊं, हें उद्यां भोजनास उपयोगीं पडेल " अशा विचारानें भिक्षान्नाचा संग्रह अगदीं करूं नये; तर हातावर भिक्षा घ्यावयाची आणि उदरांत सांठवायाची असा नेम ठेवावा. संध्याकाळासाठीं किंवा उद्यासाठीं म्हणून मुनीनें कणलाही संग्रह करूं नये. संग्रह करणारा पुरुष मक्षिकेप्रमाणें त्या संग्रहाबरोबर नाश पावतो!

### ३ स्पर्शेच्छेचा परिणाम.

( १३ ) **हत्तीपासून शिकलेली गोष्ट:**—राजा, रानांतील हत्ती धरण्यासाठीं कशी युक्ति योजितात, ती पहा:–एक मोठा खाडा खणून त्यांत भरपूर चिखल ( गारा ) तयार करावयाचा, त्याच्या तोंडावर तुरळक तुरळक गवत अंथरावयाचें आणि पलीकडल्या बाजूला लांकडाची रंगवलेली हत्तीण उभी करून ठेवावयाची. ती कृत्रिम हत्तीण दृष्टीस पडली कीं, कामानें उन्मत्त झालेला हत्ती तिजकडे धांवत येऊं लागतो, व कामातुरतेमुळें मध्येंच त्या खड्ड्यांत अडकतो; तद्वत् पुरुष स्त्रियांच्या मोहक

रूपाला भुलून त्यांच्या फंदांत पडला कीं, त्याचीही गति हीच होते! यास्तव साधक पुरुषानें स्त्रियांशीं बिलकुल संपर्क ठेऊं नये. फार तर काय, पण स्त्रीच्या आकाराची लाकडाची बाहुलीस किंवा चित्रास देखील नुसत्या पायानें सुद्धां स्पर्श करूं नये. जर ह्या नियमाचे विरुद्ध साधकाकडून घडलें तर त्यास बंधप्राप्ति होईल हें सांगावयास नको! राजा, स्त्रियांच्या फंदांत पडलेल्या साधकाला बंधप्राप्ति होते म्हणून सांगितलें, पण इतकेंच नव्हे, तर त्यास नानाविपत्ति भोगाव्या लागूनही बाकीचें आयुष्य मोठ्या दुःखानें कंठावें लागेल! पहा: मदोन्मत्त हत्ती जेव्हां हत्तीणीच्या संभोगाकरितां प्रवृत्त होतो, तेव्हां इतर मदांध हत्ती त्याच्यावर तुटून पडतात, व त्यास कधीं कधीं ठारही मारतात; तद्वत् साधक जर स्त्रीसमागमास प्रवृत्त होईल, तर त्यासही इतर पुरुषांकडून मार खावा लागतो, व कधीं कधीं तर मृत्यूच्याही स्वाधीन होणें भाग पडतें. कदाचित् तो मृत्यूच्या तडाख्यांतून सुटला, तरी आजन्मपर्यंत त्याची छीः थू होतेच!!

**( १४ ) मधुहरण करणाऱ्या पुरुषापासून शिकलेली गोष्ट:–** राजा, मधु हरण करणाऱ्या पुरुषाच्या वृत्तीवरून मी दोन गोष्टींचें ज्ञान करून घेतलें. एक भोग, दुसरें दान. त्यापैकीं.––

**[१] भोग:–** मधमाशा पुष्कळ कष्ट सोसून अनेक फुलांतून मध काढून आणून मोठ्या दक्षतेनें संचय करून ठेवितात; पण त्या आपल्या पोटास सुद्धां मध खात नाहींत. व कोणी त्यांकडे मागावयास वगैरे गेल्यास त्यांवर त्या तांगी उचलून धांवून जातात. शेवटीं परिणाम असा होतो कीं, भिल्ल वगैरे बलिष्ट लोक त्यांचें सबंध मोहोळच उचलून नेतात, व त्या माशांस मारून त्यांतील मध काढून घेतात; तद्वत्

( १ ) " माशा मधु न खाती काकुळती । माडी त्याचे दान मागती । स्वादु श्रीमंत मेवती । त्यांसि लक्ष्मीपति प्रसन्न ॥ "—नाथ.

लोभी पुरुष पुष्कळ दुःखें व कष्ट सोसून जो द्रव्यसंचय करून ठेवितात त्याचा ते दानधर्माकडे विनियोग करावयाचें नाहींत, किंवा आपल्या उपभोगाकडेही करीत नाहीं; परंतु शेवटीं परिणाम असा होतो कीं, ते द्रव्य भलताच एखादा बलाढ्य पुरुष उपटून नेतो, व तो उपभोगितो! किंवा त्याच्या हातूनही तिसराच कोणी लांबवितो!

[२] दानः--मध हरण करणारांनीं मधाकरितां पूर्वी कांहीं एक श्रम केलेले नसतात, तरी त्यांच्याकरितां परमेश्वरानें मधमाशांकडून आधींच मधुसंचय करवून ठेविलेला असतो; तद्वत् यति वगैरे परमार्थ साधन करणाऱ्या पुरुषांकरितां परमेश्वरानें वेदाच्या द्वारें गृहस्थाश्रमी लोकांकडून आधींच अन्नसंचयाचा नियम करून ठेविलेला असतो. गृहस्थांनीं बहुविध कष्ट करून धनधान्यादिकांचा पुरवठा करावा, आणि अन्नादिक सिद्ध केल्यावर आरंभीं यती व ब्रह्मचारी ह्यांस माधुकरी अर्पण करून मग शेषान्नाचा उपभोग घ्यावा, असें वेदाचेंच प्रमाण आहे. गृहस्थांनीं असें न केल्यास त्यांस चांद्रायणादिक प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. ह्यास्तव गृहस्थांस अन्नादिक पदार्थ दानधर्म करणें हें अगत्याचें आहे.

### ४. शब्देच्छेचा परिणाम.

(१९) **हरिणापासून शिकलेली गोष्टः**—राजा, हरिण जोंपर्यंत अरण्यांत व्याधाच्या मधुर गायनाकडे चित्त देत नाहीं, तोंपर्यंत त्यास त्या वनांत सुखानें संचार करितां येतो; परंतु तोच त्या पारध्याच्या गायनांस रममाण झाला, म्हणजे बंधनांत पडून शेवटीं मृत्यूच्या स्वा-

(१) "यतिश्च ब्रह्मचारी च पक्वान्नस्वामिनावुभौ । तयोरन्नमदत्वा तु भुक्त्वा चांद्रायणं चरेत् ॥" **अर्थ**—यति आणि ब्रह्मचारी हे दोघे शिजलेल्या अन्नाचे धनी होत. त्यांना अन्न न देतां जो भोजन करील, त्याला चांद्रायण प्रायश्चित्त घ्यावें लागेल.—**स्मृति.**

धीन होतो; तद्वत् जो कोणी मनुष्य मायेनें रचिलेल्या विषयांच्या फं-दांत पडला कीं तो तत्काळ फसतो असें समजावें. यास्तव सर्वसंग परित्यागी यतीनें केव्हांही विषयी लोकांच्या गाण्याबजावण्यामध्यें आपलें मन अनुरक्त होऊं देऊं नये. व त्याला भगवद्गीतेचें श्रवण वगैरे करण्यास निषेध नाहीं. उदाहरण—ऋष्यशृंग नामक मुनि हरिणीचा पुत्र होता. त्यास स्त्रियांचीं नृत्यें, वाद्यें व गायनें पाहण्या ऐकण्याचा नाद लागला; शेवटीं त्याचा परिणाम असा झाला कीं, तो मुनि त्या स्त्रियांचें खेळणें बनला, व परतंत्र होऊन त्या नाचवतील तसा नाचूं लागला. ही गोष्ट ब्रह्मचिंतन करणाऱ्या पुरुषानें अवश्य ध्यानांत ठेवावी.

५. रसनेच्छेचा परिणाम.

(१६) **मत्स्यापासून शिकलेली गोष्टः**—राजा, मासा जोंपर्यंत गळास लाविलेल्या अमिषास न भुलतां जिव्हेला स्वाधीन ठेवून त्या अमिषाच्या प्राप्तीकरितां प्रयत्न करीत नाहीं, तोंपर्यंत तो आनंदांत असतो; पण तोच त्या जिव्हेच्या आधीन होऊन तिच्या तृप्तीकरितां गळास लावलेला मांसपिंड खाण्यास उद्युक्त झाला कीं, लागलाच लोहकंटकानें काळीज विदारण होऊन मृत्युमुखीं पडतो; तद्वत् योगी पुरुष जेथपर्यंत केवळ शरीररक्षणापुरताच विचार करितात, तोंपर्यंत त्यांना या संबंधाची कोणत्याही प्रकारची बाधा प्राप्त होत नाहीं; पण त्यांची जिव्हेस स्निग्धादिक पदार्थांविषयीं इच्छा उत्पन्न झाली कीं, त्यांची बुद्धि भ्रष्ट होऊन त्यांच्या ज्ञानाची गुंडाळी बनल्याशिवाय राहणार नाहीं. राजा, जिव्हाचापल्याचा सर्वतोपरी निषेध बहुधा अशक्य आहे ही गोष्ट खरी, तथापि आत्मस्वरूपांत रममाण झाल्यास तत्काल त्याची निवृत्ति होते. पहा—एका जिव्हेचे नियमन केल्यास इतर इंद्रियें सहजिकच आकळितां येतात, परंतु इतर इंद्रियें निर्बल झालीं असतांही जिव्हेची ओढ कमी होत नाहीं; यास्तव योग्यानें गोडच अन्न पाहिजे,

चांगलें पाहिजे, अशी आसक्ति न धरितां जें मिळेल तें औषधाप्रमाणें भक्षीत जावें. ह्मणजे जिव्हा आणि नाकीची अशी कोणतींच इंद्रियें क्षोभ पावणार नाहींत. मनुष्यानें इतर सगळीं इंद्रियें जिंकला असलीं तरी जोंपर्यंत रसनेंद्रिय त्याच्या स्वाधीन झालें नाहीं, तोंपर्यंत त्याला जितेंद्रिय ह्मणतां येत नाहीं. जिव्हेंद्रिय जिंकलें कीं, सर्वच इंद्रियें जिंकलीं असेंही ह्मणतां येतें. इति । २६.

---

# अध्याय २७ वा.

## अवधूताचें ज्ञानोपदेशग्रहण. ( ११-८ )

ब्राह्मण उवाचः—

यतो यदनुशिक्षामि यथा वा नाहुषात्मज ॥
तत्तथा पुरुषव्याघ्र निबोध कथयामि ते ॥

**अवधूत म्हणालेः**—नरश्रेष्ठा ययातिपुत्रा. आतां मी कोणापासून काय व कसकसें शिकलों, तें तसतसें तुला सांगतों, एकाग्रचित्तानें श्रवण कर.

( १७ ) **पिंगलेपासून शिकलेली गोष्टः**—राजा, पूर्वी मिथिला नामक नगरींत पिंगला नांवाची एक वेश्या राहत असे. ती जारकर्म करणारी वेश्या स्त्री. रस्त्यांतून जाणाऱ्या येणाऱ्या पुरुषांचें मन प्रसन्न करून त्यांजकडून द्रव्य लुबाडण्याकरितां, रात्रीच्या वेळीं शृंगार करून मोठ्या थाटानें बाहेरच्या दारांत बसली होती. मार्गांत येणारे, जाणारे कोणी पुरुष दृष्टीस पडले कीं, तिला हे श्रीमंत दिसत असून सुरतसुखोपभोगासाठीं आपणाकडे येत आहेत, व आपल्याला द्रव्य देतील की काय असें वरचेवर वाटावें; पण ते नापडे तिच्या घराकडे येऊन ति-

ची पायरी न चढतां तसेंच पुढें चालते झाले. तेव्हां द्रव्यप्राप्ति होण्याची संधि फुकट गेलेली पाहून तिला वाईट वाटलें. राजा, ह्या प्रकारें अंतीं द्रव्याची दुराशा धरून राहिल्यामुळें झोंप येईना! त्या रात्रीं पिंगलेनें अनेक पुरुषांची मार्गप्रतीक्षा केली. व प्रत्येक वेळीं निराशेच्या दुःखाचाही अनुभव घेतला; पण करते काय बिचारी! पुढें दरवाज्यांत उभी राहून राहून कंटाळली. तथापि द्रव्याच्या आशेनें. आतां कोणी येण्याचा संभव नाहीं. असें मानून तिनें घरांत जावें. व इतक्यांत कोणी तरी येईल असें वाटून बाहेर यावें; अशा प्रकारें तिच्या येरझारा होऊं लागल्या. असें होतां होतां मध्यरात्रीचा समय आला; तेव्हां तिला फार वाईट वाटलें, व तिचें मुख सुकून गेलें; पण त्या चित्ताच्या चिंतेमुळेंच तिच्या अंतरीं परिणामीं सुखदायक असें पूर्ण वैराग्य उत्पन्न झालें. आतां तें सांगतों:—

**पिंगलेचें वैराग्य:**——राजा, संसारप्रवृत्तीला मुख्य कारण म्हटलें म्हणजे आशा हें होय. व ह्या आशानिवृत्तीला वैराग्याप्रमाणें दुसरें साधन नाहीं, असा नियम आहे. जोंपर्यंत पुरुषाला वैराग्य उत्पन्न झालें नाहीं. तोंपर्यंत संसार समाप्त होणार नाहीं. देहादिकांविषयींची अहंममत्वबुद्धि दूर होण्यास ज्याप्रमाणें ब्रह्मसाक्षात्काराची आवश्यकता असते; तद्वत् संसारांतून सुटका होण्यास वैराग्य अवश्य आहे. असो. पिंगलेला चित्तामध्यें तीव्र वैराग्यवृत्ति बाणली असतां, त्या वेळीं तिच्या मुखांतून जे उद्गार निघाले, ते जसेच्या तसेच मी तुला सांगतों, ऐक——

पिंगला म्हणाली:——"अहो, मी किती मूर्ख आहे बरें! मी तुच्छ पुरुषापासून आपले मनोरथ परिपूर्ण करून घेण्याची इच्छा धरून बसलें

(१) "आपुला पूर्ण न करवे काम। तो मज कांतेनी केला निष्काम। त्याचेनि संगे मोहभ्रम। दुःख परम पावल्यें॥"—**नाथ.**

तेव्हां हा माझा केवढा वेडेपणा सांगावा बरें! अरेरे! मी जर आपलें मन जिंकलें असतें, तर आज माझी ही दुर्दशा कां झाली असती! माझ्या अंतर्यामीं वास करणाऱ्या अस्तिभातिप्रियरूप लक्ष्मीपति प्रभूचें ध्यान करावयाचें सोडून इष्टार्थ परिपूर्ण करण्यास असमर्थ अशा क्षुद्र पुरुषाचें ध्यान करून दुःख, भय, चिंता, शोक, मोह इत्यादिकांना मीं बळेंच प्राप्त करून घेतलें, तेव्हां हा माझा केवढा मूर्खपणा बरें! अहो, मीं आजपर्यंत अशाच असह्यवृत्तीनें उपजीविका केली. स्त्रीलंपट, द्रव्यलोभी व अतिनिंद्य अशा पुरुषास मीं हा देह विकून धनाची व क्षुद्रसुखाची इच्छा करीत बसून व्यर्थ आपल्या आत्म्याला शिणविलें तेव्हां मला काय म्हणावें! अरेरे मला धिक्कार असो! अहो, हें शरीर किती घाणेरडें व त्याज्य आहे पहा—हें शरीर ह्मणजे हाडांचेच खांब, वांसे, तुळया इत्यादिकांनीं बनविलेलें एक घरच होय! त्वचा, केश आणि नखें हीं ह्या गृहाचें आच्छादनच होत. तसेंच ह्या गृहाला नऊ मोऱ्या (दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, मुख गुद व शिश्न) असून त्यांतून घाण सारखी वहात असते! हें शरीर ह्मणजे विष्ठा व मूत्र ह्यांची टाकीच होय! अरेरे, अशा पुरुषशरीराला रमणीय मानून भजणारी मजवांचून दुसरी कोणी तरी सांपडेल काय. अहो! ह्या मिथिला नगरींतील लोकांची ज्ञानमत्ता अपरंपार असतां, माझ्या ठिकाणींच अशी दुर्बुद्धि कोठून आली. अहो! नित्य, परिपूर्ण अशा ईश्वराचें ध्यान करावयाचें सोडून देऊन मी अतिनिंद्य जारकर्मास प्रवृत्त झालें, हें किती लांच्छन आहे बरें! असो. झालें तें होऊन गेलें,

(१) " जया पुरुषासी देह विकणें । तें अत्यंत हीनदीनपणें । काय सांगों त्याचीं लक्षणें । सर्व गुणें अपूर्ण ॥ वित्त न देववे कृपणता । काम न पुरवे पुरता । प्रीति न करवे तत्त्वता । भेटी मागुता तो नेदी ॥ ऐसिया पासाव सुख । वांच्छितां पावे परम दुःख । अळो त्याचें न राहे मुख । बोकारी देख येतसे ॥ "—नाथ.

पण ह्या पुढें, सर्व प्राण्यांविषयीं दयाळू, सर्वांचें पालनपोषण करणारा, व सर्वांच्या अंतर्यामीं वास करणारा असा जो परमेश्वर, त्यालाच हा देह अर्पण करून त्याला पूर्णपणें आपलासा करून घेईन, व मी लक्ष्मीप्रमाणें त्याच्याशींच रमून राहीन ! अहो ! मी परमेश्वराची दासी झालें, तरच मला खरें सुख प्राप्त होईल ! अन्यापासून लेशसुखाची इच्छा करीत रमणें हें व्यर्थ होय. कारण, शब्दादि विषय, विषयोपभोग देणारे पुरुष, अथवा इंद्रादि देव हे सर्व कालगतीनें नाश पावणारे आहेत; तेव्हां अशांपासून निजसुख कोठून मिळणार बरें. अहो ! आज माझें पूर्वसुकृत उदयास आलें, ह्यांत संदेह नाहीं. कारण, मला आज तीव्र वैराग्य उत्पन्न होऊन विष्णुसेवेचा अभिलाष उद्भवला, व ईश्वरकृपेनें माझ्या दुराशा[1] समूळ नष्ट झाल्या ! अहो, मनुष्याची आशा निवृत्त झाल्यावांचून त्यास कधींही वैराग्य उत्पन्न होत नाहीं; व वैराग्यावांचून आत्मज्ञान प्राप्त होत नाहीं. ह्यास्तव, परमेश्वराचा वैराग्यरूप अनुग्रह शिरसा धारण करून मी सर्व ऐहिक सुखोपभोगांच्या इच्छा सोडून देते. व त्याच परमेश्वराला शरण जाते. इतःपर पूर्ववृत्ति सोडून देऊन दैवयोगें जें कांहीं मिळेल तेवढ्यावर उपजीविका चालवीन, व परमात्मस्वरूप कांताबरोबर विहार करीत राहीन ! अहो, कालाच्या तडाक्यांत सर्व प्राणी सांपडले असल्यामुळें त्यांची विवेकबुद्धि नष्ट होऊन संसारकूपांत[2] गटंगळ्या खात पडले आहेत. ह्यास्तव त्यांच्या ध्यानीं लागून त्यांपासून परमार्थ लाभ घडेल ही मुळींच आशा

(१) " जे निजभयें सर्वदा दुःखी । ते आयेसी काय करिती सुखी । अवचीं पडली काळमुखीं । न दिसे इये लोकीं सुखदाता ॥ "—नाथ.

(२) " दुस्तरत्वात्संसार एक कूपः " अर्थ—संसाराला कूप म्हणण्याचें कारण, त्यांत पडलेल्या प्राण्याला बाहेर निघणें कठिण जातें हें होय.—बालप्रबोधिनी.

नाहीं. ह्मणून प्रत्येकानें सावध होऊन, हें सर्व ब्रह्मांड कालसर्पानें गिळून टाकलेलें आहे, असें जाणून पूर्ण वैराग्य धारण करावें, व भगवद्भजनीं लागून आपला आपण उद्धार करून घ्यावा हेंच हितकर होय."

अवधूत ह्मणाले:—हे यदुराजा! ह्या प्रकारें पिंगलेनें आपल्या बुद्धीचा असा निश्चय ठरवून परपुरुषांविषयींचा अभिलाष सोडून दिला व शांति स्वीकारून सुखानें झोंप घेतली! एकंदरींत सारांश हा कीं, "आशायाः परमं दुःखं निराशाः परमं सुखं" आशा हेंच दुःखाला कारण व निराशा हेंच सुखाला कारण हें निश्चित होय. कां कीं, पुरुषाची आशा तोडून टाकल्याबरोबर पिंगलेला सुखानें झोंप लागली, ह्मणजे ब्रह्मानन्दसुखास प्राप्त झाली! इति । २७.

---

# अध्याय २८ वा.

## अवधूताचें ज्ञानोपदेश ग्रहण (११-९०).

ब्राह्मण उवाचः—

**यतो यदनुशिक्षामि यथा वा नाहुषात्मज ॥**
**तत्तथा पुरुषव्याघ्र निबोध कथयामि ते ॥**

**अवधूत ह्मणाले:**—नरश्रेष्ठा यदुराजा! आतां मी कोणापासून काय व कसकसें शिकलों, तें तसतसें तुला सांगतों, एकाग्रचित्तानें श्रवण कर:—

(१) सर्प चावून आंगांत विष भिनलें ह्मणजे गुळ कडू लागतो, व कडूलिंब गुळासारखा गोड वाटतो; तशी काळसर्पानें ग्रासलेल्या संसारी पुरुषाची स्थिति होते!

(२) " जें आशापाशाचें छेदन । तेंच समाधीचें निजसाधन । ते निजसमाधि पावोन । पिंगला जाण पहुडली ॥ अवधूत सांगे यदूसी । प्रत्यक्ष वेदबाह्या वेश्येसी । ते निराश होतां मानसीं । निजसुखासी पावली ॥ "—नाथ.

( १८ ) **कुररपक्ष्यापासून शिकलेली गोष्ट:**—राजा! एकेवेळीं कुरर ( टिटवी ) पक्षी आपल्या चोंचीमध्यें मांस भरून जात होता; तेव्हां त्याच्या स्वजातीय पक्ष्यांनीं त्यास पाहिलें. त्यांनीं विचार केला कीं, 'आम्हांजवळ मांस वगैरे खाऊ कांहीं नाहीं, आम्ही बलाढ्य आहों; यास्तव ह्याला हें कां पचूं द्यावें!' लागलेच ते त्या मांसाकरितां त्या पक्ष्यावर धांवून गेले, व त्यांनीं त्यास बरेंच घाईस आणलें! पुढें त्या मांस घेऊन जाणाऱ्या पक्ष्यानें आपल्या मनांत विचार केला कीं, 'अरेरे! हे माझे जातभाई असून मला किती पीडितात बरें! ह्या सर्व दुःखाचें मूळ कारण म्हणजे माझ्या चोंचींतील मांस हें होय! जर कलहजनक मांसच टाकून दिलें, तर हा कलह आपोआप नाहींसा होईल!' असें म्हणून त्या कुररानें आपल्या चोंचींतलें मांस टाकून दिलें. तेव्हां त्याचे स्वजातीय त्यास सोडून तें मांस घेऊन चालते झाले; तद्वत् मनुष्यांना जें जें कांहीं अत्यंत प्रिय वाटतें, त्या त्या वस्तूचा तीं मनुष्यें परिग्रह करितात, म्हणजे ती ती वस्तु जवळ बाळगितात; म्हणून तो परिग्रहच त्यांना दुःख, देण्यास कारण होतो. हें जाणून जो साधक पुरुष कसलाही पदार्थ संग्रह करणें सोडून देईल त्याला निजसुख प्राप्त होतें.

( १९ ) **लहान मुलापासून शिकलेली गोष्ट**—लहान मुलास मानापमान नाहीं, व कशाचीही काळजी नाहीं, तर तें आपल्याशीच

( १ ) संन्याशानें मठाची व अन्य लौकिक व्यवहाराची उठाठेव करीत राहूं नये. कारण घरदार सोडून निःसंग झाल्यावर देखील त्याचा परिग्रहाभिमान सुटत नाहीं. म्हणून यतीनें योगमार्गानें किंवा आत्मविचार दक्षतेनें चालविला असता त्या अभिमानाची निवृत्ति होऊन त्यास अखंड सच्चिदानंद सुख प्राप्त होतें.—**नाथ.**

( २ ) पाहतां बाळकाचे ठायीं । सुख वासना असे देहीं । ते अंकुरोनि पाहीं । अतुच्छ अपायीं पाळील ॥ तैसें नव्हे योगिया गुणातीत । सो पूर्णानंदें पूर्ण भरित । त्यासि सुखदुःखाची मात । नाहीं जगांत सर्वथा ॥ ”—**नाथ.**

खेळत असतें, आणि त्यास स्वतःवांचून दुसरें कांहींही प्रियकर नसतें; तद्वत् मला मान नाहीं, अवमान नाहीं. आणि घराची व मुलाबाळांची काळजी नाहीं, तर मी ह्या जगामध्यें आपल्याशींच ह्मणजे आत्मविषयक गोष्टीमध्येंच खेळत असतों; आणि मला स्वतःवांचून ह्मणजे अंतर्यामीं वास करणाऱ्या आत्म्यावांचून इतर कांहींही प्रियकर नाहीं !

( २० ) **कुमारीपासून शिकलेली गोष्ट**—एके वेळीं एका उपवर मुलीला पाहण्यासाठीं कांहीं पाहुणे तिच्या घरीं आले. त्यावेळीं आईबाप इत्यादि नातेवाईक माणसें सगळीं कोठेंशी गेलीं असल्यामुळें पाहुण्यांचें आदरातिथ्य करण्याचें काम त्या मुलीला स्वतःलाच करावें लागलें. ती मुलगी मोठी समंजस होती, ह्मणून त्यांचें उत्तम प्रकारें आदरातिथ्य करून पाहुण्यांच्या भोजनाकरितां ती घरांत त्यांच्या दृष्टीच्या आड एका उखळावर साळी कांडीत बसली. त्या मुलीचा विचार असा होता कीं, आपल्या घरांत तांदूळ नाहींत, ही गोष्ट त्या पाहुण्यांना कळतां कामा नये; पण ती मुलगी उखळांत साळी कांडीत असतां, तिच्या हातांतील शंखवलयें ( बांगड्या ) खुळखुळ वाजूं लागलीं. जेव्हां आयत्या वेळीं आपण साळी कांडीत आहों, इतकी आपली दीन स्थिति पाहुण्यांना कळून येणें तिला बरें वाटेना. ह्मणून लज्जेस्तव तिनें आपल्या हातांतील बांगड्या एकेक एकेक अशा उतरून काढण्यास आरंभ केला; आणि तिनें उतरीत उतरीत प्रत्येक हातांत दोन दोनच शिल्लक ठेविल्या; तरी पण पुन्हां कांडूं लागतांच त्या दोन दोन बांगड्यांचा देखील शब्द निघूं लागला; ह्मणून शेवटीं तिनें त्यांतील आणखी एकेक उतरून ठेविली. आतां प्रत्येक हातांत एकेकच बांगडी राहिली, तेव्हां मात्र ध्वनि होईनासा झाला; तद्वत् हे शत्रुमर्दना राजा, लोकतत्त्व काय आहे, हें समजून घेण्यासाठीं ह्या लोकांत फिरत असतां मी सहजगत्या तेथें गेलों, तेव्हां त्या मुलीच्या

कृत्यावरून मी असा उपदेश शिकलों कीं, पुष्कळ मनुष्यें एकत्र राहिलीं असतां कलह उत्पन्न होतो; दोघें मिळून असलीं तरी गप्पागोष्टी चालावयाच्याच; म्हणून साधकानें एकटें रहात असावें हेंच श्रेयस्कर होय.

(२१) **बाण तयार करणाऱ्या कारागिरापासून शिकलेली गोष्ट:**—एकदां बाण तयार करणारा एक कारागीर आपलें काम करीत असतां त्याचें चित्त बाण सरळ करण्याच्या कामीं इतकें गढून गेलें होतें कीं, त्याच्या जवळून नगारे, नौबदी वाजवीत राजाची स्वारी गेली; पण तो समारंभ त्याच्या पाहण्यांत मुळीच आला नाहीं. स्वारी निघून गेल्यावर रस्त्यानें थोड्या वेळानें मागून एक मनुष्य येऊन त्या कारागिराला 'इकडून महाराजांची स्वारी गेली काय?' म्हणून विचारूं लागला; तेव्हां कारागिराकडून त्याला 'मी नाहीं बोवा कांहीं पाहिली.' असें उत्तर मिळालें; यावरून योग्यानें आळस सोडून देऊन प्रथम आसन जिंकावें, नंतर प्राणवायु वश करून घ्यावा. मन हें प्राणाच्या आधीन असल्यामुळें प्राण जिंकला असतां मन निश्चल होतें, आणि मग तें वश झालेलें मन एका आश्रयावर लावावें. यावर कोणी शंका घेईल कीं, 'क्षणभर मन निश्चल झालें तरी, तर कदाचित् विषयवासनेनें पुन्हां विक्षेप पावेल; अथवा सुषुप्तीप्रमाणें मूढ झालें तर काय करावें?' तर यास समाधान—विषयांविषयीं वैराग्य धरावें, म्हणजे चित्त विक्षेप (चंचलता) पावणार नाहीं, व अभ्यासयोगानें तें स्वस्वरूपाचे (आत्म्याचे) ठायीं स्थिर करावें; म्हणजे सुषुप्तीप्रमाणें मूढतर होण्याची भीति नको. जें हें लय विक्षेप पावणारें मन, तें त्या आत्म्याश्रया-

(१) प्राणो यत्र विलीयेत मनस्तत्र विलीयते । मनो विलीयते यत्र प्राणस्तत्र विलीयते ॥ "; **अर्थ**—जिकडे जिकडे प्राण गमन करितो तिकडे तिकडे मन त्याच्या सागोमाग जातें त्याचप्रमाणें जिकडे मन जातें तिकडे प्राण पाठोपाठ आहेच.-हठ.

तर स्थिरता पावलें कीं. हळू हळू कर्मवासना सोडूं लागतें. ह्यावर कोणी शंका घेईल कीं, ' कर्मवासना सुटल्या तर चित्त विक्षेप पावणार नाहीं ही गोष्ट खरी; पण सुषुप्तीप्रमाणें त्याची मूढता निवृत्त करणें कठीण पडेल.' तर यास समाधान-सत्वगुणाची वृद्धि झाली असतां मन रज व तम हे गुण सोडून देतें. कारण, विक्षेप आणि लय हे अनुक्रमें रज आणि तम ह्या गुणांचीं कार्यें होत. ते गुणच नाहींसे झाले कीं, त्यांचीं तीं कार्यें व्हावयाचींच. पुढें रज व तम जाळून टाकणारा सत्वगुणही लय पावतो. अशा रीतीनें सर्व गुणकार्यें नाहींतशीं झालीं असतां चित्तामध्यें कोणत्याही वृत्ती उठत नाहींत; आणि तें ध्येय वस्तूच्या आकारानें राहूं लागतें. ह्या प्रकारें आत्मरूपीं चित्त लीन झालें असतां साधकाला बाह्य किंवा अंतर अशा कोणत्याही विषयाचें किंवा द्वैतभावनेचें स्फुरण होत नाहीं.

( २२ ) **सर्पापासून शिकलेली गोष्ट:**—सर्प लोकांच्या भीतीनें एकटा फिरतो, नेहमीं एका स्थलास धरून रहात नाहीं, सर्वदा सावध असतो, गुहेमध्यें शयन करितो, त्याच्या बाह्य लक्षणांवरून त्याच्या ठिकाणीं विष असल्याचें कळून येत नाहीं, तो कोणाच्या साहाय्याची अपेक्षा ठेवीत नाही व कधीं कधीं थोडे शब्द उच्चारितो; त्याप्रमाणें योगी पुरुषानें एकाकी फिरावें, एकच स्थल धरून राहूं नये, आत्मस्वरूपीं नित्य सावध असावें, एकांतीं बसून योगाभ्यास करावा, आपल्या वर्तणुकीवरून लोकांना आपली स्थिति ओळखूं देऊं नये, अन्नादि प-

( १ ) भक्तिप्रकरण २६ वा अध्याय पहा.

( २ ) " हो कां योगियाचा आचार । करितां देखती लहान थोर १, सविकल्प-निर्विकल्प विचार । न कळे साचार कोणासी ॥ "—नाथ.

दाण्यासाठीं कोणाच्या माहेरीची अपेक्षा धरूं नये. व कारणाशिवाय फारसें बोलूं नये. राजा, सर्प आपण होऊन बीळ वगैरे करीत नाहीं; त्याप्रमाणें योगी पुरुषानेंही ह्या शरीराकरितां मठादिक बांधण्याची उठाठेव करूं नये. कारण, त्या मठापासून सुख होण्याचें एकीकडे राहून त्याची दुरुस्ती करण्यासाठीं उलट त्याच्या नानाविध दुःखें मात्र भोगावीं लागतील. राजा, सर्प दुसऱ्यानें केलेल्या आयत्या बिळांत शिरून सुखानें राहतो; त्याप्रमाणें योगी पुरुषानेंही आयतें असलेल्या मठांत किंवा देवळांत अथवा एखाद्या गुहेंत राहण्याचें नियमन करावें म्हणजे त्या योग्यास परम सुख प्राप्त होतें.

(२३) **कोळीनामक किड्यापासून शिकलेली गोष्ट:**-राजा, कोळी नामक किडा आपल्या नाभींतून सूत्र (सूत) बाहेर काढून सुखानें तें इतस्ततः आडवें तिडवें पसरून त्याचें जाळें तयार करितो, व त्या जाळ्यावर पुष्कळ वेळ क्रीडा करून तो पुनः तीं सूत्रें ग्रासून टाकितो; त्याप्रमाणें भगवान् नारायणही स्वतः आपणापासून विश्व उत्पन्न करितो, व त्यांत बहुकाळ क्रीडा करून, शेवटीं त्या सर्वांचा आपणामध्यें विलय करून सोडितो. म्हणजे आपल्या मायेनें हें सर्व विश्व कल्पाच्या आरंभीं उत्पन्न करितो. व कल्पांतसमयीं काल नामक शक्तीच्या योगें आटोपून घेतो. तो ईश्वरच ह्या सृष्टीचा नियंता होय. हें जग निर्माण केल्यावर तोच ह्याचा आश्रयभूत होऊन असतो. ज्या वेळीं परमात्मा स्वस्वरूपीं निमग्न राहतो, त्या वेळीं प्रकृतीची सत्त्वादिक त्रिगुणात्मक शक्ति (माया), व पुरुषाची उत्पादक व संहारक शक्ति (काल) ह्या

(१) " अनन्याश्चिन्तयन्तो माम् ये जनाः पर्युपासते । तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥ " अर्थ --जो अनन्यभावानें माझें चिंतन ठेवून जे माझी उपासना करितात, त्या नित्य माझ्या ठिकाणीं गढलेल्या पुरुषांच्या योगक्षेमाचा भार सर्वस्वी मी वहातो.—गीता.

दोन शक्ति समान प्रमाणावस्थेस प्राप्त होत असल्यामुळें सर्वत्र निरामय असतें. पुढें त्याच शक्ति सृष्टीच्या उदयकालसमयीं पुनः प्रकट होतात. तो देवादिदेव परमात्मा. प्रकृति ह्मणजे त्रिगुणांची साम्यावस्था; व पुरुष ह्मणजे प्रकृति ज्याची उपाधि तो चिदंश ह्यांचाही नियामक आहे. ब्रह्मादि देव व अन्य मुमुक्षु जन यांनीं मिळविण्याजोगें जें परमपद तें हेंच होय. आणि ह्यालाच कैवल्य ( मोक्ष ) ही संज्ञा आहे. ज्याच्या ठिकाणीं कोणतीही उपाधि नाहीं. व जो सर्वांचा साक्षी आहे. तोच परब्रह्म होय.

हे शत्रुमर्दना राजा, परमात्म्यानें सृष्टि निर्माण करण्याचा विचार केला ह्मणजे त्याची पुरुषशक्ति ( क्रियाशक्ति ) प्रकट होते. व तो पुरुष ( काल ) त्रिगुणमय मायेला क्षुब्ध करून प्रथमारंभीं सूत्र उत्पन्न करितो; त्या सूत्रालाच महत्तत्त्व ( तीन गुणांचें कार्य ) असें म्हणतात. तें सूत्र अनेक मुखांनीं ह्या त्रिगुणात्मक विश्वाची रचना करितें. त्या त्रिगुणकार्य अशा महत्तत्त्वाला सूत्र ह्मणण्याचें कारण असें कीं, हें सूत्र आडवें तिडवें विविध प्रकारांनीं ठायींच्या ठायीं गोंवून हें सर्व विश्व रचितें, आणि ह्या विश्वाच्या संबंधामुळें जीवाला संसार भोगावा लागतो.

( २४ ) **कुंभारीण माशीपासून शिकलेली गोष्ट**:—कुंभारीण माशी आपल्या भक्ष किड्याला भिंतीवर बांधलेल्या आपल्या घरांत कोंडून ठेविते. तेव्हां तो किडा ' आतां शत्रु येऊन मला टोंचील ' अशा भीतीनें त्या कुंभारणीचें ध्यान करितां करितां आपलें पूर्वीचें शरीर सोडिल्यावांचून तिजसारखें स्वरूप पावतो, ह्मणजे कुंभारीण बनून जातो;

( १ ) ज्ञानप्रकरण ४ अध्याय पहा. ( २ ) योगप्रकरण ५,६,७ वे अध्याय पहा.

( ३ ) " एवढी संसार उत्पत्ति । करावया इचि व्युत्पत्ति । यालागीं नांवें क्रियाशक्ति । सांख्य समस्तीं बोलिजे ॥ या क्रियाशक्ति सूत्राच्या ठायीं । जग ओतिलें असे पाहीं । आडवें तिडवें ठायींच्या ठायीं । गोंवून लवलाही वाढवन ॥"—नाथ.

तद्वत् योगी पुरुष आत्म्याच्या निदिध्यास ( अनात्मवृत्तींचा तिरस्कारपूर्वक आत्मवृत्तींचा प्रवाह ) चालवितां चालवितां तो त्या देहामध्येंच ब्रह्मस्वरूप बनून बंधापासून सुटतो.

यदुराजा, ज्या प्रकारें मीं चोवीस गुरूंपासून ज्ञान संपादन केलें त्या प्रकारें यथासांग सांगितलें. त्याशिवाय आणखी कांहीं ज्ञान मिळविलें, तेंही पुढें सांगावयाचें आहे. इति । २८.

# अध्याय २९ वा.

## अवधूताचें ज्ञानोपदेशप्रकरण. ( ११. ९. )

ब्राह्मण उवाचः—

स्वात्मोप शिक्षितां बुद्धिं शृणु मे वदतः प्रभो ॥ २४ ॥

**अवधूत म्हणाला:**—यदुराजा, एवढा वेळपर्यंत कोणाकोणापासून कसकशा गोष्टी शिकलों तें सर्व तुला सांगितलें. आतां मी आपल्या स्वतःच्या देहापासून कित्येक गोष्टी शिकलों. त्या (१) वैराग्य. (२) विवेक. ( ३ )

(१) " कीटकास भ्रमरत्व जडे । हे तों स्वभावें न घडे तें घडे । विचारितां [illegible] ॥ भगवद्ध्यान [illegible] । त्याला भगवद्रूपचि अंतीं । [illegible] सत्यचि कृष्णा । आपुली आपण न जाणे [illegible] । तेथें भगवत्पदप्राप्ति । ते कथा दूरचि नरदेहीं ॥ " आणि याच अर्थाची श्रुतिः—" सहस्त्रैवाहमस्मीति ब्रह्मप्रणवानुस्मरन् भ्रमरकीटकन्यायेन शरीरत्रयमुत्सृज्य सन्यासेनैव देहत्यागं करोति स कृतकृत्यो भवति ॥ " **अर्थ**— मीच ब्रह्म आहें अशा भावनेनें ईश्वरवाचक प्रणव ( ॐकार ) याचें निरंतर ध्यान करणारा पुरुष भ्रमर कीटक न्यायानें स्थूल, सूक्ष्म व कारण या तिन्ही देहांच्या वासनेला सोडून संन्यास घेऊन देहाचा त्याग करतो, म्हणून तो कृतकृत्य होतो.

नरदेहदुष्परिणाम, ( ४ ) नरदेहदुर्लभता, ( ५ ) नरदेहप्रशंसा, ( ६ ) नरदेहकर्तव्य ह्या सहा होत. त्या सर्व क्रमाक्रमानें सांगतों:—

( १ ) वैराग्य:—नरदेहाला जन्म आणि मृत्यु सतत लागलेले आहेत; आणि ह्याच्या अज्ञानामुळें त्रिविधताप भोगावे लागतात. त्या अर्थी ह्या देहावर व ह्याच्या संबंधीं स्त्रीपुत्रादि परिवारावर प्रेम ठेवणें हें सर्वथा व्यर्थ होय.

( २ ) विवेक:—मी ह्या नरदेहामध्यें जन्मास आलों, म्हणूनच मला तत्त्वविचार करितां आला. ह्यास्तव देहाचे मजवर अतिशय उपकार आहेत. खरें; तथापि तो दुसऱ्यांच्या ह्मणजे कोल्ह्याकुत्र्यांच्या किंवा अग्निमृत्तिकादिकांच्या स्वाधीन होणार. अशा विवेकानें मी त्यावरील आसक्ति सोडून खुशाल फिरत असतों.

( ३ ) नरदेहदुष्परिणाम:—राजा, मनुष्य आपल्या देहास इंद्रियसुखें प्राप्त करून देण्याच्या इच्छेनें अनेक कष्ट सोसून धन मिळवितो, व मग स्त्रीपुत्र, आप्तइष्ट, दासदासी, घरदार, धनधान्य इत्यादिक पसारा वाढवून त्याच्या लालनपालनांत तो निमग्न असतो! राजा, एवढा पसारा माजविल्यावर तो मनुष्य अनेक विलास भोगतो खरा; परंतु त्याच्या योगानें त्याची तृप्ति होणें एकीकडेच राहून उलट त्याची तृष्णा मात्र अधिकाधिक वाढत जाते! पुढें तो देह, आयुष्य संप-

( १ ) "देहा ऐसें वोखटें ( वाईट )। पृथ्वीमाजीं नाहीं कोठें। देहा ऐसें गोमटें ( चांगला )। पाहतां न भेटे त्रिलोकीं॥ वोखटें ह्मणूनि त्यागावें। तें मोक्षसुखासी नागवावें। हो कां गोमटें ह्मणोनि भोगावें। तें अवश्य जावें नरकासी॥ तरी हें त्यागावें न भोगावें। मध्यभावें विभागावें। आत्मसाधनीं लागावें। निजस्वभावें हितात्मगीं॥"—**नाथ.**

तांच नाश पावतो. तेव्हां त्यास हा सर्व पसारा जेथच्या तेथेंच निश्चयानें सोडून जावें लागतें; पण त्याची बीजरूप वासना नष्ट झालेली नसते, म्हणून पुढील देहाची योजना तो आधींच करून ठेवितो, व मग ह्या देहास सोडतो ! एतावता ह्या अमंगळ देहाच्या इंद्रियतृप्तीकरितां त्याला बहुविध दुःखें भोगावीं लागतात ! पहा:--ह्या देहाला जिव्हा मधुरादि पदार्थ चाखण्याकरितां जाचीत असते; शिश्न रतिसुखाकडे आकर्षित असतें. उदर अन्नासाठीं तडफडत असतें; कान गायनादिकांकडे ओढित असतात; नाक सुगंध सेवनाकरितां प्रेरित असतें; डोळे सुंदर रूप पाहण्याकडे धांव घेत असतात; हस्तपादादिक अवयव स्वस्थतेकरितां इच्छा करीत बसतात. एकंदरींत पुष्कळशा सवती जशा घरधन्याला ओढओढून त्याची दुर्दशा करितात; त्याप्रमाणें इंद्रियें चोहोंकडून ओढाताणीच्या योगें जर्जर करून सोडितात. अशा स्थितींत त्याला सुख तें कसें मिळावें ?[1]

( ४ ) **नरदेहदुर्लभता**—परमेश्वरानें सत्वादि त्रिगुणात्मकशक्ति जी माया तिच्या योगें प्रथम वृक्ष सरपटणारे प्राणी, पशु,पक्षी, डांस, मत्स्य इत्यादि नानाप्रकारचीं शरीरें निर्माण केलीं. परंतु त्या त्या अनेक जातींच्या शरीरांकडे पाहून देवाच्या चित्ताला संतोष वाटेना. कारण, त्या सर्वांत कैवल्या ( मोक्ष ) प्राप्ति करून घेण्यास योग्य अधि-

( १ ) " धनानि भूमौ पशवश्च गोष्ठे । भार्या गृहद्वारि जनः श्मशाने । देहश्चितायां परलोकमार्गे । कर्मानुगो गच्छति जीव एकः ॥ " **अर्थ**--द्रव्य भूमींत ( पुरलेल्या ठिकाणीं ) रहातें; गाई, म्हशी इत्यादि पशु गोठ्यांतच राहतात; बायको घराच्या दरवाज्यापर्यंतच येते, आप्त सोयरे वगैरे बंधुवर्ग स्मशानापर्यंतच यावयाचे; साडेतीन हात शरीर हें मुद्दां चितेवरच ( मरणावर ) राहतें; मृत्युलोक सोडून परलोकीं जातांना जीवाला आपलें बरें वाईट कर्मच तेवढें बरोबर घेऊन जावें लागतें. बाकी सर्व जेथल्या तेथेंच रहातें.—**विष्णुशर्मा.**

कारी कोणीच दिसेना. शेवटीं त्यानें ज्यामध्यें आत्मज्ञानाच्या योगें ब्रह्मसाक्षात्कार मिळविण्यास योग्य अशी बुद्धि आहे, तो हा मानव देह उत्पन्न केला तेव्हां त्याला आनंद वाटला.

( ५ ) **नरदेहप्रशंसा**—राजा, ह्या नरदेहाची अशी असाधारण योग्यता आहे कीं,त्याच्या योगानें मनुष्याला सर्व इष्टार्थ परिपूर्ण करून घेतां येतो. हा नरजन्म अत्यंत दुर्लभ आहे, म्हणजे चौऱ्यायंशीं लक्ष योनी फिरतां फिरतां शेवटीं ईश्वरकृपेनें ही नरतनु मिळते. आणि ही तनु क्षणभंगुर आहे खरी, तरी इजपासून परम पुरुषार्थ साधून घेतां येण्याजोगा आहे. ह्याच्या पाठीमागें निरंतर अनेक मृत्यु व अपमृत्यु लागलेले असतात, तरी परम पुरुषार्थाच्या योगें जन्ममरणरुप संसार निवृत्त करून घेतां येतो, म्हणून हा नरदेह प्रशंसनीय आहे.

( ६ ) **नरदेहकर्तव्य**—राजा, प्राण्यास उत्तम असा नरदेह प्राप्त झाल्यावर मनुष्यानें सायुज्य प्राप्तीच्या साधनांत सर्वकाल निमग्न व्हावें हेंच त्याचें कर्तव्य होय. हें साधन त्यानें आजचें उद्यावर टाकूं नये. कारण, हा नरदेह क्षणभंगूर आहे, केव्हां नाश पावेल ह्याचा नियम सुद्धां नाहीं, आणि अशा क्षणभंगूर देहाभोंवतीं अनेक विघ्नें टपून बसलेलीं असतात! ह्यास्तव हा देह पडला नाहीं, तोंच विचारी पुरुषानें आत्मज्ञान संपादण्याच्या यत्नास लागावें हाच त्याचा परमलाभ होय. विषयसुख भोगण्यामध्यें अगदीं कालक्षेप करूं नये. कारण, हें सुख पश्वादि योनींमध्यें सुद्धां असतेंच!

---

( १ ) " पावोनियां मनुष्यपण । जो न साधी ब्रह्मज्ञान । तो दाढीचा मेंढा जाण । विषयाचरणा विचरतु ॥ "—**नाथ**. ( २ ) ब्रह्मज्ञान न संपादितां पोकळ शास्त्रज्ञान, संन्यास, वेदाध्ययन, मौन, धर्माचरण, अग्निहोत्र इत्यादि खटपटी व ढोंगें व्यर्थ होत.—**नाथांचा अभिप्राय**. ( ३ ) " साधावया आत्मलग्न । सावधान विजयरावें मन । तेणें साक्षेपें आपण । सायुज्य लग्न साधावें ॥ "—**नाथ**.

राजा, असा प्रकारें विचार करि[illegible] करितां मला वैराग्य उत्पन्न झालें, तेव्हां मी देहादिकांवरची आसक्ति सोडिली. व अहंकार दूर केला. या विविध गुरूपासून मिळविलेल्या ज्ञानरूप दीपप्रकाशानें मला आत्म्याचा साक्षात्कार झाला. व तसेंच मी स्वस्वरूपीं स्थिर राहूनच या भूमंडलावर पर्यटन करीत राहतों. राजा, कदाचित् तूं असें ताणशील कीं 'ब्रह्मसाक्षात्काराला इतके पुष्कळ गुरू कशाला पाहिजेत! श्वेतकेतु भृगु याज्ञवल्क्य इत्यादि मुनींनीं कांहीं बहुत गुरू केले नव्हते.' तर त्यांस उत्तर सांगतों: ब्रह्म हें अद्वितीय (एक) असतांना ऋषींनीं आपापल्या मतानुसार बहुत प्रकारांनीं वर्णिलें आहे. यास्तव एका गुरूपासून शिकलेलें ज्ञान स्वच्छ व अत्यंत स्थिर असें होत नाहीं. म्हणून मी हे चोवीस गुरू केले. हे सर्व गुरू म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार करून देणारे आहेत असें मात्र समजूं नको; पण हे अंतर्गत असलेल्या असंभावना, विपरीतभावना इत्यादि संशयांची निवृत्ति करणारे होते. म्हणून हे पुष्कळ असणें हें योग्यच आहे.

**भगवान् श्रीकृष्ण म्हणाले:** — उद्धवा, त्या ब्राह्मणाची (दत्तात्रयाची) बुद्धि महान् गंभीर असे! त्यानें यदुराजाला याप्रमाणें सांगून त्याचा निरोप घेतला. तेव्हां राजानेंही वंदन करून त्याची पूजा

(१) "[illegible] तरल्यानां अहला गळे। तें देह अदृष्टयोगें चळे। जैसा गुळेले पान वायुवळें। पाडेल खोळे सर्वत्र ॥" —**नाथ.**

(२) "एक म्हणतां ब्रह्म सगुण। एक म्हणतां तें निर्गुण। ऐसे वाद करितां दारुण। युक्ति खंडण अभिमानें ॥" —**नाथ.**

(३) "कपोत-मीन-कुरंग-कुमारी-गज-पन्नगः। पतंगः कुररश्चाष्टौ ह्येयार्थे गुरवो मताः ॥" **अर्थ**—कपोत, मत्स्य, हरिण, कुमारी, गज, सर्प, पतंग व टिटवा हे आठ गुरु, साधकानें कोणकोणत्या गोष्टींचा त्याग करावा तें शिकण्यासाठीं मानिलेले आहेत.

व प्रार्थना केली. पुढें तो ब्राह्मण संतुष्ट होत्साता, जसा आला तसाच सहज कोणीकडे तरी निघून गेला! उद्धवा, आपल्या पूर्वजांचाही पूर्वज अशा त्या यदुराजानें अवधूताचें भाषण श्रवण करून त्या उपदेशाप्रमाणें सर्वसंग परित्याग केला, व सर्वत्र समभाव ठेविला, आणि शेवटीं तो सायुज्यपद पावला. ह्यास्तव तूंही असेंच अद्वैतज्ञान मिळीव, ह्मणजे सहजच मजप्रत पावशील. इति । २९.

---

# अध्याय ३० वा.

## बद्धमुक्तांची व्याख्या. (११-१०।११)

उद्धव उवाच:--

कथं वर्तेत विहरेत्कैर्वा ज्ञायेत लक्षणैः ॥
किं भुंजीतोथविसृजेच्छयीता ऽऽसीत याति वा ॥ ३६ ॥

**उद्धव म्हणाला:**--श्रीकृष्णा, सत्वादि तीन गुण असतील तेव्हां त्यांच्या अहंकारामुळें जीव बंध पावतो, आणि अहंकार सुटला कीं, मुक्त होतो असें पूर्वीं मला सांगितलेंस, तर बद्ध पुरुष कसा ओळखावा, व मुक्त पुरुष कसा ओळखावा, त्याचें आचरण कसें असतें, तो सुखोपभोग कसा घेतो, खातो काय, देहाची शुद्धि कसकशी करितो, निजतो कसा, बसतो कसा आणि चालतो कशा रीतीनें? हें सर्व उलगडा करून मला सांग.

**भगवान श्रीकृष्ण ह्मणाले:**—उद्धवा, ज्ञानी (मुक्त) पुरुष याच देहावर रहात असतो, तरी तो वस्तुतः देहावर नसतोच. यास दृष्टांत–जसा स्वप्नांतून जागा झालेला पुरुष स्वप्नांतील देहावर नसतो; म्हणजे जागृत झाल्यावर 'स्वप्नांत आपण वाघाच्या तोंडीं सांपडलों

होतो.' ही गोष्ट आठवेल असली तरी मनुष्याला दुःख किंवा सुख वाटत नाहीं; तद्वत् स्वप्नतुल्य संसारांतून जागृत झालेल्या ज्ञानी पुरुषाला त्या मिथ्या देहाचा अभिमान नसल्यामुळें देहनिमित्तक सुखदुःख नसतें, अर्थात् तो देहावर नसतो हें उघड आहे. आणि अज्ञानी (बद्ध) पुरुष, वस्तुतः देहामध्यें (संसारस्वप्नांत) रहात नसतांही देहस्थ असतो; म्हणजे अभिमानानें देहापासून उद्भवणारीं सुखदुःखें भोगीत असतो. यास दृष्टांत-स्वप्न पाहणारा मनुष्य वास्तविक अंथरुणावर पडलेला असतो; पण स्वप्नांत आपण वाघाच्या तोंडीं सांपडलों, असें पाहून खरी स्थिति विसरल्यामुळें भिऊन जातो; तद्वत् जीव हा वस्तुतः ज्ञानरूप असल्यामुळें त्याचा शरीराशीं कांहीं एक संबंध नाहीं; पण त्याचे संबंध आपल्यावर वळेंच आरोपित करून घेऊन तो अज्ञानी पुरुष देहनिमित्तक सुखदुःखें भोगीत असतो. जो ज्ञानी पुरुष इंद्रियांनीं आपापले विषय ग्रहण केले, तरी तो त्यांविषयीं अभिमान धरीत नाहीं. कारण, तो असें समजतो कीं, गुणांनीं गुण ग्रहण केले, त्याचें आपणाकडे काय आहे? असा अभिमान न धरल्यामुळें तो निर्विकार (रागद्वेषादि विकारांनीं रहित) असतो. आणि अज्ञानी पुरुष तर पूर्वकर्माच्या आधीन असणारें जें हें शरीर त्यामध्यें रहात असतां इंद्रियांनीं

(१) "स्वप्नींचें राज्य आणि भीक। जागृतीं मिथ्या देखती देख। तैसें देहाश्रित जे सुखदुःख। तें मिथ्या देख मुक्तांसी॥"—**नाथ.**

(२) "स्वप्नीं घाय लागले खड्गाचे। तेणें जागृतीं म्हणे मी न वांचें। ऐसें निबिड भरितें भ्रमाचें। तें बद्धाचें लक्षण॥"—**नाथ.**

(३) "तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः। गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते॥" **अर्थ**—हे महाबाहो (अर्जुना) तत्त्वज्ञानी तर गुणकार्य इंद्रियेंही गुणकार्य विषयांवर स्वभावतः जातात; असें मानून गुणकर्मविभागांवर आसक्त होत नाहीं.—**गीता.**

केलें या कर्माच्या योगें देहादिकांवर ' मीच तीं कर्में करणारा ' अशा अभिमानानें बांधला जातो; म्हणून मुक्त पुरुष व बद्ध पुरुष ह्यांच्यामध्यें सर्व गोष्टींत अशाच प्रकारचा भेदभाव दृष्टोत्पत्तीस येतो. आतां बद्धाचीं व मुक्ताचीं अंतरंग लक्षणें सांगतों:—

**बद्धमुक्तांचीं अंतरंग लक्षणें:** उद्धवा, मुक्त पुरुषाच्या ठिकाणीं पूर्ण वैराग्य असल्यामुळें निजणें, बसणें, फिरणें, स्नान करणें, पाहणें, स्पर्श करणें, हुंगणें, खाणें, पिणें, ऐकणें इत्यादिकांमध्यें तो मुळींच बद्ध होत नाहीं; परंतु बद्ध पुरुषाच्या ठिकाणीं वैराग्य नसल्यामुळें ह्या सर्व क्रियांमध्यें तो पूर्ण बद्ध होतो! इंद्रियांच्या क्रिया दोघेही करीत असतात खरे; पण मुक्त त्या क्रियांविषयीं अनासक्त असल्यामुळें तो त्या सर्वांचा साक्षी असतो. आणि बद्ध पुरुष त्या क्रियांविषयीं आसक्त असल्यामुळें इंद्रियांनीं केलेल्या क्रिया तो स्वतः भोगतो. यास दृष्टांत—आकाश सर्वत्र व्यापक असूनही कोणाशीं लिप्त झालेलें नसतें, सूर्य उदकांत प्रतिबिंबित झाला तरी त्यावर आसक्त नसतो. आणि वायु सर्वत्र फिरतो तरी कोठेंच चिकटून रहात नाहीं; तद्वत् ज्ञानी देहावर रहातो, तरी त्याचा अभिमान धरीत नसल्यामुळें देहावर नसतो. ज्ञानी पुरुष वैराग्याच्या योगानें तीक्ष्ण करून घेतलेल्या ज्ञानदृष्टीनें असंभावनादि सकल संशय निवृत्त करितो. अर्थात् जसा जागा झालेला मनुष्य स्व-

---

(१) " प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः । अहंकारविमूढात्मा कर्ताहमिति मन्यते ॥ " अर्थ —प्रकृतीचे गुण सर्वतोपरी कर्में करीत असतात, आणि अहंकारानें वेडावून गेलेला हा जीव ' मीच कर्ता ' असें मानितो, अर्थात् अभिमानानें बांधला जातो.—गीता. तसेंच नाथ सांगतात:—" जो न करितांचि चोरी। मी चोर म्हणे राजद्वारीं । तो मारिजे लहानथोरीं । तैसी परी जडजीवां ॥ "

(२) " सूर्यकांतीं सविता । अग्नि उपजवूनि अकर्ता । तैसा निजतत्वाचा ज्ञाता । करोनि अकर्ता कर्मासी ॥ "—नाथ.

भ्रमत सृष्टींतून मुक्त होतो; त्याप्रमाणें तो ज्ञानी देहादिक त्रिविध प्रपंचांतून मुक्त होतो. ज्या पुरुषाचे प्राण, इंद्रियें, मन व बुद्धि त्यांच्या वृत्ती संकल्परहित झाल्या, तो पुरुष देहाकार म्हणून असला तरी संकल्पशून्य वृत्तीनीं विहार करीत असतो; म्हणून देहाच्या सुखदुःखादि गुणांनीं मुक्त असतो. इतका वेळ सांगितलेलीं हीं बद्धमुक्तांचीं लक्षणें अंतरंग असल्यामुळें केवळ ज्यांचीं त्यांना कळण्याजोगीं असतात. आतां त्यांपैकीं मुक्तांचीं सर्वत्रांना कळण्याजोगीं बाह्य लक्षणें सांगतों:–

मुक्ताचीं बाह्य लक्षणें:– उद्धवा, असा ज्ञानी पुरुषाच्या शरीराला दुष्ट लोक किंवा हिंस्र प्राणी पीडा देत असले, अथवा एखादे वेळीं कोणी पूजा, अर्चा करूं लागले, तरी त्याच्या चित्ताला हर्ष विषाद कोणताच विकार होत नाहीं. मुक्त पुरुषाच्या मनांत अद्वैत भावना इतकी सुदृढ झालेली असते कीं, त्यास कोणी बरें म्हणो अथवा वाईट म्हणो, कोणी त्याशीं दुष्टपणानें वागो किंवा प्रेमळपणानें वागो, पण तो कोणाची स्तुति करीत नाहीं, आणि निंदाही करीत नाहीं. अथवा कशाचा विचारही करीत नाहीं. तो सदा सर्वकाळ स्वस्वरूपीं रममाण असून लोकांत वेड्यासारखा वागत असतो. उद्धवा, येथपर्यंत बद्धमुक्तांचें व्याख्यान झालें. आतां जीवन्मुक्ताचें विवरण गुरुशिष्यसंवादरूपानें सांगतों:––

**शिष्य म्हणतो- गुरुजी, जीवन्मुक्त कोणास म्हणावें ?**

---

( १ ) " यः कण्टकैर्वितुदति चंदनैर्यश्च लिंपति । अक्रुद्धोऽपरितुष्टश्च समस्तस्य च तस्य च ॥ " **अर्थ**—एखादा कोणी आंगाला कांटे टोंचीत असला तरी ज्ञानी पुरुष त्याच्यावर रागावत नाहीं; बरें दुसरा कोणी चंदनाची उटी देऊं लागला तरी त्या योगें संतोष मानीत नाहीं; तर तो त्या कांटे टोंचणाराशीं किंवा उटी देणाराशीं सारख्याच वृत्तीनें असतो, अर्थात् रागद्वेषरहित होऊन अखंड सच्चिदानंद सुखाचा अनुभव घेत शांत असतो.—याज्ञवल्क्यमहामुनि.

गुरु-बा शिष्या, मी मनुष्य, ब्राह्मण, शूद्र इत्यादि आहे, हा जसा दृढ निश्चय झालेला असतो; तद्वत् "अहंब्रह्मास्मि ( मी ब्रह्म आहें )" असें दृढ ज्ञान ज्यास झालेलें असतें, तो जीवंत असतांही मुक्त आहे; व मग त्याचीं सर्व कर्में निवृत्त होतात.

शिष्य-कर्में किती प्रकारचीं आहेत?

गुरु-आगामी, संचित व प्रारब्ध अशीं तीन प्रकारचीं आहेत. त्यांपैकीं, आगामी कर्म ह्मणजे पुढें घडणारें पुण्य-पापरूप कर्म; संचित कर्म ह्मणजे अनंत जन्मांचीं कर्में जन्मप्राप्तीस जीं बीजरूपानें शिल्लक राहतात तीं होत; आणि प्रारब्धकर्म ह्मणजे विद्यमान शरीराला सुखदुःखादिक उपभोग मिळत असलेलीं कर्में हीं होत.

शिष्य—प्रारब्धकर्म कोणत्या उपायानें नाश पावतें?

गुरु—बाळा, "नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि" ह्मणजे कोटिकल्प उल्लंघन केले, तरी प्रारब्ध कर्माचा भोगावांचून क्षय होत नाहीं, अर्थात् "प्रारब्धकर्मणां भोगादेव क्षयः ॥" ह्मणजे तें प्रारब्धकर्म भोगेंकरूनच नष्ट होतें.

शिष्य—गुरुजी, जसें प्रारब्धकर्म भोगेंकरून नाश पावतें; तसें संचित आणि आगामी हीं कर्में नष्ट होण्यास कोणतीं साधनें असावींत?

गुरु—बा शिष्या, "अहंब्रह्मास्मि ( मी ब्रह्म आहें )" या महावाक्याच्या दृढ अभ्यासेंकरून संचितकर्म नाश पावतें; आणि आगामीकर्म अपरोक्षज्ञान झाल्यानंतर "कमलिनीदलमंबुवत्" ह्मणजे कमलपत्रावरील जलाप्रमाणें त्या ज्ञान्यास तें कर्म मुळींच स्पर्श करीत नाहीं.

शिष्य—तर मग त्या ज्ञान्याच्या कर्मांचा विनियोग कसा होतो?

गुरु—जीं मनुष्यें ज्ञानी पुरुषाप्रत भजतात, स्तवितात व पूजितात त्यांप्रत ज्ञान्याच्या देहद्वारें जें पुण्यपाप कर्म घडतें, तें सर्व जातें; आणि जे लोक त्यांची निंदा व द्वेष करितात, त्यांप्रत ज्ञान्याच्या देहद्वारें घ-

डलेलें पापकर्म तें सर्व जातें. याप्रमाणें संचित व आगामी ह्या दोन्ही कर्मांचाही त्याच्याकडे कांहींएक संबंध उरत नाहीं, अर्थात् त्याचें पुण्य-पाप लोकच ग्रहण करीत आहेत. मग तो संसार उल्लंघून विद्यमान देहांतच अखंड सच्चिदानंद सुखाचा अनुभव पावून शोकरहित होतो, अर्थात् " तनुं त्यजतु वा काश्यां श्वपचस्य गृहेऽथवा ॥ ज्ञानसंप्राप्तिसमये मुक्तोऽसौ विगताशयः ॥ " अर्थ—ज्यावेळीं अपरोक्षज्ञान प्राप्त होतें, त्या वेळींच त्याची तनु, काश्यादि क्षेत्रांमध्यें अथवा चांडालगृहीं पडली असतांही तो मुक्तच आहे. आतां बद्धमुक्तांहून निराळे जे पढतमूर्ख आहेत, त्यांची स्थिति कशी असते, तेंही सांगतों:—

**दांभिकांची स्थिति:**—उद्धवा, कित्येक पुरुष वेदार्थ जाणण्यांत धुरीण असतात हें खरें; परंतु त्यांत सांगितल्याप्रमाणें ब्रह्मचिंतन चालविण्याचा प्रयत्न करीत नसतात, अशांची स्थिति शोचनीय होय. अशा पुरुषांनीं शास्त्राध्ययनाचे श्रम व्यर्थ केले असें म्हणण्यास हरकत नाहीं. उदाहरण—आपण गाय बाळगिली असें कल्पूं. जर ती दुभती असली तर बरी, नाहीं तर तिला पाळण्याची दगदग मात्र सोसावी लागेल; त्याप्रमाणें पुष्कळ शास्त्रांचें अध्ययन केलें, त्यापासून मिळविलेल्या ज्ञानास आत्मसाक्षात्कार असेल तरच मोक्षाची प्राप्ति होईल; नाहींपेक्षां व्यर्थ विद्यामर्दें करून दुःख भोगावें लागेल. इति । १०.

---

(१) " स्रवूनि क्षीर स्रवती स्तन । तेथें लागोनि गोचिड । असुद्ध (रक्त) सेवती अति मूढ । तेवीं विद्वांस दृढ विषयांसी ॥ गांचिडाचे मुखीं क्षीर रिघे । तो असुद्धा वीर्यानि तें नेघे । तेवीं ज्ञान विकोनि अंगें । विद्वांसू मागे विषयातें ॥" नाथ.

# अध्याय ३१ वा.

## ज्ञानयोगाचें संक्षिप्त वर्णन (१-२८.)

श्रीभगवानुवाचः—

**परस्वभावकर्माणि न प्रशंसेन्न गर्हयेत् ॥**
**विश्वमेकात्मकं पश्यन्प्रकृत्या पुरुषेण च ॥ १ ॥**

**भगवान श्रीकृष्ण ह्मणालेः**— बा उद्धवा, एवढा वेळपर्यंत अनेक प्रकारांनीं मीं तुला ज्ञानोपदेश केला. व तेंच ज्ञान पुन्हां संक्षेपरीतीनें सांगितलें असतां तें सर्व तुझ्या चित्तांत दृढ होऊन पुढें प्रमाद उद्भवण्याची भीति राहणार नाहीं. ह्मणून आतां मी त्या ज्ञानयोगाचें संक्षिप्त विवेचन सांगतों, तूं एकाग्र चित्तानें श्रवण कर:—

**निंदा स्तुति वर्ज्यः**—उद्धवा, विचारी मनुष्यानें दुसऱ्याचा स्वभाव व कर्में ह्यांची स्तुति किंवा निंदा कांहींही करूं नये. कारण, प्रकृति आणि पुरुष यांपासून उत्पन्न झालेलें हें सर्व विश्व एकरूपच आहे; ह्मणून ह्यांमध्यें भेद मानण्याला मुळींच आधार नाहीं. जो कोणी दुसऱ्यांच्या गुणावगुणांची प्रशंसा किंवा निंदा करितो, तो या मिथ्या द्वैताच्या ठिकाणीं अभिमान बाळगीत असल्यामुळें ज्ञाननिष्ठारूप सुखापासून शीघ्र भ्रष्ट होतो!

**द्वैतदृष्टि अनर्थावहः**— उद्धवा, द्वैतदृष्टि ही सर्वथैव अनर्थास कारण आहे. पहा--जसें राजस अहंकाराचें कार्य जो इंद्रियसमूह तो निद्रेनें पराभूत झाल्यावर देहस्थित जीव केवळ मनाच्या योगानें मायामय स्वप्नसृष्टीला सत्यवत् पहातो, व पुढें त्या निद्रेची शक्ति वाढूं लागली कीं, मनाचाही लय होतो, तेव्हां जीवाची चेतनकला नष्टप्राय होऊन तो जीव मृत्यूसमान जी निद्रा तिला प्राप्त होतो; तद्वत् ज्याची द्वैतदृष्टि

आहे असा पुरुष संसारसंबंधामुळें मोहास प्राप्त होऊन मिथ्या ( स्वप्न-तुल्य ) सृष्टीला सत्यवत् पहातो. आणि पुढें मिथ्याभूत द्वैताभिमान बळावत जाऊन त्याची बुद्धि भ्रष्ट होते. तेव्हां त्या पुरुषाची ज्ञानकला नष्ट होऊन तो दुःखमय जन्ममरणरूप संसारास प्राप्त होतो !

मिथ्या पदार्थांचें भयदायकत्वः उद्धवा, मिथ्याभूत जें विश्व त्यामध्यें चांगलें कोणतें व वाईट कोणतें ? सृष्टीतील जो जो पदार्थ वाणीनें बोलला जातो, इतर इंद्रियांनीं ज्याचा अनुभव घेतां येतो, तसेंच मनानें चिंतिला जातो, ते सर्व पदार्थ मिथ्या होत. यावर तूं शंका घेशील कीं, 'दृश्यादिक सकळ पदार्थही मिथ्याच आहेत, तर त्यांपासून ( त्यांच्या ठिकाणीं आसक्ति ठेविल्यापासून ) भीति तरी कसली ?' यास समाधान-बाबा ! आकाश, छाया, प्रतिध्वनि हे सर्व मिथ्या असूनही त्यांपासून भीति उद्भवतेना ? यास दृष्टांत रज्जूस ( दोरीस ) सर्प, छायेस वागुलबोवा, प्रतिध्वनीस पिशाच असें मानण्यानें चित्तांत भीति उद्भवते. व तिच्यामुळें दुःख संभवतें, आणि या दुःखाच्या निवृत्तीसाठीं मनुष्यें मांत्रिकास आणून त्याजकडून नानाविध मंत्रक्रिया करवितात. तेव्हां त्या भीतीपासून उद्भवलेल्या दुःखाची निवृत्ति होते; तद्वत् मिथ्या जगतांतील सकळ पदार्थांच्या ठिकाणीं आसक्ति जडली कीं, राग, द्वेष उद्भवणें हें साहजिकच आहे, त्यामुळें सर्वत्र द्वैत भासूं लागतें. व मग जन्ममरणरूप संसार प्राप्त होतो. आणि त्याच्या निवृत्तीकरितां तत्त्वज्ञ पुरुषाकडून अद्वैत ज्ञान संपादन करून घेतात, तेव्हां त्या रागद्वेषांपासून उद्भवलेल्या संसाराची निवृत्ति होते.

**श्रुतींची अद्वैतपरता:**—उद्धवा, आतां तूं म्हणशील कीं, 'श्रुतींनींच द्वैताचें निरूपण केलें आहे, मग तें खोटें कसें म्हणतां येईल ?' तर यास समाधान असें:-बाबा, हें तुझें म्हणणें जरी खरें आहे, तरी त्या श्रुतींचा उद्देश चित्तशुद्धि होऊन तद्द्वारा मोक्ष प्राप्त करून घेण्याकडे

आहे, असें असतांही द्वैतवादी लोक इंद्रियतृप्तीकरितां त्या श्रुतींची बळेंच ओढाताण करून द्वैतपर अर्थ करीत असतात. वस्तुतः श्रुतींचा अभिप्राय अद्वैतपरच आहे. पहा-" अद्वैतपरमानंदो विभुर्नित्यो निष्कलङ्को-निर्विकल्पो निरंजनो निराख्यातः शुद्धो देव एको नारायणो न द्वितीयोऽस्ति कश्चित् " व "एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा " इत्यादि श्रुति अद्वैतबोधक आहेत; तसेंच " हें विश्व उत्पन्न होतें तें, व जो यास उत्पन्न करतो तो आत्माच होय. " ज्याचें रक्षण केलें जातें व जो रक्षण करतो तोही सर्व शक्तिमान विश्वात्माच होय " "ज्याचा नाश होतो व जो नाश करतो तो एकच सर्वात्मा ईश्वर होय. " ह्या श्रुत्यर्थवाक्यांचा तात्पर्यार्थ असा आहे कीं, आत्म्याची व्याप्ति सर्वत्र अद्वैतपणानें ओतप्रोत भरलेली आहे. उद्धवा, श्रुतीचें रहस्य असें असल्यामुळें आध्यात्मिकादि त्रिपुटींचा भेद आत्म्याच्या ठिकाणीं निर्मूल आहे. ह्यावर तूं शंका घेशील कीं, ' जें निर्मूल आहे, त्याची प्रतीति कशी होते ' तर यास समाधानः—हें त्रिगुणमय विश्व मायेनें रचिलेलें असल्यामुळें मृगजलाप्रमाणें मिथ्या पदार्थांनेंही भान स्वप्नाप्रमाणें प्रतीतीस येतें.

**समदृष्टि**—उद्धवा, हें मीं सांगितलेलें ज्ञान आणि विज्ञान ( अनुभव ) यांचें तत्त्व जाणणारा पुरुष कोणाची निंदा किंवा स्तुति करीत नाहीं, तर सूर्याप्रमाणें सर्वत्र समदृष्टि ठेवून लोकांत वागतो. प्रत्यक्ष, अनुमान, श्रुति, आणि अनुभव या चार प्रमाणांनीं हें सर्व दृश्य विश्व आद्यंतवंत असल्यामुळें मिथ्या आहे असेंच सिद्ध होतें. याकरितां वि-

* ज्ञानप्रकरण १६ वा अध्याय पहा.

( १ ) ज्ञानप्रकरण १०, ११, १२, वे अध्याय पहा.

चारी पुरुषानें हे सर्व देहादिक पदार्थ मिथ्या आहेत, असें जाणून त्यांच्या ठिकाणीं असक्ति न धरितां वर्तन करावें.

**संसारी कोण? उद्धव म्हणालाः**—हे श्रीकृष्णा! आत्मा सकल पदार्थांचा द्रष्टा असल्यामुळें केवळ चिद्रूप आहे, व देह हा दृश्य असल्यामुळें केवळ जड आहे, तर मग हा संसारभास दोहोंच्या ठिकाणीं दिसून येत नाहींसा झाला. पहाः—संसार हा आत्म्यास संभवतच नाहीं कारण तो द्रष्टा म्हणजे सर्वांचा साक्षी असून प्रकाशक आहे. बरें देहास तो आहे म्हणावें, तरी तसेंही म्हणतां येत नाहीं. कारण, देह हा दृश्य व अनात्मा आहे. आतां दोहोंसही नाहीं असें म्हणावें तर त्याची प्रत्यक्ष प्रतीति येते. यामुळें मुळींच संसार नाहीं असेंही सिद्ध होत नाहीं. तर संसार प्राप्त होतो तो कोणाला? भगवंता, आत्मा हा अविनाशी, निर्गुण, शुद्ध, स्वयंप्रकाश व अपरिच्छेद असा आहे; आणि देह हा त्याहून विलक्षण प्रकारचा दृश्य आणि जड आहे. दृष्टांतः—जसें दाहककाष्ठाच्या ठिकाणीं अग्नि व काष्ठ यांचा भेद जरी दिसत नाहीं, तरी अग्नि हा प्रकाशक आणि काष्ठ हें प्रकाश्य ( प्रकाशित होणारें ) आहे; तद्वत् देह व आत्मा यांच्यामध्यें जरी भेद दिसत नाहीं, तथापि आत्मा प्रकाशक व देह प्रकाश्य होय. ह्यावरून जन्ममरणप्रवाह दोहोंसही नाहींसा होतो. ह्यास्तव ह्याचा गूढार्थ काय तो मला सांगावा.

**अहंकारी जीवात्मा ( चिदाभास )— श्रीकृष्ण म्हणालेः**—बा उद्धवा, संसार दोहोंच्या ठिकाणीं दिसून येत नाहीं असें जें तूं म्हण-

( १ ) " असक्तिरनभिष्वंगः पुत्रदारगृहादिषु । नित्यं च समचित्तत्व मिष्टानिष्टोपपत्तिषु ॥ " अर्थ—साधक पुरुषानें स्त्रीपुत्र, घरदार इत्यादिक पदार्थांचे ठायीं आसक्त न होतां बरा किंवा वाईट जो कांहीं प्रारब्धकर्मानुसार प्राप्त झालेला फलभोग भोगीत सर्वत्र समदृष्टि ठेवून लोकांत वागावें. —गीता.

तोस तें खरें आहे, परंतु त्या उभयतांच्या अन्योन्याध्यासामुळें त्या संसाराचा भास होतो. दृष्टांत–नौकावृक्षन्यायवत् ह्मणजे जोंपर्यंत नौकेचा अध्यास झाडावर व झाडाचा अध्यास नौकेवर असा अन्योन्याध्यास होतो, तोंपर्यंत अविवेक दृष्टीनें, जाणारी नौका उभी राहिल्यासारखी व उभें असलेलें झाड धांवणाऱ्या नौकेसारखें धांवत आहे असा भास होतो; तद्वत् जोंपर्यंत आत्म्याचा अध्यास अनात्म्यावर व अनात्म्याचा अध्यास आत्म्यावर असा अन्योन्याध्यास होतो, तोंपर्यंत अविचारदृष्टीनें देह, इंद्रियें व प्राण इत्यादि अनात्म पदार्थांशीं आत्म्याचा संबंध आहे असा भास होतो; व हा भासमान संसार मिथ्या असूनही प्रत्यक्ष प्रतीतीस येतो. आतां याचा सिद्धांत सांगतों:–उद्धवा, जोंपर्यंत कोणीही मनुष्य, चेतन आत्म्याचा जड देहाशीं संबंध आहे असें मानितो, तोंपर्यंतच त्या अज्ञान्यास संसार प्राप्त होतो; पण त्याच पुरुषाची, विचारदृष्टीनें आत्म्याचा देहाशीं कांहींएक संबंध नाहीं, अशी भावना दृढ झाली ह्मणजे त्यास संसारबंध मुळींच राहणार नाहीं. ह्यावर तूं शंका घेशील कीं, ' देहादि पदार्थ जर मिथ्या आहेत, तर संसाराभासास तरी कारण कसे होतील? ' तर यास समाधान–देहादि पदार्थांस जरी सत्यता नाहीं, तरी विषयांचें चिंतन करणारास त्यांची प्रतीति येतेच. दृष्टांत–स्वप्नांतील सकल पदार्थ खोटे असतात, तरी स्वप्न पाहणारास ते सत्य भासून त्यांपासून हर्षशोकांची प्राप्ति होते; तद्वत् संसारांतील सर्व पदार्थ मिथ्या आहेत, तरी विषयोपभोग भोगणारा मनुष्य ते सत्य मानून त्याचाच उपभोग घेत असतो; ह्मणून त्यास त्यांपासून सुखदुःखादिक विकार प्राप्त होतात. ह्यावर तूं शंका घेशील कीं, ' मिथ्या पदार्थांचे ज्ञानीसुद्धां उपभोग घेत असतात; तेव्हां त्यांच्या ठिकाणीं विषयांची स्फूर्ति ( प्रतीति ) होणारच ! ' तर ह्यास समाधान–जरी त्यांचे ठायीं विषयांची प्रतीति होते, तरीं ज्ञानी मिथ्यात्व निश्चयानें व-

र्तेत असल्यामुळें. त्यांजपासून त्यास कोणतेही विकार प्राप्त होत नाहींत, उलट आनंद होतो. दृष्टांत—जो मनुष्य जागा झाला नाहीं. त्यास स्वप्न हें हर्षशोकांस कारण होतें; परंतु जो जागृत झाला त्यास त्या स्वप्नांत पाहिलेले पदार्थ व त्याकाळीं घडलेले हर्षशोक प्राप्त होत नाहींत. व स्वप्न वृत्तांताचें स्मरण असलें तरी त्यापासून कांहीं अनर्थ न होतां मनास एका प्रकारचा चमत्कार वाटतो; तद्वत् जो पुरुष आत्मज्ञान प्राप्त करून घेत नाहीं. त्यास संसार हा अनर्थास कारण होतो; परंतु ज्यानें दृढ अपरोक्षज्ञान मिळविलें त्यांत त्या संसारांतल्या पदार्थांपासून हर्षविषाद प्राप्त होत नाहींत; व त्यास विषयप्रतीति झाली. तरी त्यापासून कांहीं अनर्थ न होतां उलट विनोद वाटतो! आतां यावर तूं शंका घेशील कीं. 'मिथ्या पदार्थांच्या प्रतीतीपासून ज्ञान्याला अनर्थ प्राप्त होत नाहींत, तरी विषयांची स्फूर्ति आहे तोंपर्यंत मोक्ष संभवणार नाहीं' तर यास समाधान:—ज्ञानी पुरुषास विषयस्फूर्ति होते. तरी तो त्यांच्या ठिकाणी आसक्त होऊन रहात नाहीं. कारण. पूर्वीच त्यास ब्रह्मसाक्षात्कार झालेला असतो; म्हणून तो मुक्तच होय. भय, हर्ष, शोक, क्रोध, लोभ. मोह. इच्छा. जन्म व मृत्यु हे सर्व विकार अहंकारासच आहेत; चिद्रूप आत्म्यास मुळींच नाहींत. पहा निद्रा व समाधि यांमध्यें अहंकार लीन झालेला असतो. तेव्हां हे सर्व विकार दिसून येत नाहींत, आणि तो त्य पासून उत्थान (जागा) पावला कीं, पुन्हां उदय पावतात, अर्थात् हर्षशोकादि विकार अहंकाराचे ठायीं आहेत असें सिद्ध झालें. शिवाय सुखदुःखादि देहधर्म जसे दृश्य आहेत; तद्वत् अहंकारही दृश्य

(१) "सुप्ते ऽहमि न दृश्यन्ते सुखदोषप्रवृत्तयः ॥ अतस्तस्यैव संसारो न मे संसृतिसाक्षिणः ॥" **अर्थ.**—अहंकार लीन झाला असतां सुख व दुःख इत्यादि विकारांच्या प्रवृत्ति चालत नाहींत, अर्थात् संसार त्या अहंकाराचाच होय; संसृतीचा साक्षी जो मी (आत्मा) त्याचा नव्हे.—श्रुति.

आहे, यामुळें हे विकार त्यासच आहेत. आत्मा द्रष्टा ( पाहणारा ) असल्यामुळें त्याचे ठायीं कोणतेही धर्म नाहींत. उद्धवा, यावर तूं शंका घेशील कीं, ' जर हा संसार अहंकारासच आहे, तर मुक्तिही त्यासच असली पाहिजे, आणि जर असें असेल तर मुक्तिकाळीं सुद्धां अहंकार शिल्लक राहतो असें सिद्ध होतें. ' तर याविषयीं समाधान सांगतों ऐक:-देह, इंद्रियें प्राण आणि मन यांच्या ठिकाणीं ज्यास अहंत्वाभिमान आहे, असा आत्माच देहादिकांचा अंतर्गत जीव होय. गुण व कर्म यांनीं युक्त ज्याचें स्वरूप आहे, त्यासच सूक्ष्म उपाधीमुळें सूत्रात्मा, महत्तत्त्व इत्यादि अनेक नामें प्राप्त होतात. असा हा परमेश्वराधीन जीवात्मा या संसाराच्या ठिकाणीं प्रविष्ट होतो. अर्थात् अहंकाराचे तादात्म्याध्यासानें जीवास संसार आहे. तादात्म्यारोप नष्ट झाल्यावर मोक्ष होतो; म्हणजे मुक्तिकाळीं अहंकारावशेषरूप उक्त दोष राहण्याचा संभव नाहीं. म्हास्तव ज्ञानाची प्राप्ति करून घेणें हेंच श्रेयस्कर होय.

**ज्ञानाची आवश्यकता:**—उद्धवा, साधक पुरुषानें सद्गुरूपासून ज्ञानप्राप्ति करून घेऊन देहादिकांविषयींचा वृथाभिमान सोडावा. कारण, मन, वाणी, प्राण आणि शरीर यांच्या ठिकाणीं अहंत्वाभिमानरूपी जो अहंकार हा निर्मूल असूनही देव, दानव, मानव इत्यादि अनेक रूपांनीं इंद्रजालाप्रमाणें प्रकाशमान झाला आहे. म्हास्तव जो पुरुष ज्ञानरूप खड्गानें अहंकाराचा नाश करितो, तो विषयादिकांविषयीं अनासक्त राहून या जगामध्यें निःसंशयपणानें विहार करितो.

**ज्ञानप्राप्तीचीं साधनें:**—चिज्जडग्रंथीचें पुढें सांगितलेल्या साधनानीं पृथक्करण करून 'ज्ञानरूप' आत्माच मी आहें, असें जें जाणणें तेंच ज्ञान होय. या ज्ञानाचीं साधनें वेद, तप ( स्वधर्म ), स्वानुभव, उपदेश व अनुमान हीं होत.

**चिज्जडांचा विवेक:**—या सृष्टीच्या आदि व अंतीं जें एक पर-

ब्रह्मतत्त्व असते, तेंच मध्य-स्थितीतही चिद्रूपानें विद्यमान असतें. दृश्य जगत् हें आद्यंतयुक्त असल्यामुळें मिथ्या होय. उद्धवा, चित् ( चैतन्य ) व जड यांचें पृथक्करण करण्यास सुवर्ण व त्यापासून झालेले अलंकार ह्यांचा विचार कर. पहा–कटककुंडलादि अनेक अलंकारांच्या रूपानें न घडलेलें सोनें, अलंकार घडण्याचे पूर्वीं जें होतें, तसेंच तो दागिना ( आटवून ) मोडल्यानंतर जें राहणार, तेंच तो अलंकार असतांनाही आहे; व कडीं, तोडे, कुंडलें इत्यादि अनेक नामरूपभेदांनीं भिन्न भिन्न व्यवहारास जरी प्राप्त झालें, तरी सोनें तें एकच; तद्वत् नामरूपादि भेदानें नानाविध व्यवहारास आश्रय जगत्कारण असा मी एकच आहें. जगत् हें मजहून भिन्न मुळींच नाहीं. हे उद्धवा, जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांनीं युक्त जी बुद्धि, त्या अवस्थात्रयास कारणीभूत सत्त्व, रज व तम हे गुण, तसेंच त्या गुणांपासून उद्भवलेल्या अध्यात्म, अधिभूत व अधिदैव क्रमानें इंद्रियें, विषय व देवता ही त्रिपुटी आणि त्या त्रिपुटीच्या द्वारें निर्माण झालेलें चराचर विश्व हें सर्व सामान्य ज्ञानस्वरूप जो तुरीय म्हणजे अवस्थात्रयसाक्षी चैतन्य त्याच्या व्याप्तीनेंच प्रकाशित होतें. आतां तूं म्हणशील कीं, ' आम्हांस या विशेष ज्ञानाशिवाय सामान्य ज्ञानस्वरूप जो तुरीय त्याची प्रतीति म्हणून कांहीं नाहीं. ' तर यास उत्तर सांगतों:–या विशेष ज्ञानाचा व्यतिरेक ( अभाव ) झाला असतां समाध्यादि अवस्थांच्या ठिकाणी जें अवशिष्ट राहतें तेंच तुरीय किंवा चैतन्य होय. या प्रकारें कालत्रयींही सतत राहणाऱ्या तुरीय चैतन्याचें सत्यत्व तुला सांगितलें. आतां कांहीं काळ भासणारें व अंतीं नष्ट होणारें जें हें जग त्याची मिथ्यात्वता सांगतों:––

हे उद्धवा ! जें सृष्टीच्या पूर्वीं नव्हतें व प्रलयानंतरही जें नाहीं; तें हें मग केवळ मध्येंच जरी भासमान होत आहे, तरी तें कारणस्वरू-

याहून भिन्न नाहीं. पण त्यास नाममात्र आहे.[१] कारण, जो पदार्थ ज्या कारणापासून उत्पन्न झाला, किंवा ज्यानें प्रकाशित केला, तो पदार्थ कारणस्वरूप किंवा प्रकाशस्वरूपच होय असें माझें मत आहे. कारणावांचून कार्य किंवा प्रकाशावांचून प्रकाश्य ह्मणून भिन्न कांहीं प्रत्ययास येत नाहीं. हे उद्धवा, हा जो सृष्टीच्या पूर्वी नसलेला विकारसमूह ( सर्व जग ) भासत आहे, तो सर्व रजोगुणद्वारा ब्रह्माचेंच कार्य होय. आणि भासकाळीं ब्रह्मप्रकाशानेंच भासमान होत आहे ब्रह्मवस्तु हें स्वतःसिद्ध आहे. तें कोणाचें कार्य नव्हें. तसेंच तें स्वयंप्रकाश असून सर्वांचें प्रकाशक आहे. म्हणून इंद्रियें, विषय, देवता, इत्यादि आकारांनीं चित्रविचित्र असें एक ब्रह्मतत्त्व भासत आहे. याप्रमाणें श्रुति, धर्मशास्त्र प्रत्यक्षप्रमाण, महद्वचन आणि अनुमान ह्या प्रमाणभूत साधनांनीं ब्रह्मतत्त्वाचा निश्चय करून अनात्म देहादिकांवरील आत्मत्वाभिमानरूप अहंकारग्रंथी ( गांठ ) छेदून टाकावा, व स्वस्वरूपभूत आत्मानंदानेंच संतुष्ट होत्साता विषयकामुक जे इंद्रियादिक या सर्वांपासून उपरत व्हावें. ह्मणजे त्यांवरील आसक्ति सोडावी. आतां देहादिकांवरील आसक्ति कशी निवृत्त होते, तें सांगतों:-

**आत्मानात्मविवेकः** उद्धवा, मृत्तिकेचा विशिष्ट विकार जसा घट; तद्वत् पृथ्वीचें विशिष्ट कार्य शरीर होय. अर्थात् शरीर हा आत्मा नव्हे; तसेंच इंद्रियें अधिष्ठात्री देवता, प्राण, मन, बुद्धि चित्त आणि अहंकार हेंही आत्मा नव्हत. कारण, हे सर्व अन्नमयादि कोशरूप असल्यामुळें शरीराप्रमाणेंच मिथ्या आहेत. याचप्रमाणें, आकाशादिक स्थूलभूतें आणि शब्दादिक सूक्ष्मभूतें आणि प्रकृति ह्यांसमुद्धां आत्मा ह्मणतां येत नाहीं. कारण, तीं सर्व जड आहेत. आत्मा हा केवळ चिद्रूप आहे.

( १ ) " वाचारम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् "--श्रुति. ( २ ) ज्ञानप्रकरण १६ वा अध्यायाचे शेवटीं पहा. (३) ज्ञानप्रकरण १३ वा अध्याय पहा.

**आत्मानात्मविवेकफळ**:—उद्धवा, माझें स्वरूप विवेचनपूर्वक निश्चितपणें ज्यानें जाणलें, अर्थात् ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे; अशा ज्ञानी पुरुषाचें चित्त कदाचित् विषयांत रंगून गेल्याप्रमाणें दिसलें, तरी त्याला त्यापासून कांहींच दोष लागत नाहींत. दृष्टांत–जसें सूर्याच्या पुढें मेघ आले किंवा गेले, तरी सूर्यास त्यासंबंधें गुणदोष लागत नाहींत; तद्वत् ज्ञानी पुरुषास विषयाचे गुणदोष मुळींच लिप्त होत नाहींत. अथवा आकाश हें जसें वायु, अग्नि, उदक आणि पृथ्वी यांचे गुण क्रमानें शोषण, दाह, आर्द्रता, व मलिनता किंवा ऋतूंचे धर्म आले अथवा नष्ट झाले तरी त्यांच्याशीं संबंध पावत नाहीं; तद्वत् सत्त्वादि त्रिगुणात्मक व्यवहारिक विकारांनीं ब्रह्मसाक्षात्कार झालेल्या पुरुषास कांहींही अपाय घडत नाहीं.

**भ्रष्टतेचा संभव**—उद्धवा, जोंपर्यंत ज्ञानयोग दृढ होऊन विषयासक्तिरूप मनोवासना निवृत्त झाली नाहीं, तोंपर्यंत मायारचित अशाही या विषयांच्या ठिकाणीं आसक्ति होऊं नये. दृष्टांत–जसा एखादा रोग झाला असून त्याची चिकित्सा (परिहार) योग्य रीतीनें झाली नाहीं, तर तो पुन्हां पुन्हां वृद्धिंगत होऊन मनुष्यास दुःख देतो; तद्वत् विषयादिकांची वासना व तन्मूलक कर्मे दग्ध झालीं नाहींत, आणि तें स्त्रीपुत्रादि विषयांकडे धांव घेतें, तें मन कुयोगी म्हणजे अयथार्थ ज्ञानी पुरुषास भ्रष्ट करितें.

**संसारबंधाचा अभाव**—उद्धवा, ते अपूर्णज्ञानी, कुयोगी, बंधु, शिष्य इत्यादि रूपानें संबंध पावलेले, ते देव त्यांनीं केलेल्या विघ्नांनीं भ्रष्ट होतात; ते अर्धवट ज्ञानी दुसऱ्या जन्मांत पूर्वाभ्यासाच्या बळानें पुन्हां त्या ज्ञानयोगाचाच अभ्यास चालवितात; पण कर्मजालाच्या नादीं लागत नाहींत. ह्यावर तूं शंका घेशील कीं, ' विद्वानांस सुद्धां सर्व प्रकारांनीं विषयासक्ति ही दुस्त्यज आहे, म्हणून पूर्णज्ञान्यांस देखील पुन्हां

संसारप्राप्ति होण्याचा संभव आहे.' तर यास समाधानः–प्रारब्धकर्मांनीं प्रेरिलेल्या ज्ञानी पुरुषाचा देह पडेपर्यंत अन्नपानादि व्यवहार करितांना दिसतो खरा; पण तो ज्ञानी देहाच्या ठिकाणीं स्थित राहून विषयादिक सेवनकालींही विकार पावत नाहीं. कारण, अखंड सच्चिदानंद सुखानुभवानें त्याची सर्व विषयतृष्णा निवृत्त झालेली असते. ह्मणून तो तज्जन्य हर्षविषादादिक संसारास प्राप्त होत नाहीं.

**ब्रह्मनिष्ठ पुरुषाची स्थितिः**—ब्रह्मनिष्ठ पुरुषाची बुद्धि निरंतर आत्मस्वरूपीं रममाण असल्यामुळें आपला देह उभा आहे किंवा बसला आहे, चालत आहे किंवा निजलेला आहे, मलमूत्रोत्सर्ग करीत आहे अथवा भोजनादि अन्य कर्में करीत आहे, हें त्यास कांहींच माहीत नसतें ! ब्रह्मज्ञ पुरुष बहिर्मुख अशा इंद्रियांनें विषय जरी अवलोकन करितो; तरी ते सर्व स्वप्नतुल्य असल्यामुळें मिथ्या आहेत असें मानितो. ह्मणून त्यांच्या ठिकाणीं लेशमात्र आसक्ति ठेवित नाहीं. कारण, आत्मा हा निर्विकार व चिन्मय आहे असा तो पूर्णपणें जाणलेला असतो. एवंच कर्मांच्या योगानें देह विकार पावत असतांही आत्मा विकार पावत नाहीं. ह्यावर तूं कदाचित् शंका घेशील कीं, 'आत्म्याच्या ठिकाणीं गुणकर्में नसल्यामुळें बंधरूप विकार नसेल. पण मोक्षरूप विकार तरी कां नसावा ?' यास समाधान—मुक्ति ही जर कर्मांचें फल असती. तर आत्मा विकारी झाला असता; परंतु तसें संभवत नसून ती केवळ अज्ञान निवृत्तिरूप असल्यामुळें बंध आणि मोक्ष दोन्हीही आत्म्यास स्पर्श करूं शकत नाहींत. ह्मणून त्यास कोणतांही विकार नाहीं, अर्थात् तो निर्विकार व निर्गुण आहे. दृष्टांत–ज्याप्रमाणें सूर्याचा उदय केवळ मनुष्यांच्या नेत्रांतलि अंधकार नाहींसा करितो, परंतु पूर्वस्थित घटादिक पदार्थ पुन्हां नवे कांहीं बनत नाहींत; तद्वत् ब्रह्मज्ञान हें पुरुषाच्या बुद्धीं-

तील अज्ञानांधकार मात्र नाहींसा करितें; पण आत्मा कांहीं नवा उत्पन्न होत नाहीं. म्हणून तो निर्विकार आहे.

**आत्म्याची निर्विकारता**—उद्धव. हा आत्मा स्वयंप्रकाश, जन्मरहित, इंद्रियजन्य ज्ञानास अगोचर, देशकालवस्तुपरिच्छेदरहित, अनुभवरूप आणि सर्वानुभवसिद्ध असा एकच आहे. त्याच्या निर्विकारतेस दुसरें कांहीं एक कारण नाहीं; म्हणून तो अद्वितीय होय. व तो " यतोवाचोनिवर्तन्ते अप्राप्य मनसासह " इत्यादि श्रुतीवरून मन वाणीचाही अविषय आहे.

**द्वैताद्वैतनिर्णय**—केवल एकरूप अशा आत्म्याच्या ठिकाणीं नाना प्रकारांचा जो भेद भासतो, तो केवळ मनाचा भ्रम होय. कारण, रौप्यभ्रांतीस शिंपीवांचून जसा दुसरा आश्रय नाहीं; तद्वत् या भेदभ्रांतीस आत्म्यावांचून दुसरा आधार नाहीं. याविषयीं श्रुतिप्रमाण आहेत, त्या अशा:—" येथें दुसरें भिन्न कांहीं नाहीं; " " एक परमात्मा तो मायेच्या योगानें बहुरूप भासत आहे. " असें असतां आम्हीच पंडित आहों असें म्हणणार कित्येक पूर्वमीमांसक असें वाटतें कीं, हें नामरूपांनीं युक्त पंचभूतात्मक द्वैत जगत् अबाधित आहे. आणि ऐक्यप्रतिपादक जें वेदांतशास्त्र तें केवळ अर्थवाद म्हणजे यज्ञ करणाऱ्या पुरुषाची स्तुति आहे; परंतु तत्त्ववेत्त्यांस तसें वाटत नाहीं. कारण, ती त्या पूर्वमीमांसकांची समजूत सत्याला सोडून आहे. पहा—वेदांतशास्त्र जर अर्थवाद किंवा कर्त्याची स्तुति आहे असें म्हणावें तर विधिवाक्याशीं एकवाक्यता कांहीं जुळत नाहीं. तसेंच अकर्ता, अभोक्ता व परमानंदरूप अशा आत्म्याचें प्रतिपादन कर्मविधीचें अंगही होऊं शकत नाहीं. आतां द्वैत हें अबाधित म्हणजे सत्य आहे असेंही म्हणतां येत नाहीं. कारण, तें नामरूपात्मक इंद्रियांस गोचर व पांचभौतिक असें आहे.

( १ ) ज्ञानप्रकरण अध्याय १५ वा पहा.

ह्मणून तें स्वप्नतुल्य अर्थात् मिथ्या होय. इत्यादि अनुमानांनीं व " वाचरंभणं विकारो नामधेयं " इत्यादि 'श्रुतींनींही त्या द्वैताचें मिथ्यत्व सांगितलें आहे. इति । ३१. ०

---

# अध्याय ३२ वा.

## भिक्षुचा इतिहास ( ११–२३. )

श्रीभगवानुवाचः—

बार्हस्पत्य स वै नात्र साधुर्वै दुर्जनेरितैः ॥
दुरुक्तैर्भिन्नमात्मानं यः समाधातुमीश्वरः ॥ २ ॥

**भगवान् श्रीकृष्ण ह्मणाले:**--हे बृहस्पतीच्या शिष्या उद्धवा ! असा सत्पुरुष ह्या जगांत कोणीच नाहीं कीं, जो दुर्जनांनीं उच्चारिलेल्या अपशब्दांच्या योगें क्षुब्ध झालेल्या मनाला शमविण्यास समर्थ होईल. कारण, दुष्टांचे दुर्भाषणरूप तीक्ष्ण बाण काळजाला भिडल्यावर अशा दुःसह वेदना होतात कीं, तशा वेदना मर्मावर अचूक लागलेल्या बाणांनींही होत नाहींत ! हें सर्व खरें; तथापि दुष्टांनीं अपकार केला असतां तो सहन करण्याला कांहीं एक उपाय नाहीं असें मात्र समजूं नकोस ! तो उपाय कळण्यासाठीं एक महापुण्यकारक इतिहास तुला सांगतों, तो तूं सावधान चित्तानें ऐक. तो इतिहास ह्मणजे कोणी एका यतीनें केलेला तत्त्वविचार हा होय. पहा—त्या संन्याशाला दुर्जनांनीं अतिशय छळिलें, तेव्हां त्यास स्वतःच्या कर्माचा विपाक आठवूं लागला. अशा कठीण प्रसंगीं धैर्य धरून त्यानें गोंवलेली विचारमुक्ताफळांची जी माळ ती खरोखर प्रत्येकानें धारण करण्यासारखी आहे. आतां प्रथम त्याचें थोडेंसें चरित्र सांगतों; नंतर त्यानें गाइलेली गाथा निवेदन करीन.

इतिहासः—माळवदेशामध्यें कोणीएक मोठा धनसंपन्न ब्राह्मण राहत होता. तो शेती, व्यापार वगैरे व्यवसाय करी. त्याचा स्वभाव पराकाष्ठेचा कद्रू ( कवडीचुंबक ), कामी, लोभी, व अतिशय रागीट असा होता. त्याच्या घरीं कधीं धर्मकर्म व्हावयाचें नाहीं. किंवा कधीं ज्ञातिजनांचें व पाहुण्यांचें नुसत्या गोड शब्दांनीं देखील आदरातिथ्य व्हावयाचें नाहीं. फार तर काय, पण तो आपल्या शरीराचें सुद्धां कधीं चांगलें वस्त्रपात्र लेऊन किंवा कधीं स्निग्ध व मधुर अन्न खाऊन संगोपन करीत नसे! असा त्याचा स्वभाव पराकाष्ठेचा नष्ट व कृपण असल्यामुळें मुलगे, आप्तजन, बायको, मुली, चाकरमाणसें सगळीं त्रासलीं, व त्याचा द्वेष करूं लागलीं. आणि त्याच्या मनाप्रमाणें कोणी वागेनासें झालें! धनाधिक मनुष्यानें कृत्य जें द्रव्याचें रक्षण करावयाचें; तसेंच ह्या ब्राह्मणानेंही कांहीं द्रव्य सांचवून ठेवावयाचें. म्हणजे त्याचा उपयोग सत्कर्मास अगदीं करावयाचा नाहीं एवढेंच असे. त्यानें द्रव्याचा उपभोग घेऊन स्वार्थही साधला नाहीं, व पंचमहायज्ञद्वारें परमार्थही साधला नाहीं. तेव्हां त्या देवतांच्या अनादरामुळें त्याचा पुण्यांश नष्ट झाला; व अत्यंत परिश्रमानें मिळविलेलें त्याचें सर्व धन नाश पावलें! त्यांपैकीं कांहीं धन आप्तस्वकीयांनींच लांबविलें; कांहीं चोरांनीं लुटिलें, कांहीं जळून फस्त झालें; कांहीं पेवांत ठेवलेलें धान्यादिक कुजून गेलें; कांहीं ठकांनीं भुलथापा देऊन अपहारिलें; राहिलेलें कांहीं राजानें काढून घेतलें; अशा रीतीनें त्या नामधारी ब्राह्मणाच्या सर्व द्रव्याची वाट लागली. नंतर त्या ब्राह्मणाची स्थिति फारच शोचनीय झाली. श्रीपु-

(१) "आत्मानं धर्मकृत्यं च पुत्रदारांश्च पीडयन् । देवतातिथिभृत्यांश्च स कदर्य इति स्मृतः ॥" अर्थ—स्वतःच्या पोटाला खायचा नाहीं; धर्मकृत्याचें नांव नको; मुलांना, बायकोला, देवतांना, अतिथींना व चाकरमाणसांना सर्वांनाच त्रास द्यायचा, असा ज्याचा स्वभाव तो कदर्य म्हटला जातो.—स्मृति.

त्रादिक आप्तस्वकीयें आधींच त्याचा द्वेष करीत असत; पण तो ब्राह्मण धनादिकांच्या लोभामुळें त्या सर्वांची कांहींएक पर्वा ठेवीत नसे. आतां त्याचें धनादिक सर्व गेलें; तेव्हां इहपर दोन्ही साधनांनीं अंतरला जाऊन तो मोठ्या विवंचनेंत पडला! त्याचें पूर्वकर्म त्याच्यापुढें मूर्तिमंत उभें राहूं लागलें! तेव्हां त्यास अत्यंत खेद झाला. व त्यामुळें त्याचा कंठ भरून येई. होतां होतां शेवटीं त्याला तीव्र वैराग्य उत्पन्न झालें! त्या वेळीं तो आपल्याशीच असें म्हणाला:---

**भिक्षूचें वैराग्य:** ---अरेरे! मीं आपल्या देहाला व्यर्थ ताप दिला, आणि हें धन जोडिलें. ह्यापासून मला ऐहिक सुखेंही मिळालीं नाहींत, अथवा पारमार्थिक साधनेंही प्राप्त झालीं नाहींत. अहो, कृपणांची अवस्था अशीच होत असेल. पहा--इहलोकीं हाडांचीं काडें करावीं, व मेल्यावर सुद्धां नरकाची जोड करून घ्यावी इतकेंच कायतें कर्तव्य! अरेरे, लोभ हा महापातकीच आहे. पहा---मनुष्याच्या अंगीं कितीही सद्गुण असोत, अथवा त्याचें यश कितीही पसरलेलें असो, त्याच्या ठिकाणीं लोभाचा लेश उत्पन्न झाला कीं, त्यास सद्गुणांचें किंवा यशाचें वाटोळें झालेंच म्हणून समजावें! उदाहरण---सगळें रूप मनोहर असून जर का मुखावर किंचित् कुष्ठाचा डाग असेल तर तें सौंदर्य हीनच होय. अहो मनुष्यांना द्रव्य मिळविण्यास किती आयास पडतात, त्याची वृद्धि करण्यास किती कष्ट करावे लागतात, तें राखण्यास चोरादिकांचें भय किती वागवावें लागतें; नंतर त्याचा खर्च करितांना पोटांत कसे दुःखाचे उमाळे उठतात. आणि शेवटीं त्याचा नाश झाला असतां कसा भ्रमिष्ट बनतो! एतावता द्रव्य हें आरंभापासून समाप्तीपर्यंत दुःखदायक होय! अरेरे, द्रव्यसंग्रह करितांना किती नीच कर्में करावीं लागतात हें सांगताही येत नाहीं! पहा---द्रव्यलोभासाठीं चोरी करणें भाग पडतें, विश्वासघात करावा लागतो, लबाडी करण्याची पाळी वारं-

वारं येते, ढोंग माजविल्याशिवाय गत्यंतरच नाहींसें होतें. अपहारबुद्धि नेहमीं बाळगावी लागते, व संतापवृत्ति धारण केल्याशिवाय उपायच नाहींसे होतात. कदाचित् द्रव्याची जरी प्राप्ति झाली, तरी त्यापासून सुद्धां अनेक दुष्परिणाम घडतात. पहा —मनुष्याजवळ द्रव्यसंचय झाला कीं, प्रथम गर्विष्ठ बनतो; मग त्यास बरें वाईट कांहींएक सुचेनासें होतें. त्यामुळें दुसऱ्याचा नाश करण्यासाठीं लावालावी वगैरे दुष्ट उपायांचें तो अवलंबन करितो; परोत्कर्ष सहन होत नाहीं. म्हणून तो भल्याशीं सुद्धां शत्रुत्व करून त्यास गांजितो; त्यांच्यावर विश्वास न ठेवितां त्यांचा हेवा करितो; आणि पापकर्माधिक्यामुळें तो दुर्मति, द्यूत व मद्यपान अशा व्यसनांत निमग्न होऊन जातो ! अरेरे, ह्या सर्व अनर्थांचें मूळ धन होय. ह्यास्तव साधक पुरुषानें अर्थ हा अनर्थकारक आहे, असें मानून त्याचा त्याग करावा. अहो, द्रव्यानें किती घोर अनर्थ घडतात ते पहा —आईबाप, भाऊबंध, स्त्रीपुत्र व आप्तस्वकीय हीं सर्व एक निवाचीं व अतिप्रेमळ असतांही एका दमडीसाठीं एका क्षणांत हाडवैरी बनतात. हीं मंडळी अल्प द्रव्यासाठीं भांडतात आणि क्रोधाच्या भरांत चटकन एकमेकांस सोडून जातात; एवढेंच नव्हे, तर एकाएकीं सगळें प्रेम दूर झुगारून देऊन द्वेष आरंभितात व परस्परांचे घात करितात.

" अहाहा ! हा मनुष्यजन्म किती तरी दुर्लभ ! पहा—ही नरतनु प्राप्त व्हावी म्हणून देव सुद्धां इच्छा करितात ! असा दुर्लभ नरदेह मला प्राप्त झाला, इतकेंच नव्हे, तर मानवामध्यें अत्यंत श्रेष्ठ जो ब्राह्मणवर्ण तो मिळाला आहे. असें असतांना अशा त्या असदृश जन्माचा अनादर करून मजसारखा अधम पुरुष आत्महित साधीत नाहीं; तेव्हां ह्या माझ्या नीच वृत्तीनें, मेल्यावर मला नरकाचीच प्राप्ति होईल ह्यांत संदेह नाहीं. अहाहा ! मनुष्यदेहाची केवढी योग्यता ! हा स्वर्ग व मोक्ष मिळविण्याचें साधनरूप केवळ द्वारच होय ! असा नरदेह प्राप्त झाल्यावर

ह्याच्या योगानें एक स्वर्ग तरी मिळवावा, ' किंवा मोक्ष जोडून अखंड सच्चिदानंदसुखांत तरी रंगून जावें ! 'असें असतां कोणता बरें मरणधर्मी पुरुष अनर्थाचें केवळ माहेरघर.अशा द्रव्यावर आसक्त होईल ? अर्थात् कोणी होणार नाहीं.

" अहो ! धनादिकांची प्राप्ति झाल्यावर मनुष्यानें त्याचा सद्व्यय करावा हेंच त्यानें कर्तव्य होय ! धनिक पुरुषानें पंचमहायज्ञ म्हणजे देव, ऋषि, पितर, भूतें, गोत्रज, आप्त व स्वतःचें शरीर यांना यथायोग्य विभाग न देतां ( अन्नादिकांच्या योगें तृप्त न करितां ) समंदाप्रमाणें द्रव्याचें नुसतें रक्षण करितो, तो पुरुष निःसंशय अधोगतीस जातो ! अहो ! मी आजपर्यंत द्रव्याचें संपादन व रक्षण करण्याच्या भरीस पडून व्यर्थ आयुष्य घालविलें; पण त्या द्रव्याचा मुळींच सद्व्यय केला नाहीं. शेवटीं परिणाम असा झाला कीं, माझें सर्व ऐश्वर्य नाश झालें; व आयुष्य व्यर्थ गेलें; आणि आतां मी सर्वतोपरी दीन होऊन बसलों ! विवेकी पुरुष ज्या धनादिकांच्या योगें चारी पुरुषार्थ साधितात, अशा त्या धनादिकांनीं मी नरक मात्र जोडिला ! अहो ! मी तर आतां वृद्ध झालों. अशा काळीं माझ्या हातून कोणतें सत्कर्म घडेल. अर्थात् मी चतुर्विध पुरुषार्थास अंतरलों ! अहो ! द्रव्य हें सर्व अनर्थाचें केवळ कोठारच होय, असें जाणणारे पुरुष सुद्धां द्रव्यासाठीं हपापून जाऊन जीवापाड श्रम करितात, तेव्हां त्यांस काय म्हणावें! मला असें वाटतें कीं, हें कोणा तरी विलक्षण शक्तीचें कृत्य होय. कारण, तिच्यामुळेंच हें सर्व ब्रह्मांड विमोहित झालें आहे ! अहो धनादिकांच्या इच्छेमुळें लोक क्लेश भोगीत आहेत, तर मग उदरपूर्ति पलीकडे विशेष प्रयत्न काय म्हणून करावा ? धनादिक मिळवून किंवा धनोत्पादक व्यवसाय करून मृत्यु चुकणार काय ? अथवा किती ही सुखें भोगिलीं, किंवा नानाप्रकारचीं उपभोग्यवस्तु मिळविल्या, तरी मरणरूपी दुःखाचा प्रतिकार होईल

काय ? अहो ! ह्या देहाला क्षणोक्षणी मृत्यु ग्रासीत आहे, तर अशा अशाश्वित नरतनूच्या पालनपोषणाकरितां जीं जीं कर्मे करील त्यांपासून जन्ममरणपाश अधिकाधिक बळकट होत जातो ! ह्यास्तव विचारी मनुष्यानें ऐहिक विषयसुखापासून पराङ्मुखच असावें. हें योग्य होय.

" अहा ! आज निःसंशय मजवर सर्व देवतारूप भगवान् हरि संतुष्ट झाला असावा असें मी मानितों. कारण, त्या परमेश्वराच्या अनुग्रहानेंच आज हें वैराग्य मला प्राप्त झालें ! आतां माझें आयुष्य फारसें अवशिष्ट राहिलें नाहीं. हें जरी खरें आहे, तरी उरलेल्या थोडीबहुत आयुष्यमर्यादेंतच मी ह्या देहाचें साफल्य करण्याचा प्रयत्न करीन. मी सर्व धर्मादिसाधनांत तत्पर असून आपलें शरीर तपश्चर्येच्या योगें झिजवीन, किंवा आत्मज्ञान संपादन करून ब्रह्मरूप होईन ! मात्र ह्या माझ्या विचारास त्रिभुवनेश्वर प्रभूनें अनुमोदन द्यावें, ह्मणजे त्याच्या कृपेनें या थोडक्या आयुष्यांत परमार्थसिद्धि प्राप्त करून घेईन. यावर कोणी ह्मणेल कीं, ' देवांनीं कृपा केली तरी तूं ह्मातारा अल्प कालांत सिद्धि मिळवूशील कशी ? ' तर त्याबद्दलही सांगतो — पूर्वी खट्वांग नामक राजा होऊन गेला. त्या राजर्षीनें एका मुहूर्तांतच ब्रह्मलोक साध्य करून घेतला ! ह्यास्तव प्रत्येक मनुष्यानें ईशप्राप्तीच्या प्रयत्नास लागावा, हेंच उचित होय. "

**श्रीभगवान म्हणाले:**— उद्धवा, अवंतिदेशीय ब्राह्मणोत्तमानें मनामध्यें पूर्ण वैराग्य धारण करून अहंमम ग्रंथि तोडिले, आणि तो सर्व विषयवासना झाडून टाकून चतुर्थाश्रम स्वीकारिला. मग तो शांत व विचारशील असा यति झाला ! तेव्हांपासून तो संन्यासी मनें, इंद्रियें व प्राण हीं आपल्या आधीन ठेवून ह्या भूमंडलावर पर्यटण करूं लागला. त्यानें विषयांवरील आसक्ति अगदीं सोडून दिली. भिक्षासाठीं मात्र नगरांत व गांवांत प्रवेश करे; पण आपली श्रेष्ठ योग्यता कोणाकाही

दाखवीत नसे. बा उद्धवा, त्या वृद्ध व मलिन भिक्षूला पाहून नीच लोक नानाप्रकारें उपद्रव करीत. कोणी दंड हिसकून घेत, कोणी कमंडलु ओढीत, कोणी आसन दवडीत, कोणी रुद्राक्षांची माळ नेत, कोणी गोधडी घेऊन जात व कोणी छाट्या लपवीत! नंतर त्या मुनीला ' अहो महाराज, ही आपली घ्या ' असें म्हणून ती ती वस्तु देत! तो भिक्षा मागून अन्न मिळवून आणून नदीच्या तीरावर भोजन करीत बसला कीं, अति नीच पापी लोक त्या अन्नांत मुतत! व खांकरून त्याच्या मस्तकावर थुंकत! तो निमूट बसला असतां त्यास उगीच कांहीं तरी वारंवार विचारून त्रास देत! इतक्यावरही तो बोलला नाहीं, तर त्यास मार देखील देत असत! कित्येक लोक " हा संन्यासी चोर आहे " असें म्हणून त्याला शब्दांनीं धमकी देत! कित्येकजण ' बांधा बांधा ' म्हणून त्याला दोरीनें बांधीत! कित्येक त्याची अवहेलना करून म्हणत कीं, ' अहो, हा कोणी तरी धर्माचें ढोंग करणारा महा ठग असावा? आपल्या जवळचें सर्व कांहीं दवडून आतां आप्तस्वकीय थारा देत नाहींसे झाल्यामुळें ह्यानें पोट भरण्यासाठीं हें सोंगच घेतलें आहे! अहो! हा अतिशय बळकट व पर्वतासारखा धैर्यवान् आहे, ( तुह्मी कितीहि त्रास दिला तरी सगळा सोशील ) आणि निश्चय ढळूं न देतां बगळ्याप्रमाणें निमूट बसून आपला कार्यभाग साधून घेईल. ' असें म्हणून कित्येकजण त्याचा उपहास करीत! कित्येक लोक त्याच्यावर अधोवायु सोडीत! कित्येक त्यास माखळदंडांनीं बांधीत, पिंजऱ्यांतल्या पक्ष्याप्रमाणें कोंडून ठेवीत. अशा प्रकारें दुर्जनांनीं दिलेलें " भौतिक " दुःख, ज्वरादिकांपासून उद्भवलेलें " दैहिक " दुःख आणि थंडी वारा यांपासून होणारें " दैविक " दुःख, हें सर्व आपल्या दैवानें प्राप्त झालेलें आहे. ह्मणून " नाभुक्तं क्षीयते कर्म कल्पकोटिशतैरपि. " ह्या श्रुतिवचनाप्रमाणें तें फळ शंभरकोटिकल्पं उल्लंघिले तरी उपभोग के-

त्याशिवाय गत्यंतरच नाहीं असें समजून, तो तें शांतपणानें सहन करी. ते नराधम त्या संन्याशाच्या धर्माचरणास विघ्नें आणीत व त्यास स्वधर्मापासून भ्रष्ट करण्याचाही प्रयत्न करीत व अतिशय छळीत; पण त्या महात्म्याची वृत्ति इतकी शांत होती कीं, त्यानें त्या अपकार करणाऱ्या लोकांविषयीं किंचित्सुद्धां विषमबुद्धि न बाळगितां त्यांना सर्व उपद्रव सहन केला, व आपलें धर्माचरण दृढनिश्चयानें अव्याहत चालविलें ! अशा स्थितींत त्यानें जी गाथा गाइली, ती प्रत्येकानें विचार करून हृदयांत धारण करण्यासारखी आहे; ह्यास्तव ती लक्ष्यपूर्वक श्रवण कर.

**सर्व अनर्थांचें कारण-मन ! ब्राह्मण ( भिक्षु ) ह्मणाला:—** " अहो, मला सुख किंवा दुःख प्राप्त होण्यास निमित्त हे लोक नव्हत, देवता नव्हत, आत्मा नव्हे, ग्रह, कर्म व काळ हे कांहीं एक नव्हत, तर सुखदुःखांचें कारण केवळ मनच होय व त्याच्यामुळेंच मला हें संसारचक्र फिरवावें लागत आहे ! मनामध्यें भोगेच्छा उत्पन्न झाल्या म्हणजे तें मन अनावर होतें; मग त्यास नानाविध विषय सत्य भासतात; नंतर तें, इंद्रियांच्या तृप्तीकरितां सात्विक, राजस, व तामस कर्मं करण्यास तत्पर होतें, आणि परिणामीं त्या त्या कर्माप्रमाणें जीवास अनुक्रमें उत्तम, अधम व मध्यम अशा देव, तिर्यक् व नर इत्यादि गति प्राप्त होतात. अहो, ह्या मनानेंच माझा सर्वस्वीं घात केला ! मनामध्यें वास करणाऱ्या परमात्म्यानें ह्या मनानें कपटस्वरूप ओळखिलें; पण मीं मात्र तें ओळखिलें नाहीं ! परमात्मा हा ज्ञानशक्तिप्रधान असल्यामुळें मनाचे सर्व खेळ स्वस्थपणें पहात आहे; पण मी अविद्येच्या अधीन झाल्यामुळें ह्या मनाचा दास बनलों आहे ! एतावता भवबंधाचें कारण माझें मनच होय; ह्यास्तव त्यापासून निवृत्त होण्याचा प्रयत्न करणें हें माझें मुख्य कर्तव्य आहे. अहो, दानधर्म, नित्यनैमित्तिक

कर्मे, यमनियम, वेदाध्ययन, व्रतवैकल्यें व इतर सर्व कर्मे, ह्या सर्वांचा हेतु, मनाचा निग्रह करितां येणें हा होय. ज्यास मननभाव निवृत्त करितां आला, त्यास परमार्थसिद्धीची किल्लीच सांपडली असें समजावें ! अहो, ज्यानें आपलें मन विषयादिकांपासून सोडवून ब्रह्मस्वरूपांत लीन केलें, त्यास दानधर्मादिक कोणत्याही साधनांची आवश्यकता नाहीं. कारण मनोनिग्रह केला कीं, सर्व केल्यासारखें होतें ! पण, ज्याचें मन दानधर्मादिक उपायांनीं विषयांपासून पराङ्मुख झालें नाहीं, तर त्याचीं तीं सर्व साधनें व्यर्थच गेलीं असें मी मानितों ! यावर कोणी ह्मणेल कीं, ' त्या साधनांचा उपयोग इतर इंद्रियें जिंकणें हा होईल. ' तर त्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण, मनाच्या अधीन अधिष्ठात्री देवता असतात, पण मन कोणाच्याही अंकित नसतें. मन हें मोठें बलाढ्य व अजिंक्य आहे ! ह्यासाठीं, जो पुरुष त्याला स्वाधीन करून घेईल तो देवांचाही देव ( सर्व इंद्रियांना जिंकणारा ) होतो. अहो, मनाच्या रागद्वेषादिक वृत्ति मोठ्या दुःसह आहेत. उपेक्षा केल्यास त्या काळजाचेंही विदारण करतील ! म्हणून मन हा दुर्जय शत्रु आहे. ह्यासाठीं विचारी पुरुषानें प्रथम मनास जर्जर करून मग त्या अशुभ वृत्तींची निवृत्ति करावी. कित्येक पुरुष मनास जिंकावयाचें सोडून मनाच्या संतोषाकरितां दुसऱ्या पुरुषांशीं कलह माजवितात. व त्यांशीं मित्रत्व किंवा शत्रुत्व जोडितात, हाच त्यांचा वेडेपणा होय. अहो, देहादिक प्रपंच हा केवळ कल्पनेचा बाजार होय. ह्यांत सत्य म्हणून कांहींएक नाहीं. असें असतां जे पुरुष ह्याविषयीं ममत्वबुद्धि बाळगून ह्यांत रममाण होतात, ते ह्या दुस्तर संसारांत भ्रमण पावतात.

**जीवाचा सुखदुःखाशीं असंबंध**—( १ ) अहो, हे लोक, आपल्याकडून मला दुःखें देवोत; पण मला ह्या दुःखांपासून व्यथा काय ह्मणून व्हावी. दुःख देणारा देह व दुःख भोगणारा देह पंचभौतिकच;

ह्यास्तव माझ्या ज्ञानरूपी आत्म्याचा ह्यांशीं कांहींएक संबंध नाहीं. कारण, आत्मा अमूर्त व अक्रिय असल्यामुळें तो कोणत्याहि क्रियेचा कर्ता किंवा कर्म होत नाहीं. ह्यावर कोणी ह्मणेल कीं, ' तरी पण सुख-दुःखाचें पर्यवसान आत्म्याकडेच व्हावयाचें. ' तर त्यास उत्तर दोन्ही देहांत ज्याअर्थी आत्मा एकच आहे, त्याअर्थी कोणावरही रागावतां येत नाहीं. पहा —एकादे वेळीं आपल्या दांतांनीं जर आपली जीभ चावली, तर त्या वेदनेबद्दल राग काढावयाचा कोणावर. ( २ ) आतां दुःखाचें कारण अधिष्ठात्री देवता असें मानिलें, तरी त्या पक्षामध्येंसुद्धां आत्म्याकडे कांहींच नाहीं. कारण, तें दुःखाचें देणें किंवा भोगणें, ज्या ज्या विकार पावणाऱ्या त्या त्या अधिष्ठात्री देवतांकडे असतें. उदाहरण—हातानें मुखाला मारिलें व तोंडानें हाताचा डांस घेतला तर हात व मुख ह्यांच्या अधिष्ठात्री देवता अनुक्रमें इंद्र व अग्नि त्यांना तें भोगावें लागलें; निर्विकार आत्म्याकडे त्या दुःखाचा मुळींच संबंध नाहीं. शिवाय, देवता सर्व देहांमध्यें एकच असतात. ह्मणजे आपल्या इंद्रियांच्या ज्या देवता त्याच सर्व प्राण्यांच्या त्या त्या इंद्रियांच्या देवता होत. म्हणून कोणावरही रागावतां येत नाहीं. ( ३ ) कदाचित् आत्माच सुखदुःख देत असावा. म्हणून आत्माच सुखदुःखांचा हेतु होय असें ह्मणावें. तरी त्या पक्षामध्येंसुद्धां जुळत नाहीं. कारण. आत्माच जर दुःख देत आहे तर माझा आत्माच माझ्या आत्म्याला दुःख देणारा असाच अर्थ होईल, हें अगदींच असंबद्ध होय. कारण, आत्मा विकाररहित आहे; तेव्हां तें संभवत नाहीं. तें सुखदुःख होणें हें स्वाभाविक होय. ( ४ ) बरें, ग्रह सुखदुःखांचें निमित्त ह्मणावें तर त्यांपासून तरी जन्मरहित आत्म्याला काय व्हावयाचें आहे ? अर्थात कांहींच नाहीं. कारण, ग्रह पीडा देतात कोणाला ? जन्मास येणाऱ्या देहालाच. कारण, जन्मलग्नादिकांच्या अभिमानामुळें एका ग्रहाची दुसऱ्या ग्रहावर अ-

नुकूल अथवा प्रतिकूल दृष्टि असल्यामुळें घडतें; असें ज्योतिर्विदांचें मत आहे. तर मग त्या पीडेशीं माझा कांहीं संबंध नाहीं, हें व्यक्त आहे. पुरुष ( आत्मा ) तर त्या ग्रहांहून व देहांहून वेगळा होय. तेव्हां संतापण्याचें कारण राहातच नाहीं! ( ५ ) आतां सुखदुःखाचा हेतु कर्मच असेल असें ह्मणणेंमुद्धां मिथ्याच. कारण, कर्म हें मुळीं जड, आत्मा चैतन्य. मग जडकर्माचा आत्म्याशीं संबंध तो कसा असणार. पहा देह जड म्हणून त्याची कर्माकडे प्रवृत्ति संभवणार नाहीं. आणि पुरुष ( जीव ) तर चेतन ह्मणजे शुद्ध ज्ञानरूप व अकर्ता होय. सुखदुःखांचें मूळभूत कर्मच मिथ्या ठरलें; तेव्हां रागवावयाचें कोणावर. ( ६ ) आतां काळच जर सुखदुःखांचा हेतु असेल तर त्यापक्षींही आत्म्याला काय असणार. कारण, आत्मा मुळीं परमात्म्याचा अंश ( काळरूप ) होय. तेव्हां स्वतःपासूनच स्वतःला ताप किंवा पीडा होणें कधींच संभवत नाहीं. उदाहरण–अग्नीपासून त्याच्या अंशभूत ज्वाला जळून नाश पावल्या असें कधींच होत नाहीं. व हिमाचें ( बर्फाचें ) शैत्य हिमाच्या बारीक बारीक कणांना बाधलें आणि ते कण नष्ट झाले असें कधीं होत नाहीं. शिवाय. अंशाची गोष्टच एकीकडे असू द्याः– वस्तुतः हा मुळीं परमात्माच होय. परमात्म्याचा व सुखदुःखादि द्वंद्वांचा कांहीं संबंध नाहीं. एतावता सुखदुःखांचीं हीं सहाही कारणें नव्हत असें ठरलें.

अहो. सुखदुःखांचें मूळ बीज अहंकार हें होय. जीवानें अहंकारग्रंथी छेदून टाकली, व आपलें शुद्ध चैतन्यरूप जाणलें, ह्मणजे त्यास कधीं कोठें व कशापासूनही भीति ह्मणून नाहीं. ह्यास्तव मी इतःपर अहंकार सोडून देऊन परमात्मनिष्ठेचा आश्रय करून राहीन, व ह्या दुस्तर संसारांतून पार पडेन! आजपर्यंत अनेक महात्में ह्याच मार्गानें अवलंबन करून उद्धरून गेले; व मीही तसाच उद्धरून जाईन!"

**श्रीभगवान् ह्मणाले;**—उद्धवा, त्या ब्राह्मणाची सर्व संपत्ति नष्ट झाल्यामुळें त्यास तीव्र वैराग्य उद्भवलें; त्यागलेच त्याचे कष्ट दूर होऊन त्याच्या चित्तांत शांति उत्पन्न झाली; नंतर त्यानें सर्वसंगपरित्याग करून संन्यास घेतला; आणि दुष्ट लोकांपासून छळ सोसून शेवटपर्यंत स्वधर्माचरण उत्कृष्ट चालविलें! उद्धवा, त्या भिक्षूची गाथा मोक्षमार्ग दाखविणारी होय. त्यासाठीं ती तूं नीट लक्षांत ठेव. या सर्वांचें सार एवढेंच कीं, पुरुषाला सुख किंवा दुःख देणारा कोणी नाहीं. शत्रु, मित्र व उदासीन हा सगळा संसार केवळ अज्ञानानें रचिलेला मनाचा खेळ होय. ह्या अज्ञानानेंच जीवास संसार भोगावा लागतो. त्यासाठीं, हे उद्धवा, आपल्या मनाचें नियमन करून तूं माझ्या चिंतनांत निमग्न हो, ह्मणजे तुला अनायासें परमपद (मोक्ष) प्राप्त होईल.

बा उद्धवा, ह्या भिक्षुगीताचें माहात्म्य मोठें अगाध आहे! जो पुरुष हें स्वतः ऐकेल, ध्यानांत ठेवील व दुसऱ्यास सांगेल, त्यास सुखदुःखादिक द्वंद्वांपासून मुळींच पीडा होणार नाहीं! इति । ३२.

नमो भगवते तस्मै कृष्णायाकुंठमेधसे ॥
यत्पादांभोरुहध्यानात्संहितामध्यगामिमाम ॥ ३५ ॥

शा. १८२६ [illegible] संपूर्ण झाला.



॥ ॐ नमो नारायणाय ॥

# वेदांतपदार्थसंज्ञावर्णन

अथवा

# लघुवेदांतकोश.

**पूर्णब्रह्म** (एकमेवाद्वितीयं ब्रह्म ॥ स्वयंप्रकाशः स्वयंब्रह्म ॥ अजरोऽमरोऽमृतोऽभयो ब्रह्माभयं वै ब्रह्म ॥ विज्ञानमानंदं ब्रह्म ॥ सच्चिदानन्दोऽसंगः कूटस्थः साक्षी ब्रह्म ॥ तत्त्वंपदलक्ष्यं प्रत्यगभिन्नं ब्रह्म ॥ अनन्तमप्रमेयमखण्डं परिपूर्णं ब्रह्म ॥ मनोवाचामगोचरं ब्रह्म ॥ शिवं प्रशान्तममृतं परं च ब्रह्म ॥ ॐ मित्येकाक्षरं परं ब्रह्म ॥ लोको ब्रह्म गुरुर्ब्रह्म शिष्यो ब्रह्म सदाशिवः ॥ ज्ञान एव परं ब्रह्म सत्यं ब्रह्म सनातनम् ॥ )

## पदार्थ द्विविध ( २ )

**अध्यात्मताप २**—आत्म्याच्या आश्रयानें जे स्थूलसूक्ष्म देह आहेत, ते अध्यात्म होत; आणि तद्गत जो ताप ( दुःख ) तो अध्यात्मताप होय. याचे दोन भेद आहेत:—१ आधिताप म्हणजे मानस ताप, २ व्याधिताप म्हणजे शरीरताप.

**असंभावना २**—१ प्रमाणगत असंभावना म्हणजे प्रमाण [वेद] गत असंभावनेचें ज्ञान; २ प्रमेयगत असंभावना म्ह० प्रमेय [ प्रमाणाचे विषय मोक्षादिक ] गत असंभावनेचें ज्ञान.

**अहंकार २**—१ शुद्ध अहंकार म्ह० स्वस्वरूपाचा अहंकार; २ अशुद्ध अहंकार म्ह० देहादि अनात्म पदार्थांचा अहंकार ॥ १ सामान्य अहंकार म्हणजे देहादि धर्मांच्या उद्देशाहून रहित केवल " अहं [ मी ] " असें स्फुरण; २ विशेष अहंकार म्ह० देहादि धर्मां [ नामरूपादिकां ] स उद्देशून " अहं [ मी ] " असें स्फुरण.

**अज्ञान २**—१ मूलाज्ञान म्हणजे शुद्ध चेतनेचें आच्छादक अज्ञान; २ तूलाज्ञान म्हणजे घटादि अवच्छिन्न चेतनेचें आच्छादक अज्ञान.

**अज्ञानाच्या शक्ति** २—१ आवरण शक्ति म्ह० अधिष्ठानाला झांकणारी शक्ति; २ विक्षेप शक्ति म्ह० आत्मज्ञान आच्छादक शक्ति.

**उपासना** २—१ सगुण उपासना म्हणजे कारणब्रह्म [ ईश्वर ] आणि कार्यब्रह्म [ हिरण्यगर्भादि ] ची उपासना; २ निर्गुण उपासना म्हणजे शुद्ध ब्रह्माची उपासना.

**निग्रह** २—१ क्रमनिग्रह म्ह० यमनियमादि अष्टांगयोगाच्या क्रमानें होणारा निग्रह; २ हठनिग्रह म्हणजे प्राणनिरोधरूप हठयोगानें किंवा शांभव्यादि मुद्रांच्या अभ्यासानें होणारा निग्रह.

**संन्यास** २—१ विविदिषा संन्यास म्हणजे जिज्ञासापूर्वक ज्ञानप्राप्तीसाठीं धारण केलेला संन्यास; २ विद्वत् संन्यास म्हणजे ज्ञानानंतर वासनाक्षय, मनोनाश व तत्त्वज्ञान यांच्या अभ्यासद्वारा जीवन्मुक्तीच्या विलक्षण आनंदार्थ स्वीकारलेला संन्यास.

**प्रपंच** २—१ बाह्य प्रपंच; २ अंतर प्रपंच.

**प्रज्ञा** २—१ स्थितप्रज्ञ ( " यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः । इंद्रियाणींद्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ " **अर्थ**—जसें कांसव सर्व प्रकारें आपले अवयव आकुंचन करून घेतें; तद्वत इंद्रियविषयांपासून जो इंद्रियांना आवरून घेतो, त्याला स्थितप्रज्ञ असें म्हणतात ); २ अस्थितप्रज्ञ ( त्याचें विपरीत ).

**लक्षण** २—१ स्वरूप लक्षण म्ह० सदा विद्यमान असलेलें व्यावर्तक लक्षण; २ तटस्थ लक्षण म्हणजे कादाचित असणारें व्यावर्तक लक्षण.

**वाक्य** २—१ अवांतरवाक्य; २ महावाक्य.

**वाद** २—१ प्रतिबिंबवाद; २ अवच्छेदवाद.

**विपरीत भावना** २—१ प्रमाणगत विपरीत भावना; २ प्रमेयगत विपरीत भावना.

**संपत्ति** २—१ दैवी संपत्ति; २ आसुरी संपत्ति.

**संशय** २—१ प्रमाणगत संशय; २ प्रमेयगत संशय.

**समाधि** २—१ सविकल्प; २ निर्विकल्प.

**सूक्ष्म देह** २—१ समष्टि ( समुदायात्मक ); २ व्यष्टि ( अवयवी ).

**स्थूल शरीर** २—१ समष्टि; २ व्यष्टि.

## पदार्थ त्रिविध ( ३ )

**अध्यात्मादि** ३—१ इंद्रिय ( अध्यात्म ); २ देवता ( अधिदैव ); ३ विषय ( अधिभूत ).

**अंतःकरण दोष ३**—१ मलदोष (जन्मजन्मांतरांचें पाप), २ विक्षेपदोष (चित्ताची चंचलता), ३ आवरणदोष (स्वरूपाचें अज्ञान).

**अवस्था ३**—१ जाग्रत्, २ स्वप्न, ३ सुषुप्ति (देहाच्या व्यवहाराचे तीन काल).

**आत्मा ३**—१ ज्ञानात्मा (बुद्धि), २ महानात्मा (महत्तत्त्व), ३ शांतात्मा (शुद्ध ब्रह्म).

**आत्म्याचे भेद ३**—१ मिथ्यात्मा (स्थूलसूक्ष्मादि शरीर), २ गौणात्मा (पुत्र), ३ मुख्यात्मा (साक्षी [कूटस्थ]).

**आनंद ३**—१ ब्रह्मानंद (समाधींत आविर्भूत अथवा सुषुप्तिगत निजभूत आनंद), २ विषयानंद (जाग्रत्स्वप्नांत विषयांच्या प्राप्तिमुळें निमित्तानें एकाग्र झालेल्या चित्तामध्यें अनुभवास येणाऱ्या आनंदाचें क्षणिक प्रतिबिंब; यालाच लेशानंद आणि मात्रानंदही म्हणतात), ३ वासनानंद (सुषुप्तीपासून उत्थानानंतर उदासीन दशेंतील आनंदानुभव).

**एषणा ३**—१ पुत्रैषणा, २ वित्तैषणा, ३ लोकैषणा (हा सर्व लोक माझी स्तुति करोत, कोणी माझी निंदा न करोत अशी इच्छा अथवा परलोकाची इच्छा).

**करण ३**—१ मन, २ वाणी, ३ काया (हीं तीन कर्मांचीं साधनें होत).

**कर्म ३**—१ पुण्यकर्म, २ पापकर्म, ३ मिश्रकर्म.

**कर्म ३**—१ संचितकर्म (अनेक जन्मांत संचय केलेलें), २ आगामिकर्म (इहजन्मांत घडणारें), ३ प्रारब्धकर्म (वर्तमान जन्माच्या प्रारंभीचें).

**कर्मादि ३**—१ कर्म (वेदविहितकर्म), २ विकर्म (वेदविरुद्धकर्म), ३ अकर्म (वेदविहित आणि वेदविरुद्ध उभयविध कर्म न करणें).

**कर्तव्यादि ३**—१ कर्तव्य (करण्यास योग्य असें ज्ञानाचें साधन), २ ज्ञातव्य (जाणावयास योग्य ज्ञानाचा विषय [ब्रह्म आणि आत्मा यांचें एकत्व]), ३ प्राप्तव्य (प्राप्त करून घेण्यास योग्य मोक्ष हें ज्ञानाचें फल).

**काल ३**—१ वर्तमानकाल, २ भूतकाल, ३ भविष्यकाल.

**जाग्रत् ३**—१ जाग्रत् जाग्रत् (वर्तमानजाग्रतींत स्वरूपसाक्षात्कार), २ जाग्रत् स्वप्न (जाग्रतींत घडणारें भूत किंवा भविष्य ज्ञानींल मनोराज्य), ३ जाग्रत् सुषुप्ति (जाग्रतीमध्यें श्रमानें होणारी जडभूत वृत्ति).

**जीव ३**—१ परमार्थिकजीव ह्म० साक्षी [ कूटस्थ ] चेतन, २ व्यावहारिकजीव ह्म० साभास अंतःकरणरूप जीव, ३ प्रातिभासिकजीव ह्म० साभास अंतःकरणरूप व्यावहारिक जीवामध्यें स्वप्नांतील अध्यस्थ जीव. १ विश्व ( जाग्रतींतील तीन देहांचा अभिमानी जीव ), २ तैजस ( स्वप्नांतील स्थूल देहाभिमान्यास सोडून सूक्ष्म व कारण ह्या दोन देहांचा अभिमानी जीव ), ३ प्राज्ञ ( सुषुप्तींतील स्थूलसूक्ष्मदेहाभिमान्यास सोडून एक कारण देहाचा अभिमानी जीव ).

**ताप ३**—१ अध्यात्मताप ह्म० स्थूलसूक्ष्मशरीरास होणारीं आधिव्याधिदुःखें, २ अधिदैवताप ह्म० देवांकडून होणारीं शीत,उष्ण,अतिवृष्टि,अनावृष्टि इत्यादि दुःखें, ३ अधिभूतताप ह्म० स्वशरीराहून भिन्न चक्षुगोचरप्राण्यां [चोर, व्याघ्र, शत्रु इत्यादिकां ] च्या योगें घडणारीं दुःखें.

**नादादि ३**—१ नाद ( ॐकार किंवा शब्दगुण अथवा परापश्यंत्यादि चार वाणी ), २ बिंदु ( ॐकारानें अलक्ष्यार्थरूप तुरीयपद ), ३ कला ( ॐकाराच्या अकारादि मात्रा ह्मणजे परावाणीरूप अंश अर्थात शब्दांचे अवयव ).

**प्रपंच ३**—१ स्थूलप्रपंच ( कुटुंबपोषण ), २ सूक्ष्मप्रपंच ( कुटुंबपोषणाविषयांचें मनोराज्य ), ३ कारणप्रपंच ( परोपकारबुद्धि ).

**प्रारब्ध ३**—१ इच्छाप्रारब्ध, २ अनिच्छाप्रारब्ध, ३ परेच्छाप्रारब्ध.

**ब्रह्म ३**—१ विराट्, २ हिरण्यगर्भ, ३ ईश्वर.

**मूर्ति ३**—१ ब्रह्मा, २ विष्णु, ३ शिव.

**लोक ३**—१ स्वर्ग, २ मृत्यु, ३ पाताल.

**वादादि ३**—१ वाद ( परमार्थ निर्णयात्मक गुरुशिष्यसंवाद ), २ जल्प ( युक्तिप्रमाण कुशल पंडितांचा वाद ), ३ वितंड ( मूर्खांचा प्रमाणयुक्तिरहित वाद ).

**वादादिफल ३**—१ वादफल–परमानंद, २ जल्पफल–दुःख,३ वितंडफल पाप.

**वेदकांड ३**—१ कर्मकांड, २ उपासनाकांड, ३ ज्ञानकांड.

**शरीरें ३**—१ स्थूलशरीर २ सूक्ष्मदेह, ३ कारणदेह.

**श्रवणादि ३**—१ श्रवण, २ मनन, ३ निदिध्यास.

**श्रवणादिफल ३**—१ श्रवणफल–प्रमाणगत संशयाची निवृत्ति, २ मननफल–प्रमेयगत संशयाची निवृत्ति, ३ निदिध्यासफल–विपर्ययनिवृत्ति.

**सुषुप्त्यादि ३**—१ सुषुप्ति, २ मूर्च्छा, ३ समाधि.

**हेत्वादि ३**—१ हेतु, २ स्वरूप, ३ फल.

**ज्ञातादि ३**—१ ज्ञाता, २ ज्ञान, ३ ज्ञेय.

**ज्ञानप्रतिबंधक ३**—१ संशय, २ असंभावना, ३ विपरीतभावना.

**ज्ञानादि ३**—१ ज्ञान, २ वैराग्य, ३ उपशम.

## पदार्थ चतुर्विध ( ४ )

**अंतःकरण ४**—१ मन ( संकल्पविकल्पात्मक ), २ बुद्धि ( निश्चयात्मक ), ३ चित्त ( चिंतन-स्मरणात्मक ), ४ अहंकार ( अहंस्फूर्ति ).

**आर्तादिभक्त ४**—१ आर्त ( आध्यात्मादि दुःखानें व्याकूळ ), २ जिज्ञासु ( आत्मतत्त्व जाणण्याची इच्छा बाळगणारा ), ३ अर्थार्थी ( इहलोक अथवा परलोकभोगाची इच्छावान ) ४ ज्ञानी ( जीवन्मुक्त पुरुष ).

**आश्रम ४**—१ ब्रह्मचर्य, २ गृहस्थ, ३ वानप्रस्थ, ४ संन्यास.

**चित्तनिरोधयुक्ति ४**—१ अध्यात्मविद्या, २ साधुसंग, ३ वासनात्याग, ४ प्राणायाम.

**धर्मादि ४**—१ धर्म ( सकाम निष्काम पुण्य ), २ अर्थ ( इहपरलोकांतील भोगसाधन धनादिक ) ३ काम ( इहपरलोकांतील भोग ), ४ मोक्ष ( दुःखाची अत्यंत निवृत्ति आणि परमानंद सुखप्राप्ति.

**पुरुषार्थ ४**—१ धर्म, २ अर्थ, ३ काम, ४ मोक्ष.

**पूजापात्र ४**—१ ब्रह्मनिष्ठ, २ मुमुक्षु, ३ हरिदास, ४ स्वधर्मनिष्ठ.

**प्रमाण ४**—१ प्रत्यक्षप्रमाण, २ अनुमानप्रमाण, ३ उपमानप्रमाण, ४ शब्दप्रमाण.

**ब्रह्मविदादि ४**—१ ब्रह्मवित ( चतुर्थ भूमिकेवर आरूढ झालेला ज्ञानी ), २ ब्रह्मविद्वर ( पंचमभूमिकेवर आरूढ झालेला ज्ञानी ), ३ ब्रह्मविद्वरीयान् ( षष्ठ भूमिकेवर आरूढ झालेला ज्ञानी ), ४ ब्रह्मविद्वरिष्ठ ( सप्तम भूमिकेवर आरूढ झालेला ज्ञानी ).

**भूतग्राम ४**—१ जरायुज ( मनुष्य पश्वादिक ), २ अंडज ( पक्षि सर्पादिक ), ३ उद्भिज ( वृक्षादिक ), ४ स्वेदज ( पिसा ढेकुणादिक ).

**मैत्र्यादि ४**—१ मैत्री ( धनानें किंवा गुणांनीं समान अथवा ईश्वरभक्त किंवा कर्मोपासक यांच्याविषयीं " हे माझे आहेत ", अशी बुद्धि ), २ करुणा ( दुःखी

किंवा गुणानें निकृष्ट अथवा अज्ञजन किंवा जिज्ञासु ह्यांच्यावर दया ), ३ मुदिता ( पुण्यवान किंवा गुणवान अथवा ईश्वर किंवा मुक्त ह्यांच्यावर प्रीति ), ४ उपेक्षा (पापिष्ट किंवा अवगुणी अथवा द्वेषी किंवा पामर ह्यांच्यासंबंधीं रागद्वेषरहित उदासीनता)

**मोक्षद्वारपाल ४**—१ शम ( अंतरेंद्रिय निग्रह ), २ संतोष, ३ विचार ( विवेक ), ४ सत्संग.

**योगभूमिका ४**—१ वाणीलय, २ मनोलय, ३ बुद्धिलय, ४ अहंकारलय.

**वर्ण ४**— १ ब्राह्मण, २ क्षत्रिय, ३ वैश्य, ४ शूद्र.

**वर्तमानज्ञान प्रतिबंधक निवृत्ति हेतु ४**—१ शमादि ( हीं विषयासक्ति निवर्तक ), २ श्रवण ( हें बुद्धिमांद्य निवर्तक ), ३ मनन ( हें कुतर्क निवर्तक ), ४ निदिध्यास ( हें विपरीत भावनासंबंधी होणारा दुराग्रह निवर्तक ).

**वर्तमानज्ञान प्रतिबंध ४**—१ विषयासक्ति, २ बुद्धिमांद्य, ३ कुतर्क, ४ विपर्ययदुराग्रह.

**विवेकादि ४**—१ विवेक, २ वैराग्य, ३ षट्संपत्ति, ४ मुमुक्षुता.

**वेद ४**—१ ऋग्वेद, २ यजुर्वेद, ३ सामवेद, ४ अथर्ववेद.

**शब्दप्रवृत्ति निमित्त ४**—१ जाति, २ गुण, ३ क्रिया, ४ संबंध.

**संन्यास ४**—१ कुटीचक, २ बहूदक, ३ हंस, ४ परमहंस.

**समाधिविघ्न ४**—१ लय (निद्रालस्यादि), २ विक्षेप, ३ कषाय, ४ रसास्वाद.

**स्पर्श ४**—१ शीत, २ उष्ण, ३ कोमल, ४ कठिण.

## पदार्थ पंचविध ( ५ )

**अभाव ५**—१ प्रागभाव (कार्याच्या उत्पत्तीपूर्वी असलेला त्याचा अभाव), २ प्रध्वंसाभाव ( नाशानंतरचा अभाव ), ३ अन्योऽन्याभाव ( परस्परांहून परस्परांचा अभाव. जसा घटपटामधील परस्परांचा अभाव), ४ अत्यंताभाव (तिन्ही कालांतीक अभाव. जसें वायूचे ठायीं रूप ), ५ सामायिकाभाव ( क्वचित प्रसंगीं भूतलावर घटादींचा अभाव ) हा नास्ति प्रतीतीचा विषय होय.

**अज्ञानाचे भेद ५**—१ माया अविद्यारूप अज्ञान (कित्येक [विद्यारण्यस्वाम्यादि) अज्ञानाला माया [ समष्टि अज्ञानमय ईश्वराची उपाधि ] आणि अविद्या [ व्यष्टि अ-

ज्ञानमय जीवाची उपाधि ] रूप मानितात ). २ ज्ञानक्रियाशक्तिरूप अज्ञान ( कोणी कोणी अज्ञानाला ज्ञानशक्ति व क्रियाशक्ति असे मानितात ). ३ विक्षेप आवरणरूप अज्ञान ( कित्येक अज्ञानाला आवरण आणि विक्षेप [ यांना हेतुभूत शक्ति ] रूप मानितात ). ४ समष्टि व्यष्टिरूप अज्ञान ( कित्येक अज्ञानाला समष्टि [ ईश्वराची उपाधि ] आणि व्यष्टि [ जीवाची उपाधि ] रूप मानितात ). ५ कारणरूप अज्ञान ( कोणी कोणी अज्ञानाला जगताचे उपादानकारण ईश्वराच्या उपाधिरूप मूलप्रकृती मानितात, आणि त्या पक्षाचे त्याचा कार्य [ अंतःकरण ] उपाधिवान जीव मानिले आहेत ).

**उपवायु** ५—१ नाग ( उद्गाराचा हेतु ), २ कूर्म ( निमेष उन्मेषाचा हेतु ), ३ कृकल ( शिंकेचा हेतु ), ४ देवदत्त ( जांभईचा हेतु ), ५ धनंजय ( देहपोषणाचा हेतु ).

**कर्म** ५—१ नित्यकर्म ( ज्याचे सदा अनुष्ठान करावे लागते, जसे स्नानसंध्यादिक ). २ नैमित्तिक कर्म म्ह० कोणा निमित्ताने ज्याचे अनुष्ठान घडते असे ग्रहणश्राद्धादिक कर्म. ३ काम्य कर्म म्ह० कामनेकरिता विधान केलेले यज्ञयागादिक कर्म, ४ प्रायश्चित्त कर्म म्ह० पापाचे निवृत्तीसाठी विधान केलेले कर्म, ५ निषिद्ध कर्म म्ह० ब्रह्महत्यादिक न करण्यास सांगितलेले कर्म.

**कर्मेंद्रियें** ५—१ वाक्, २ पाणि, ३ पाद, ४ उपस्थ, ५ गुद.

**कोश** ५—१ अन्नमय, २ प्राणमय, ३ मनोमय, ४ विज्ञानमय, ५ आनंदमय.

**क्लेश** ५—१ ( अविद्या [१] दुःखाचे ठायीं सुखबुद्धि [२] अनात्म्याच्या ठिकाणीं आत्मबुद्धि [३] अनित्यामध्यें नित्यत्वबुद्धि [४] अशुचीत शुचित्वबुद्धि. ह्या चारी प्रकारची कार्याविद्या होय ), २ अस्मिता ( साक्षी [ आत्मा ] आणि बुद्धि यांच्या ऐक्यतेचें ज्ञान म्हणजे सामान्य अहंकार ), ३ राग ( दृढ आसक्ति म्हणजे अत्यंत प्रीति ), ४ द्वेष ( क्रोध ), ५ अभिनिवेश ( मरणाचें भय ).

**जीवन्मुक्ती प्रयोजन** ५—यद्यपि जीवन्मुक्ति ज्ञान्याला सिद्ध आहेच; तथापि येथें जीवन्मुक्ति या शब्दानें जीवन्मुक्तीच्या विलक्षण आनंदाची अवस्था पंचम्यादि भूमिकेचें ग्रहण होय. यांचें प्रयोजन म्ह० त्याची फळें पांच प्रकारचीं आहेत:— १ ज्ञानरक्षा म्हणजे एकदा उत्पन्न झालेल्या बोधाचा नाश होत नाहीं, तथापि येथें निरंतर ब्रह्माकारवृत्तीची जी स्थिति ती ज्ञानरक्षा होय, २ तप म्ह० मन आणि इंद्रियें यांची एकाग्रता; किंवा शरीर, वाणी आणि मन यांचा संयम, ३ विसंवादा-

भाव ह्म० जल्प व वितंड ह्या वादांचा अभाव. ४ दुःखनिवृत्ति ह्म० दृष्ट [ प्रत्यक्ष ] दुःखाची निवृत्ति, ५ सुखप्राप्ति म्ह० निरावरण, परिपूर्ण व सजातीयवृत्तिरूप जीवन्मुक्तीच्या विलक्षण आनंदाची प्राप्ति.

**दृष्टांत ५-जगत् मिथ्यत्वाविषयीं दृष्टांत पंचविध आहेत, ते असेः-** १ शुक्तिरजतन्याय ह्मणजे शिंपीचे ठायीं रौप्याचा आभास, २ रज्जुसर्पन्याय ह्मणजे रज्जूवर सर्पाचा भास, ३ स्थाणुचोरन्याय ह्मणजे स्थाणूच्या ( खोडाच्या ) ठिकाणीं चोराचा भास, ४ खपुष्पन्याय ह्मणजे आकाशामध्यें पुष्पाच्या किंवा नीलतेचा चा आभास, ५ मृगजलन्याय ह्मणजे माध्यान्हकालीं मरुभूमीवर प्रतिबिंबित किरणांचा आभास.

**नियम** ५—१ शौच, २ संतोष, ३ तपश्चर्या, ४ स्वाध्याय ( वेदाचें किंवा गीतादिकांचें नित्य पठण ), ५ ईश्वरप्रणिधान ( ॐकारादि ईश्वर उपासना ).

**प्रलय** ५—१ नित्यप्रलय ( क्षणोक्षणीं दीपकाप्रमाणें सर्व कार्यांचा नाश किंवा सुषुप्ति ), २ नैमित्तिक प्रलय ( ब्रह्माच्या रात्रिरूप निमित्तानें भूरादि खालील तीन लोकांचा नाश ), ३ दिनप्रलय ( ब्रह्मीच्या दिवसांत जीं चौदा मन्वंतरें होतात, त्या प्रत्येकाचा नाश, याला अवांतर प्रलय व मन्वंतर प्रलय ह्मणतात. कोणी कोणी तर याला नैमित्तिकप्रलय ह्मणतात ), ४ महाप्रलय ( ब्रम्ह्याच्या शंभर वर्षानंतर ब्रह्मदेवासहित सर्व भूतांचा नाश ), ५ आत्यंतिकप्रलय ( ज्ञानानें होणारा कारणासहित सकल जगताचा बाध म्हणजे अत्यंत निवृत्ति ).

**प्राणादि** ५—१ प्राण, २ अपान, ३ व्यान, ४ उदान, ५ समान.

**ब्रम्ह्याचे अंश** ५—१ अस्ति, भाति, ३ प्रिय, ४ नाम, ५ रूप.

**भेद** ५—१ जीवईश्वराचा भेद, २ जीवजीवाचा भेद, ३ जीवजडाचा भेद, ४ ईशजडाचा भेद, ५ जडजडाचा भेद.

**भ्रम** ५—१ भेदभ्रम, २ कर्तृत्वभ्रम, ३ संगभ्रम, ४ विकारभ्रम, ५ सत्यत्वभ्रम.

**भ्रम निवर्तक दृष्टांत** ५—१ बिंबप्रतिबिंबाच्या दृष्टांतानें " भेदभ्रमा " ची निवृत्ति, २ लोहितस्फटिका ( स्फटिकाचे ठायीं लाल रंगाच्या प्रतीती ) च्या दृष्टांतानें " कर्तृत्व भोक्तृत्व " तेची निवृत्ति, ३ घटाकाशाच्या दृष्टांतानें " संग-

भ्रांती " ची निवृत्ति, ४ रज्जुसर्पाच्या दृष्टांतानें " विकारभ्रांती " ची निवृत्ति, ५ कनककुंडलाच्या दृष्टांतानें जगाच्या " सत्यत्वभ्रांती " ची निवृत्ति.

**महायज्ञ** ५—१ देव, २ ऋषि, ३ पितर, ४ मनुष्य, ५ भूतयज्ञ.

**यम** ५—१ अहिंसा, २ सत्य, ३ ब्रह्मचर्य, ४ अपरिग्रह ( निर्वाहापेक्षां अधिकांचा असंग्रह ), ५ अस्तेय ( चोरीचा अभाव ).

**योगभूमिका** ५—१ क्षेप ( रागद्वेषानें चित्ताची चंचलता ), २ विक्षेप ( बहिर्मुख चित्ताची कदाचित् ध्यानयुक्तता ), ३ मूढ ( निद्रा आळसादि युक्त ), ४ एकाग्र, ५ निरोध.

**वचनादि** ५—१ वचन, २ आदान, ३ गमन, ४ रति, ५ मलत्याग.

**शब्दादि** ५—१ शब्द, २ स्पर्श, ३ रूप, ४ रस, ५ गंध.

**स्थूलभूतें** ५—१ आकाश, २ वायु, ३ तेज, ४ जल, ५ पृथ्वी.

**ज्ञानेंद्रियें** ५—१ श्रोत्र, २ त्वचा, ३ चक्षु, ४ जिव्हा, ५ घ्राण

## पदार्थषड्विध ( ६ ).

**अजिव्हत्वादि** ६—यति ( संन्यासी ) चे धर्मविशेष—१ अजिव्हत्व ( रसनेच्या विषयासक्तीपासून रहितता ), २ नपुंसकत्व ( लहान मुली, नवयौवना [ सोळा वर्षांची ] स्त्री आणि वृद्धस्त्री यांच्याविषयीं समता म्हणजे विकाररहितता ), ३ पंगुत्व ( एका दिवसांत योजनापेक्षा अधिक न जाणें ), ४ अंधत्व ( एका धनुष्यापेक्षां अधिक दृष्टीचें अप्रसरण ), ५ बधिरत्व ( व्यर्थालापाचें अश्रवण ), ६ मुग्धत्व ( व्यवहारांत मूढता ).

**अनादिपदार्थ** ६—उत्पत्तिरहित पदार्थ—१ जीव, २ ईश्वर, ३ शुद्धचेतन, ४ अविद्या, ५ चेतनअविद्यासंबंध, ६ यांचे भेद.

**अरिवर्ग** ६—परलोकाचा विरोधी—१ काम ( प्राप्तवस्तूच्या भोगाची इच्छा ), २ क्रोध ( द्वेष ), ३ लोभ ( अप्राप्त वस्तूच्या प्राप्तीची इच्छा ), ४ मोह ( आत्मानात्म्याचा किंवा शुभकार्याचा अथवा अशुभकार्याचा अविवेक ), ५ मद ( गर्व किंवा अहंकार ), ६ मत्सर ( लोकांच्या उत्कर्षाची असहिष्णुता. )

**अवस्था** ६—स्थूल शरीराचे काल—१ शिशु ( एक वर्षाच्या शरीराचा काळ २ कौमार ( पांच वर्षांच्या शरीराचा काल ), ३ पौगंड ( सहापासून दहावर्षांपर्यंत-

चा काल ), ४ किशोर ( अकरापासून पंधरावर्षांपर्यंतचा काल ), ५ यौवन ( सोळा वर्षांपासून चाळीस वर्षांपर्यंतचा काल ), ६ जरा ( चाळीसांपासून नंतरच्या शरीराचा काल ).

**ईश्वराचे भाग ६**—१ समग्र ऐश्वर्य, २ समग्र धर्म, ३ समग्र यश, ४ समग्र श्री, ५ समग्र ज्ञान, ६ समग्र वैराग्य.

**ऊर्मि ६—संसाररूप समुद्राच्या लहरी**—१ जन्म, २ मरण, ३ क्षुधा, ४ तृषा, ५ हर्ष, ६ शोक.

**कर्म--नित्यकर्म**—१ स्नान, २ जप, ३ होम, ४ अर्चन म्हणजे देवपूजन, ५ आतिथ्य म्ह० भोजनसमयीं आलेल्या अभ्यागतास अन्नदान, ६ वैश्वदेव म्ह० अग्नीमध्यें द्रव्यांचा होम.

**कौशिक ६—अन्नमयकोश ( शरीरा )चे ठायीं असणारे पदार्थ**—१ त्वचा २ मांस, ३ रुधिर, ४ मेद, ५ मज्जा, ६ अस्थि.

**भ्रम ६**—१ कुळ, २ गोत्र, ३ जाति, ४ वर्ण, ५ आश्रम, ६ नाम.

**रस ६**—१ मधुर, २ आम्ल, ३ लवण, ४ कटु, ५ कषाय ६ तिक्त.

**लिंग ६--वेदवाक्यांचें तात्पर्यनिश्चयात्मक लिंग**—१ उपक्रमोपसंहार ( आदि व अंत यांची एकरूपता ), २ अभ्यास (वारंवार पठन), अपूर्वता ( अलौकिकता ), ४ फल ( मोक्ष ), ५ अर्थवाद (स्तुति), ६ उपपत्ति ( अनुकूल दृष्टांत

**विकार ६**—१ जन्म, २ अस्तित्व, ३ वृद्धि, ४ विपरिणाम, ५ अपक्षय ६ विनाश.

**वेदांग ६**—१ शिक्षा, २ कल्प, ३ व्याकरण, ४ निरुक्त, ५ छंद, ६ ज्योतिष.

**शमादि ६**—१ शम, २ दम, ३ उपरति, ४ तितिक्षा, ५ श्रद्धा, ६ समाधान.

**शास्त्र ६**—१ सांख्य, २ योग, ३ न्याय, ४ वैशेषिक, ५ पूर्वमीमांसा, ६ उत्तरमीमांसा.

**समाधि ६**—१ बाह्य दृश्यानुविद्ध समाधि, २ अंतर दृश्यानुविद्ध समाधि, ३ बाह्य शब्दानुविद्ध समाधि, ४ अंतर शब्दानुविद्ध समाधि ५ बाह्य निर्विकल्प समाधि ६ अंतर निर्विकल्प समाधि.

**सूत्र ६**—१ जैमिनीय सूत्र, २ आश्वलायनसूत्र, ३ आपस्तंबसूत्र, ४ बौद्धायनसूत्र, ५ कात्यायनसूत्र, ६ वैखानसीयसूत्र.

**ज्ञानभूमिका** ७—१ शुभेच्छा, २ सुविचारणा, ३ तनुमानसा, ४ सत्वापत्ति, ५ असंसक्ति, ६ पदार्थाभाविनी, ७ तुरीयगा.

## पदार्थ अष्टविध (८).

**पाश** ८—१ दया, २ शंका, ३ भय, ४ लज्जा, ५ निंदा, ६ कुल, ७ शील, ८ धन.

**पुरी** ८—१ ज्ञानेंद्रियपंचक, २ कर्मेंद्रियपंचक, ३ अंतःकरणचतुष्टय, ४ प्राणादिपंचक, ५ भूतपंचक, ६ काम, ७ त्रिविधकर्म, ८ वासना.

**प्रकृति** ८—१ पृथ्वी, २ जल, ३ अग्नि, ४ वायु, ५ आकाश, ६ मन ( येथें मन शब्दानें समष्टिमनरूप अहंकाराचें ग्रहण ), ७ बुद्धि ( येथें बुद्धि शब्दानें समष्टिबुद्धिरूप महत्तत्त्वाचें ग्रहण ), ८ अहंकार ( येथें अहंकार शब्दानें महत्तत्त्वाहून पूर्व शुद्ध अहंकाराच्या कारणअज्ञानरूप मूलप्रकृतीचें ग्रहण ).

**ब्रह्मचर्यांगें** ८—१ स्त्रीदर्शन, २ स्पर्शन, ३ केलि, ४ कीर्तन, ५ गुह्यभाषण, ६ संकल्प ( चिंतन ), ७ निश्चय, ८ क्रियाजन्यसुख. (ह्या अष्ट प्रकारच्या मैथुनांहून विपरीत ).

**मद** ८—१ कुलमद, २ शीलमद, ३ धनमद, ४ रूपमद, ५ यौवनमद, ६ विद्यामद, ७ तपमद, ८ राज्यमद.

**शब्दशक्तिग्रहण हेतु** ८—१ व्याकरण, २ उपमान, ३ कोश, ४ आप्तवाक्य, ५ वृद्धव्यवहार, ६ वाक्यशेष, ७ विवरण, ८ सिद्धपदार्चा सन्निधि.

**समाधिअंग** ८—१ यम, २ नियम, ३ आसन, ४ प्राणायाम, ५ प्रत्याहार, ६ धारणा, ७ ध्यान, ८ सविकल्प समाधि.

## पदार्थनवविध ( ९ ).

**तत्त्व ९—कित्येक विद्वानांच्या मतांत लिंगदेहाचीं नऊ तत्त्वें मानिलेलीं आहेतः**—१ श्रोत्र, २ त्वचा, ३ चक्षु, ४ जिव्हा, ५ घ्राण, ६ मन, ७ बुद्धि, ८ चित्त, ९ अहंकार.

**संसार** ९—१ ज्ञाता, २ ज्ञान, ३ ज्ञेय; ४ भोक्ता, ५ भोग्य, ६ भोग; ७ कर्ता, ८ करण, ९ क्रिया.

## पदार्थ दशविध ( १० ).

**नाडी** आणि **देवता** १०—१ इडा–चंद्र ( वामनासिकागत चंद्रनाडी–अधिष्ठात्री देवता–हरि ), २ पिंगला–सूर्य ( दक्षिण नासिकागत सूर्यनाडी–अधिष्ठात्री देवता–ब्रह्मा ), ३ सुषुम्ना–मध्यमा ( नासिकेच्या मध्यगत नाडी–अधिष्ठात्री देवता–रुद्र ), ४ गांधारी ( दक्षिण नेत्र–देवता इंद्र ), ५ हस्तिजिव्हा ( वाम नेत्र–देवता वरुण ), ६ पूषा ( दक्षिणकर्ण–देवता ईश्वर ), ७ यशस्विनी ( वामकर्ण–ब्रह्मा ), ८ कुहू ( गुदा–पृथ्वी ), ९ अलंबुषा ( मेढ्र–सूर्य ), १० शंखिनी ( नाभि–चंद्र )

**शृंगारादि रस** १०–शृंगार रस, २ वीर रस, ३ करुण रस, ४ अद्भुत रस, ५ हास्य रस, ६ भयानक रस, ७ बीभत्स रस, ८ रौद्र रस, ९ शांति रस, १० प्रेमभक्ति किंवा ज्ञान रस.

## पदार्थ एकादशविध ( ११ ).

**ज्ञानसाधन** ११—१ विवेक, २ वैराग्य, ३ षट्संपत्ति, ४ मुमुक्षुता, ५ गुरूपसत्ति ( विधिपूर्वक सद्गुरूला शरण जाणें ), ६ श्रवण, ७ तत्त्वज्ञानाभ्यास, ८ मनन, ९ निदिध्यास, १० मनोनाश ( येथें मनशब्देंकरून रजतमानें सत्त्वगुणाचें तिरस्काररूप मनाचा स्थूलभाव म्हटला आहे. त्याचा नाश म्हणजे ब्रह्माभ्यासाच्या बळानें रजतमाचें तिरस्कारेंकरून सत्त्वगुणाचा अविर्भाव ), ११ वासनाक्षय.

## पदार्थ द्वादशविध ( १२ ).

**अनात्मधर्म** १२—१ अनित्य, विनाशी, ३ अशुद्ध, ४ नाना, ५ क्षेत्र, ६ आश्रित, ७ विकारी, ८ परप्रकाश, ९ हेतुमान, १० व्याप्य–परिच्छिन्न ( देशकालवस्तुकृत परिच्छेदवान् ), ११ संगी, १२ आवृत.

**आत्म्याचे धर्म** १२—१ नित्य ( उत्पत्तिनाशरहित ), २ अव्यय ( वृद्धि क्षयाहूनरहित ), ४ एक (सजातीय भेदरहित), ५ क्षेत्रज्ञ (शरीररूप क्षेत्राचा ज्ञाता), ६ आश्रय ( अधिष्ठान ), ७ अविक्रय ( अविकारी ), ८ स्वप्रकाश ( आपल्या प्रकाशीसंबंधीं अन्य प्रकाशाची अपेक्षारहित असून सर्वांचा प्रकाशक ), ९ हेतु (इतस्ततः पसरलेल्या ऊर्णनाभीच्या जाळ्याप्रमाणें, आणि नख, रोमांचें कारण पुरुषाप्रमाणें जगाचें अभिन्ननिमित्त [ विवर्त ] उपादान कारण होय ), १० व्यापक ( अ-

परिच्छिन्न परिपूर्ण ), ११ असंगी ( सजातीय, विजातीय व स्वगतसंबंध रहित ), १२ अनावृत्त ( सर्वथा आवरणाहून रहित ).

**ब्राह्मणाचे व्रत १२**—१ ज्ञान, २ सत्य, ३ शम, ४ दम, ५ श्रुत ( शास्त्राभ्यास ), ६ अमात्सर्य ( परक्यांच्या उत्कर्षाची असहिष्णुतारूप मत्सर, त्याहून रहितपणा ), ७ लज्जा, ८ तितिक्षा, ९ अनसूया ( गुणांचे ठायीं दोषारोपरूप असूयाहून रहितता ), १० यज्ञ, ११ दान, १२ धैर्य ( कामक्रोधाच्या वेगाचा प्रतिबंध ).

**महत्ता हेतुधर्म १२**—१ धनाढ्यता, २ अभिजन-कुटुंब, ३ रूप, ४ तप, ५ श्रुत, ६ ओज ( इंद्रियांचे तेज ), ७ तेज, ८ प्रभाव, ९ बल, १० पौरुष, ११ बुद्धि, १२ योग.

## पदार्थ त्रयोदशविध ( १३ ).

**भागवतधर्म १३ भगवद्भक्तांचे धर्मः**—१ सकाम कर्मांच्या फलाचें विपरीत दर्शन, २ धन, गृह पुत्रादिकांविषयीं दुःखबुद्धि व चलबुद्धि, ३ परलोकाविषयीं नश्वरबुद्धि, ४ शब्दब्रह्म व परब्रह्म यांविषयीं कुशल गुरुप्रति गमन, ५ गुरूचे ठायीं ईश्वरबुद्धि आणि निष्कपट सेवा, ६ परमेश्वराचे ठायीं सर्व कर्म समर्पण, ७ भक्तिवैराग्यासहित स्वरूपानुभव, साधुसंग; ८ स्वाध्याय, आर्जव ( सरळस्वभाव ), ९ ब्रह्मचर्य, अहिंसा आणि द्वंद्वसमत्व ( शीत-उष्णादिक द्वंद्वधर्म सहन करण्याचा स्वभाव ), १० सर्वत्र आत्मरूप ईश्वराचें दर्शन, ११ कैवल्य ( एकाकी असणें ), अनिकेतता ( गृह न बांधणें ), एकांत ( विविक्त ), चीरवस्त्र, संतोष; १२ सकल भूतांचे ठायीं आत्म्याच्या भगवद्भावाचें दर्शन, आणि भगवद्रूप आत्म्याचे ठायीं सर्व भूतांचें दर्शन; १३ जन्मकर्म वर्णाश्रमादिक देहाचे ठायीं निरभिमानाचा आणि स्वपरबुद्धीचा अभाव.

**॥ इति वेदांतपदार्थसंज्ञा अथवा लघुवेदांतकोशः समाप्तः ॥**

देवकिन्नरगंधर्वाः पितरो यक्षचारणाः । मुनयोऽपि न जानंति गुरुशुश्रूषणाविधिः ॥१९
महाहंकारगर्वेण विद्यातपबलान्विताः । संसारकुहरावर्ते घटयंते घटो यथा ॥ २० ॥
न मुक्ता देव गंधर्वाः पितरो यक्षकिन्नराः । ऋषयः सर्वसिद्धाश्च गुरुसेवापराङ्मुखाः ॥
ध्यानं शृणु महादेवि सर्वानंदप्रदायकं । सर्वसौख्यकरं नित्यं भुक्तिमुक्ति विशारदं ॥२२॥
नित्यं शुद्धं निराभासं निराकारं निरंजनं । नित्यबोधचिदानंदं गुरुं ब्रह्म नमाम्यहम् ॥
हृदंबुजे कर्णिकमध्यसंस्थं । सिंहासने संस्थितदिव्यमूर्तिं ॥
ध्यायेद्गुरुं चंद्रकलाप्रकाशं । सच्चित्सुखाभीष्टवरं दधानं ॥ २४ ॥
यस्मिन् सृष्टिस्थितिध्वंसं निधान निग्रहात्मकं । कृत्यं पंचविधं शश्वद्भासते तं नमः शिवं ॥
एवंविधं गुरुं ध्यात्वा ज्ञानमुत्पद्यते स्वयं । तदा गुरुप्रसादेन मुक्तोऽहमिति भावयेत् ॥
गुरुणा दर्शिते मार्गे मनःशुद्धिं चकारयेत् । अनित्यं खंडयेत्सर्वं यत्किंचिदात्मगोचरम् ॥
एवं श्रुत्वा महादेवि गुरोर्निंदा करोति यः । स याति नरकं घोरं यावच्चंद्रदिवाकरौ ॥
श्रुतिस्मृतीच विज्ञाय केवलं गुरुसेवया । तेवै संन्यासिनः प्रोक्ता इतरे वेषधारिणः ॥
नित्यं ब्रह्मनिराकारं निर्गुणंबोधयेत्परं । पूर्णानंदनिराभासं दीपोदीपांतरं यथा ॥ ३० ॥
गुरुकृपाप्रसादेन आत्मारामोहि लभ्यते । अनेन गुरुमार्गेण स्वात्मज्ञानं प्रवर्तते ॥३१॥
आब्रह्मस्तंभपर्यंतं परमात्मस्वरूपकं । स्थावरं जंगमं चैव प्रणमामि जगन्मयम् ॥
वंदेऽहं सच्चिदानंदं भेदातीतं श्रीसद्गुरुं । नित्यपूर्णंनिराकारं निर्गुणं स्वात्मसंस्थितं ॥
परात्परतरं ध्येयं नित्यमानंदकारकं । हृदयाकाशमध्यस्थं शुद्धस्फटिकसन्निभं ॥ ३४ ॥
स्फटिके प्रतिबिंबरूपं दृश्यते दर्पणे यथा । तदात्मानं चिदाकारमानंदं सोऽहमित्युत ॥
अंगुष्ठमात्रं पुरुषं ध्यायते चिन्मयं हृदि। तत्र स्फुरति यो भावः श्रुत्वा तं कथयाम्यहं ॥
अगोचरं तथागम्यं रूपनामादिवर्जितं । निःशब्दंतु विजानीयात्स्वभावं ब्रह्म पार्वति ॥
यथा निजस्वभावेन कर्पूरकुंकुमादिकं । शीतोष्मादि स्वभावेन तथा ब्रह्मच शाश्वतं ॥
स्वयं सर्वमयो भूत्वा स्वातंत्र्यं यत्र कुत्रचित् । कीटो भृंगइवध्यानं यथा भवति तादृशं ॥
गुरुध्यानं तथा नित्यं देही ब्रह्ममयो भवेत् । पिंडे पदे तथा रूपे मुक्तासौ नात्र संशयः ॥

